# भगवान् श्रीकृष्ण

'भगवान् श्रीकृष्ण' या विषयावर
श्री. बाळशास्त्री हरदास यांचीं
दि. २६-३-१९५२ ते २६-४-१९५२ पर्यंत
पुणें येथें
झालेलीं व्याख्यानें

# प्रास्ताविक

नागपूर येथील सुप्रसिद्ध विद्वान् साहित्यिक साहित्याचार्य श्री. बाळशास्त्री हरदास यांचीं मागील वर्षी ठरल्याप्रमाणें या वर्षी भगवान् श्रीकृष्ण या विषयावर व्याख्यानें झाली. त्यांना सुरुवात चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या मुहूर्तावर ( दि. २६–३–५२ ) रोजीं होऊन ती महिनाभर चालून अक्षय्य तृतीयेला ( दि. २६–४–५२ ) परिसमाप्त झाली. एकंदर व्याख्यानें २८ झालीं. हीं व्याख्यानें म्हणजे त्यांच्या महाभारतावरील व्याख्यानांची पुरवणीच होय.

भगवान् श्रीकृष्ण यांच्या चारित्राशिवाय महाभारतांतील विषयाची परिपूर्ति होऊंच शकत नाही. महाभारत व भगवान् श्रीकृष्ण यांवरील व्याख्यानांनी मिळून भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचें एक महत्त्वाचें दर्शन श्री. बाळशास्त्री हरदासांनीं पुणेंकरांना घडविलें आहे. त्यांच्या रामायण-महाभारतावरील या तीन व्याख्यानमालांनीं लोकांना भारताच्या सांस्कृतिक इतिहासाची एक नवी दृष्टि दिली असून राज्यशास्त्राच्या व समाज-शास्त्राच्या अभ्यासाला त्यायोगें विशेष चालना मिळाली आहे. सूक्ष्म दृष्टि, सखोल अभ्यास व प्रभावी वक्तृत्व यांमुळें त्यांचीं व्याख्यानें अतिशय परि-णामकारक होतात. तीं त्यांजकडून लिहवून घेऊन ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्यात मला विशेष आनंद होत आहे.

या पुस्तकांत घातलेलें चक्रधारी भगवान् श्रीकृष्णांचें चित्र श्री. मनोहर नारायण सबनीस यांच्या कृपेनें मिळालें आहे.

**विजयादशमी**
शक १८७४
दि. २८-९–५२

**प्रकाशक**

# अनुक्रमणिका

# अर्पण-पत्रिका

माझ्यांत जें कांहीं चांगलें असेल तें, ज्यांच्या
कृपाप्रसादाचें फळ आहे ते माझे परमपूज्य गुरुदेव.
श्री. अप्रबुद्ध
म. म. पंडित कृष्णशास्त्री घुले,
व वेदान्तवाचस्पति पं. भाऊशास्त्री वझे
यांच्या चरणांना वंदन करून हा ग्रंथ मी
राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे सरसंघचालक व
हिंदुराष्ट्र निर्माण करण्यासाठीं बद्धपरिकर
झालेले महान् तपस्वी प. पू.
श्री. माधवरावजी गोळवलकर
गुरुजी यांना समर्पण
करीत आहे.

बाळशास्त्री हरदास

# प्रार्थना

होत्राग्निहौत्राग्निहविष्यहोतृ-
होमादिसर्वस्थितिभासमानम् ।
यद्ब्रह्मतद्बोधवितारिणीभ्यां
नमो नमः श्रीगुरुपादुकाभ्याम् ॥

होमप्रमुख्यैर्जगति द्विजाद्याः
कर्मव्रजैर्भक्तिवितानवन्तः ।
पश्यन्ति यत्तत्फलदायिकाभ्यां
नमो नमः श्रीगुरुपादुकाभ्याम् ॥

हिरण्यगर्भाधिकबोधदाभ्यां
शरण्यसंघातशिरोमणिभ्याम् ।
चिन्तामणिभ्यां नतमानसानां
नमो नमः श्री[illegible]दुकाभ्याम् ॥

नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे
फुल्लारविन्दायतपत्रनेत्र ।
येन त्वया भारततैलपूर्णः
प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥

प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।
ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥



पीतकौशेयसंवीतो मणिश्यामो जनार्दनः ।
शुशुभे विद्रवन् भीष्मं विद्युन्माली यथाम्बुदः ॥

# प्रास्ताविक

नव्या संवत्सराच्या आरंभदिनीं पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या दिव्य जीवनाचें चिंतन करण्याची संधि मला मिळाली हें मी माझें भाग्य समजतों. पुण्याच्या वाक्पीठाचा अधिकार इतका थोर आहे कीं, पूर्णावतार श्रीकृष्णांच्या संबंधींचें माझें विवेचन येथें मांडावयास धजतांना माझें मन मागच्या दोन व्याख्यानमालांच्यापेक्षांही या वेळीं अधिकच कंपित होत आहे. भगवान् श्रीकृष्णांना पूर्ण परब्रह्माचा मानवदेहधारी आविष्कार मानतात. त्यांच्या त्या विशिष्ट परमेश्वरी अवस्थेसमोर 'वेदही मौनावले' अशी श्रीतुकाराम महाराजांनी साक्ष दिली आहे. वाणी आणि मन यांच्या क्षितिजापलीकडच्या या विषयाला हात घालण्याइतकी दिव्य प्रतिभा माझ्या जवळ नाहीं. अशा स्थितींत केवळ मनाला आणि वाणीला पावित्र्य यावें यासाठींच मी हा विषय मांडणार आहें. महाराष्ट्राच्या या सांस्कृतिक केंद्रांतील आपणांसारख्या विचक्षणांना श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या शब्दांत

**जैसा स्वभाव मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा ।**
**तरी अधिक तयाचा । संतोष आथी ॥ ६४**
**तैसा तुम्हीं मी अंगीकारिला । सज्जनी आपुला म्हणितला ।**
**तरी उणें सहजें उपसाहला । प्रार्थूं काई ॥ ६५**

—ज्ञानेश्वरी अ. १.

अशी अभ्यर्थना करून व मला संभाळून घ्यावें अशी विनंति करून मी माझ्या विषयाकडे वळतों.

## श्रीकृष्णांचें विभूतिमत्त्व

ही व्याख्यानमाला जरी भगवान् श्रीकृष्णांवर असली तरी ती माझ्या मागच्या व्याख्यानमालेचा उत्तरार्ध आहे व त्याच दृष्टीनें मी तिची मांडणी करणार आहें. त्यामुळें विशाल व व्यापक

---

व्याख्यान १ लें, दि. २६।३।५२.

अशा भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्रांतील एका विशिष्ट भागाचाच खरोखरी येथें उलगडा करण्याचा प्रयत्न होईल. भारतवर्षाच्या अनादिकालापासून चालत आलेल्या विशाल राष्ट्रजीवनांत भगवान् श्रीकृष्णांच्या विभूतिमत्त्वाचा खोलवर ठसा उमटलेला असून त्या राष्ट्रजीवनाची सर्व अंगें त्या विभूतिमत्त्वानें व्यापलेलीं आहेत यशस्वी मुत्सद्दी, विजयी योद्धा, धर्मसाम्राज्याचा निर्माता, मानवी जीवनाची विकसनपरंपरा ज्यामुळें टिकून राहील अशा शाश्वत जीवनमूल्यांचा आणि तत्त्वज्ञानाचा महान् द्रष्टा, या बौद्धिक व व्यावहारिक क्षेत्रांपासून तर पूर्णावतार,भावजगताचे सम्राट् इत्यादि विशेषणांनी आध्यात्मिक व आंतरिक जीवनांतीलही सर्व सांधी-कोपरे भगवान् श्रीकृष्णांनीं व्यापले आहेत. कोणत्याही दृष्टिकोनां-तून पाहिलें तरी विलक्षण गुंतागुंतीचें व गूढ असें त्यांचें चरित्र पाहून मन स्तिमित होतें. कांहीं कांहीं विषय असे असतात कीं, शब्दांच्या स्पर्शानेंच त्यांचें सौंदर्य व त्यांची कोमलता कोमेजते. श्रीकृष्णांना वाणीनें कवळण्याच्या प्रयत्नांतही हीच भीति वाटल्यावांचून राहात नाहीं. त्यांच्या जीवनाच्या अगदीं व्यावहारिक आविष्काराकडे जरी पाहिलें तरी गूढाचा डोंगर डोळ्यासमोर उभा राहून त्यांतून सुटका होणें अशक्य होऊन बसतें. दिग्दर्शनापुरतींच अशीं कांहीं स्थळें मी आपणांस सांगतों.

## चरित्रांतील गूढत्व

महाभारताच्या आश्वमेधिक पर्वात अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रानें मेलेल्या राजा परीक्षितीला भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या साम-र्थ्याच्या प्रभावानें जीवदान दिल्याचें वर्णन आहे. परीक्षिति हा पांडवांचा वंशतंतु असल्यामुळें त्याला मरूं न देणें ही गोष्ट अत्यंत आवश्यक होती. तेवढ्याचसाठीं व्यासांच्या आश्रमांत अश्वत्थाम्यानें उत्तरेच्या गर्भावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग करण्याचें आपलें मनोगत व्यक्त केलें तेव्हां तुझे मनोरथ मी विफल करीन असें श्रीकृष्णांनीं त्याला सांगितलें होतें. आपल्या निश्चयानुसार त्यांनीं त्याला जिवंत केलें. पण त्यासाठीं त्यांनीं जीं साधनें वापरलीं तीं स्थूल दृष्टीच्या

व्यक्तीला तरी विस्मयाचा धक्का देणारीं वाटतील. अंतःपुरांतील क्रोलाहल ऐकून श्रीकृष्ण उत्तरेच्या राहण्याच्या ठिकाणीं आले. त्यानंतर त्यांच्या क्रियायोगाचें वर्णन करतांना महाभारतकार म्हणतात :—

श्रुत्वा स तस्या विपुलं विलापं पुरुषर्षभः ।
उपस्पृश्य ततः कृष्णो ब्रह्मास्त्रं प्रत्यसंहरत् ॥ १६
प्रतिजज्ञे च दाशार्हः तस्य जीवितमच्युतः ।
अब्रवीच्च विशुद्धात्मा सर्वं विश्रावयन् जगत् ॥ १७
न ब्रवीम्युत्तरे मिथ्या सत्यमेतद् भविष्यति ।
एष संजीवयाम्येनं पश्यतां सर्वदेहिनाम् ॥ १८
नोक्तपूर्वं मया मिथ्या स्वैरेष्वपि कदाचन ।
न च युद्धात्परावृत्तः तथा संजीवतामयम् ॥ १९
इत्युक्तो वासुदेवेन स बालो भरतर्षभ ।
शनैः शनैर्महाराज प्रास्पंदत सचेतनः ॥ २४

—महाभारत आश्वमेधिक पर्व, अ. ६९

## बाह्यतः विसंवाद

"उत्तरेचा विपुल विलाप ऐकून भगवान् श्रीकृष्णांनीं आचमन केलें व ब्रह्मास्त्राचा उपसंहार केला. त्याला जिवंत करण्याची प्रतिज्ञा त्यांनीं पुन्हां उच्चारिली. विशुद्धात्मा भगवान् सर्वांसमोर म्हणाले : उत्तरे, मी खोटें बोलत नाही. माझी प्रतिज्ञा खरीच होईल. सर्व लोकांसमक्ष मी याला जीवदान देतों. मी आजवर थट्टेंत देखील कधींही खोटें बोललों नाहीं किंवा युद्धापासून कधींही परावृत्त झालों नाहीं. या पुण्याच्या सामर्थ्यानें हा जिवंत होवो. श्रीकृष्णांच्या तोंडून याप्रमाणें शब्द निघाल्यावर तो मुलगा जिवंत होऊन हळूहळू हालचाल करूं लागला."

भगवान् श्रीकृष्णांच्या तोंडून निघालेली ही वाणी सत्याच्या सामर्थ्यानें इतकी भरलेली आहे कीं, तिच्या प्रभावानें महाभारत-कारांच्या वर्णनानुसार प्रकृतीच्या नियमनांवर प्रभाव गाजवून

मृताला संजीवन दिलें आहे. पण श्रीकृष्णांचा जीवनक्रम ध्यानांत घेतला तर स्थूल दृष्टीला तरी तो उलगडूं शकणार नाहीं. थट्टेंत सुद्धां खोटें न बोललेले श्रीकृष्ण चांगल्या गंभीर प्रसंगीं देखील रूढ अर्थानें अनेकवार मिथ्या भाषणाचे प्रयोग करतांना आढळतात. ते स्वतःच तसे प्रयोग करतात असें नव्हे, तर जन्मभर सत्यधर्मानुसार वागणाऱ्या व्यक्तीलाही तसे प्रयोग करावयास भाग पाडतांना दिसतात.माझ्या महाभारतावरील व्याख्यानांत युधिष्ठिराचें स्वभाव-चित्र चित्रित करतांना मी या गोष्टीचा पुरावा दिलेला आहे. अश्वत्थाम्याच्या मृत्यूच्या वार्तेवांचून द्रोणाचार्य शस्त्रसंन्यास करणें शक्य नाहीं असें पाहून श्रीकृष्णांनी स्वतः तर त्यांना अश्वत्थामा मेल्याचें सांगितलेंच, पण युधिष्ठिरालाही त्यांनी तसें करावयास भाग पाडलें. रूढ अर्थानें सत्य बोलण्याच्या कक्षेंत हें कसें येईल? असे किती तरी प्रसंग त्यांच्या जीवनांत आहेत. जरासंधाचे हंस व डिंभक या नांवाचे दोन प्रबल सेनापति यादवांवर चालून आले असतां त्यांच्याशीं झालेल्या युद्धप्रसंगांत श्रीकृष्णांनीं पुनश्च याच नीतीचा अवलंब केलेला आहे. या दोन सेनापतीच्या परस्परांवरील आत्यंतिक प्रेमाची श्रीकृष्णांना जाणीव होती. बलरामानें हंस नांवाच्या दुसऱ्याच एका व्यक्तीला ठार मारल्यावर सेनापति हंसाला युद्धांत मारण्यांत आलें असें भगवंतांनीं डिंभकाला खोटेंच सांगितलें. त्याबरोबर मित्रविनाशाच्या दुःखामुळें डिंभकानें यमुनेच्या पाण्यांत जलसमाधि घेतली. तें पाहतांच खऱ्या हंसाला भेटून श्रीकृष्ण त्याला म्हणाले कीं, तुझ्या नांवाच्या दुसऱ्याच्र व्यक्तीच्या मृत्यूमुळेंसुद्धां तुझा मित्र या जगांत जिवंत न राहण्याइतका कष्टी होतो आणि त्याच्या प्रत्यक्ष मृत्यूनंतर देखील तुझ्या मनावर मात्र कांहींही परिणाम होत नाहीं ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे! हा उपहास ऐकतांच हंसानेंही भावनेच्या भरीस पडून यमुनेच्या पाण्यांत जलसमाधि घेतली व अशा रीतीनें श्रीकृष्णांचे दोन्हीही शत्रू संपले.

आवश्यक म्हणून या गोष्टी करीत असतां श्रीकृष्णांचें चित्त आपण कांहीं अस्वाभाविक करीत आहोंत अशा चिंतेनें यत्किंचितही व्यथित झालेलें नाहीं. त्यांच्या जीवनांतील या व इतर अशा अनेक

प्रसंगांच्या प्रकाशांत त्यांच्या सत्यवादित्वाच्या प्रतिज्ञेकडे पाहिलें म्हणजे स्थूल दृष्टीच्या व्यक्तीची अगदीं विलक्षण अवस्था होते. युद्धांतील त्यांच्या पलायनासंबंधाचेंही असेंच आहे. सम्राट् जरासंधाच्या अठराव्या आक्रमणाच्या वेळीं श्रीकृष्णांनीं प्रत्यक्ष युद्धाच्या रणघाईंतून पलायन केलें होतें असा त्यांच्या भागवतांतील व हरिवंशांतीलही चरित्रांत उल्लेख आहे. कालयवनाच्या मथुरेवरील आक्रमणाच्या वेळीं हातांत हत्यारदेखील न घेतां श्रीकृष्ण त्याच्यासमोरून पळून जाऊं लागल्याचें भागवतांत वर्णन आहे. खास महाभारत संहितेकडेच पाहिलें तर जरासंधाच्या आक्रमणाच्या भयामुळें आपली राजधानी बदलून सौराष्ट्राकडे यादवांच्या गणसंघासह आपण पलायन केल्याची स्वतः श्रीकृष्णच युधिष्ठिरांना कबुली देत आहेत. या सर्व घटनांच्या प्रकाशांत त्यांच्या "न च युद्धात्परावृत्तः" या वाक्याचा अर्थ काय लावावा? व्यावहारिक क्षेत्रांतील श्रीकृष्णांच्या जीवनांत अशासारख्या विलक्षण विरोधाच्या अनेक गोष्टी आढळतील. अधर्मानें कोणासही जिंकलें नाहीं असें ते म्हणतात; पण लोकसमजुतीप्रमाणें धर्माचा जो कांहीं अर्थ होतो व जो त्यांच्या स्वतःच्या चरित्राच्या कालखंडांतही होत असे, तदनुसार पाहिलें तर अधर्माच्या अवलंबाविना कोणालाही त्यांनीं जिंकल्याचें सहसा आढळून येणार नाहीं. ज्या गोष्टी इतर कोणाच्याही आयुष्यांत घडल्या तर त्याला लोकांनीं सहज मिथ्याभाषी व अधार्मिक म्हटलें असतें, त्याच गोष्टी भगवान् श्रीकृष्णांच्या हातून घडल्या असतांही प्राचीन सांस्कृतिक इतिहास त्यांच्यावर हे आरोप पुसटपणानें देखील करावयास धजत नाहींत. स्वाभाविकपणेंच या गोष्टींची कांहीं तरी वेगळी संगति असली पाहिजे, व ती आहे हें निर्विवाद आहे.

धार्मिक क्षेत्रांतील त्यांच्या जीवनाकडे पाहिलें तरी अशींच एकाहून एक गूढें निर्माण होतात. भगवान् श्रीकृष्ण स्वतःच्या अवताराचें प्रयोजन सांगतांना महाभारतामध्येंच दोन ठिकाणीं तरी धर्मसंस्थापना व धर्माचें संरक्षण हींच कारणें सांगतात. भगवद्गीतेच्या चौथ्या अध्यायांत "धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।"

असें त्यांनीं म्हटलें आहे व महाभारताच्या आश्वमेधिक पर्वांत उत्तंकाला आपल्या अवताराचा हेतु विशद करून सांगतांना त्यांनीं पुनश्च "धर्मसंस्थापनार्थाय धर्मसंरक्षणाय च ।" असे शब्द वापरले आहेत. धर्मसंस्थापना आणि धर्मसंरक्षण हे ज्या व्यक्तीचे जीवनव्यापी हेतु आहेत तिच्याच हातून रासक्रीडा घडलेली आहे हें त्या जीवनांतच उल्लेखिलेलें आहे. रासक्रीडेचें वर्णन निव्वळ भागवतांतच आहे असें नाहीं. तर "हल्लीसकक्रीडनम्" म्हणून तें हरिवंशांतही येतें. महाभारतांतही 'गोपीजनप्रिय' हें विशेषण श्रीकृष्णांना अनेकवार लाविलेलें आढळतें. रासक्रीडा ही धर्म्य आहे काय असा प्रश्न श्रीकृष्ण-चरित्राच्या आजच्याच निरीक्षकाला पडलेला आहे असें नसून राजा परीक्षितीसारख्या सुबुद्ध व्यक्तीलाही तो प्रश्न पडलेला आहे. श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधांतील रासक्रीडेचें वर्णन ऐकून व त्यावरील आचार्य शुकांचें स्पष्टीकरण ऐकूनही समाधान न पावलेला परीक्षिति शुकाचार्यांना असें विचारतो कीं—

**संस्थापनाय धर्मस्य प्रशमायेतरस्य च ।**
**अवतीर्णो हि भगवानंशेन जगदीश्वरः ।। २८**
**स कथं धर्मसेतूनां वक्ता कर्ताऽभिरक्षिता ।**
**प्रतीपमाचरद् ब्रह्मन् परदाराभिमर्शनम् ।। २९**
**आप्तकामो यदुपतिः कृतवान्वै जुगुप्सितम् ।**
**किमभिप्राय एतं नः संशयं छिन्धि सुव्रत ।। ३०**

—भागवत दशम स्कंध अ. ३३.

"धर्माच्या स्थापनेसाठीं व अधर्माच्या विनाशासाठीं पृथ्वीपति भगवान् अवतीर्ण झाले आहेत असें आपणच मला सांगितलें; मग स्वतः धर्ममर्यादा सांगणारा, त्या मर्यादानुसार आचरण करणारा व त्यांचें संरक्षण करणारा परदाराभिमर्शनासारखें त्या मर्यादांचा भंग करणारें कृत्य करण्यास कसा प्रवृत्त झाला ? त्यांना स्वतःला कांहीं मिळवावयाचें होतें असेंही नाहीं. स्वतः सिद्ध, नित्य तृप्त भग-वंतांनीं हें घृणास्पद कृत्य कोणत्या अभिप्रायानें केलें? आपण माझ्या संशयाची निवृत्ति करावी."

रासक्रीडेचें हें गूढ सोडविण्याचा अनेक लोकांनीं प्रयत्न करून देखील अजूनही त्यावर चर्चा-प्रतिचर्चा चालूच आहे. श्रीकृष्ण व राधा यांच्या संबंधींच्याही वेगवेगळचा उपपत्ति निर्माण होत आहेत. विशाल जीवनांतील चंद्रावरच्या काळचा डागाप्रमाणें हा एक कलंक आहे असें म्हणून मुळींच भागत नाहीं. उपासनेच्या क्षेत्रांत या गोष्टींचा समावेश झालेला आहे. इतकेंच नव्हे, तर अंतःकरण निर्वासिन करण्याठीं साधन म्हणून रासपंचाध्यायीचा उपयोग होत असतो. भावसाम्राज्याच्या क्षेत्रांत तर या पंचाध्यायीवरच आधारलेल्या मधुर भावाच्या उपासनेचें अत्यंत महत्त्व असून त्रिखंडकीर्ति विवेकानंदांचे गुरु श्रीरामकृष्ण परमहंस व नदियाचे महान् भगवद्-भक्त श्रीगौरांगप्रभु, तसेंच आपल्या महाराष्ट्रांतही श्रीगुलाबराव महाराज प्रभृति महान् संत या विशिष्ट भावाच्या उपासना—संप्रदायाचें आचरण करतांना दिसतात. श्रीगुलाबराव महाराज यांना बुद्धिवादी व विवेचक न म्हणण्याची कोणाचीही प्राज्ञा नाहीं. बौद्धिक क्षेत्रांतील एक आश्चर्य म्हणून कै. साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर यांनींही आदरानें त्यांचा उल्लेख केला आहे. श्रीरामकृष्णांच्या भावमय जीवनावर तर रोमारोलाँपासूनच्या लोकांनीं भक्तिपुष्पें वाहिलीं आहेत. अशा स्थितींत धर्मसंरक्षणार्थ अवतीर्ण झालेल्या भगवान् श्रीकृष्णांच्या जीवनांतील रासक्रीडेचें हें गूढ कसें उलगडावें ? अथवा तें डावलून तरी त्या जीवनांतील संपूर्ण कक्षांचा विचार कसा करतां येईल ? व्यावहारिक, धार्मिक, बौद्धिक, नैतिक व आध्यात्मिक अशा सर्व क्षेत्रांत आपणांस विलक्षण स्वरूपाच्या परस्परविरोधी प्रवाहांचें या महान् जीवनांत मिश्रण झालेलें आढळून येईल. किंबहुना, या सर्व क्षेत्रांतील रूढ कल्पना व भावाभाव यांच्या अतीत असेंच तें चरित्र वाटतें. मानवी देहांत त्या देहांतील सर्व मर्यादांचा अवलंब करून राहणारे भगवान् श्रीकृष्ण सहजरीत्या ज्या वेळीं "अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा।" "अहं बीजप्रदः पिता," "अहमादिर्हि भूतानाम्" असें म्हणून जातात, त्या वेळीं आध्यात्मिक क्षेत्रांतील विचारवंतांनाही गूढ पडल्यावांचून राहात नाहीं. परमेश्वराचें चिरंतन शाश्वत

स्वरूप निर्गुण, निराकार व निरवयव आहे; सगुण,साकार व सावयव असें ईश्वरी स्वरूप असलें तरीही तें विवर्त आहे असें तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत निर्वेधपणें मानणाऱ्या तत्त्वज्ञान्यांना देखील विश्वरूपदर्शना-सारखीं महान् कृत्यें सहज रीतीनें घडवून आणणारें व कोणाच्याही तपोबलाचा प्रभाव स्वतःवर न चालू देणारें श्रीकृष्णशरीर हें काय असावें असा प्रश्न पडल्यावांचून राहात नाहीं. तें विवर्त असलें तरी श्रीकृष्ण-शरीराचा विवर्त हा अध्यस्त आहे की अनध्यस्त आहे या विषयाचें गूढ अजूनही आध्यात्मिक विचारवंतांना पूर्णपणें उकल-लेलें नाही. किंबहुना शेवटीं श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या प्रत्यया-प्रमाणें या विशिष्ट क्षेत्रांतील व्यक्ति "तुज सगुण म्हणू कीं निर्गुण रे। सगुण निर्गुण एकू गोविंदू रे।" अशा निर्णयाप्रत येऊन पोहोंचतात.

श्रीकृष्णांचा विचार करीत असतां जीवनाच्या सर्व क्षेत्रांतील केवढ्या विलक्षण स्वरूपाच्या गूढतेशीं आपली गांठ पडते हें दिग्दर्शित करण्यासाठींच मी हीं कांहीं स्थळें सांगितलीं.परमेश्वराच्या सर्व अवतारांत भगवान् श्रीकृष्णांच्या इतका लोकांच्या प्रेमाचा व निष्ठेचा विषय झालेला दुसरा अवतार नाहीं. त्यांच्या जीवन-काळीं लोकांचें त्यांच्यावर अपरंपार प्रेम होतेंच; पण त्यानंतर आज हजारों वर्षे तेंच प्रेम नांदत आलेलें आहे. भावजगताचे ते सम्राट् असून कित्येक उपासनासंप्रदायांचें ते आराध्य दैवत व त्यांच्या तत्त्वज्ञानाचे अंतिम केंद्र आहेत. वल्लभाचार्यांचा शुद्धा-द्वैत संप्रदाय भगवान् श्रीकृष्णांनाच पूर्ण परब्रह्म मानतो. श्रीगुलाब-राव महाराजांच्या 'मधुराद्वैत' संप्रदायांत श्रीकृष्णशरीराला देखील अनध्यस्त विवर्त मानून नित्यत्व मानण्यांत येतें. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतील व्यक्तीची सुद्धां श्रीकृष्णांच्या विषयींची विलक्षण निष्ठा श्रीचैतन्यांच्या एका श्लोकांतून व्यक्त झाली आहे. त्यांना एकदां त्यांच्या शिष्यानें असा प्रश्न विचारला कीं, "जग सत्य आहे वा मिथ्या आहे?" चैतन्यांनीं त्यावर उत्तर दिलें,

**जगत्सत्यमसत्यं वा नेतरेति मतिर्मम ।**
**श्रीकृष्णचरणम्भोजं सत्यमेव न संशयः ॥**

—चैतन्य चरितावलि.

" जग सत्य आहे कीं असत्य आहे हें मला माहीत नाहीं; पण श्रीकृष्णांचीं चरणकमलें मात्र सत्य आहेत हें निर्विवाद आहे. "

तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतील श्रीकृष्णांच्या या विशिष्ट वस्तुस्थितीबरोबरच उपासक-भक्तीच्या वाङ्मयाचा प्रचंड विस्तार पाहिला तर मन थक्क होऊन जातें. भारतवर्षांत एकही प्रांत असा नाहीं कीं जेथें श्रीकृष्णांचे एकांतिक उपासक नाहींत. त्यांच्यावर निर्माण झालेल्या सूरदासांच्या व मिरा देवीच्या काव्यांनीं सारा उत्तर भारत व्यापला आहे. विद्यापति व चंडीदास यांच्या वंगगीतांनी बंगाली जनतेचीं अंतःकरणें भारलेलीं आहेत. निव्वळ महाराष्ट्रापुरतेंच पाहिलें तरी श्रीज्ञानदेवापासून तर तुकाराम महाराजांपर्यंत कोणत्याही संतांच्या अभंगाची गाथा श्रीकृष्णांच्या बालक्रीडेच्या अभंगांवांचून पूर्ण होत नाहीं.

निव्वळ राजकारणाच्या व व्यवहाराच्या क्षेत्रांत उतरलें तर अशीच वस्तुस्थिति दृष्टोत्पत्तीला येईल. राज्यशास्त्र व राजकारण या विषयावर महाभारतांतून भगवान् श्रीकृष्णांचे म्हणून जे जे विचार व्यक्त झाले आहेत ते इतके चिरंतन स्वरूपाचे आहेत कीं, कौटिल्यासारख्या महनीय व्यक्तीच्या अर्थशास्त्रावरील ग्रंथांतसुद्धां तत्त्वतः त्याहून वेगळा असा विचार आढळत नाहीं. नुसते देव, पूर्ण परब्रह्म, वा तात्त्विक विचार मांडणारी राज्यशास्त्रावरील अधिकारी व्यक्ति एवढेंच श्रीकृष्णांचें स्वरूप नाहीं. यश व श्रीकृष्ण या दोन शब्दांची जणूं कीं काय सांगड घातलेली आहे अथवा ते एकमेकांचे पर्यायशब्द आहेत असें वाटूं लागण्याइतकें फलदायी कर्तृत्व त्यांच्या जीवनांत दृष्टीस पडतें. एकदां नव्हे तर दोनदां धर्मसाम्राज्याची त्यांनीं स्थापना केली आहे. तत्कालीन पराक्रमी राजमंडळाची त्यांच्याविरुद्ध झालेली एकजूट त्यांनीं अनेकवार भंगून शेवटीं तर विनाशाच्या रणकुंडांत भस्मसात् करून टाकली आहे, व हेंही सर्व इतक्या सहजपणें व अशा पद्धतीनें कीं जगांतील मोठमोठ्या कारस्थानी राजकीय पुरुषांना विस्मय वाटावा ! युद्धकलेच्या सर्व क्षेत्रांत प्रथम श्रेणीचें स्थान त्यांनीं मिळविलें होतें. कोणत्याही

युद्धपद्धतीचा उल्लेख आला असतां "कृष्णादवा देवकीपुत्रात्" या भारतांत येणाऱ्या शब्दप्रयोगावरून हें उघड दिसतें.

राजनीतीचा व्यावहारिक प्रांत सोडून तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत शिरलें तर काय दृष्टीस पडेल ? केवळ सातशें श्लोकांतील संवादांतून जगताच्या या महान् नेत्यानें जें तत्त्वज्ञान सांगितलें त्याचा अर्थ काय करावा याविषयीं आजसुद्धां वादविवाद चालू आहेत. त्या तत्त्वज्ञानाची महती इतकी विलक्षण आहे कीं, त्या त्या संप्रदायाच्या प्रत्येक पुरस्कर्त्याला त्यांतील श्रीकृष्णांच्या उक्तीचा आधार घेतल्यावांचून आपल्या म्हणण्यास पूर्णता येऊंच शकत नाही असें वाटतें. श्रीमदाद्य शंकराचार्यांपासूनचे सर्व आचार्य, कै. लो. टिळक, योगिवर्य अरविंद घोष, डॉ. राधाकृष्णन्, अॅनी बिझांट, म. गांधी प्रभृति भारतीय राष्ट्रांतील आधुनिक सर्वश्रेष्ठ पुरुष वर्तमानकाळांत देखील या तत्त्वज्ञानाच्या प्रभावानें प्रभावित झालेले असून अजूनही त्या तत्त्वज्ञानावर नवीन नवीन उपपत्त्या बसविण्यांत येत आहेत व सहस्रावधि पृष्ठांचे ग्रंथ उपलब्ध होत आहेत; आणि तरीही श्रीकृष्णांच्या म्हणण्याचा निश्चित अर्थ काय यासंबंधींचें प्रश्नचिन्ह अद्याप अल्पांशानेंही पुसट झालेलें नाहीं. श्रीकृष्णांच्या जीवनाचा प्रभाव हिंदुस्थानांतीलच नव्हे तर भारताबाहेरील लोकांवरदेखील पडलेला आहे. त्या प्रभावाला धर्माचीं बंधनें नाहींत, राष्ट्राचीं नाहींत, किंवा रक्तवंशाचींही नाहींत. युरोपियन, ख्रिस्ती व मुसलमान समाजांतील त्यांच्या एकांतिक भक्तांवरून हें स्पष्ट दिसतें.

भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्रावर प्रमाण म्हणून अथवा ज्यांचा विचार अवश्य केलाच पाहिजे असे तीन ग्रंथ आहेत. त्यांच्या राजकीय, धार्मिक, सामाजिक व आध्यात्मिक क्षेत्रांतील जीवनावर महाभारत प्रकाश टाकतें. त्यांच्या महाभारतांत केवळ ध्वनित केलेल्या चरित्राचा विस्तार हरिवंशांत आहे व त्यांच्या देवत्वाविषयीं सर्व शंका निर्मूल करण्याचें कार्य श्रीमद्भागवतानें केलेलें आहे. सारे उपासनापंथ व संप्रदाय भागवतांतून निघालेले आहेत. त्यांच्या जीवनाचा विचार करीत असतां या तीन दीपस्तंभांच्या साहाय्यानेंच

तें जीवन पाहिलें पाहिजे. तात्पर्य, श्रीमदाद्य शंकराचार्यांपासून योगी अरविंद व लों. टिळक यांच्यापर्यंतच्या प्रतिभासंपन्न पंडितांची प्रतिभा गुंगवून टाकणारा महान् तत्त्वज्ञ, सर्व राजकीय पुरुषांना अखंड मार्गदर्शक असा महान् साम्राज्य–निर्माता, व दुष्ट क्षत्रांचा विध्वंस करणारा धर्मसंस्थापक, चैतन्य–रामकृष्णापर्यंतच्या भाव-जगतांतील उपासकांचा केवळ प्राण, व नवसमाजाच्या नीतिमूल्यांचा आविष्कार करूं इच्छिणाऱ्या लोकांचा शाश्वत पथप्रदर्शक, अशा अनेक नात्यांनीं भगवान् श्रीकृष्णांच्या चरित्राकडे जों जों पाहूं लागावें तों तों त्याची गूढता व व्यापकता प्रतिभा व मन यांच्या सामर्थ्याच्या पलीकडची आहे असेंच प्रत्ययास येईल. या सर्वव्यापी व भव्य जीवनाकडे पाहण्याची मी कोणती दृष्टि अंगीकारणार आहें हें पुढील व्याख्यानांत स्पष्ट करीन.

---

# विशाल सांस्कृतिक जीवनाचा दृष्टिकोन

पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या गूढ व व्यापक जीवनाकडे पाहण्याचे विविध दृष्टिकोन आहेत. त्यांपैकीं कोणत्याचाही वापर करून त्यांच्या चरित्राचें अवगाहन केलें तरी अधिष्ठानसत्तेचें सामर्थ्यच असें आहे कीं, शेवटीं त्यामुळें कल्याणच होईल.अधिष्ठान-सत्तेच्या या सामर्थ्याचें वर्णन करीत असतां नारदांनीं युधिष्ठिराला असें सांगितलें आहे कीं–

**गोप्यः कामाद् भयात्कंसः द्वेषाच्चैद्यादयो नृपाः ।**
**सम्बन्धाद्वृष्णयः स्नेहाद्यूयं भक्त्या वयं विभो ।। ३१**

—भागवत सप्तम स्कंध अ. १

गोपी कामानें, कंस भयानें, शिशुपालादि लोक द्वेषानें, यादव व तुम्ही नात्यामुळें व आम्ही भक्तीमुळें श्रीकृष्णाशीं संबद्ध झालों व या प्रत्येकाचें कल्याण झालें. नारदाच्या याच वाक्याचा अनुवाद वेदस्तुतीच्या पुढील ओळींतही झालेला आहे.

**स्त्रिय उरगेन्द्रभोगभुजदण्डविषक्तधियः । २३**

—भागवत, स्कंध १०–८७

त्यामुळें भगवान् श्रीकृष्णांच्याकडे पाहण्याचे सर्व दृष्टिकोन अखेरीस कल्याणप्रदच ठरतात. तरी पण त्या विशाल जीवन-सागराच्या ज्या विशिष्ट तरंगांनीं आज आपल्या राष्ट्राचे व व्यक्तींचे कल्याणमार्ग उजळतील त्यांच्याकडेच अधिक पाहण्याचें मीं ठरविलें आहे. वेदरूपी ज्ञानसागरांतून साधकांनीं काय घ्यावें याचें विवेचन करीत असतां स्वतः भगवान् श्रीकृष्णच अर्जुनाला असा उपदेश करतात कीं——

**यावानर्थ उदपाने सर्वतः सम्प्लुतोदके ।**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ।।** —गीता अ. २–४६

व्याख्यान २ रें, ता. २७।३।५२

"जलाशय संपूर्ण भरलेला असला तरी आपल्याला हवें तितकेंच पाणी घ्यावयाचें असतें त्याचप्रमाणें विचक्षण ब्राह्मणांनीं सर्व वेदांच्या ज्ञानसागराच्या विषयींही वागावें."

साधनयोग, भावजगत्, उपासना इत्यादि सर्व गोष्टींवर माझा पूर्ण विश्वास आहे. रामकृष्ण परमहंस व श्रीचैतन्य यांच्या सारख्यांचीं अनुभूतीच्या प्रांतांतील सत्यें मी नाकारूं शकत नाहीं. बालकृष्णांचें हृदयंगम स्वरूप व कानांत सुधेचा वर्षाव करून जिवाला मुक्त करणारे त्यांच्या बासरीचे निनाद मलाही मोहित करतात. पण संकटमय परिस्थितीतील भारत राष्ट्राच्या व मानवतेच्याही आजच्या गरजेच्या दृष्टीनें भगवान् श्रीकृष्णांना मी जर अशी प्रार्थना केली कीं, "बन्सी बजाना छोड दो, बन चक्रसुदर्शनधारी।" तर तें कांहीं चुकेल असें नाहीं. अर्जुन भीष्मांच्या बाणांनीं खिळून गेला असतां, पांडवांच्याकडील मोठमोठे योद्धे पळून जात असतां, व सात्यकीसारखे लोकही त्यांना आवरूं शकत नसतां, बन्सीधारी श्रीकृष्णानें सुदर्शनच हातीं घेतलें होतें हें कांहीं कोणास सांगावयास नको.

आज आपल्या राष्ट्रांत एका बाजूला भौतिक जडवाद व दुसऱ्या बाजूला निधर्मी राज्यकल्पना यांनी धर्म व नीतिकल्पनांवर कुरघोडी चालविली असून सहस्रावधि वर्षे या राष्ट्रांत मांगल्य उत्पन्न करणाऱ्या जीवननिष्ठांपासून राष्ट्र ढळत चाललें आहे. मॅकेव्हिलीनें केवळ समर्थ राज्यतंत्राचा पुरस्कार करण्यासाठीं निधर्मी राज्यव्यवस्थेची जी घोषणा केली तिचें विकृत थैमान हल्लीं येथें चालू आहे. आपल्या मूलभूत दृष्टीपासून आपण ढळतों आहोंत. जगांतील मानवतेंतही यापेक्षां विभिन्न वस्तुस्थिति आहे असें नाहीं. जुन्या जीवनमूल्यांना धक्का मिळालेला आहे व जुन्या नीतिमंदिराला चिरे पडत चालले आहेत. नव्या नीतिमंदिराची उभारणी करावयास आवश्यक तीं मूल्यें उत्पन्न झालेली नाहींत व त्यांच्या अभावीं राष्ट्रांत कोणतीही निष्ठा उरलेली नाहीं. वेगवेगळ्या वादांचे (isms) एकांगी अभिमान फक्त वाढीस लागले आहेत. लॉर्ड

ॲक्टननें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, Isms corrupt people's mind. Power corrupts only its possessor. नुसत्या निधर्मी-पणाच्या निष्ठाशून्य उद्‌घोषांमुळें विधायक स्वरूपाचा जीवनाचा कोणताही दृष्टिकोन भारत देशांतली आजची राज्यसत्ता उत्पन्न करूं शकत नाहीं. गेल्या दीडशें वर्षांच्या पारतंत्र्याच्या अवस्थेंत येथें असलेल्या राजसत्तेला या समाजांत असा कोणताही दृष्टिकोन उत्पन्न करण्याचें कांहींच कारण नव्हतें. तात्पर्य, पूर्वींची राजसत्ता परकी म्हणून व आजची निधर्मी म्हणून जीवननिष्ठा उत्पन्न करा-वयाच्या संबंधीं सारख्याच असमर्थ आहेत. अशा स्थितींत रिकाम्या धर्मशाळेंत कोणत्याही वाटसरूनें जावें त्याप्रमाणें युरोपखंडांत उत्पन्न झालेल्या वेगवेगळ्या वादांना येथें आपला प्रभाव गाज-विण्यास भरपूर अवसर मिळत आहे. त्यांतल्या त्यांत जड भौतिक वाद व त्याच्यांतून अलीकडे निर्माण झालेला मार्क्सो–लेनिनिस्ट संप्रदाय यांचा येथें दिवसेंदिवस अधिक प्रभाव पडत चालला असून भारतीय जीवनाचें प्राचीन मंदिर भुईसपाट होण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली आहे. सुसंस्कृततेचा अंत केव्हां होतो व तिची सुरुवात केव्हां होते याचें वर्णन करीत असतां सुप्रसिद्ध लेखक बर्ट्रन्ड रसेल यानें एका ठिकाणीं असे सुंदर उद्‌गार काढले आहेत कीं–

Civilization only begins when men say I believe, but I may be wrong. It ends when men say, I know the truth, I know what you ought to do, and it is my mission and duty to see that you do it.

सुसंस्कृततेच्या अंताचें हें विशिष्ट वातावरण नुसत्या सत्तेनें उत्पन्न होऊं शकत नाहीं; पण परिभाषांना व आश्वासनांना फसवून केलेल्या एकाद्या वादाच्या एकांगी दृष्टिकोनामुळें मात्र ही गोष्ट निश्चित होऊं शकते. भौतिक वादानें एका विशिष्ट दृष्टिकोनानें जगाकडे व जीवनाकडेही पाहिलें; पण बहुरंगी जीवनाचें तें केवळ एक अंग होय. जीवनाला आणि जगालाही इतर अनेक बाजू आहेत; आणि त्या सर्वांचा विचार करण्याची तितकीच आवश्यकता आहे. या गोष्टीचा विचारही हे पुरस्कर्ते ध्यानांत घेत नाहींत. सगळीच

घडी नवी बसवीत असतांना त्यापेक्षां वेगळ्या स्वरूपाच्या जीवनाचा विचार करण्याची जी दृष्टि आहे तिची यथार्थ जाणीव भगवान् श्रीकृष्णांचें विशाल जीवन व त्या जीवनांतून आविष्कृत झालेलें तत्त्वज्ञान देऊं शकतें, हें श्रीकृष्णांनीं सांगितलेल्या गीतेवरील अरविंद व लोकमान्य यांच्या वर्तमानकाळांतील विवेचनावरूनही दिसून येईल. संघर्षाच्या वणव्यांत सांपडलेल्या व विनाशाच्या काठावर आलेल्या मानवतेला जशी पुनर्रचनेच्या दृष्टीनें या नव्या दृष्टीची आवश्यकता आहे त्याचप्रमाणें भारत राष्ट्राला आपलीं मूल्यें ओळखण्याच्या दृष्टीनेंही या दृष्टीची आवश्यकता आहे. भगवान् श्रीकृष्णांच्या विशाल जीवनांतील ह्या विशिष्ट भागाचें दिग्दर्शन घडविणें हाच माझा या व्याख्यानमालेंतील हेतु आहे. महाभारत-कारांनीं वर्णन केलेलें भगवान् श्रीकृष्णांचें जीवन हें याच दृष्टि-कोनांतून झालेलें आहे. सर्व जगाचा उद्धारक, द्रष्टा, धर्माचा संस्थापक, यशस्वी राजपुरुष, अधर्माचा निखंदक, व शाश्वताचा मार्गदर्शक हें महाभारतांतील भगवान् श्रीकृष्णांचें स्वरूप आहे.

## पूर्वसंदर्भ

भगवान् श्रीकृष्ण हे युगपुरुष होते हें निर्विवाद आहे. आत्म-विस्मृतिरूप अधर्म परकीयांच्या आक्रमणामुळें किंवा स्वतःच्या अधःपतनामुळें जेव्हां वाढीस लागतो, तेव्हां त्याचा नायनाट करून त्या जागीं आत्मज्ञानरूपी धर्माची प्रतिष्ठापना करणें हें युगपुरुषांचें काम आहे. महाभारताच्या जयनामक इतिहासांत श्रीकृष्णांनीं हें काम कसें केलें याचें वर्णन आहे. भारताचा इतिहास हा सांस्कृतिक इतिहास आहे हें मी स्पष्ट केलेंच आहे. भारतीय जीवनाच्या परमो-च्चतेचें, अधःपतनाचें व पुन्हां परिस्थितीवर मात करून घडून आलेल्या पुनरुत्थानाचें या इतिहासांत महर्षि व्यासांनीं दर्शन घडवि-लेलें असून त्यापासून आज राष्ट्राला आत्मज्ञान प्राप्त व्हावें हा महर्षि व्यासांचा हेतु आहे. म्हणूनच त्यांनीं ‘ इतिहासप्रदीप ’ असें त्याचें नामकरण केलें आहे. मागच्या पंचवीस व्याख्यानांतून महाभारताच्या काळीं राज्यसंस्था भ्रष्ट, नेतृसंस्था अधःपतित, सचिवसंस्था पापी,

धर्म दुर्बळ, व तेजस्वी नि तत्त्वज्ञानी पुरुष अकर्मण्य किंवा निरुपयोगी कसे झाले होते याचें चित्र मीं रेखाटलें आहे. बलवान् म्हणेल तो धर्म व सत्ताधारी म्हणेल ती नीति अशी परिस्थिति उत्पन्न होऊन धर्म व तत्त्वज्ञान यांनीं सामर्थ्याला नियंत्रित करण्याऐवजीं सामर्थ्यच त्यांना नियंत्रित करूं लागलें. अधर्माचें अभ्युत्थान तें हेंच होय.

हें संकट बाह्य आक्रमणाचें नसून अंतर्गत आक्रमणाचें होतें. असें आक्रमण नष्ट करावयास सर्व मानवी कोमल भावनांवर विजय मिळवून अंतःकरण वज्राप्रमाणें कठिण व समष्टि-जीवनाच्या आत्यंतिक कल्याणाच्या जीवनाशीं एकरूप करावें लागतें. अपूर्ण मानवी जीवनाच्या मर्यादेंत ही गोष्ट बसू शकत नसल्यामुळें पूर्णावताराशिवाय हें कार्य कोण करूं शकणार? पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांना धर्मसंस्थापनेच्या कार्यास कां प्रवृत्त व्हावें लागलें व आपल्या या कार्यासाठी त्यांनीं कोणतें साधन वापरलें एवढ्याच गोष्टीचें मी दिग्दर्शन केलें आहे. श्रीकृष्णांनी हें कार्य कसें पूर्णावस्थेस नेलें व त्यांनीं धर्माची प्रतिष्ठापना केली म्हणजे काय केलें हें या व्याख्यानमालेंतून पाहावयाचें आहे. म्हणजे या सांस्कृतिक इतिहासाचें निरीक्षण पूर्ण होईल. पण हें पाहात असतांना त्या इतिहासाचें सम्यक् ज्ञान करून घ्यावयाचें असलें तर विकृत सस्कारांनी डागळलेलीं अंतःकरणें मात्र नकोत असा जो इषारा मी मागें दिला होता तोच येथेंही देणें क्रमप्राप्त आहे.

## टीकाकारांचा विकृत दृष्टिकोन

भारतीय राष्ट्र हें ऋग्वेदापासूनच पूर्णावस्थेस पोहोंचलेल्या निर्गत संस्कृतीचें (Deductive) राष्ट्र असल्यामुळें त्याचा इतिहास उलगडतांना हळूहळू विकसित होणाऱ्या मानवसंघाच्या इतिहासाच्या कल्पनेची कास सोडणें आवश्यक ठरतें. दुर्दैवानें या देशाचा इतिहास उलगडावयास पाश्चात्य संशोधक पुढें आले व तेही या देशाचा आत्माभिमान नष्ट करण्याचा हेतु अंतःकरणांत धरून पुढें आले. मॅक्समुल्लरसारख्या पंडितांनीं आपल्या या कामगिरीसंबंधानें स्टेट सेक्रेटरीला पत्र पाठवतांना भारतीयांचा त्यांच्या धर्म व संस्कृती-

वरील अभिमान नष्ट करण्याच्या बाबतींत आपण यशस्वी झाल्याबद्दल समाधान व्यक्त केलें असून पुढें तो त्यांत (खंड२ रा) लिहितो–
"If Christianity dose not step in, whose fault will it be ?"

मॅक्समुल्लर साहेब आपला हा हेतु स्पष्ट केल्यावांचून राहिले नाहींत. म्हणून जस्टिस वुडड्रॉफ यानें या इतिहाससंशोधनाचा परिणाम म्हणून India has become ignorant of its racial spirit असे उद्‌गार काढले असले तर त्यांत नवल नाहीं. त्यांच्या संशोधनांत राजकीय हेतु होता व त्यावर आधारलेल्या शिक्षणतंत्राच्या संस्कारांनीं जी पिढी उत्पन्न झाली ती आत्मविस्मृत झाल्याबद्दल त्यांनीं आनंदाचे उद्‌गारही काढले आहेत. सर व्हॅलेंटाईन चिरोल हे स्वतःचें समाधान व्यक्त करतांना म्हणतात :–

Out of the ancient world of India we have raised an Indian middle class with one foot perhaps still lingering in Indian civilization; but with the other, certainly planted in Western civilization.

त्यामुळें खऱ्या अर्थानें आत्मविस्मृति घडून आली. इतिहासाच्या क्षेत्रांत ही जी विलक्षण उलथापालथ झाली तिचे परिणाम आतां स्वतंत्र भारतांतील लोकांना जाणवूं लागले आहेत. भारताचा इतिहास भारताच्या दृष्टिकोनांतूनच उलगडला पाहिजे हें विचक्षणांना पटूं लागलें आहे ही सद्‌भाग्याची गोष्ट होय. ना. मुनशी यांनीं असा भारतीय दृष्टिकोनांतून इतिहास निर्माण करण्याचा प्रयत्न करण्यासाठीं स्वतंत्र भारतीय इतिहाससमिति स्थापन केलेली असून तिच्या द्वारा त्या इतिहासाचा वैदिक कालखंड या नांवाचा प्रथम खंड प्रकाशितही केला आहे. त्या खंडाला जोडलेल्या प्रस्तावनेंत स्वतः ना. मुनशीच असें लिहितात कीं–

Unfortunately for us, during the last two hundred years we had not only to study such histrories, but unconsciously to mould our whole outlook of life upon them. Few people realise that the teachings of such histories in our Schools and Universities have substancially added to

the difficulties which India has had to face during the last hundred years, and never more than during recent years. Generations after generations, during their School or College career, were told about the successive foreign invasions of the country; but little about how we resisted them and less about our victories. They were taught to decry the Hindu social system, but they were not told how this system came into existence as a synthesis of political, social, economic, and cultural forces. How it developed in the people the tenacity to survive catastrophic changes for millennia. How it protected life and culture in times of difficulty by its conservative strength and in favourable times developed an elasticity which made ordered progress possible; and how its vitality enabled the national culture to adjust its central ideas to new conditions. The attempts of British Scholars with the exception of Tod, wherever they have taken these histories as reliable source-books, have hindered rather than helped the study of Indian History. So high an authority as Dr. Maulana Nadvi in his Presidentital address at the early medieval India section of the Seventh Session of the Indian History Congress expressed the verdict of modern scholars that both the selection and translation of these extracts have not been honest.

—The History and Culture of the Indian People
( Vedic Age ) pp. 8–9

"अशा पद्धतीनें निर्माण झालेले इतिहास स्वाभाविकपणेंच इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वपूर्ण नसतात. दुर्दैवानें गेल्या दोनशें वर्षांत, अबुद्धिपूर्वक कां होईना, पण अशा अनैतिहासिक इतिहासांचेंच अध्ययन करावें लागून आपला जीवनाचा दृष्टिकोनही तदनुसार बनविण्याची आपणांवर पाळी आली. अशा इतिहासाचें विद्यापीठांतून व शाळांतून मिळणारें शिक्षण अधिकाधिक अडचणीच उत्पन्न करावयास कारणीभूत झालें ही गोष्ट फारच थोड्या लोकांच्या

ध्यानांत आली. अशा प्रकारच्या इतिहासांतून घडलेल्या गोष्टींच्या यथादर्शन चित्रलेखनाचा सर्वस्वी अभाव दिसून येतो. अनेक पिढ्यांच्या विद्यार्थ्यांना भारतावर झालेल्या आक्रमणांचें संपूर्ण वर्णन या इतिहासांनीं केलेलें पाहावयास मिळतें; पण त्या आक्रमणांचा प्रतिकार करण्यासाठीं भारतीयांनीं जे अपूर्व प्रयत्न केले व त्यांनीं परकीयांवर जे विजय मिळविले त्याबद्दल त्यांत अवाक्षरही आढळून येत नाहीं. भारतीयांच्या समाजरचनेची या इतिहासांतून भरपूर निंदा करण्यांत आली आहे. पण ही समाजरचना कोणत्या राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक घटनांच्यामुळें अस्तित्वांत आली याचा उल्लेखही त्यांत केलेला नाहीं. या समाजरचनेनें भारतीयांचें अडचणीच्या काळांत आपल्या स्थिरत्वामुळें कसें संरक्षण केलें व उत्कर्षाच्या काळांत तिच्या लवचिकपणामुळें त्यांची कशी उन्नति झाली याबद्दल त्या पुस्तकांत एक शब्दही सांपडत नाही. पाश्चात्य पंडितांचे प्रयत्न व त्यांनीं वापरलेली प्रमाणें यांनीं भारतीय इतिहास उलगडण्यास साहाय्य करण्याऐवजीं त्यांत एक प्रकारें उपद्रवच उत्पन्न केला आहे. आधारांचें साधें भाषांतर व त्यांची निवड करीत असतांनासुद्धां त्यांची कशी अवस्था असते याबद्दल सातव्या भारतीय इतिहास परिषदेंतील मध्ययुगीन भारत विभागाचे अध्यक्ष डॉ. मौलाना नाडवी यांच्यासारख्या उत्तरदायी गृहस्थानें असे उद्गार काढले आहेत कीं, निवड व भाषांतर या दोन्ही गोष्टींत प्रामाणिकपणा नाहीं." नामदार मुनशी यांचा स्वतःचा ग्रंथ या दोषापासून किती मुक्त आहे हा प्रश्न अर्थातच वेगळा. पण मुनशी यांनीं उल्लेखिलेल्या इतिहासपरिषदेच्या विभागाध्यक्षानें जें म्हटलें आहे, तोच इषारा स्वामी विवेकानंदांनीं त्याच्या किती तरी पूर्वीं दिलेला आहे. नासदीय सूक्ताच्या युरोपियन पंडितांनीं केलेल्या भाषांतरासंबंधीं स्वामीजी म्हणतात :—

In translating the *Suktas,* pay particular attention to the Bhashyakaras and pay no attention whatever to the Orientalists. They do not understand a single thing about our Shastras. It is not given to dry philologists to under-

stand philosophy or religion .... for instance, the word 'आनीदवातम्' in Rigweda was translated "He lived without breathing." Now here the reference is really to the chief Prana, and 'अवातम्' has the root-meaning for unmoved, that is vibration. It describes the state in which the Universal Cosmic Energy or Prana remains before the Kalpa begins. The Bhashyakaras explain everything according to sages and not according to the so-called European Scholars. What do they know ?

" ऋग्वेद सूक्तांचें भाषांतर करतांना पाश्चात्य पंडितांच्याकडे मुळींच पाहूं नका. भाष्यकारांवरच विशेष भर ठेवा. पाश्चात्य पंडितांना आमच्या शास्त्रांतील अवाक्षरही कळत नाहीं. भाषाशास्त्राचा शुष्क काथ्याकूट करणाऱ्यांना तत्त्वज्ञान आणि धर्म यांचें ज्ञान संभवत नाहीं. उदाहरणार्थ, 'आनीदवातम्' या ऋग्वेदीय शब्दांचें भाषांतर 'तो श्वासोच्छ्वासाशिवाय राहात होता' असें करण्यांत आलें आहे. खरें पाहिलें तर या ठिकाणीं मुख्य प्राणाचा संबंध असून 'अवातम्' याचा अर्थ, त्याच्या धातूस धरून निःस्पंद असा आहे. कल्पापूर्वीं विश्वाचा महाप्राण ज्या स्थितींत राहतो त्या स्थितीचें हें वर्णन आहे. म्हणून म्हणतों कीं, ऋषिमुनींच्या परंपरेला अनुसरून साऱ्या गोष्टी समजून घ्या. पंडित म्हणविणाऱ्या पाश्चात्य अभ्यासकांच्या नादीं लागू नका. त्यांना काय समजतें आहे ?"

पाश्चात्य संशोधकांच्या संशोधनशास्त्रावर भिस्त ठेवून त्यानें प्रभावित झाल्यामुळें भारतीय शरीरांत विलायती अंतःकरणें उत्पन्न झालेले लोक मोठमोठे पंडित असूनही भारतीय वाङ्मयाच्या संशोधनास अपात्र ठरण्याचा संभव कसा उत्पन्न होतो व मुळांत तें संशोधनशास्त्रच कसें अशास्त्रीय थोतांडावर आधारलें आहे याचें उत्कृष्ट चित्र महाराष्ट्रांतील विख्यात प्रतिभासंपन्न पंडित श्री. अप्रबुद्ध यांचा ऋग्वेदाचा संदेश या ग्रंथांत चित्रित केलेलें आहे. केवळ दुराग्रह व अहंकार यांमुळें भारताविषयींसुद्धां श्रीकृष्ण, कौरव-पांडव व भारतीय युद्धाची घटनाच खोटी असल्याचा कांगावा याच पाश्चात्य

लेखकांनीं केलेला आहे. वेबरसारख्याची गोष्ट सोडून दिली तरी मॅक्समुल्लर, कीथसारख्यांचीही हीच अवस्था आहे. तोच बेछूटपणा या दृष्टिकोनाच्या आहारीं गेल्यामुळें भारतीय लेखकांतही कसा उतरला आहे हें ज्यांना पहावयाचें असेल त्यांना वानगीदाखल कै. रमेशचंद्र दत्त यांच्याच एका उद्गाराचा नमुना दाखवितो. ते म्हणतात :—

" As a historical narrative of the principal incidents of the war, the present Epic is utterly valueless. For the events and incidents in it have been changed and the names of the heroes are later interpolations.... And if the heroes of the Epic are mythical, the heroine is still more so."

—(History of Civilization in Ancient, India, Page 186.)

"ऐतिहासिक वृत्तान्त या नात्यानें महाभारत ग्रंथ कवडीमोलाचा आहे. त्यांतील मूळ घटनेंत अजिबात फरक केला गेला आहे व त्यांतील पात्रें सर्वस्वी काल्पनिक आहेत. त्यांतील प्रमुख पुरुष काल्पनिक आहेत व नायिका तर सर्वस्वीच काल्पनिक आहे."

पण व्हिन्सेंट स्मिथ, डॉ. विन्टरनिट्झ प्रभृति रमेशचंद्र दत्तासारख्यांच्या गुरुसंप्रदायांतील लोकांनीं देखील महाभारताची व त्यांतील पुरुषांची ऐतिहासिकता मान्य करून त्यांना परस्पर चोख उत्तर दिलेलें असल्यामुळें वेगळ्या उत्तराची आवश्यकता नाहीं. इतिहास हें आतां एक शास्त्र झालें असून त्याच्या शास्त्रीय दृष्टिकोनांत रामायण व महाभारताचे ग्रंथ कसे बसतात हें मी माझ्या श्री रामायणावरील व्याख्यानमालेंत दाखवून दिलेंच आहे. असो.

पुढें श्रीकृष्णांची ऐतिहासिकता पटली तरी पराक्रम, तत्त्वज्ञान, द्रष्टेपण व भक्ति या गोष्टी एकत्र असणें उगाचच असंभवनीय मानून गवळ्यांचा पुढारी श्रीकृष्ण, पांडवांचा धूर्त मित्र श्रीकृष्ण व गीतोपदेष्टा श्रीकृष्ण हे मुळांत वेगवेगळे असून पुढें त्यांचें एकीकरण झालें या मताचा अवलंब केवळ कपोलकल्पित कल्पना म्हणून करण्यांत आला. डॉ. विंटरनिट्झसारखे पाश्चात्य व डॉ.

रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्यासारखे पौरस्त्य या दृष्टिकोनाच्या आहारीं गेले. वेबरनें तर याच्याही पुढें उडी मारून नारायणीय धर्म अथवा भागवत धर्म, श्वेतद्वीपांत नारायणानें नारदाला सांगितला या महाभारतांतील उल्लेखावरून भक्तिसंप्रदाय बाहेरून हिंदुस्थान देशांत आलेला आहे व हिंदुस्थानाबाहेरील जगांत केवळ ख्रिश्चन धर्मच भक्तिप्रधान असल्यामुळें त्यापासूनच हिंदुस्थानांत भक्तिसंप्रदाय उत्पन्न झाला अशीही कल्पना मांडावयास कमी केलें नाहीं! वास्तविक ख्रिस्ताचा जन्मही नव्हता अशा काळीं पाणिनि व बुद्ध या ख्रिस्तपूर्वकालीन पुरुषांनाही भागवत धर्म व भक्तिसंप्रदाय पूर्णपणें माहीत होता. पण लक्षांत कोण घेतो ? श्रीकृष्ण अनेक नसून एकच आहेत हें मत डॉ. भांडारकरांना उत्तर देऊन लोकमान्य टिळकांनीं गीतारहस्यांत मांडलेलें आहे. त्यांतच डॉ. विंटरनिट्झ् यालाही उत्तर मिळतें. हें मत व त्याचें लोकमान्यांनीं दिलेलें उत्तर माझ्या महाभारतावरील व्याख्यानांच्या ग्रंथांत आलेलें असल्यामुळें मी त्याचा येथें उल्लेख करीत नाहीं.

या विकृत दृष्टिकोनांच्या व्यर्थतेचें ज्ञान हल्लीं विचक्षण विचारवंतांना होऊं लागलें आहे. याची साक्ष म्हणजे भारतीय इतिहास समितीचा प्रयत्न होय. महाभारतेतिहासाचा अथवा भगवान् श्रीकृष्णांच्या कार्याचा व शिकवणुकीचा विचार करतांना आणखी दोन अत्याचारी प्रवृत्तींपासून व संप्रदायांपासून सावध राहण्याची नितान्त आवश्यकता आहे. आधीं गृहीत कृत्यें धरून आपला विकृत दृष्टिकोन ते लादतात. हेतुपुरःसर भारतीय इतिहासाचें व वाङ्मयाचें विडंबन करणारे ते दोन पंथ म्हणजे एक गांधीजीच्या नांवावर चाललेला अहिंसकांचा संप्रदाय व दुसरा कम्युनिस्टांचा संप्रदाय हे होत. त्यांच्या या विकृत दृष्टिकोनांची व त्यांपासून होणाऱ्या इतिहासविडंबनाची कल्पना मी आपणांस पुढच्या व्याख्यानांत देईन.

---

# आक्षेपक

अहिंसावादी संप्रदाय व कम्युनिस्ट संप्रदाय हे तत्त्वज्ञान व दृष्टिकोन या दोन्ही दृष्टीनीं परस्परांपासून कितीही दूर असले तरी भारतीय वाङ्मयाच्या विडंबनाच्या दृष्टीनें दोघांच्याही कार्याची परिणति सारखीच आहे. किंबहुना एका दृष्टीनें कम्युनिस्ट बरे; कारण जगाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन पूर्णपणें अभारतीय असल्यामुळें त्यांचा जो काय प्रयत्न असतो, त्यांत फसण्याचा संभव उरत नाही. त्यांची गृहीत कृत्यें, त्यांचे शास्त्रीय नियम व त्यांचा प्रतिपादनाचा सांचा इतका ठरलेला आहे की, त्यांच्या विशिष्ट विवेचनाची व त्याच्या कारणांची उपपत्ति कोणालाही लावतां येते. अहिंसक सर्वोदयवाद्यांचें तसें नाहीं. ते भारतीय साधूच्या वेषांत राहतील, उपनिषदांच्या परिभाषेत बोलतील व भारतीय संस्कृतीच्या बाह्य परिवेषाचा आविष्कार असा कांहीं करतील कीं, त्यामुळें त्यांच्या विकृतीकरणाची तशी सुस्पष्ट कल्पना येणें स्थूल दृष्टीच्या निरीक्षकाला दुरापास्त व्हावें. म्हणूनच भारतीय संस्कृतीचे उघड शत्रू असलेल्या कम्युनिस्टांची भूमिका जशी सहज समजूं शकते तशी यांची समजू शकत नाही.

घटना व प्रतिपादन यांचें ज्ञान आहे त्या स्वरूपांत प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न चुकणारच नाहीं असें नाही. पण तो प्रयत्न प्रांजल व प्रामाणिकपणाचा असला पाहिजे यासंबंधीं तरी दुमत असावयाचें कारण नाहीं. पण आधी मनाशीं एक दृष्टिकोन निश्चित करावयाचा, व नंतर त्याच्या सिद्धतेसाठीं ऐतिहासिक घटनांची व प्रतिपादनाची कुतरओढ करावयाची या गोष्टी प्रांजलपणाच्या म्हणतां यावयाच्या नाहीत. अहिंसक सर्वोदयवाद्यांच्या वर्गात म. गांधी, महादेवभाई देसाई, श्री. जावडेकर, श्री. विनोबाजी भावे प्रभृति, राष्ट्रापासून तों प्रांतापर्यंतच्या

---

व्याख्यान ३ रें, दि. २८-३-५२

त्या त्या जीवनक्षेत्रांतील महत्त्वाच्या व्यक्ती येतात. त्या व्यक्तींच्या थोरपणाची मला पूर्णपणें जाणीव आहे. पण येथें व्यक्तींचा प्रश्न नसून सत्यासत्याचा प्रश्न आहे. व या व्यक्ती कितीही थोर असल्या तरी त्या कांहीं भगवान् श्रीकृष्णांपेक्षां अधिक थोर आहेत असें मला वाटत नाहीं; व तसें कोणास वाटत असलें तरी तेवढ्यामुळें आपला दृष्टिकोन भगवान् श्रीकृष्णांवर लादण्याचें त्यांना कांहीं कारण नाहीं. आत्यंतिक अहिंसा व आत्यंतिक सत्य या दोहोंनाही या पंथांत सारखेंच महत्त्व दिलें जात असतांही आत्यंतिक अहिंसेच्या पुरस्कारास्तव त्यांना सत्याची कांस सोडावी लागते हें दृश्य मोठें विदारक आहे. अहिंसा हें एक साधन म्हणूनच त्याचें महत्त्व आहे. देशकाल-परिस्थितीचा व व्यक्तीचा विचार न करतां त्या साधनाचा साध्य म्हणून पुरस्कार करीत बसलें तर तेंच पुण्याऐवजीं पाप झाल्या-वांचून राहत नाही.

अर्थातच कोणी कोणत्या ध्येयाचा पुरस्कार करावा हा ज्याचा त्याचा स्वतंत्र प्रश्न असल्यामुळें तो ही मंडळी करूं शकतात; पण प्राचीन सांस्कृतिक वाङ्मयाचा तोच अर्थ आहे, व श्रीकृष्णांचाही तोच संदेश आहे असें सांगून आकसानें तसा अर्थ त्यांच्या चरित्रांतून व वाङ्मयांतून कोणी काढू लागला तर भगवान् श्रीकृष्णांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे हें करणें ‘अनार्यजुष्ट’ असल्यामुळें अस्वर्ग्य व अकीर्तिकर ठरल्यावांचून राहात नाहीं. अर्थाची या बाबतींत कशी गल्लत होते व संदर्भ कसे बुद्ध्या टाळले जातात हें ज्याला पाहावयाचें असेल त्यानें विनोबा भावे यांच्या ‘युद्धे चाप्य-पलायनम्’ या गीतावाक्यावरील भाष्य पहावें. ते लिहितात :—

“क्षत्रियोंके गुणोंमें भगवानने ‘युद्धे चाप्यपलायनम्’ भी एक गुण बतलाया है। परन्तु उसका अर्थ युद्धमें निर्भयतासे छाती खोलकर खडे रहना है, न कि दूसरोंको मारना या संहार करना” (कल्याण मासिक, श्रीमद्भगवद्गीतांक; श्रावण संवत् १९८६ पृ. १०६)

विनोबांचा हा विचित्र अर्थ क्षात्रधर्मासंबंधीं उपलब्ध असलेल्या सर्व भारतीय वाङ्मयाच्या विरुद्ध असून खास भगवद्गीतेच्या उप-

क्रमोपसंहाराशीं त्याचा संबंध शून्य आहे. कंसापासून शाल्वापर्यंत अनेक उन्मत्तांना स्वतःच्या हातानें कंठस्नान घालणारे भगवान् श्रीकृष्ण हे वक्ते, भारतीय क्षत्रियांच्या समूहाला अनेकवार रण-क्षेत्रांत धूळ चारणारा अर्जुन हा श्रोता, व त्याला रक्तपातमय व संहारक अशा युद्धासाठीं प्रवृत्त करणें हें प्रयोजन या तीन गोष्टींचा संदर्भ विनोबांनीं ध्यानांत घ्यावयास नको होता काय? भारतीय युद्ध हें कांहीं सत्याग्रहसंग्रमाच्या पद्धतीनें चालावयाचें होतें अशी तर त्यांनीं आपली समजूत करून घेतलेली नाहीं ना! विनोबा म्हणतात तशा स्वरूपाची फुकट आत्महत्या करून घेणेंच जर आदर्श क्षत्रियत्वाचें लक्षण श्रीकृष्ण समजत असते, तर मग त्यांना अर्जुनाला गीतेचा उपदेश करण्याचें कारणच उरत नाहीं. कारण विनोबांचा आदर्श अर्जुनानें गीतेच्या प्रारंभींच श्रीकृष्णांसमोर दिग्दर्शित केला आहे.

**यदि मामप्रतिकारमशस्त्रं शस्त्रपाणयः।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥** —गीता अ. १-४६

"प्रतिकार न करणाऱ्या व शस्त्रहीन असलेल्या मला शस्त्रें हातांत घेऊन या धृतराष्ट्रपुत्रांनीं जर ठार मारलें तर तें हितप्रदच होईल" या अर्जुनाच्या उद्गारांत व विनोबांनीं केलेल्या 'युद्धे चाप्यपलायनम्' च्या अर्थात काय फरक आहे? विनोबांच्या या आदर्श वर्तणुकीलाच श्रीकृष्ण 'अनार्यजुष्ट, अस्वर्ग्य व क्लैब्य' म्हणत आहेत. 'धर्म्याद्धि युद्धात् श्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते' 'मया हतांस्त्वं जहि' 'निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्' या वाक्यांचे काय अर्थ होतील? गीताईमाउलीच्या स्तन्याचें पान करावयास अखेरीस गांडीवधारी पार्थच लागतो हेंच खरें!

आत्यंतिक अहिंसावाद, आत्यंतिक, व ध्येयाचीच मान मुरगळणारी साधननिष्ठा व आक्रमणाचा अप्रत्यक्ष प्रतिकारात्मक विरोध हें तत्त्वज्ञान श्रीकृष्ण व त्यांचे गीतेसारखे संदेश यांतून काढण्याच्या अहिंसक अत्याचारामुळें विलक्षण स्वरूपाच्या चक्रिकापत्ति सर्वोदयवाद्यांच्या प्रतिपादनांत उत्पन्न झालेल्या आहेत. डॉ. राधाकृष्णन्

यांनीं अर्जुनाच्या भूमिकेचें विशदीकरण करतांना "He takes a human view of the situation and represents the extreme of Non-Violence."

—डॉ. एस. राधाकृष्णन् यांची भगवद्गीता, पृ. ६८

"वातावरणाचा मानवी दृष्टिकोनानुसार आढावा घेऊन अर्जुनानें आत्यंतिक अहिंसेच्या दृष्टिकोनाचें प्रतिनिधित्वच केलें आहे" हे जे उद्गार काढले आहेत ते या दृष्टीनें लक्षांत घेण्यासारखे आहेत. वर दाखविल्याप्रमाणें अप्रतिकारक अहिंसक अवस्थेंत मरण पत्करणाऱ्या अर्जुनाला उत्तर म्हणूनच जर गीता आहे तर पुन्हां तोच उपदेश श्रीकृष्णांनी अर्जुनाला कशास्तव करावयाचा? गीतेंतील वातावरणाचें निरीक्षण केलें तर अर्जुनाची भूमिका ही सर्वोदयवाद्यांची ठरून श्रीकृष्णांची भूमिका ही त्या भूमिकेचें खंडन करणारी भूमिका ठरते. सर्वोदयवाद्यांच्या भूमिकेनुसार गीतेच्या पहिल्या अध्यायांतील अर्जुन आदर्श व श्रीकृष्णच उलट त्या आदर्शाला त्याच्या भूमिकेपासून ढळविणारे ठरतात. एकदां जपानी पंडित डॉ. कागावा यांनी प्रत्यक्ष महात्मा गांधीनाच असें लिहिलें होतें कीं, निरपवाद व आत्यंतिक अहिंसेच्या भूमिकेचें गीतेनें प्रतिपादन केलें हा दृष्टिकोन जर पत्करला तर श्रीकृष्णांच्या उत्तरापेक्षां अर्जुनाच्या आक्षेपालाच अधिक सयुक्तिक मानणें प्रामाणिकपणाचें ठरेल. डॉ. कागावा यांचा हा आक्षेप इतका बिनतोड आहे की गांधीजींनाही त्यावर सरळ उत्तर देणें अवघड होऊन बसलें. अशा प्रसंगीं ज्या पद्धतीचा अवलंब ते करीत, तिचाच त्यांनी पुन्हां एकदां आविष्कार केला. ते डॉ. कागावा यांस म्हणाले, 'मग तुमच्या मतानें शिष्य गुरूपेक्षां मोठा होता तर!' अर्थात् हें कांहीं उत्तर नव्हे. अर्जुनाला कोणीही अहिंसा शिकविण्याची आवश्यकता नाहीं. कारण ती त्याची भूमिका सिद्ध आहे. सर्वोदयवाद्यांना ही गोष्ट मोठी अडचणीची वाटत असल्यामुळें अर्जुनाची भूमिकाच वेगळ्या स्वरूपाची आहे असेंही दाखविण्याचा प्रयत्न करण्याचें त्यांनीं सोडलेलें नाहीं. महात्मा गांधींचे सर्वश्रेष्ठ शिष्य श्री. विनोबा भावे हे लिहितात, "काय अर्जुनाच्या ठिकाणीं अशोकाप्रमाणें

अहिंसावृत्तीचा उदय झाला होता ? नाहीं. ही सारी स्वजनासक्ति होती. आजच्या घटकेलाही जर समोर गुरु, बंधु, आप्त नसते, तर त्यानें शत्रूचीं मुंडकीं चेंडूप्रमाणें उडविलीं असतीं. पण आसक्तिजन्य मोहानें त्याची कर्तव्यनिष्ठा ग्रासली, आणि मग त्याला तत्त्वज्ञान आठवलें. कर्तव्यनिष्ठ मनुष्य मोहग्रस्त झाला तरी नागडी कर्तव्य-च्युति त्याला सहन होत नाहीं. तो तिला एखादा सद्विचार नेस-वितो. तो आतां युद्धच मुळांत पाप आहे असें उसनें प्रतिपादन करूं लागला. युद्धानें कुलक्षय होईल, धर्म लोपेल, स्वैराचार माजेल, व्यभिचारवाद पसरेल, दुर्भिक्ष्य ओढवेल, समाजावर संकटें येतील, असे अनेक मुद्दे तो कृष्णाला समजावून सांगू लागला. त्यानें मांडलेले मुद्दे चुकीचे नव्हते. पण विचाराची गोष्ट इतकीच कीं, अर्जुनाचें तें तत्त्वज्ञान नव्हतें. तो त्याचा प्रज्ञावाद होता. कृष्ण हें जाणून होता. म्हणून त्या मुद्द्यांची दखल न घेतां त्यानें सरळ मोहनाशाचा उपाय अवलंबिला." इ. इ.

अर्जुन हा जर खरोखर अहिंसावादी झालेला असता तर अवांतर ज्ञानविज्ञानें कोणी कितीही सांगितली असतीं तरी मूळ मुद्द्यांचें उत्तर मिळाल्याशिवाय त्याचें समाधान झालें नसतें. पण सबंध गीतेंत या मुद्द्यांचें उत्तर नाहीं. आणि अर्जुनाचें समाधान झालेलें आहे. प्रश्न असा आहे कीं, अर्जुनाची ही मांडलेली भूमिका खरी आहे असें थोडा वेळ गृहीत धरलें तरी त्यामुळें निरपवाद अहिंसा हें श्रीकृष्णाच्या उपदेशाचें तात्पर्य कसें निघणार ? उपदेशाचें पर्य-वसान अर्जुनानें बाण व गांडीव धारण करण्यांत झालें असें गीतेनंत-रच्या महाभारतावरील श्लोकांवरून सहज दिसतें. सत्याग्रह-संग्रा-माचीं कोणतीही शस्त्रें न वापरतां "ततो धनंजयं दृष्ट्वा बाण-गांडीवधारिणम्" असें अर्जुनाचें पर्यवसान झालें आहे. गीता हें महाभारतांतील प्रकरण आहे. 'विसृज्य सशरं चापं' येथून त्याचा प्रारंभ असून 'बाणगांडीवधारिणं' येथें त्याचें पर्यवसान झालेलें आहे. श्रीकृष्णांचें जीवनचरित्र व महाभारत संहितेंत ठिकठिकाणीं त्यांचे दिसणारे प्रासंगिक उद्गार गीतोक्त विचारसरणीच्या

संवादीपणानेंच व्यक्त झालेले आहेत, व सर्वोदयवादाचें जें तत्त्वज्ञान म्हणून सांगण्यांत येतें त्याच्या ते सर्वस्वी विरुद्ध आहेत. एकदां आग्रह सुरू झाला कीं वचनांची उलथापालथ करणें, व आपल्याला नको असेल तें प्रक्षिप्त म्हणून निकालांत काढण्याच्या पद्धतीचा अवलंब करणें इत्यादि सत्याची हत्या करण्याचे प्रकार होऊं लागतात. गांधीजींनीं ११ व्या अध्यायाला काव्यकल्पनेंत काढलेलें आहे, तर वैयक्तिक वा सामुदायिक हत्येचें गीतेनें समर्थन होण्याची भीति वाटून महादेवभाई देसाईपासून सर्व मोठमोठ्या आचार्य व प्राचार्यांनीं वचनांचे अर्थ फिरविण्याची करामत केलेली आहे. तरीही ती साधूं शकत नाहीं व सारी बाजू अंगलट येते, हें स्पष्टपणें दिसूं लागल्यावर रा. शंकरराव जावडेकर यांच्यासारख्या लोकांनीं तर गीतेंतील श्रीकृष्णांचा उपदेश गांधीजींच्या तत्त्वज्ञानापेक्षां निष्कृष्ट प्रतीचा असून गांधी श्रीकृष्णापेक्षांही पुढें गेले होते असें प्रतिपादन करावयास प्रारंभ केला आहे! ( नवयुग १९५० दिवाळी अंक )

श्री. जावडेकर यांचें हें म्हणणें किती बरोबर आहे याचा विचार येथें कर्तव्य नाहीं. इतकें खरें कीं, गांधीजींनीं श्रीकृष्णावर मात केली की नाहीं हा प्रश्न जरी विवाद्य असला तरी आचार्य जावडेकरांनीं मात्र गांधीजींवरही मात केली आहे! आपलें म्हणणें हेंच श्रीकृष्णांचें तत्त्वज्ञान आहे येवढाच गांधीजींचा आग्रह आहे. ते श्रीकृष्णांना सोडावयास सिद्ध नाहींत; पण जावडेकर स्वतः मात्र एकाच उडीत गीता व गांधी या दोघांच्याही पुढें गेले यांत शंका नाहीं! मला आपणांस इतकेंच सांगावयाचें आहे कीं, महाभारतसंहितेंतून दिग्दर्शित झालेलें भगवान् श्रीकृष्णांचें कार्य व स्वरूप आपल्या अंतःकरणांत खऱ्या अर्थानें प्रकाशित व्हावयाचें तर या आग्रही सांप्रदायिक दृष्टिकोनांचा परित्याग करून मूळ संहिता जें सांगत असेल त्याच्याकडे शुद्ध बुद्धीनें पाहिलें पाहिजे.

असाच सांप्रदायिकतेचा काळा चष्मा लावून सांस्कृतिक इतिहासाचा उलगडा करावयास कम्युनिस्ट पुढारी डांगे हेही प्रवृत्त झाले आहेत. मार्क्सच्या साच्यांत महाभारताचा इतिहास बसविण्याच्या

नादांत त्यांनीं खोटे पुरावे तयार करण्यापासून तर बेजबाबदार विधानें ठोकून देण्यापर्यंत हेतुपुरःसर कसा गोंधळ उडविलेला आहे हें मी माझ्या महाभारतावरील व्याख्यानमालेंत दिग्दर्शित केलें आहे. गीता, महाभारत युद्ध व भगवान् श्रीकृष्ण यांच्यासंबंधीं त्यांनीं जें बुद्धिपुरःसर विकृत विवेचन केलेलें आहे, त्याचें स्वरूप फक्त मी येथें मांडतों.

गणराज्य अथवा गण असे शब्द महाभारतांत अनेकवार येतात. गण या शब्दाचा अर्थ या ठिकाणी 'ट्राइब्ज्' असा करून मार्क्सच्या सांच्यांत अवघें भारतीय युद्ध बसविण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला आहे. मार्क्सवादी लोक मानव समाज हा प्रगतिमान् आहे असें मानून त्याची प्रगति ही निसर्गाच्या विरोधविकासी स्वभावामुळें होते असें प्रतिपादन करतात. समाजजीवनाच्या बाबतीत या विरोध-विकासाचें स्वरूप वर्गकलहाच्या रूपानें प्रत्ययास येतें. पूर्वी केव्हांतरी वर्गहीन समाज होता. मानव समाजाचा इतिहास म्हणजे वर्गकलहाचा इतिहास होय. या वर्गकलहाचा प्रारंभ व अंतिम बिंदु म्हणजे वर्गोत्पत्तीचें कारण व वर्गकलहांतून कांहीं काळ येणारी अंतिम अवस्था निश्चित करणारी अर्थोत्पादनाची साधनरूपी शक्ति (Means of Production) होत. मानव समाजाच्या इति-हासाचें हें त्यांचें तत्त्वज्ञान आहे. या तत्त्वज्ञानाप्रमाणें कोणताही समाज पांच अवस्थांतून गेलाच पाहिजे किंबहुना कोणत्याही समा-जाला या अवस्थांतून जावेंच लागेल असें ते मानतात. या पांच अवस्था येणेंप्रमाणें : (१) मनुष्याची प्राथमिक वर्गहीन स्थिति. या स्थितींत निसर्ग विपुल, उत्पादन थोडें, साधनें त्या मानानें गरजे-पुरतीं, सर्वांनीं मिळून उत्पन्न करावें व सर्वांनीं मिळून उपभोग घ्यावा, खाजगी मालमत्तेची या अवस्थेंत कल्पना नाहीं, त्यामुळेंच पिळवणुकीचें कारण नाहीं, पिळणारे लोक नाहींत व म्हणूनच पिळले जाणारेही लोक नाहींत, वर्गच नाहींत, त्यामुळें वर्गकलहाचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. (२) दुसरी अवस्था गुलामगिरीची. आतां येथें उत्पादक व उत्पादनसाधनें वाढल्यामुळें गुलाम व त्यांचे धनी अथवा राबणारा व श्रम घेणारा असें दुसरें नातें उत्पन्न झालें. जगां-

तील इतर पदार्थप्रमाणेंच मनुष्याचे श्रम व त्याची श्रम करण्याची शक्ति ही सुद्धां एक वस्तु होऊन तेंही एक विनिमयाचें द्रव्य बनलें. (३) या गुलामगिरीच्या अवस्थेंतूनच तिचें परिणत स्वरूप म्हणून राज्यसंस्थेचा उदय झाला. राज्यसंस्थेंतून वंशनिष्ठ श्रेष्ठता, एकतंत्री व्यवस्था, सामंत-सरदारांचा वर्ग म्हणजेच सरंजामशाही उत्पन्न होते. (४) यानंतर चवथ्या अवस्थेंत भांडवलशाहीचा पूर्ण विकास होतो. एका बाजूनें ही व्यवस्था वंशनिष्ठ राजसंस्थेचा व सरंजामी पद्धतीचा पूर्ण नाश करून दुसरीकडून कामगार लोकांच्या क्रांतीला जन्म देते आणि नाहींशी होते. (५) यानंतर पांचवी अवस्था म्हणजे कामगार लोकांच्या यशस्वी क्रांतीनंतर येणारी वर्गहीन स्वस्वकर्तव्याची जाणीव असणारी सुखमय अवस्था होय. हिच्यांत व पहिल्या प्राथमिक अवस्थेंत स्वरूपतः फरक नाहीं. फक्त पहिली अज्ञानपूर्वक अवस्था आहे, तर ही अखेरची ज्ञानपूर्वक आहे. मनुष्याचा सारा इतिहास म्हणजे या पांच अवस्थांचा इतिहास होय.

या सर्व प्रतिपादनाला भारतवर्षातील इतिहास हा मोठाच अडथळा असल्यामुळें तो इतिहासही याच पांच अवस्थांत डांगे यांनीं बसवून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. महाभारताचा इतिहास व भारतसंहितेच्या वाङ्मयांत दृष्टीस पडणारें प्रतिबिंब हें पहिल्या दोन अवस्थांचें प्रामुख्यानें प्रतिबिंब असून तिसऱ्या अवस्थेचेंही बीज त्यांच्यांत सांपडतें असें त्यांचें म्हणणें आहे. मी त्यांचें म्हणणें विकृत स्वरूपांत मांडलें असें होऊं नये म्हणून त्यांचें म्हणणें येथें मी त्यांच्याच शब्दांत उद्धृत करतों. त्यांच्या मतें महाभारतामध्यें प्राथमिक अवस्थेचें म्हणजे वर्ग नाहींत, उत्पादन-साधनें सामुदायिक, उपभोग सामुदायिक, व वर्ग नाहींत म्हणून पिळवणूक नाहीं या अवस्थेचें चित्रण पुढीलप्रमाणें आहे. डांगे म्हणतात :—

"The leader of the Pandawas, the victorious section in the Mahabharat war, which faught the Kauravas, both belonging to the same kinship, asked Bhishma a question about kingship. How is it that a mere man, just like any other man, with eyes and hands and a mortal at that,

becomes a king and can rule over men wiser and more powerful individually than him? What gives him this capacity ? "*

" In answer, Bhishma tells us the story of the origin of the State as he understands it. The most important statement that he makes in giving the origin of Kingship or State is that there was a period when there was no State, no Kingship. ( Rajan here really means State ). In the *Kritayuga* or formerly " there was no kingdom and no king, no punisher and no punished ( no State and no exploitation ). By their very law of being, the people protected each other. "

"All writers describing the *Gana* characteristic which is also that of *Kritayuga*, say that their men did not distinguish between 'your and mine.' This was not merely a fiction, but a reality following from the collectivism of the primitive period. "

—(India from Primitive Communism to Slavery, P. 59-60)

"दोघेही एकाच वंशांतील असतांना देखील महाभारतांतील युद्धांत कौरवांशीं भांडून विजयी झालेला पांडवपक्ष भीष्मांना राज्य-संस्थेच्या उत्पत्तीविषयीं प्रश्न विचारूं लागला : 'इतर सामान्य माणसासारखाच असलेला, ज्याचे डोळे, हात व मर्त्यपणाचा धर्म सामान्य माणसासारखाच आहे असा मनुष्य राजा कसा होतो ? व व्यक्तिशः आपल्यापेक्षां अधिक सामर्थ्यशील व शहाण्या लोकांवर अधिराज्य कसें गाजवितो ? त्याला कोणत्या गोष्टीमुळें अधिकार प्राप्त झाला ?' या प्रश्नाचें उत्तर म्हणून भीष्म आपल्या माहिती-

* समानजन्ममरणः समः सर्वैर्गुणैर्नृणाम् ।
विशिष्टबुद्धीन् शूरांश्च कथमेकोऽधितिष्ठति ॥ ८
नैव राज्यं न राजाऽसीन्न च दण्डो न दाण्डिकः ।
धर्मेणैव प्रजाः सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ॥ १४

— महाभारत शान्तिपर्व अ. ५९

प्रमाणें राजसंस्थेचें मूळ सांगत आहेत. हें मूळ सांगत असतां भीष्म जें सर्वांत महत्त्वाचें वक्तव्य करीत आहेत तें हें कीं, असा एक काळ होता कीं, ज्या वेळीं राज्यही नव्हतें व राजाही नव्हता (या ठिकाणीं 'राजन्' या शब्दानें राज्ययंत्रच घेतलें पाहिजे ). कृतयुगांत किंवा अगदीं प्राथमिक अवस्थेंत राज्य नव्हतें, राजा नव्हता, दण्ड देणारा कोणी नव्हता व ज्याला दंड द्यावा असाही कोणी नव्हता ( राज्य नाहीं व पिळवणूकही नाहीं. ). त्यांच्या सामुदायिक जीवनांतील स्वभावसिद्ध प्रथेनुसार लोक एकमेकांचें संरक्षण करीत. गणांचें स्वरूप विशद करतांना, व वस्तुतः तेंच कृतयुगाचेंही स्वरूप आहे, सर्व लेखकांचें या बाबतींत एकमत आहे कीं, त्यावेळीं 'तुझें व माझें' असा भेद माणसें करीत नसत. हें निव्वळ कल्पनाजाल नव्हे. प्राथमिक अवस्थेंतील सामुदायिक जीवनपद्धतीचा तो सत्य व यथार्थ असा आविष्कार आहे."

भारतीय समाजाच्या या प्राथमिक अवस्थेनंतर हळुहळू उत्पादन-साधनें वाढून खाजगी मालमत्तेची कल्पना व वर्ग अस्तित्वांत आले. वर्ग उत्पन्न होतांच धनी व चाकर हें नातें उत्पन्न होऊन पिळणाऱ्या व पिळल्या जाणाऱ्या लोकांच्या स्वरूपांत वर्गविग्रह उत्पन्न झाला. ब्राह्मण व त्यांच्या नादानें क्षत्रिय उत्पादन करणाऱ्या वैश्यांना व शूद्रांना राबवूं लागले. कांहीं क्षत्रियांना त्यांच्या गणजीवनाच्या संस्कारामुळें ही परिस्थिति न आवडून वर्चस्व गाजविणाऱ्या वर्गाविरुद्ध ते बंड करून उठू लागले. महाभारतांतील वेनप्रकरण हें या गोष्टीचें निदर्शन होय. डांगे लिहितात :—

Though this new class-rule of the slave-owners based on violence was sanctified by the blessings of the Divine Creator, it remained still unstable. Hardly had five or six kings ruled than a fresh conflict broke out. It seems, this time led by one of the kings himself, who walked over to the camp of the *Visha* democracy against the Brahma-Kshatra class. King Vena revolted against the new order and fought the Brahmins and Khatriyas. Wena was

assisted and advised in this venture by his intelligent wife, Suneetha, who most probably was fretting at the overthrow of matriarchy and the democracy of the woman. But, however great may be Suneetha and Wena, the new social forces could not reverse their steps back into an epoch, which was dead forever, the epoch of the primitive commune. Wena was defeated and killed by the Brahmins.

—(Ibid, pp. 150 and 151.)

"जरी हें धन्यांचें अत्याचारावर आधारलेलें नवें वर्गवर्चस्व ब्रह्म्याच्या आशीर्वादानें मान्यता मिळालेले असलें तरी तें अजून अस्थिरच होतें. कसेबसे चार किंवा पांच राजे राज्य करावयास लागतात न लागतात तोंच संघर्ष उफाळून उठला. असें दिसतें कीं वैश्य गणमंडळाकडे जाऊन ब्रह्मक्षत्रांच्या वर्गाविरुद्ध एका राजानेंच या संघर्षाचें नेतृत्व पत्करलें. नव्या प्रवाहाविरुद्ध संघर्षाचें उत्थान घडवून ब्राह्मण व क्षत्रिय यांच्याविरुद्ध झगडणारा तो राजा म्हणजे वेन होय. या कामांत त्याची साहाय्यक व सल्लागार त्याची अत्यंत बुद्धिमान् पत्नी सुनीथा ही होती. बहुधा स्त्रीस्वातंत्र्यासाठीं, त्यांची गुलामींतून मुक्तता करण्यासाठीं व गणजीवनांतील त्यांचें स्थान पुन्हां त्यांना प्राप्त करून देण्यासाठीं ती तळमळत असावी. पण सुनीथा व वेन केवढेही थोर असले तरी नव्या सामाजिक प्रवाहाला ते बदलवूं शकत नव्हते; व प्राथमिक अवस्थेंतील जुनी नष्ट झालेली वस्तुस्थिति, सदांकरितां नष्ट झालेली प्राथमिक अवस्था, ते पुन्हां परत आणूं शकत नव्हते. वेनाचा पराभव झाला व ब्राह्मणांनीं त्याला ठार मारलें."

प्राथमिक अवस्थेंतील सामुदायिक जीवनाची वस्तुस्थिति व दुसऱ्या गुलामगिरीच्या परिणतीची वर्गविग्रहात्मक अवस्था यांच्या प्रातिनिधिक असणाऱ्या राज्यसंस्थामधील संघर्ष म्हणजे महाभारतीय युद्ध असून त्या युद्धानें गणराज्यांचा व त्यांच्याच बरोबर प्राथमिक अवस्थेचा संपूर्णपणें नाश करून त्यांच्या जागीं अत्याचारावर आधारलेली एकतंत्री जुलमी अशी वरिष्ठ वर्गाची राजसत्ता

प्रस्थापित केली. या नव्या वर्गवर्चस्वाच्या युगाचें समर्थक तत्त्वज्ञान म्हणजे गीतेचें व महाभारताचें तत्त्वज्ञान होय असें डांगे यांचें म्हणणें आहे. ते लिहितात:—

The name Bharatvarsha is derived from Bharat, the son of Dushyanta in the *Gana–sanghas* of the Pururavas. It was just about that time that territorial states with heriditory monarchy had begun to come into existence and the primitive democracies were fast disappearing in the holocust of the rising slave states. ( Ibid, pp. 159 )

Thus the Mahabharat war involved almost the whole of North India in the terrible carnage. The whole old world of the *Gana–Sanghas*, military democracies, aristocratic *Kula–Sanghas*, slave states and all were thrown in one boiling cauldron of the war. It was the end of the old world of *Ganas* and their values, their morality and ethics, their economy and social relations. A new world wanted to stabilise the world of greed, wealth and concentrated power of the slave-owners over the exploited *Sudras* and *Vaisyas*.

This terrific crisis in social relations and ideological values reflecting them is in a way hinted at in the episode of the *Bhagawadgeeta* leaving aside for the moment the various schools of philosophy, which that book discusses. Its origin suggests that it gave the final death-blow to the collective *Gana* relations and their ideology and enthroned. almost in a cynical fashion, the supremacy of the morality of private property and class relations. The new relations had become a fact, the word of Geeta gave them a theory and tried to silence critics, who may speak from the stand-point of the old *Gana* democracy. In the name of the new Avatar of Divinity and Kali age, the Geeta declared that the age of kinship and collective *Gana* democracy was over, the age of class antagonisms and

exploitation had come; the ethics and morality of the former were dead, the ethics and morality of the latter were supreme.

Certainly the eighteen chapters of the Geeta were not produced between Krishna and Arjun right in the middle of the field of battle, as the traditional account tells us. Even with due respect to the great personalities involved, Krishna was too much of a realist to put himself in such a funny position. The theoretician of the Mahabharat war compiled that book in some peaceful corner. But the compilation is not merely an after-thought, nor is the war situation taken merely as an excuse to retail out all the philosophical schools of the writer's period. If that were the only motive, it could as well have come in the Shanti-Parva, where all sorts of questions and controversies have been raised and answered. The main question which the writer wants to answer in the Geeta, was a general question raised by all thinking people of Bharat war. That question is neither of Sanyas nor of Karmayoga.

But with all that, it is clear to every student of history that Arjun's malady was not dieletic nor his problem one of choosing some school of philosophy. He had posed a simple question that was perhaps uppermost in the minds of all the common men of that period who had still preserved the moral ethical loyalties of *Gana* relations.*

* आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः सम्बन्धिनस्तथा ॥ ३४
एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५

—गीता अ. १.

His claim for a share in the Kingdom even five villages, if not more, had brought to him to a pass where he had to battle and kill his Gurus, grandfathers, brothers, uncles, in short, every known kin, to kill whom according to the ideology of the old period, for whatever reason, was sin, absolutely taboo.

Old *Gana* democracies trained their people to look upon such killing with the greatest horror. How was all this permissible and not sinful ? If the old morality held, then all the leaders on either side were wrong, taking all the *Kulas* to ruin and hell. Give up the claims for property and kingdom and thus avoid the kin-massacre and the sin of it and retire ( Sanyasa ). This was the only logical result of the *Gana–sangha, Kula-sangha* laws. But if the war had to be faught, what was the new ethical law, new social value that sanctioned it and made it sinless to kill kins ? Arjun raised the question, the commonalty of the *Ganas* felt that way and demanded an answer. The theoretician of the *Geeta* gave the answar. The answer shows the hopeless contradictions to which Society has involved itself, and in which the theoretician of the class-society could find no profounder answer than to say : " It is fate; it is your class duty. Trust and obey." And as if to make up for the deficiency of reason and to buttress the new class law with fright and terror, Krishna is supposed to have revealed his *Virat* form in which the destiny of all is visualised in advance. Arjun is silenced and says he is satisfied. Common humanity is talked out, dumb–founded, terrorised, and drugged and goes into an unholy massacre made holy by new relations, philosophy and law. —(Ibid pp. 164–166)

To fight and kill in order to keep, increase, or recover wealth, cattle, villages, land, slaves, kinships, all now the property of the person or family concerned, became the

new duty and right of the Brahmin and Kshatriya families, no matter who was the enemy or opponent concerned. He may be kin, blood-relation, Guru, or Grand-father, *Gana* member or alien. That is the first lesson which the Geeta gives to Arjun as a Kshatriya. (Ibid pp. 167.)

Now came a society of antagonism and exploitation, his food left him and fed somebody else, who did no labour for it. His cloth left him and robed the master while he shivered. If he questioned, he was hit; if he refused to create, the violence of all the society descended on him to force him to create. He was told it was his duty to create. If he asked for a share enough to let him live, he was accused of greed and taught to be modest. Thus came that profound principle of the Geeta and the Upanishadic philosophy.

You have only to do and go on doing what has been ordained for you by your station in life. You have no control or right over the results of what you do. Do not do things with an eye on getting the fruits of your doings and never stop working. —( Ibid pp. 169–170 ).

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूः मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ —गीता अ. २–४७.

नियतं कुरु कर्म त्वम् । —गीता अ. ३–८.

Even the most spacious argument of duty and *Lokasangraha* ( good of the community ) proved a little weak to persuade the vacillating Arjun to kill. Emotions and feelings well up in him. Once dead, all is at an end, either for him, or for them. And when such an argument comes, in answer the Geeta reduces all human beings to an abstraction called the Atman ( soul ) which, though encased in the body, is apart from it. It neither feels nor

thinks, neither lives nor dies. Sensation, feeling etc. are transitory attributes of the body and the very capacity for them can be overcome. And when overcome, man attains the state (that of the *Sthitaprajna*) where his actions cease to have any attachment for him or any binding results on him. Even if he kills them, he does no sin, and since the Atman in the killed and the killer is neutral and immortal, nothing so to say, really has happened. Such a man feels no pleasure or pain, heat or cold. He has attained liberation from his body even when living, and after death is not born again, to reap interest on his investments in sin or virtue. —(Ibid, pp. 170–71)

The theoretician of the post-Bharat class society was not quite certain of his success in such argument convincing and leading man's reason to a conduct and to social relations running counter to all human life and feelings. So like all leaderships of the ruling classes, desirous to uproot the rational personality of the toiling masses and converting them into blind loyalty to ruling class, he comes to the final advice. Leave every law and injunction to its fate and follow me in devotion. —(Ibid, pp. 171.)

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।** —गीता अ. १८–६६

म्हणजे "पौरवांच्या गणसंघांतील दुष्यन्ताचा पुत्र भरत याच्या वरूनच भारतवर्ष हें नांव पडलें आहे. त्याच सुमारास प्रादेशिक राज्ययंत्रें हीं वांशिक राजसंस्थेसह अस्तित्वांत यावयास प्रारंभ झाला होता व गुलामगिरीच्या युगाच्या प्रातिनिधिक अशा त्या राजसंस्थांच्या धक्क्यांत प्राथमिक अवस्थेंतील लोकतंत्रें झपाट्यानें अदृश्य होऊं लागलीं होतीं.

"याप्रमाणें महाभारताच्या युद्धांत संपूर्ण उत्तर भारत भयानक संघर्षांत ओढलें गेलें. गणसंघांचें संपूर्ण जुनें जग, लष्करी लोकतंत्रें,

श्रेष्ठतेच्या जाणिवेनें भारलेले कुलसंघ, गुलामीच्या युगाचें प्रतिबिंब असलेलीं राज्यें हें सर्व युद्धाच्या उकळत्या वातावरणांत फेकलें गेलें जुन्या गणांचें युग व त्यांचीं मूल्यें, त्यांची नीति व त्यांच्या रीतीभाती, त्यांचे सामाजिक संबंध व त्यांचें अर्थशास्त्र यांच्या अंताचाच तो क्षण होता. नव्या जगाला स्थिर व्हावयाचें होतें व हें नवें जग स्पर्धेचें, संपत्तीचें, व शूद्र आणि वैश्य यांची पिळवणूक करण्यासाठी सारी शक्ति एकवटलेल्या धन्यांचें, पिळवणूक करणाऱ्यांचें, होतें सामाजिक संबंध भयानक संघर्षाच्या अवस्थेंत येऊन पोहोंचले असून त्याच्या पाठीमागें वैचारिक मूल्यें कशी उभीं राहिली होती हे भगवद्गीतेच्या प्रकरणांत ध्वनित केलें आहे. त्या पुस्तकांत चर्चिण्यांत आलेल्या निरनिराळ्या तत्त्वज्ञानाच्या सांप्रदायांना तात्पुरते बाजूला ठेवलें तर त्यांची उत्पत्ति गणसंघाला, त्यांतील संबंधांना व त्याच्या विचारसरणीला पदच्युत कसें करण्यांत आलें, त्यांना मृत्यूचा शेवटचा तडाखा कसा मिळाला, व खाजगी मालमत्ता आणि वर्गसंबंध यांच्या नीतिमत्तेला वर्चस्व कसें प्राप्त झालें हें उत्तम सूचित करतें. नवीन संबंध अस्तित्वांत आले. ती एक सत्य घटना होती. गीतेच्या शब्दानें त्यांना विचारसरणी पुरविली व जुन्या गणलोकतंत्रांच्या भूमिकेवरून जो कोणी बोलेल त्याला गप्प बसविण्याचा प्रयत्न केला. परमेश्वरी अवताराच्या व कलियुगाच्या प्रारंभाच्या नांवानें गीतेनें असें घोषित केलें कीं, कुळांचें युग व सामुदायिक गणलोकतंत्र संपलें. वर्गविग्रहाचें व पिळवणुकीचें नवें युग उदय पावलें आहे.

"जुन्या युगाचीं नीतितत्त्वें व व्यवहार मेले व नव्या युगाचीं नीतितत्त्वें व व्यवहार यांचेंच यापुढें वर्चस्व सुरू झालें. पारंपरिक घटना आपणांस कांहींही सांगत असली तरी कृष्णार्जुन संवादाचे गीतेचे १८ अध्याय रणक्षेत्रावर खात्रीनेंच निर्माण झालेले नाहींत. या संवादांत संबंधित असलेल्या व्यक्तींच्या विषयीं योग्य आदर बाळगूनही असेंच म्हणावें लागेल कीं असल्या हास्यास्पद अवस्थेंत स्वतःला न टाकण्याइतका श्रीकृष्ण निश्चित ' वास्तववादी होता. महाभारतीय युद्धाच्या विचारप्रणालीच्या निर्मात्यानें एकांताच्या

शांत जागींच हें पुस्तक निर्माण केलें आहे. पण त्यांतील विचारसरणीही मागाहून सुचलेली नाहीं. किंवा आपल्या वेळच्या सर्व तात्त्विक दृष्टिकोनांना एकत्र उल्लेखण्यासाठींही या पुस्तकांत दिलेल्या युद्धघटनेचा उपयोग करण्यांत आलेला नाहीं. जर तेवढाच उद्देश असता तर या प्रकरणाचा समावेश शांतिपर्वांत झाला असता. कारण तेथें अनेक प्रश्न, चर्चा-प्रतिचर्चा आहेत व त्यांचीं उत्तरेंही देण्यांत आलीं आहेत. गीतेंत ज्या मुख्य प्रश्नाचें उत्तर देण्याची गीताकाराला इच्छा आहे, तो भारतीय युद्धाच्या वेळीं असलेल्या सर्व विचारवंतांनी उत्पन्न केलेला व सर्वांच्या जिव्हाळ्याचा असा प्रश्न आहे. तो प्रश्न संन्यासाचाही नाहीं व कर्मयोगाचाही नाहीं. इतिहासाच्या प्रत्येक अभ्यासकाला ही गोष्ट स्पष्ट माहीत आहे की, अर्जुनासमोर उपासनेचा कोणता मार्ग शोधावा, अथवा तत्त्वज्ञानाच्या कोणत्या संप्रदायाचा अवलंब करावा असा प्रश्न मुळीच नव्हता. ज्यांनीं अजूनही गणांच्या सामुदायिक जीवनांतील नीतिमूल्यें व रीतिभाती शिल्लक ठेविल्या होत्या, अशा सर्वसामान्य माणसांच्या अंतःकरणांत जो प्रश्न होता, तोच त्यानें विचारलेला आहे. त्यानें राज्यावरच काय, पण पांच गांवांवर आपली सत्ता असावी असा आपला सांगितलेला हक्क देखील नाकारण्यांत येऊन त्यासाठी त्याला युद्ध करावें लागणार होतें व त्या युद्धांत गुरु, आजोबा, भाऊ, चुलते, इत्यादि सर्व नातलगांना मारावें लागणार होतें. कोणत्याही कारणास्तव असो, पण जुन्या गणयुगाच्या विचारप्रणालीच्या अनुसार तें एक पाप होतें, महापाप होतें, हेंच अर्जुनानें म्हटलें आहे.

"जुन्या गणलोकतंत्रानें आपल्या लोकांना अशा प्रकारच्या हत्येंत महापाप आहे असें शिकविलें होतें. हें सगळें पाप नसून कर्तव्य कसें ठरेल? जुन्या नीतिमत्तेप्रमाणें पाहिलें तर उभयपक्षांचे लोक आपल्या कुलालाच विनाशाच्या नरकांत न्यावयास तयार झाल्यामुळें चुकीच्या मार्गावर होते. जुन्या गणसंघांच्या व कुलसंघांच्या विचारांची व कायद्यांची तार्किक परिणति, संपत्तीवरील व राज्यावरील अधिकार सोडून व अशा रीतीनें स्वजनवध आणि त्यापासून उत्पन्न

होणारें पाप टाळून संन्यास घेण्यांतच झाली असती. पण जर युद्ध करावयाचेंच असलें व त्यांत स्वजनवध करावयाचाच असला तर त्याचें जो •पूर्ण मंडन करील असा नीतीचा नियम अथवा नवा सामाजिक कायदा कोणता? सर्वसामान्य गणांना जें वाटत होतें, तेंच प्रश्नरूपानें अर्जुनानें विचारलें व उत्तर मागितलें. गीतेच्या निर्मात्यानें उत्तर दिलें. 'समाज किती विलक्षण, परस्परविरोधी वैचारिक संघर्षात सांपडला होता, व वर्गात्मक समाजरचनेच्या तत्त्वज्ञान्यांजवळ या विग्रहाला द्यावयास कांहीही उत्तर कसें नव्हतें हेंच गीताकारांचें उत्तर दिग्दर्शित करतें. 'हें प्रारब्ध आहे; हें तुझें वर्णाचें कर्तव्य आहे; निष्ठा ठेव व पाळ' व जणू कीं काय बुद्धीच्या प्रवाहाला बंद करण्यासाठीं व भय आणि कंप यांच्या मार्गानें नव्या युगाचा कायदा लादण्यासाठी कृष्णानें आपलें विराट स्वरूप प्रकट केलें व त्याच्यांत सर्वांचा शेवट झाल्याचें दाखविलें. अशा रीतीनें अर्जुनाला गप्प बसविण्यांत आलें व माझें समाधान झालें असें तो म्हणाला. सामान्य मानवतेला गप्प बसविण्यांत आलें, मूक बनविण्यांत आलें व भयकंपित करण्यांत आलें; व नव्या संबंधांनीं, तत्त्वज्ञानानें व कायद्यानें पापमयतेला पवित्र करून संहारांत ढकलून देण्यांत आलें.

"आतां वैयक्तिक मत्ता अथवा कौटुंबिक मत्ता यांचें युग सुरू झालें होतें. व आपली संपत्ति, जनावरें, गांवें, प्रदेश, गुलाम, राज्यें टिकवून धरण्यासाठीं, वाढविण्यासाठी अथवा गेलेलीं परत मिळविण्यासाठी युद्ध करणें व संहार करणें हें ब्राह्मण व क्षत्रिय कुटुंबांचें नवीन कर्तव्यकर्म, इतकेंच नव्हे तर धार्मिक कर्तव्य ठरलें! मग ज्याच्याशीं युद्ध करावयाचें व ज्याला मारावयाचें, तो शत्रू अथवा प्रतिपक्षी कोणीही असो, तो आपला जवळचा संबंधी असो, रक्ताच्या नात्याचा असो, गुरु असो वा आजोबा असो, आपल्या जमातीचा असो, वा मित्र असो! क्षत्रिय या नात्यानें गीतेनें अर्जुनाला दिलेला हा पहिला धडा आहे.

"आतां वर्गविग्रह व पिळवणुकीचें युग उत्पन्न झालें होतें. त्याच्या अन्नानें त्याला सोडावें व तें उत्पन्न करण्यासाठीं जो कांहींच परिश्रम

करीत नाहीं अशाचें पोट भरावें; त्याच्या कपड्यांनी त्याला सोडून धन्याचें अंग झांकावें, व त्यानें थंडीनें कुडकुडावें. जर त्यानें प्रश्न विचारला तर त्याच्यावर आघात होई. जर त्यानें उत्पादन करण्याचें नाकारलें तर जबरदस्तीनें त्याला उत्पादन करावयास लावण्यासाठीं सर्व समाज त्याच्यावर अत्याचार करी. त्याला असें सांगण्यांत येई कीं, काम करणें हें तुझें कर्तव्य आहे. जगण्यासाठीं आवश्यक तो भाग तो मागूं लागला तर त्याला लोभी असें संबोधण्यांत येऊन शांत रहा असें शिकविण्यांत येई. उपनिषदांचें तत्त्वज्ञान व गीता यांच्या त्या विख्यात तत्त्वाची निर्मिति अशीच झाली आहे. 'तुला सतत कर्म अन् कर्मच करीत राहिलें पाहिजे. तुझ्या जीवनांतील स्थानानें तुझ्यासाठीं हेंच कर्म निर्माण केलें आहे. तुझ्या कर्माच्या परिणामावर तुझा कांहीं एक अधिकार अथवा नियंत्रण असूं शकत नाहीं. काम करतांना कामाच्या मोबदल्यावर दृष्टि ठेवूं नकोस व काम करावयाचें कधींही थांबवूं नकोस.

"कर्तव्य व लोकसंग्रह यांचें हें विख्यात प्रतिपादन अर्जुनाला संहारासाठी उद्युक्त करावयास कमीच पडलें. संवेदना व भावनांचा त्यांच्यांतील जोर अधिक वाढला. एकदां मृत्यु आला कीं, तेथें सगळेंच संपणार; त्यांच्यासाठी व दुसऱ्यासाठीही असा प्रश्न पुढें आला कीं, आपल्या उत्तरांत गीता आत्म्याच्या कल्पनामय शून्यतेंत सर्व मानवांना विरवून टाकते. तो आत्मा शरीरांत आहे पण त्यापेक्षां वेगळा आहे; त्याला विचार नाहींत कीं संवेदना नाहींत; तो जगतही नाहीं व मरतही नाहीं; भावना, संवेदना इत्यादि शरीराच्या आश्रयानें राहणारे क्षणिक धर्म असून त्यांच्या सामर्थ्यावर विजय मिळवितां येणें शक्य आहे व तो एकदां मिळविल्यावर मनुष्याला स्थितप्रज्ञावस्था प्राप्त होते. त्या अवस्थेंत त्याच्या कर्मांचें त्याला कांहींही आकर्षण नसतें व परिणामांच्या बंधनांत तो सांपडत नाहीं. त्यानें जरी कोणाला मारलें तरी त्याला कांहीं पाप लागत नाहीं. कारण कीं, मरणाऱ्याच्या व मारणाऱ्याच्या शरीरांतील आत्मा एकच असल्यामुळें व तो अमर असल्यामुळें वस्तुतः कांहींच होत नसतें. अशा माणसाला सुखदुःखाच्या व शीतोष्णतेच्या भावना

नसतात. जिवंत असतांनासुद्धा त्यानें शरीरापासून पूर्ण स्वातंत्र्य मिळविलेलें असतें. व मृत्यूनंतर पापपुण्यांच्या जगांत तो मुळीच जन्माला येत नाहीं.

"भारतीय युद्धानंतर उत्पन्न झालेल्या वर्गात्मक समाजरचनेचे तत्त्ववेत्ते हें पूर्णपणें जाणून होते की मनुष्याच्या बुद्धीचें समाधान त्याच्या प्रतिपादनानें होण्यासारखें नाही. व जीवनांत आणि भावनांच्या जगांत तें टिकाव धरण्यासारखेही नाही. त्यामुळें वर्चस्व गाजविणाऱ्या वर्गांच्या नेतृत्वाकडून नेहमीच जें केलें जातें तेंच गीताकारानेंही केलें आहे. समाजांतून स्वतंत्र विचारशक्ति नष्ट करावयाची व वर्चस्व गाजविणाऱ्या वर्गासाठीं समाजाकडून आंधळ्या निष्ठेची मागणी करावयाची हें तें कृत्य होय. गीताकार शेवटचा सल्ला देतात, सर्व नियम व विचार सोड; आणि निष्ठेने मी सांगतों तसें वाग."

श्री. डांगे यांचें हें म्हणणें नुसतें वाचलें तरी एखाद्या वादानें अंध झालेला मनुष्य किती विकृत होऊं शकतो हें दिसतें. व वादांनीं मनुष्य शेवटीं पूर्ण विकृत होतो हें लॉर्ड अॅक्टन यांचें म्हणणें किती सार्थ आहे हें पूर्णपणें लक्षांत येतें. त्यांच्या या विचारप्रणालीचें परीक्षण आपण पुढच्या व्याख्यानांत करूं.

---

# आक्षेपांचें परीक्षण

श्री. डांगे यांनीं भारताच्या इतिहासांतून मार्क्सच्या ज्या ऐतिहासिक पांच अवस्थांचें दिग्दर्शन करण्याचा आग्रह चालविला आहे, ती इतिहासप्रक्रिया अशास्त्रीय असून जर मानवी इतिहास हा यंत्राप्रमाणें कर्मबद्ध असेल तर मनुष्याचें स्वातंत्र्य कोठें राहिलें? कित्येक ठिकाणी इतिहासाचा ओघ संथपणें न वाहतां बिचकणाऱ्या घोड्याप्रमाणें हवा तसा वळलेला दिसतो. कित्येक व्यक्ति व घटना ओघांतून सरळ उत्पन्न न होतां भूकंपाप्रमाणें किंवा ज्वालामुखीच्या उद्रेकाप्रमाणें 'मध्येंच उत्पन्न होऊन त्यांनीं ओघ मात्र हवा तसा पालटून टाकल्याचें आढळतें. ही वस्तुस्थिति खास मार्क्सच्याही ध्यानांत आलेली होती. मानवी जीवनप्रवाहाचा इतिहास बहुतांशीं कलहस्वरूप असला तरी हे कलह वर्गकलहात्मक असून त्यांचें मूळ केवळ आर्थिकतेंत आहे असें म्हणणें हा मानवी भावनांचा सर्वस्वी अवमान आहे. अर्थमूलकता व भावमूलकता या दोन्हींतही मानवी इतिहासाचें मूळ पाहिलें पाहिजे. तरच मानवी इतिहास उलगडेल, एरवीं नाहीं. ह्या सगळ्या अशास्त्रीय गृहीत कृत्यांचें मूळ कारण इतिहासापेक्षांही तत्त्वज्ञानांत आहे. कोणत्याही संघातांतील स्थूल किंवा सूक्ष्म घटकांचें परस्परसंबंध विरोधात्मकच असले पाहिजेत हा मार्क्सवाद्यांचा आग्रह आहे. पण विज्ञानाच्या उत्क्रांतीनें ही गोष्ट आतां पार खोटी ठरविली आहे.

यांतील सत्य हें अर्धसत्य आहे. पूर्ण सत्य नव्हे. एका साखरेच्या कणांत ऑक्सिजनचे ११, हैड्रोजनचे २२, व कार्बनचे ४ कण असतात. साखरेच्या कणांत या तिन्ही कणांचे परस्परसंबंध विरोधी आहेत असें कोणीही दाखविलेलें नाहीं. ह्या अर्धसत्याला सत्य समजून मानवी इतिहासाची प्रक्रिया त्यावर लादणें भयंकर धोक्याचें आहे.

---

व्याख्यान ४ थें, दिनांक २९-३-५२

शिवाय मानवी जीवनाचा विचार करतांना केवळ त्यांतील जड-प्रवाहाचा विचार न करतां मानवी शरीरांत भासमान होणाऱ्या सर्व भावनांचा, संवेदनांचा व त्याच्या मुळाशी असलेल्या अस्मितेच्या (Ego) मूलभूत जाणिवेचाही विचार करण्याची आवश्यकता आहे. मानवी जीवन म्हणजेच या ज्ञानमय व चैतन्ययुक्त अशा अस्मितेच्या अथवा मानवी संवित्‌च्या विलासाचा चढउतार होय. मानवी इतिहास हा या अस्मितेच्या खेळाचेंच प्रतिबिब म्हणतां येईल. या मानवी संवित्‌चा अजूनपर्यंत मार्क्सवाद्यांनीं विचार केला नसल्याची कबुली स्वतः त्यांचे ऋषि व महर्षि देत आहेत. आपल्या 'मार्क्सिस्ट फिलॉसफी ॲण्ड दि सायन्सेस' या ग्रंथांत हॉल्डेन असें म्हणतो कीं–

It is at present an unanswerable question because we have not got the necessary data and not in the least, I believe because it involves contradictions and antimonies any more serious than those with which physicists are already dealing. For that reason Engels left it alone except for a few sentences. The additional knowledge of the last fifty years does not yet allow us even to pose the question in its proper form. —( Marxist Philosophy and sciences pp. 141. )

मानवी जीवनाचे व त्या प्रवाहांतील गतींना मुख्यतः कारण असलेलें जें हें तत्त्व त्याच्याविषयीं इतकें विलक्षण अज्ञान असतां त्याच्याच संकोच–विकासाचा खेळ असणाऱ्या इतिहासावर एखादी जड प्रक्रिया लादावयाची ही गोष्ट मुळांतच भीषण आहे. इतकेंच नव्हे तर जीवनाचें केवळ एकांगी ज्ञान आपणांस आहे हें मान्य करूनही त्याच्या सर्व अंगांचा उलगडा मात्र एकाच पद्धतीनें करण्याचा हा अट्टाहास विघातकही आहे. इतिहासाचा मानवी संवित्‌शीं घनिष्ठ संबंध आहे व तिचें ज्ञान आपणांस नाहीं ही कालच्या लेनिन-पासून तर आजच्या हॉल्डेनपर्यंत सर्वच मार्क्सवाद्यांची स्पष्ट कबुली आहे. मग अपुरें ज्ञान त्या संवित्‌वर लादण्याचा व इतिहासाच्या प्रवाहाचा सोयीस्कर अर्थ करण्याचा हा उपद्व्याप कशासाठीं? प्रश्न

असा आहे कीं,इतिहास म्हणजे जीवनाचा प्रवाह. त्या प्रवाहांत कलह असेल तसें साम्यही असेल. कलहावर आधारलेलें द्वैत असेल तर विभिन्नतेंतही परस्परसहकार्यानें जीवनांत संवादी संगीत निर्माण करणारें द्वंद्वही असूं शकेल. कलहाचें सुद्धां एकच स्वरूप असूं शकणार नाही. जसा तो कित्येक ठिकाणी आर्थिक स्वरूपाचा राहील तसाच तो कित्येक ठिकाणी भावमूलकही राहील. व हिंदुस्थानच्या इतिहासांत तर ही भावमूलकता विशेषच राहते. भावजगत् हेंच संवित्चें स्वाभाविक जग होय.

मार्क्सवाद्यांच्या इतिहासप्रक्रियेसंबंधानें तूर्त यापेक्षां अधिक सांगण्याची आवश्यकता नाहीं. ती अपुरी, एकांगी व अशास्त्रीय आहे, मानवी जीवनाचा व भावनांचा अपमान करणारी आहे, व अशास्त्रीयतेपेक्षांही आग्रहीपणावर आधारलेली आहे हें आतां पुष्कळांना उमगूं लागलें आहे. हिंदुस्थानचा इतिहास उलगडत असतांना युरोपच्या इतिहासाची एका विशिष्ट पद्धतीनें तेथील आर्थिक कलह तीव्र असल्यामुळें संगति लावण्यांत यशस्वी ठरलेले हे लोक गोंधळून जातात. याचें कारण भारतीय संस्कृतीची विशेष अवस्था ते ध्यानांत घेत नाहींत. पूर्वीं केव्हां तरी समाज रानटी अवस्थेंत असेल त्याविषयीं मला वाद करावयाचा नाहीं. माझें इतकेंच म्हणणें आहे कीं, ऋग्वेदापासूनचा हिंदुस्थानचा जो इतिहास आहे. तो सांस्कृतिक इतिहास संस्कृतीला पूर्ण स्वरूप आल्यानंतरचा आहे. इतिहासांतील घटना व उल्लेख यांच्यावर आपल्या हेतूंचा आरोप न करतां जें सत्य असेल त्याकडे केवळ ज्ञानग्रहणाच्या बुद्धीनें पाहिलें तर हेंच सत्य अनुभवास येईल. आधीं आपल्या मनाशीं इतिहासप्रक्रिया ठरवून नंतर त्या इतिहासप्रक्रियेंतील सिद्धांत घटनेंतून पहाण्याचा आग्रह पार पाडण्यासाठीं त्या घटनेलाच पिळून काढणें हें कांहीं सत्यान्वेषी इतिहासकाराचें कार्य नव्हे. आपल्या विषयाच्या मर्यादेंत न बसल्याकारणानें ऋग्वेदादि वेदवाङ्मयाच्या बाबतीत मी येथें शिरत नाहीं. पण महाभारतांत दिग्दर्शित केलेल्या संस्कृतींत अपूर्णतेंतून पूर्णतेकडे असा प्रकार नसून पूर्णावस्थेस पोंचलेल्या संस्कृतीच्या जीवनाचेंच प्रतिबिंब आढळतें असें मला म्हणावयाचें आहे. डांगे यांनीं जे जे

पुरावे दिले आहेत ते सर्व खोटे असून पूर्वापार संबंध सोडून देऊन मधलींच कांहीं वाक्यें उचलून घेऊन त्यांनीं एक कल्पित कादंबरी निर्माण केली आहे. केवळ कादंबरीशिवाय तेथें दुसरें कांहींही आढळावयाचें नाही. मार्क्सच्या इतिहासप्रक्रियेच्या साच्यांत भारतीय इतिहास कसा कोंबला जाऊं शकत नाहीं याचें प्रत्यंतर म्हणजेच त्यांनीं दिलेले पुरावे असून या नसत्या उपद्व्यापांत ते पडले नसते तर बरें झालें असतें असें म्हणण्याची खास कम्युनिस्टांवरच पाळी आहे. त्यांच्या इतिहासप्रक्रियेसंबंधीं मी सांगितलेंच आहे. आतां त्यांनीं तिचें जें दिग्दर्शन भारतीय इतिहासांतून घडविलेलें आहे त्याकडे वळूं.

ज्या भीष्मांच्या संवादांत प्राथमिक अवस्थेचें म्हणजे उत्पादन-साधनें सामुदायिक, उपभोग सामुदायिक, वर्ग नाहींत म्हणून पिळवणूक नाहीं अशा प्राथमिक अवस्थेचें वर्णन आहे असें श्री. डांगे म्हणतात, तें प्राथमिक अवस्थेचें वर्णन नसून कृतयुगाचें वर्णन आहे. महाभारतांतील "न वै राज्यम्" इत्यादि जो श्लोक त्यांनीं उद्धृत केलेला आहे त्याच्या आधींचा श्लोक ध्यानांत घेणें अवश्य आहे. महाभारतांतील तें वर्णन पुढीलप्रमाणें आहेः—

**नियतस्त्वं नरव्याघ्र शृणु सर्वमशेषतः ।**
**यथाराज्यं समुत्पन्नमादौ कृतयुगेऽभवत् ॥ १३**
**न वै राज्यं न राजाऽऽसीन्न च दण्डो न दाण्डिकः ।**
**धर्मेणैव प्रजाः सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ॥ १४**
**पाल्यमानास्तथाऽन्योऽन्यं नरा धर्मेण भारत ।**
**खेदं परमुपाजग्मुस्ततस्तान्मोह आविशत् ॥ १५**
**ते मोहवशमापन्ना मनुजा मनुजर्षभ ।**
**प्रतिपत्तिविमोहाच्च धर्मस्तेषामनीनशत् ॥ १६**

— महाभारत शांतिपर्व अध्याय ५९

"हे नरव्याघ्रा, मी तुला जें सांगतों तें लक्षपूर्वक ऐक. आधीं कृतयुगांत राज्य कसें उत्पन्न झालें तें मी तुला सांगतों. पूर्वी राज्य नव्हतें, राजा नव्हता, ज्याला दण्ड करावा असा अपराधी नव्हता व

ज्यानें दण्ड करावे असा अधिकारीही नव्हता. आपआपल्या कर्तव्याची जाणीव ठेवून "एकमेकां साह्य करूं अवघे धरूं सुपंथ" या अवस्थेप्रमाणें लोक एकमेकांचें संरक्षण करीत असत. पुष्कळ दिवस असा काळ गेल्यानंतर या चिरशांततेंत हळुहळू आळस उत्पन्न होऊन त्या एक प्रकारच्या सारखेपणाच्याच कंटाळ्यांतून मोह उत्पन्न झाला व मोहामुळें अज्ञान उत्पन्न होऊन अथवा ज्ञान नष्ट होऊन त्यांच्यांतली केवळ कर्तव्यबुद्धीची जाणीव अथवा धर्ममयता नष्ट झाली."

या ठिकाणी एक प्रकारच्या अपूर्ण प्राथमिकतेंतून वर जाण्याचा क्रम दिग्दर्शित केलेला नसून पूर्णतेंतून अधःपतनाकडे वळण्याचा स्वाभाविक क्रम दिग्दर्शित केलेला आहे. राज्यविहीन अवस्थेचें हें चित्र कृतयुगांतील आहे असें महाभारतकार म्हणतात. कृत म्हणजे हेतुतः व प्रयत्नपूर्वक निर्माण केलेलें. संपूर्ण भारतीय वाङ्मयांत नैसर्गिक, रानटी स्वरूपाच्या प्राथमिकतेला वा पशुतेला उद्देशून कृत शब्दाचा वापर कुठेंही असला तर तो डांगे व त्यांचे कम्युनिस्ट मित्र यांनी अवश्य दाखवून द्यावा. कृत शब्दांतील 'कृ' धातु ध्यानांत घेतला तरीही त्यांच्या विधानांतील फोलपणा ध्यानांत येण्यासारखा आहे. "पूर्णापासुनि ढळलेलें जग जातें पूर्णाकडे" हा जो भारतीय तत्त्वज्ञानाचा सिद्धांत तोच मानवी जीवनप्रवाहाला लावून त्या प्रवाहाचा ओघ अथवा इतिहास मांडून दाखविण्याची त्यांची पद्धति आहे.

या पद्धतीच्या अनुसार कृतयुगापासून कलियुगापर्यंत म्हणजेच विकसनाच्या अंतिमापासून अधःपतनाच्या अंतिमापर्यंत मानवी जीवनांतील अवस्थांचें ते आपल्या वाङ्मयांतून दर्शन घडवीत अससात. प्रत्येक ठिकाणीं कृतयुग हें अभिलषणीय आहे असेंच वर्णन असून ती एक अभिलषणीय व साध्यभूत अवस्था आहे असेंच वारंवार घोषित केलेलें आढळतें, व कलियुगाची मात्र वारंवार निंदा केलेली आढळते. मी म्हणतों याहून वेगळा कृत व कलि या शब्दांचा संकेत असल्याचें संपूर्ण भारतीय वाङ्मयाच्या पसाऱ्यांतून कोणीही दाखवून द्यावें. डांगे यांनीं या बाबतींत ऐतरेय

ब्राह्मणांतील दिलेला पुरावा किती खोटा व भ्रामक आहे, आणि तो किती लबाडीनें दिलेला आहे हें मी माझ्या महाभारतावरील व्याख्यानमालेंत दिग्दर्शित केलेलें असून तिच्या झालेल्या ग्रंथांत तें सविस्तरपणें आलेलें असल्यामुळें त्याचा मी येथें पुन्हां उल्लेख करीत नाही. तात्पर्य प्राथमिक अवस्था गृहीत धरून डांगे यांनीं भीष्मांवर आपलें म्हणणें लादलेलें आहे. कोणतीही प्राथमिक अवस्था असली तरी तिच्यांत मानसशास्त्रज्ञांनीं ज्याला स्वाभाविक प्रवृत्ति असें म्हटलें आहे त्या पशुत्वाच्या मनोवृति राहणारच. भावना या अत्यंत स्वाभाविक असून स्वाभाविक प्रवृत्तींच्या मध्यें मूळ मानवी मन व्यक्तीपुरतेंच पहाणारें असल्यामुळें संस्कारावांचून त्याच्यांत बदल पडू शकत नाहीं. अशा स्थितीत या स्वाभाविक प्रवृत्तीवर विजय मिळविल्यावांचून अथवा आपल्या स्वचें क्षितिज पूर्णपणें विश्वरूप केल्यावांचून केवळ कर्तव्यानुसार वागण्याची प्रवृत्ति निर्माण होणार कशी ? ही गोष्ट संस्कारावांचून सिद्ध होत नसल्यामुळेंच या विकसनावस्थेला कृतयुग म्हणजे निर्माण केलेली असें म्हटलेलें आहे. प्रयत्नपूर्वक मनाचें उदात्तीकरण करून सहज प्रवृत्ति जिकतां येतात असा आजच्या मानसशास्त्रज्ञांचा अभिप्राय आहे. प्राथमिक अवस्था म्हटली कीं तिच्यांत ह्या प्रवृत्ति जिंकतां येणार कशा ? म्हणूनच मीं म्हटलें आहे कीं, इतिहास अर्थमूलक आहे या सिद्धांतावर आत्यंतिक भर देणें एकांगीपणाचें असून तो भावमूलक आहे हेंही लक्षांत घेतल्यावांचून तो नीट उलगडत नाहीं. भीष्म 'प्रतिपत्तिविमोह' असा शब्द वापरतात याचाच अर्थ कृत-युगाची अवस्था ही प्रतिपत्तीची म्हणजेच ज्ञानाची आहे हें स्पष्ट होतें. पण लक्षांत कोण घेतो ? आम्ही डांगे यांस असें म्हणतों की, त्यांनीं 'विदरिंग अवे ऑफ दि स्टेट' हें मार्क्सचें सूत्र व त्यावरील लेनिनचें भाष्य पुन्हां एकदां वाचावें व प्रतिपत्तिविमोह यांतील प्रतिपत्ति या शब्दाचा भारतीय संस्कृतीच्या अथवा वाङमयाच्या तात्त्विक संकेतानुसार होणारा अर्थ नीट लक्षांत घ्यावा. कृतयुगाचा संकेतही ध्यानांत घेऊन त्यांतील 'कृ' धातूचें नीट परीक्षण करावें व

आग्रहीपणा सोडून द्यावा. म्हणजे 'न वै राज्यं' हें वर्णन कोणत्या अवस्थेंतील आहे हें त्यांच्या ध्यानांत येईल. कम्युनिझमनें जिची कल्पना केलेली आहे ती सुवर्णयुगात्मक अवस्था हीच आहे.

आतां डांगे यांच्या दुसऱ्या मुद्द्याकडे वळूं. एकदां मूळ चुकलें कीं सारेंच हुकतें. तसाच प्रकार त्याच्याही बाबतीत झालेला आहे. आत्यंतिक विकसन निर्माण झालें तरी मानवांतील पशुप्रवृत्ति मूलभूत असल्याकारणानें पुनःपुन्हां अधःपतनही होतें. प्लेटोनेंही हें मान्य केलेलें तत्त्व आहे. असो. वेनाच्या कथेचाही त्यांनीं असाच विपर्यास केलेला आहे. वेनाचें बंड हे वर्ग उत्पन्न झाल्यावरच्या वर्चस्वप्रधान अवस्थेशीं जनस्वातंत्र्यार्थ पुकारलेलें बंड होय, हें त्यांचें कल्पनाजाल आहे. वेनाच्या कथेला त्यांचाही पुरावा महाभारतांतीलच आहे. पण महाभारत वेनासंबंधीं काय म्हणतें तें पहाण्यासारखें आहे. महाभारतकार म्हणतात :—

**तं प्रजासु विधर्माणं रागद्वेषवशानुगम् ।**
**मन्त्रभूतैः कुशैर्जघ्नुॠषयो ब्रह्मवादिनः ॥ ९४**

—महाभारत शान्तिपर्व अ. ५९.

राजा वेन हा रागद्वेषादि मनोविकारांच्या आधीन होऊन प्रजांच्या बाबतींतील आपल्या कर्तव्याला पूर्णपणें चुकला म्हणून ब्रह्मवादी ऋषींनी मंत्रमय कुशांनी त्याला ठार मारलें. रागद्वेषादि मनोविकारांच्या आधीन झालेला कर्तव्यभ्रष्ट अरेराव हें वेनाचें महाभारतकार वर्णन करतात. डांगे यांनीं सोयीस्कर रीतीनें रागद्वेषवशानुग व विधर्माण हीं दोन्हीही पदें गाळून टाकलीं आहेत. आधार दिल्याचा देखावा उत्पन्न करण्यासाठीं वेदापासून भारतापर्यंतच्या अनेक ग्रंथांतील कोपऱ्यांतीलही संस्कृत वचनें जर त्यांना देतां येतात तर वेनाच्याच बाबतींतील हा महत्त्वाचा उल्लेख त्यांनीं कां गाळला? मला तर आणखी असेंही म्हणावयाचें आहे कीं, भारत सोडून इतरत्रही वेनाची कथा जेथें जेथें येते त्या प्रत्येक ठिकाणीं याहून वेगळें वर्णन त्यांनीं दाखवून द्यावें. तात्पर्य, क्रांतीचा अग्रदूत असलेला वेन हा डांगे यांच्या कादंबरीचा नायक असेल; पण महा-

भारतांतील वेनाशीं त्याचा कांहीही संबंध नाहीं. सुनीथा नांवाची वेनाची बायको स्त्रीस्वातंत्र्याच्या पुरस्कारानें प्रेरित होऊन त्याला सहायक झाली होती असेंही डांगे यांनीं वर्णन केलें आहे. आधीं सुनीथा ही वेनाची बायको नसून आई होती असें महाभारतांत वर्णन आहे. तिच्या साहाय्याचा महाभारतांत कोठेंही उल्लेख नाहीं. सुनीथेचा भागवत-पुराणांत असलेला उल्लेख ती वेनाला प्रेरक असल्याचें मुळींच दाखवीत नाहीं. उलट बरोबरीच्या, सहज खेळावयास आलेल्या सोबत्यांना गळे दाबून ठार मारणारा व ते तळमळून मरत असतां त्या दृश्याच्या दारुणतेंत आनंद अनुभवणारा अधम वेन मात्र तेथें दृष्टीस पडतो. महाभारतांतील सुनीथेचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे.

**मृत्योस्तु दुहिता राजन्सुनीथा नाम मानसी ।**
**प्रख्याता त्रिषु लोकेषु याऽसौ वेनमजीजनत् ।। ९३**

—महाभारत शान्तिपर्व अ. ५९

"हे राजा, मृत्यूची सुनीथा नांवाची मानसकन्या होती व तिनें वेनाला जन्म दिला."

एकतर ही कथा रूपकात्मक मानली व त्या रूपकांतून राज्यसंस्था कशी निर्माण झाली ह्याचा इतिहास पाहिला तरी तें चांगलें उलगडू शकेल. वेन हें मानवतेंतील पशुत्व असून सुनीथा हें विनाशाचें चिन्ह आहे. विनाशमय परिस्थितीचा किंवा पूर्ण अधःपतनाचा क्षण जवळ येत चालल्याचें निदर्शन म्हणून पशुत्व कसें उफाळलें होतें हें येथे दिग्दर्शित केलें असून त्याला आवर घालण्यासाठीं समाजांतील श्रेष्ठ लोकधुरीणांनीं पृथूच्या रूपानें राज्यसंस्था निर्माण केली असा महाभारतकारांचा अभिप्राय आहे. तें रूपक न मानतां ती एक ऐतिहासिक गोष्ट मानली तर वेन हा अरेराव सुलतानशहाचा अवतार असून तो सुनीथेचा मुलगा होता येवढेंच निष्पन्न होतें. कम्युनिस्टांच्या नीतिमूल्यांप्रमाणे त्यांच्या कल्पित कादंबरीत आईचें पत्नींत रूपांतर व्हावयास कदाचित् हरकतही नसेल !

आतां डांगे यांच्या तिसऱ्या मुद्द्याकडे वळूं. भारताचा उल्लेख करतांना पौरव गणसंघांतील दुष्यंताचा मुलगा येवढाच त्यांनीं उल्लेख केला असून त्या सुमारास प्रादेशिक राज्यतंत्रें, वांशिक राज्यसंस्थेसह अस्तित्वांत यावयास प्रारंभ झाला होता असें त्यांचें म्हणणें आहे. महाभारतानुसार दुष्यन्त हा पौरव गणांतील एक सामान्य मनुष्य नसून तो राजा होता व राजा या संस्थेचीं सर्व लक्षणें त्याला लागू पडत होतीं असें स्पष्टपणें दिसतें. भरताचा पिता जो दुष्यन्त त्याच्याविषयीचे महाभारतांतील पुढील उल्लेख पहाः–

**पौरवाणां वंशकरो दुष्यंतो नाम वीर्यवान् ।**
**पृथिव्याश्चतुरन्ताया गोप्ता भरतसत्तम ॥ ३**
**चतुर्भागं भुवः कृत्स्नं यो भुंक्ते मनुजेश्वरः ।**
**समुद्रावरणांश्चापि देशान्स समितिंजयः ॥ ४**
**संमतः स महीपालः प्रसन्नपुरराष्ट्रवान् ॥ १४**
**भूयो धर्मपरैर्भावैर्मुदितं जनमादिशत् ॥ १५**

—महाभारत आदिपर्व अ. ६८

"पौरवांच्या वंशांत उत्पन्न झालेला व सर्व पृथ्वीचें संरक्षण करणारा दुष्यन्त नांवाचा राजा असून तो राजा समुद्रवलयांकित सर्व पृथ्वीचें राज्य करीत असे. त्याचें राष्ट्र व नगरांतील लोक प्रसन्न असून सर्वांचा आवडता असा तो राजा प्रजा अधिकाधिक धार्मिक कशी होईल अशीच खटपट करीत असे."

आतां प्रत्यक्ष 'राजा' या शब्दानें केलेला व त्या संस्थेचा निदर्शक असा 'अमात्य' शब्दही वापरलेला दुसरा उल्लेख पहाः–

**ततो मृगसहस्राणि हत्वा सबलवाहनः ।**
**राजा मृगप्रसङ्गेन वनमन्यद्विवेश ह ॥१**

—महाभारत आदिपर्व अ. ७१

**ततो गच्छन्महाबाहुरेकोऽमात्यान्विसृज्य तान् ।**
**नापश्यच्चाश्रमे तस्मिंस्तमृषिं संशितव्रतम् ॥ १**

—महाभारत आदिपर्व अ. ७२

"आपल्या सैन्यासहित मृगया करणाऱ्या त्या राजानें सहस्रावधि पशु मारून दुसऱ्या अरण्यांत प्रवेश केला. नंतर त्या महाबाहूनें आपल्या अमात्यांना सोडून एकट्यानेंच त्या आश्रमांत प्रवेश केला."

या दोन्ही उल्लेखांत राजा व अमात्य हे राजसंस्थेचें स्पष्ट निदर्शक शब्द आहेत. राजसंस्थेचें अस्तित्व दुष्यंताचे वेळीं दृढमूल झाल्याचा आणखी एक पुरावा म्हणजे युवराजसंस्थेचा स्पष्ट निर्देश होय. दुष्यंताशी गांधर्व विवाह करावयास स्वतःची मान्यता देत असतांना शकुंतला म्हणते–

**सत्यं मे प्रतिजानीहि यथा वक्ष्याम्यहं रहः।**
**मयि जायेत यः पुत्रः स भवेत्त्वदनन्तरः ॥१६**
**युवराजो महाराज सत्यमेतद्ब्रवीमि ते ।**
**यद्येतदेवं दुष्यंत अस्तु मे संगमस्त्वया ॥१७**

--महाभारत आदिपर्व अ. ७३

"एकांतांत मी आपल्यासमोर एक अट घालतें. मला होणारा मुलगा हा तुमच्यानंतर राजा होईल. हें जर आपणांस मान्य असेल व त्याला यौवराज्याचा अभिषेक करीत असाल तरच मी आपणांशीं गांधर्व विवाह करीन."

प्रादेशिक व वांशिक राजसत्ता पूर्णपणें अस्तित्वांत नव्हे, भरांत होती असाच याचा अर्थ नाहीं का? भरत तर नुसता राजा नसून चक्रवर्ती व सम्राट होता असा महाभारतांत दोनदां उल्लेख आलेला आहे. महाभारतकार म्हणतात–

**दुष्यन्तस्तु तदा राजा पुत्रं शाकुन्तलं तदा ।**
**भरतं नामतः कृत्वा यौवराज्येऽभ्यषेचयत् ॥ १२६**
**तस्य तत्प्रथितं चक्रं प्रावर्तत महात्मनः ।**
**भास्वरं दिव्यमजितं लोकसंनादनं महत् ॥ १२७**
**स विजित्य महीपालांश्चकार वशवर्तिनः ।**
**चचार च सतां धर्मं प्राप चानुत्तमं यशः ॥ १२८**
**स राजा चक्रवर्त्यासीत्सार्वभौमः प्रतापवान् ।**
**ईजे च बहुभिर्यज्ञैर्यथा शक्रो मरुत्पतिः ॥ १२९**

—महाभारत आदिपर्व अ. ७४

"नंतर दुष्यंतानें शकुंतलेच्या पुत्राचें भरत असें नांव ठेविलें. व त्याला यौवराज्याचा अभिषेक केला. त्याचे दिव्य, तेजस्वी, अजिक्य व सर्व लोकांत गाजलेलें आज्ञाचक्र प्रवृत्त झालें. राजे लोकांना जिकून त्यांना त्यानें स्वाधीन केलें व संतांच्या मार्गाचें अनुकरण करून श्रेष्ठ यश मिळविलें. हा प्रतापी राजा सार्वभौम असून चक्रवर्ती होता. देवेंद्राप्रमाणें त्यानें अनेक यज्ञ केले."

जगांतील श्रीकृष्णकाळापूर्वीच्या श्रेष्ठ सम्राटांत भरताची गणना होते. भगवान् श्रीकृष्णांनी प्रसिद्ध अशा पांच सम्राटांत भरताची गणना केलेली आहे. ते म्हणतात :—

**जित्वा जय्यान्यौवनाश्विः पालनाच्च भगीरथः ।**
**कार्तवीर्यस्तपोवीर्याद् बलात्तु भरतो विभुः ॥ १५**
**ऋद्धया मरुत्तस्तान्पञ्च सम्राजस्त्वनुशुश्रुम ।**
**साम्राज्यमिच्छतस्ते तु सर्वाकारं युधिष्ठिर ॥ १६**

—महाभारत सभापर्व अध्याय १५

"अजिक्य लोकांना जिकल्यामुळें मांधाता, प्रजापालनामुळें भगीरथ, तपस्येच्या प्रभावामुळें कार्तवीर्य, सामर्थ्यामुळें भरत व वैभवसंपन्नतेमुळें मरुत्त असे पांच सम्राट आम्ही ऐकले आहेत."

तात्पर्य डांगे म्हणतात त्याप्रमाणें पौरव गणसंघांतील दुष्यंताचा भरत मुलगा दिसत नसून तो एका राजाचा मुलगा व सुप्रसिद्ध सम्राट आहे. नुकतेच भरताच्या वेळी राजसत्तेचें युग उत्पन्न झालेलें होतें असेंही दिसत नाही. महाभारतांतील आदिपर्वाच्या ९४ व्या अध्यायांतील वंशवर्णनाकडे पाहिलें तर भरतापूर्वी दहा पिढ्या तरी त्या वंशांत राज्य असल्याचें दिसतें. दहा पिढ्या म्हणजे नुकतेंच असें असेल तर प्रश्न नाहीं!

आतां डांगे यांच्या पुढच्या व महत्त्वाच्या मुद्द्याकडे वळूं. गणांची अवस्था ही प्राथमिक अवस्थेची द्योतक आहे व त्यानंतर राजसत्तेचें युग उत्पन्न झालें हें गृहीत कृत्य धरून महाभारतीय युद्ध हें गण व उदय पावणारी नवी राजसत्ता यांच्यांतील युद्ध होतें असें त्यांनीं आधारांविनाच गृहीत धरलेलें आहे. नव्या युगाला उद्देशून त्यांनीं

दिलेल्या शिव्या केवळ एंजल्स व मार्क्सच्या वाङमयांतील जशाच्या तशाच उद्धृत केलेल्या आहेत यापेक्षां त्याला अर्थ नाहीं.

'गण' या शब्दाच्या चुकीच्या अर्थावरून हे सगळे तर्कवितर्क केले जातात व हिंदुस्थानचा इतिहास हा युरोपप्रमाणेंच संस्कृतीची पूर्णावस्था येण्यापूर्वीचा असला पाहिजे अशा कल्पनेनें उघड उघड दिसणाऱ्या गोष्टीही केवळ आजच्या प्रगतीच्या द्योतक म्हणून त्या काळी नसल्याच पाहिजेत या सिद्धांतावर सारें मंदिर उभारले जातें. भारतीय सांस्कृतिक वाङमयाकडे पाहिलें तर राजसंस्था ही प्रथम असून गणसंस्था ही नंतर उत्पन्न झाल्याचें आढळून येईल. वेद-वाङमयाला राजसंस्था परिचयाची आहे. गणसंस्था नाही. त्यामुळें गणसंस्थेनंतर राजसंस्था निर्माण झालेली नसून राजसंस्था ही प्रथम व गणसंस्था ही त्यानंतर दृष्टोत्पत्तीस येते. गणसंस्था ही आज ज्याला रिपब्लिक्स (Republics) असें राज्यशास्त्राच्या परिभाषेंत म्हणतात त्या स्वरूपाची राजसंस्था आहे.

ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांतील १७३ व्या सूक्तांत व अथर्व वेदांतही राजसंस्थेच्या अस्तित्वाचा उल्लेख आहे. गणसंस्थेचा उल्लेख नाहीं. खास महाभारताप्रमाणें पाहिलें तरीही भारताच्या शांतिपर्वात जेथें राजसंस्थेच्या उत्पत्तीचें वर्णन आहे, त्या ठिकाणीं अराजकाचें व केवळ बळाच्या भरंवशावर सामाजिक जीवन नष्ट होऊं लागल्याचें भय उत्पन्न झाल्यावर आवश्यक ती व्यवस्था म्हणून राजसंस्था निर्माण झाल्याचेंच वर्णन आहे. गणसंस्थेचें नाहीं.तात्पर्य, गणसंस्था ही राजसंस्थेंत मागाहून झालेली उत्क्रांति होय असेंच वैदिक वाङमयाच्या अंतर्गत पुराव्यावरून दिसतें. फार कशाला, मौर्य चंद्रगुप्ताच्या दरबारीं येऊन राहिलेला ग्रीक वकील मेगा-स्थनीस याचीही या बाबतींत अशीच साक्ष आहे. ख्रिस्तापूर्वी कमींत कमी चार शतकें तरी भारतांत आलेल्या व येथें एका समृद्ध राज्याचा प्रत्यक्ष कारभार डोळ्याखालून घालणाऱ्या मेगास्थनीसला हिंदु राजसंस्थेची जी परंपरा कळली ती अशीच कळली कीं,पहिल्या-पासून या देशांत चालू असलेल्या राजसत्तेच्या स्वरूपांतूनच पुढें

गणतंत्राची निर्मिति झालेली आहे. अशा स्थितींत राजसंस्था नंतर व गणसंस्था आधी हें सिद्ध करावयास आवश्यक तो पुरावा काय? ऋग्वेदापासून तों महाभारतापर्यंत, इतकेंच नव्हे तर मेगास्थनीस-सारख्या परक्या प्रवाशाच्या निरीक्षणांतूनही जी गोष्ट स्पष्ट दिसते ती मान्य करूनच या दोन्ही संस्थांच्या स्वरूपाचा विचार केला पाहिजे. हिंदुस्थान देशांतील सर्वश्रेष्ठ राज्यशास्त्रज्ञ कौटिल्य व पाणिनि हे आपल्या वाङमयांतून संघ व गण हे एकमेकांचे पर्याय-शब्द म्हणून वापरतात. गणाला संघ असा पर्यायशब्द खास महा-भारतांतही आढळतो. महाभारतांतील कृष्ण व नारद संवादांत कृष्णाला विशेषण देतांना एका ठिकाणीं नारद 'यादवांच्या गण-राज्याचे प्रमुख' या अर्थी श्रीकृष्णांना उद्देशून 'संघमुख्योऽस्मि' असे शब्द वापरतात व त्याचवेळी त्या संघाचाच पर्यायवाचक शब्द म्हणून 'गणः प्राज्ञेऽवतिष्ठते' असे शब्द वापरतात.

कौटिल्य–पाणिनीच नव्हे तर प्रत्यक्ष महाभारत देखील संघ व गण हे एकमेकांचे पर्यायशब्द मानतें हें यावरून उघड होतें. अशा स्थितींत संघ म्हणजे भटक्या लोकांमधून सहज उत्पन्न झालेली अवस्था असें कसें म्हणतां येईल? गण व संघ आणि वांशिक राजसंस्था या दोन्हीही एकाच वेळी नांदत असल्याची उदाहरणें भारतीय वाङमयांतून किती तरी आढळतात. अवदानशतकामध्यें "केचिद् देशा गणाधीनाः केचिद् राजाधीनाः" असा स्पष्ट उल्लेख आहे. गणसंस्था मोडून तेथें राजसंस्था उत्पन्न झाल्याचा कोठेंही पुरावा नाहीं. गणांचा ट्राईब असा चुकीचा अर्थ घेतल्यामुळें हा सर्व घोटाळा उत्पन्न झाला आहे. उत्तरभारतांतील विख्यात व नुकतेच दिवंगत झालेले पंडित कै. डॉ. जयस्वाल यांनीं आपल्या हिंदु पॉलिटी नांवाच्या ग्रंथांत या विषयासंबंधानें केलेलें विवेचन या दृष्टीनें पहाण्यासारखें आहे. डॉ. जयस्वाल लिहितात :—

The early Vedas knew only Monarchy. Departure from this normal constitution was made in post-Vedic times, and as Megasthenis also records, the traditional

sovereignty ( Kingship ) was dissolved and democratic governments set up in various places. The Mahabharat, similarly, as we shall see in our discussion on Hindu Monarchy, considers monarchy alone as the Vedic form of Government. The hymns of the *Rik* and *Atharvan*, the view of the Mahabharat and the tradition which Megasthenis heard in India in the fourth century B. C., all point to the fact that the Republican form of Government in India came long after Monarchy and after the early Vedic age. It appears in the later Vedic literature, in the Rigvedic Brahmana, the Aitareya, and the Yajurveda and its Brahmana, the Taittiriya."

—(Hindu Polity by Jayaswal pp. 23 )

A wrong value to *Gana* has been assigned in the dictionary of Monier Williams which has misled many modern students of Sanskrit literature. Monier Williams translated the word by the English word 'tribe'. This meaning was adopted by the late Dr. Fleet in his translation of the Gupta inscriptions in connection with the Malav *Gana* of those records. When my interpretation was published, Dr. F. W. Thomas, the foremost Indianist Scholar in England pointed out that the 'tribe' meaning was to be given up. And when Dr. Fleet insisted on the correctness of his rendering 'tribe', Dr. Thomas challenged him to show that meaning from Sanskrit literature. Dr. Fleet found no authority except that of modern English translations of the Raghuwansh and the Mahabharat. Dr. Thomas drew attention to the fact that the St. Petersburg Dictionary and some later dictionaries never authorised and accepted the 'tribe' interpretation.

—(Hindu Polity by Jayaswal pp. 26)

" जुन्या वेदांना फक्त राजसंस्था माहीत आहे. वेदोत्तर काळांत या नैसर्गिक घटनेपासून वेगळेपण उत्पन्न झाल्याचें दिसतें. मेगास्थनीस सुद्धां जी परंपरा उल्लेखितो ती हीच आहे. तो म्हणतो कीं

राजसंस्था विलय पावली व पुष्कळ ठिकाणीं लोकतंत्रें उत्पन्न झालीं. पुढें हिंदुराज्य संस्थेच्या इतिहासांत आम्ही महाभारताचें काय म्हणणें आहे तेंही दाखविणार आहों. त्यावरून असें दिसून येईल कीं, महाभारतकारांनासुद्धां राजसंस्था हाच वेदांतील राज्यतंत्राचा प्रकार म्हणून माहीत होता. ऋग्वेद व अथर्ववेदांतील सूक्तें, महाभारत व ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकांतील मेगास्थनीसला माहीत असलेली परंपरा ह्या सर्व बाबी ही गोष्ट सिद्ध करतात की, लोकतंत्र राज्यव्यवस्था ही पुष्कळ दिवस राजसंस्था चालल्यानंतर मागाहून हिंदुस्थानांत उत्पन्न झालेली संस्था असून ती वेदोत्तरकालीन आहे. वेदाच्या उत्तरकालीन वाङ्मयांत, ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणांत, व यजुर्वेद व त्याच्या तैत्तिरीय ब्राह्मणांत गणांचें अस्तित्व आढळतें. मॉनियर वुईल्यम्सच्या कोशांत गण शब्दाच्या दिलेल्या चुकीच्या अर्थामुळें संस्कृत वाङ्मयाच्या पुष्कळ आधुनिक अभ्यासकांची दिशाभूल झालेली आहे. मॉनियर विल्यम्सनें गण शब्दाचें इंग्रजींतील ट्राईब्स या शब्दानें भाषांतर केलेलें आहे. दिवंगत डॉ. फ्लीट यानें गुप्तकालीन ताम्रपटांच्या संशोधनाच्या वेळी मालव गणासंबंधीं लिहितांना मॉनियर विल्यम्सचाच अर्थ स्वीकारला. ज्या वेळीं 'गण' शब्दाचा मी केलेला अर्थ प्रसिद्ध झाला त्या वेळीं इंग्लंडमधील भारतीय वाङ्मयाचे विख्यात संशोधक डॉ. एफ. डब्ल्यू. थॉमस यांनी त्यांच्या असें नजरेस आणून दिलें कीं गण शब्दाचें 'ट्राईब' या प्रतिशब्दानें करण्यांत येणारें भाषांतर यापुढें सोडून दिलें पाहिजे. पण डॉ. फ्लीट तसा आग्रहच धरून बसले, त्या वेळीं डॉ. थॉमस यांनीं त्यांना असें आव्हान दिलें की, संपूर्ण संस्कृत वाङ्मयांतून तसा अर्थ काढून दाखवा. डॉ. फ्लीट यांना रघुवंश व महाभारताच्या अलीकडेच झालेल्या इंग्रजी भाषांतरावांचून दुसरा आधार मिळू शकला नाही. नंतर डॉ. थॉमस यांनी या गोष्टीकडे लक्ष वेधलें कीं, सेंट पीटर्सबर्ग डिक्शनरी व अलीकडेच नवे उपलब्ध झालेले कोश यांनीं गण शब्दाचें 'ट्राईब' या शब्दानें करण्यांत येणारें भाषांतर कधींही स्वीकारलें नाहीं. अथवा त्याला कधीं मान्यताही दिलेली नाहीं." मला वाटतें हा उतारा संशय निवारणास पुरेसा आहे.

सारांश, गण हा प्रजातंत्र राज्ययंत्राचा एक प्रकार आहे व महाभारतांतील माझ्या मागच्या व्याख्यानमालेंत महाभारताच्या शांतिपर्वांतील गणराज्यविषयक सर्व विचार जे मी उद्धृत केले आहेत, ते जर नीट वाचले तर हें ध्यानांत येईल की कोणत्याही अर्थानें यापेक्षां अधिक सुधारलेले विचार आजच्या लोकतत्र व्यवस्थेच्या तत्त्वज्ञानी पुरस्कर्त्यांनी व्यक्त केलेले नाहीत व त्याला जर प्राथमिक अवस्था म्हणावयाचें असेल तर नव्या व्यवस्थेनें वैचारिक संपत्तींत कोणतीही भर घातली नाही एवढेंच म्हणावे लागेल. तात्पर्य राजसंस्था ही मूळ पहिली अवस्था व गणांची लोकतंत्रपद्धति ही नंतर निर्माण झालेली अवस्था आहे असाच स्पष्ट पुरावा भारताच्या वाङमयांतून व खास महाभारतांतूनही मिळत असल्यामुळें भारतीय युद्ध हें डांगे म्हणतात त्याप्रमाणें प्राथमिक सामुदायिक जीवन व त्यांतून निर्माण होणारें गुलामगिरीचें राजतंत्र यांच्यांतील झगडा ठरूं शकत नाहीं. मार्क्स व एंजल्स यांच्याऐवजीं खास हिंदुस्थानांतलें व तेंही महाभारताचें वाङमय महाभारताविषयी काय म्हणतें हेंच पहाणें सत्यशोधनाचे दृष्टीनें प्रामाणिकपणाचें व खरें महत्त्वाचें आहे. कॉ. डांगे यांच्या मूळ गृहीत कृत्याचीच ही अवस्था असल्यामुळें या खोटया, मानीव, व भ्रामक कल्पनेवर आधारलेले त्यांचें भगवान् श्रीकृष्णांच्या व गीतेच्या शिकवणुकीविषयीचें प्रतिपादन आपोआपच केवळ खोटें कल्पनाजाल ठरतें. तें कल्पनाजाल मांडतांनासुद्धां त्यांना किती लबाडया कराव्या लागल्या आहेत हें पहाण्यासारखें आहे.

त्यांच्या पहिल्या मुद्दयाचाच विचार करूं. खास भरताच्या सुद्धां दहा पिढयांपूर्वी राजसंस्था—तीही प्रादेशिक व वांशिक राजसंस्था—अस्तित्वांत आल्याचें आपण महाभारतांतील पुराव्यावरून पाहिलें आहे. त्यानंतर कितीतरी पिढयांनीं अर्जुन उत्पन्न झालेला आहे. त्यामुळें अर्जुनाचा गणराज्य व त्यांतील परंपरांशीं डांगे म्हणतात तसा कांहींही सबंध नाहीं. म्हणून 'आचार्याः पितरः पुत्राः' या श्लोकांतून माझ्या नातलगांना व जवळच्या संबंधी आणि पूज्य लोकांना मी कसें मारूं हा जो प्रश्न अर्जुनानें विचाराला आहे तो जुन्या गणजीवनाच्या संस्कारांचा, डांगे म्हणतात तसा निदर्शक ठरूं शकत

नाहीं. वस्तुस्थिति त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें उलटी असावयास पाहिजे. अर्जुनाचा गणराज्याच्या भानगडीशी संबंध नसल्यामुळें त्यानें सर्व नातलगांना मारावयाचें ठरविल्यावर भगवान् श्रीकृष्ण हे गणराज्याचे पुढारी असल्यामुळें त्यांनी मात्र अर्जुनास असें दटावावयास पाहिजे होतें कीं तूं आपल्या नातलगांनाच मारावयास उठलास हें गणतंत्राच्या नीतिनियमांप्रमाणे चुकीचें आहे. तेव्हां हें कर्म तू करूं नकोस. पण झालें आहे उलटेच! गणतंत्राचा मुख्य या सगळ्यांना मारावयास आपल्या शिष्याला उद्युक्त करतो आहे व परंपरागत राजसंस्थेंत वाढलेला शिष्य त्यांना मारण्याविषयी कां कू करीत आहे. डांग्याच्या मताप्रमाणें पाहिलें तर गीतेचा वक्ता अर्जुन व पृच्छक श्रीकृष्ण हवा होता. गुरु, पिता, आजोबा यांच्याविषयीचा आदर वा निष्ठा सामुदायिक जीवनाचें प्रतिबिंब आहे हेंही खोटें आहे. डांगे ज्याला सामुदायिक जीवन म्हणतात त्याचा पुरस्कार मनुस्मृतीत मुळीच नाही. उलट प्रादेशिक व वांशिक राजसंस्था, वर्णव्यवस्था, व वर्गात्मक समाजरचना यांचाच मनुस्मृतीत सामर्थ्यसंपन्न पुरस्कार आहे. पण अशा ग्रंथांत पुढील नीतिमूल्यें व नैतिक व्यवहार उपदेश म्हणून सांगितलेली आहेत. मनु म्हणतो:—

**आचार्यश्च पिता चैव माता भ्राता च पूर्वजः ।**
**नार्तेनाप्यवमन्तव्या ब्राह्मणेन विशेषतः ॥ २५**
**गुरोर्यत्र परीवादो निंदा वापि प्रवर्तते ।**
**कर्णौ तत्र पिधातव्यौ गन्तव्यं वा ततोऽन्यतः ॥२००**

—मनुस्मृति अध्याय २

"आचार्य, पिता, माता, व ज्येष्ठ बंधु यांचा गांजलेले असतांही अपमान करूं नये. ब्राह्मणांनीं तर या बाबतींत विशेषच दक्ष राहिलें पाहिजे. जेथें गुरूवर आक्षेप घेणें चाललें असेल अथवा त्याची निंदा होत असेल तेथें एकतर कान झांकून घ्यावे किंवा ती जागा सोडून दुसरीकडे निघून जावें."

तात्पर्य, भारतीय जीवनाचे हे सामान्य नीतिनियम आहेत. त्यांचा प्राथमिक अवस्था व सामुदायिक जीवन यांच्याशीं तिळमात्रही संबंध

नाहीं. डांगे यांना आमचें असें आव्हान आहे की, त्यांच्या मतानें वेगवेगळ्या अवस्थांचे निदर्शक असणाऱ्या धर्मशास्त्राच्या कोणत्याही ग्रंथांतून याविरुद्ध संकेत असलेला पुरावा त्यांनीं दाखवून द्यावा. उगाच साप म्हणून भुई धोपटण्यांत अर्थ काय ? अर्जुनाच्या प्रश्नाला नुसतें प्रारब्ध, वर्णाचें कर्तव्य, असें उत्तर गीतेंत नाही. भारत हा तत्त्वाचा झगडा आहे. महान् जीवनाच्या मूल्यांच्या सरक्षणाप्रीत्यर्थ व प्रतिष्ठेसाठी कितीही जवळच्या व्यक्ति असल्या तरी त्याचें बलिदान देणें एक कर्तव्य ठरतें असा गीतेचा संदेश आहे. डांगे व त्यांचा कम्युनिझम तरी केवळ जवळच्या नातलगांच्या भावनेसाठीं या संदेशाविरुद्ध पुरस्कार करूं शकेल काय ? कम्युनिझमचें ध्येय प्रत्यक्षांत आणण्यासाठी इतकी बलिदानें घडवून आणीत असतां व पक्षाच्या सभासदत्वाशिवाय आणि समान विचारप्रणालीवांचून दुसरें कोणतेंही नातें न ओळखत असतां त्यांनीं हें प्रतिपादन करावयास धजावें हें मोठें आश्चर्य आहे ! जीवनमूल्यें कोणतीं मानावयाचीं या बाबतींत केवढाही फरक असला तरी महान् ध्येयासाठी व्यवहारतः हेंच सूत्र पाळावें लागतें हें डांगे यांस उत्तम माहीत आहे. समजा, की कम्युनिस्टांचा ध्येयवाद प्रत्यक्षांत आणण्याच्या विरुद्ध श्री. डांगे यांचे स्वतःचेच शाळाकॉलेजांतील गुरु, आजोबा, संबधी अथवा प्रत्यक्ष चिरंजीव आडवे आले तर डांगे तो ध्येयवाद सोडून देतील आणि ते आपल्या संबंधी लोकांच्या गळ्यांत पडतील कां प्रसंग आला तर आपल्या ध्येयवादाप्रीत्यर्थ त्या संबंधी लोकांवर हत्त्यार चालवतील? अर्जुनासमोर असाच प्रश्न आहे व गीतेचेंही हेंच तात्पर्य आहे. तात्पर्य, आहे तो गीतेचा उपदेश प्रामाणिकपणानें नजरेसमोर आणून त्याचें खंडन करावयाचें असलें तरी करा, पण नाहीं त्या गोष्टी त्याच्यावर लादू नका. गीतेचा उपदेश क्षत्रियाला युद्ध करा असें सांगण्याचा आहे. ब्राह्मणाला युद्ध करा असा उपदेश गीतेंत कोठेंही केलेला नाहीं व तोही मूल्यांच्या प्रतिष्ठापनेसारख्या अधिक श्रेष्ठ गोष्टींसाठीं युद्ध करा असा उपदेश आहे. आपली संपत्ति वाढविण्यासाठीं युद्ध करा असा उपदेश नाहीं. 'धर्म्याद्धि युद्धात् श्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते' या ओळींतील धर्म्य व क्षत्रिय या दोन शब्दांचे अर्थ डांगे यांना समजत

नाहीत काय ? पण मुद्दाम झोंपी गेलेल्याला जागें कोण करणार ? ‘कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन’ हा उपदेश ब्रह्मक्षत्रांनी वैश्यशूद्रांना केलेला नसून एका क्षत्रियानें दुसऱ्या क्षत्रियाला केलेला आहे व तोही कर्माच्या हेतूत मन गुंतवून फळाच्या आसक्तीनें कर्म करूं नकोस असें सांगत असतां वैयक्तिक आसक्तिस्वरूप भावनेवर विजय मिळवावयास सांगितले आहे. पुन्हां आम्ही डांगे यांस विचारतों की कम्युनिझम प्रस्थापित व्हावा यासाठी कराव्या लागणाऱ्या ध्येयवादी युद्धांत मला व्यक्तिशः जगतां येईल किंवा नाहीं अथवा इतका मोबदला मिळेल किंवा नाहीं असें जर त्यांचा अनुयायी त्यांना विचारूं लागला तर त्याला ते हेंच सांगणार नाहीत काय, कीं संपूर्ण समाजाच्या पुनर्रचनेचा हा महान् प्रश्न असल्यामुळें वैयक्तिक लाभालाभाच्या जाणिवेंत तू आपले चित्त गुंतवू नयेस. फक्त अखिल जगाच्या सुखाच्या तत्त्वज्ञानाचा एक महान् पायिक म्हणून तू हें उत्थानाचें कार्य सतत करीत रहा. याहूनही गीतेची भूमिका अधिक उदात्त आहे. जर यापेक्षां कोणताही वेगळा व्यक्तिगत लाभालाभाच्या जाणिवेंत गुंतून राहण्याचा उपदेश कोणीही नेतृपदावर असलेल्या पुरुषानें आपल्या अनुयायांना करण्याचें ठरविलें तर कोणतीही क्रांति कधीच होण्याची आशा नको. अगदीं लेनिनसुद्धां यशस्वी व्हावयाचा नाही. मग डांगे यांची तर कथा काय ?

यानंतरच्या डांगे यांच्या गीतेंतील आत्मानात्म विचाराकडे वळूं. त्यासंबंधानें इतकेंच म्हणावयाचें आहे की या व्याख्यानाच्या आरंभीच मी सांगितलेल्या हाल्डेनच्या उताऱ्यावरून याविषयाविषयीं पक्कें मत देण्याइतका पुरावा विज्ञानाच्या जगाजवळ देखील जर उपलब्ध झालेला नाही व त्यावरच भिस्त ठेवणाऱ्या कम्युनिस्टांजवळही उपलब्ध झालेला नाही, तर मग उगाच त्यावर मत प्रदर्शित करून नांवें ठेवणें व आपले हेतु त्याच्यावर लादीत बसणें अप्रामाणिकपणाचेंच नाहीं काय? तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम् शक्तिसामर्थ्य असलेल्या ईश्वरी सत्तेला उद्देशूनच ‘सर्वधर्मान् परित्यज्य’ हा गीतेंतील उपदेश आहे. एंजलसपासून लेनिनपर्यंत व लेनिनपासून हाल्डेनपर्यंन सर्व लोकांनी ज्या गोष्टीचा

# यादवांचें गणराज्य

श्रीमन्महाभारतांत भगवान् श्रीकृष्ण जे पहिल्याप्रथम आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात ते द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगींच होय. त्या ठिकाणींही ते वृष्णी व अंधक गणसंघाचे पुढारी म्हणूनच दृष्टोत्पत्तीस येतात. भारतांतील श्रीकृष्णांचा पदप्रवेश हा एका गणराज्याचे अधिनायक, सर्वक्षत्रियांत आपल्या पराक्रमानें स्वतःची प्रतिष्ठा स्थिरपद केलेले व ज्यांच्या बुद्धिमत्तेविषयीं आणि बळाविषयीं तत्कालीन श्रेष्ठ व्यक्तींना आदर आणि प्रबल शत्रूंना धाक वाटतो अशा स्वरूपांत झालेला आहे. मधूनमधून भारतांत त्यांच्या संबंधानें येणाऱ्या प्रासंगिक उल्लेखांत त्यांच्या पूर्वायुष्याचे कांहीं प्रसंग फक्त उल्लेखिलेले आहेत. पण तेही सर्वांना माहीत आहेत असें गृहीत धरूनच उल्लेखिलेले आहेत. त्यामुळें महाभारतांतील भगवान् श्रीकृष्णांचें स्वरूप समजावून घेतांना त्यांच्या त्या स्वरूपामागील ऐतिहासिक पार्श्वभूमि पहाणें आवश्यक आहे. हें प्रसिद्धच आहे कीं, भगवान् श्रीकृष्ण हे वसुदेव–देवकीचे पुत्र असून कंसाच्या अत्याचारामुळें त्यांच्या मातापित्यांनीं त्यांना नंद नांवाच्या गोपांच्या पुढाऱ्याच्या स्वाधीन करून गुप्तपणें वाढविलें. आपला बालपणाचा काळ श्रीकृष्णांनीं गोकुल-वृंदावनांत घालविला व पुढें त्यांनीं कंसाला ठार मारून नंतर ते यादव या नात्यानें उघडपणें वागू लागले. पण श्रीकृष्णांचें महाभारतांतील स्वरूप पाहण्यापूर्वी वसुदेव कोण होता ? कंसाच्या अत्याचाराचें स्वरूप काय आहे ? वसुदेवाचाच निर्वंश करण्याविषयीं तो कां झटत होता ? श्रीकृष्णांना कंसाला मारतां येणें शक्य कसें झालें ? इत्यादि गोष्टींचा नीट उलगडा करणें आवश्यक आहे. युगपुरुष व विभूति या नात्यानें महाभारताच्या इतिहासांत भगवान् श्रीकृष्णांचें जें दर्शन आपणांस घडतें त्याचीं सर्व बीजें या पार्श्वभूमींत व्यक्त झालेलीं आहेत. त्यामुळें त्या पार्श्वभूमीचा विचार अधिकच आवश्यक आहे.

---

व्याख्यान ६ वें, दि. १–४–५२

श्रीकृष्णांचा जेथें जन्म झाला तें यादवांचें राज्य हें गणराज्य होतें. यादवांना नृपासनाचा अधिकार नाही असे उद्गार महाभारत, हरिवंश व भागवतांतून आढळतात. श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधांत भगवान् श्रीकृष्ण उग्रसेनाला यादवांच्या राज्यावर बसविण्याचा आग्रह करीत असतां उग्रसेन त्यांना असें उत्तर देतांना आढळतो कीं:—

**ययातिशापाद् यदुभिर्नासीतव्यं नृपासने ॥ १३**

—श्रीमद्भागवत दशमस्कंध पूर्वार्ध अ. ४५

ययातीच्या शापामुळें यदूंना सिंहासनावर बसण्याचा अधिकार नाहीं. यासंबंधीची प्रचलित असलेली कथा भागवत, महाभारत व हरिवंश या तिन्हींमध्यें एकच आहे. ही कथा महाभारताच्या आदिपर्वांतील ८१ ते ८४ या चार अध्यायांत आलेली असून हरिवंशाच्या ३० व्या अध्यायांत तीच कथा आहे. भागवताच्या नवमस्कंधांत या दोन ग्रंथांत आलेल्या कथेचाच अनुवाद केलेला आढळतो. ती कथा पुढीलप्रमाणें आहे:—

दैत्यांचे गुरु शुक्राचार्य यांची मुलगी देवयानी हिला संजीवनी विद्येच्या प्राप्तीसाठी शुक्राचार्यांच्याकडे येऊन राहिलेला देवगुरु बृहस्पतींचा मुलगा कच हा असा शाप देतो की, "तुझें लग्न ब्राह्मण कुमाराबरोबर होणार नाहीं." पुढें कच निघून गेल्यावर देवयानी आणि दैत्यांचा राजा वृषपर्व याची मुलगी शर्मिष्ठा या दोघी मैत्रिणी असल्यामुळें त्या विहारासाठी उद्यानांत जातात. तेथें पातळांच्या आदलाबदलीवरून त्या दोघीचें भांडण होतें. त्या भांडणांत देवयानी शर्मिष्ठेला नाहीं नाहीं तें टाकून बोलल्यावर संतापलेली शर्मिष्ठा तिची चांगलीच खरडपट्टी काढून व एका आश्रित भिक्षुकाची मुलगी म्हणून उपहास करून तिचें नेसूं पातळही हिसकावून तिला विहिरींत ढकलून देते. सुदैवानें विहिरींत पाणीच नसल्यामुळें देवयानीवर प्राणसंकट कांहीं कोसळत नाहीं. पुढें नहुषाचा मुलगा राजा ययाति त्या ठिकाणीं सहज आला असतां त्याच्या दृष्टीस ती देवयानी पडते. तो तिला बाहेर काढतो.

ती त्याच्याशीं विवाह करण्याची इच्छा प्रदर्शित करते. शुक्राचार्यांची संमति असल्यास आपणांस हा विवाह मान्य असल्याचें ययाति देवयानीस सांगतो. पुढें तो निघून गेल्यावर कन्येच्या शोधार्थ शुक्राचार्य त्या स्थळी येऊन पोहोंचतात. त्यांना देवयानी शर्मिष्ठेच्या व आपल्या भांडणाचें वृत्त सांगते. व आपण त्या नगरांत पुन्हां परतू नये असें विनविते. कन्येच्या प्रेमास्तव शुक्राचार्य दैत्यराष्ट्र सोडून जावयास सिद्ध होतात. तें ऐकून घाबरलेला वृषपर्वा तें राष्ट्रावरील संकट आहे हें ओळखून त्यांना तसें न करण्याविषयीं विनवितो. शुक्राचार्य देवयानीचें समाधान करा म्हणून सांगतात. देवयानी अशी अट घालते कीं जर विवाह न करतां राजकन्या शर्मिष्ठा आपल्या शंभर दासीसह माझी दासी व्हावयास सिद्ध असेल तर माझी नगरांत यावयास सिद्धता आहे. अडलेला वृषपर्वा शर्मिष्ठेला विचारतो व शर्मिष्ठा राष्ट्रासाठीं स्वतःच्या जीवनाचें हें बलिदान द्यावयास सिद्ध होते. पुढें देवयानीचें ययातीशीं लग्न झाल्यावर शर्मिष्ठा ही आपल्या दासींसह तिचें दास्य करावयास राजा ययातीच्या राजधानीत जाते. शर्मिष्ठा आपल्याहून अधिक सुंदर असल्यामुळें तिच्या सौंदर्यामुळें आपल्या संसाराचा विचका होऊं नये म्हणून शुक्राचार्यांकरवीं देवयानी ययातीला सावधगिरीचा धमकीवजा इषारा देते. पण शेवटीं व्हावयाचें तेंच होऊन शर्मिष्ठेच्या आग्रहास्तव राजा ययाति तिच्याशीं गांधर्वविवाह करतो. देवयानीला ययातीपासून यदु व तुर्वसु अशीं दोन मुलें होतात. व शर्मिष्ठेला द्रुह्यु, अनु आणि पुरु अशीं तीन मुलें होतात. यदूपासूनच यादव उत्पन्न झाले असून पुरूपासून पौरव झाले. त्यांचेंच पुढें कौरव असें नांव पडलें. यदु हा यादवांचा मूळ पुरुष होय. पुष्कळ दिवस शर्मिष्ठेच्या विवाहाची गोष्ट गुप्त राहते. पण कालांतरानें आपल्या नवऱ्यानें केलेला वचनभंग देवयानीच्या ध्यानांत येतो व तो विनवणी करीत असतांही त्याचें न ऐकतां तामसी देवयानी शुक्राचार्यांकडे निघून जाते. कन्याप्रेमानें अंध झालेले शुक्राचार्य ययातीला असा शाप देतात कीं, 'तुला म्हातारपण प्राप्त होईल.' तें ऐकून खिन्न झालेला ययाति

त्यांना उलट असें म्हणतो कीं, 'यांत माझ्याबरोबर आपण आपल्या मुलीचाही तोटा केलेला आहे.' तें ऐकून शुक्राचार्य चपापतात व यांतून मार्ग काढावयाचा म्हणून त्याला असें सांगतात कीं, तूं आपलें म्हातारपण दुसऱ्या कोणालाही देऊन त्याचें तारुण्य स्वत: घेऊं शकशील. कोणींतरी आपलें म्हातारपण घ्यावें म्हणून ययाति यदूपासून पुरूपर्यंतच्या आपल्या सर्व मुलांना विनवितो. पण कोणींही तें घ्यावयास सिद्ध होत नाहीं. शेवटीं त्याचा सर्वांत धाकटा मुलगा पुरु हा पितृभक्तीनें प्रेरित होऊन ती गोष्ट मान्य करतो. पुरूवर प्रसन्न होऊन ययाति पुरूला राज्यसिंहासन देतो व संतापून इतर सर्व मुलांना शाप देतो. त्यांत यदूला जो शाप दिला त्याचें हरिवंशांत पुढीलप्रमाणें वर्णन आहे:-

**एवमुक्त्वा यदुं तात शशापैनं समन्युमान् ।**
**अराज्या ते प्रजा मूढ भवित्रीति नराधम ॥२९**

—महाभारत, हरिवंशपर्व अ. ३०

याप्रमाणें बोलून रागावलेल्या ययातीनें यदूला असा शाप दिला कीं, हे 'नराधमा मूर्खा, तुझी प्रजा राज्यहीन अवस्थेंत राहील. (प्रजा म्हणजे तुझ्या वंशांतील लोक). महाभारतांतही हाच शाप ययातीनें दिलेला आढळतो. महाभारतकार म्हणतात :—

**यत्त्वं मे हृदयाज्जातो वय: स्वं न प्रयच्छसि ।**
**तस्मादराज्यभाक्तात प्रजा तव भविष्यति ॥ ९**

—महाभारत, आदिपर्व अ. ८४

हरिवंश व महाभारत या दोन्ही ठिकाणीं असलेल्या शापांतील प्रजा व अराज्यभाक् हे शब्द आपल्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत. पौराणिक वर्णन सोडलें तरी यादवांच्या राज्यव्यवस्थेंत राजा या शब्दानें निर्देशिलेली घटना नसून त्यांचें राज्ययंत्र हें वेगळ्या स्वरूपाचें असलें पाहिजे हें उघड होतें. यदूशिवाय दुसऱ्या कोणत्याही मुलाला या स्वरूपाचा शाप नाहीं. व दोन्ही ठिकाणीं असलेलें 'प्रजा' हें विशेषण महत्त्वाचें आहे. यादव राजे नव्हते. सिंहासनाधीश्वर अशा एकराज्य पद्धतीच्या राज्यतंत्राचा प्रकार

त्यांच्यामध्यं नव्हता. याचा आणखीही एक साहाय्यक उल्लेख महाभारताच्या सभापर्वांत मिळतो. शिशुपालानें भगवान् श्रीकृष्णांच्या अग्रपूजेचा निषेध करतांना असें म्हटलें आहे कीं,

**कथं ह्यराजा दाशार्हो मध्ये सर्वमहीक्षिताम् ।**
**अर्हणामर्हति तथा यथा युष्माभिरर्चितः ।। ५**

—महाभारत, सभापर्व अ. ३७

'ह्या सर्व राजसमूहांत राजा नसलेला हा दाशार्ह तुम्ही ज्याप्रमाणें सन्मानिलेला आहे त्याप्रमाणें सन्मान कसा पावूं शकेल ?' येथें श्रीकृष्णांना 'दाशार्ह' असें कुलवाचक विशेषण वापरलें असून 'अराजा' असें स्पष्ट म्हटलेलें आहे. हा उल्लेख नुसता व्यक्तीपुरता आहे असें मानतां येत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, श्रीकृष्णांऐवजीं ज्या थोर राजांचें राजा या नात्यानें अर्चन करावें असें शिशुपालाचें म्हणणें आहे, त्यांत यादवकुलीन कोणत्याही व्यक्तीचें नांव नाहीं. तात्पर्य वांशिक एकतंत्री राज्यव्यवस्थेपेक्षां वेगळ्या स्वरूपाची अशी राज्यघटना अथवा राज्यतंत्राचा प्रकार यादवांच्यांत असला पाहिजे.

महाभारतांत यादवांचा उल्लेख शांतिपर्वात 'गण व संघ' अशा दोन नांवांनीं अथवा संज्ञांनी आलेला आहे.

शांतिपर्वाच्या ८१ व्या अध्यायांत यादव गणासंबंधीं श्रीकृष्ण व नारद यांचा जो संवाद वर्णिलेला आहे त्यांत पुढील श्लोक पहाण्यासारखे आहेतः—

**भेदाद् विनाशः संघानां संघमुख्योऽसि केशव ।**
**यथा त्वां प्राप्य नोत्सीदेदयं संघस्तथा कुरु ।। २५**
**नान्यत्र बुद्धिक्षांतिभ्यां नान्यत्रेंद्रियनिग्रहात् ।**
**नान्यत्र धनसंत्यागाद् गणः प्राज्ञेऽवतिष्ठते ।। २६**
**यादवाः कुकुरा भोजाः सर्वे चांधकवृष्णयः ।**
**त्वय्यासक्ता महाबाहो लोका लोकेश्वराश्च ये ।। २९**

—महाभारत, शांतिपर्व अ. ८१

"संघांचा विनाश आपसांतील भेदांनीं होतो. हे केशवा, तूं या संघाचा मुख्य आहेस. तूं या संघाचा मुख्य असल्यामुळें त्यांच्यांत आपसांत फूट निर्माण होणार नाहीं हें तूं आपल्या सामर्थ्यानें करून दाखविलें पाहिजेस. युक्ति व सहनशीलता, आपल्या स्वतःच्या प्रवृत्तींचें नियंत्रण, आपलें औदार्य, या गुणांनींच प्राज्ञ अशा नेत्याचे बाबतीत गण निष्ठावान् राहातो. यादव, कुकुर, भोज, सर्व अंधक, वृष्णी केवळ तुझ्यावर अवलंबून आहेत."

महाभारतांतील या उल्लेखांत श्रीकृष्णांना संघमुख्य म्हटलेलें असून संघ व गण हे एकमेकांचे पर्यायशब्द म्हणून वापरलेले आहेत. गण या शब्दाचा 'ट्राईब' असा अर्थ करून यादव हे भटके लोक होते अशा कल्पनेवर डॉ. विंटरनिट्झसारख्या पाश्चात्य पंडितांनीं हवे तसे तारे तोडलेले आहेत. पण गण व संघ हे एकमेकांचे पर्यायशब्द आहेत, निदान महाभारतांतील यादव गणापुरतें पाहिलें तर ते एकमेकांचे पर्यायशब्द आहेत असेंच स्पष्ट दिसतें. राज्य-शास्त्राच्या परिभाषेंत संघ शब्दाला एक विशेष अर्थ आहे. तो काय आहे तें आपण आतां पाहूं.

## संघ अथवा गण म्हणजे काय ?

व्याकरणकार पाणिनि गण व संघ हे महाभारताप्रमाणेंच एक-मेकांचे पर्यायशब्द मानतो. 'संघोद्धौ गणप्रशंसयोः' या सूत्रांत गण आणि संघ हे पर्यायवाचक शब्द असल्याचें पाणिनीनें म्हटलें आहे. संघ म्हणजे ज्यामध्यें संहनन म्हणजे बुद्धिपुरस्सर एकत्र येणें अभिप्रेत आहे, अशा रीतीची उपपत्ति प्रसिद्ध भाष्यकार पतंजलि यांनीं लावलेली आहे.

गण आणि संघ हे एकमेकांचे पर्यायवाचक शब्द होते ही गोष्ट एकदां ध्यानांत घेतल्यावर व तीही महाभारतांतील पुराव्यावरून ध्यानांत घेतल्यावर संघ हा शब्द त्यांनीं राजकीय वाङमयांत कोणत्या अर्थानें लावलेला आहे हेंही पाहणें अवश्य आहे. भारतां-तील सर्वश्रेष्ठ राज्यशास्त्रज्ञ कौटिल्य आपल्या कौटिलीय अर्थ-शास्त्राच्या प्रथम अधिकरणांतील सहाव्या अध्यायांत यादवांचा

उल्लेख 'वृष्णिसंघ' असा करतो. ( वृष्णिसंघश्च द्वैपायनमिति— कौटिलीय अर्थशास्त्र, मुळेप्रत पृष्ठ ४ )

संघराज्याचें वर्णन करतांना कौटिल्य असें म्हणतो कीं, इतर कोणत्याही राज्यापेक्षां संघराज्यें हीं सर्वांत अधिक बलवान् असल्यामुळें कोठल्याही सैन्याच्या वा राजांच्या साहाय्यापेक्षां त्यांचें साहाय्य अधिक महत्त्वाचें आहे. संघ राज्यापैकी कांही संघ 'राजा' असा शब्द धारण करीत असत असेंही कौटिल्यानें म्हटलें आहे. कौटिल्य म्हणतो :—

**संघलाभो दण्डमित्रलाभानां तमः ।**

**संघो हि संहतत्वाद् अधृष्यः परेषाम् ।**

**काम्बोजसुराष्ट्रक्षत्रियश्रेण्यादयो वार्ताशास्त्रोपजीविनः ।**

**लिच्छिविक व्रजिक मल्लक भल्लक कुकुर-**

**कुरुपांचालादयो राजशब्दोपजीविनः ।**

**तान् अनुगुणान् भुञ्जीत सामदामाभ्यां विगुणान् भेददण्डाभ्याम् ।**

—(कौटिलीय अर्थशास्त्र एकादश अधिकरण अध्याय १३५ पृष्ठ १४६)

"सैन्याचें अथवा मित्र राजाचें साहाय्य मिळविण्यापेक्षां संघाचें साहाय्य मिळविलें तर तें अधिक चांगलें. संघ एकजुटीनें वागणारे असल्यामुळें शत्रूला ते दाद देत नाहीत. काम्बोज, सुराष्ट्र वगैरे देशांतील क्षत्रियांचे संघ शेती, व्यापार व शस्त्रें यांवर उपजीविका करतात. लिछविक, व्रजिक, मल्लक, भल्लक, कुकुर, कुरू, पांचाल वगैरे देशांतील संघ 'राजा' पदवी धारण करून क्षत्रियत्वानें निर्वाह करतात." अभिषेक नसला तरी राजा ही पदवी धारण करून संघ राहात असत, हें जें कौटिल्याचें वर्णन आहे तसेंच वर्णन पाणिनीच्या 'राज्यन्यबहुवचनद्वंद्वे अंधकवृष्णिषु' या सूत्रावरील कारिकाटीकेंतून दृष्टोत्पत्तीस येते. त्या टीकेंतील अंधकांचा म्हणजेच यादवांचा उल्लेख पुढीलप्रमाणें आहे:—

**अंधकवृष्णयः एते ननु राज्यन्यः राज्यन्यग्रहणम्**
**इह अभिषिक्तवंशानां क्षत्रियाणां ग्रहणार्थम् ।**

"अंधकवृष्णी यांना येथें राज्यन्य म्हटलेलें नाहीं. वंशपरंपरागत राज्याभिषेकाची पद्धति ज्यांच्यांत आहे त्या क्षत्रियांनाच राज्यन्य म्हटलें आहे यादव लोकसंघांत अथवा गण राज्यांत 'राजा' ही वंशपरंपरागत अभिषिक्त पद्धतीची संस्था नव्हती हें ययातीच्या शापाच्या अलंकारिक अर्थानें जें पौराणिक वाङमयानें सूचित केलें आहे तेंच या ठिकाणीं त्यांच्या घटनेचा उल्लेख करून कौटिल्यानें स्पष्ट केलें आहे. यादवांचें गणराज्य हें कुकुर, अंधक, वृष्णी इत्यादि विविध कुळांचें राज्य होतें. कुळांचें राज्य असावें, व तें सर्वांत अधिक बलवान् असतें असें मत कौटिल्यानें प्रदर्शित केलें आहे. कौटिल्य म्हणतोः-

**कुलस्य वा भवेद् राज्यं कुलसंघो हि दुर्जयः ।**

-( कौटिलीय अर्थशास्त्र प्रथमाधिकरण अध्याय १७ वा पृष्ठ ११ )

"जोंपर्यंत संघांत आपआपसांत भेद उत्पन्न होत नाहींत तोंपर्यंत संघ हा अत्यंत बलवान असतो." ज्या दिवशीं त्यांच्यांत आपआपसांत भेद निर्माण होईल त्या दिवशीं मात्र संघ संपल्याशिवाय राहणार नाहीं. दीघनिकायामध्यें संघांच्याविषयीं गौतमबुद्धाच्या तोंडून संघासंबंधीचे जे विचार प्रदर्शित करण्यांत आले आहेत, त्यांच्यामध्येंही हाच विचार व्यक्त करण्यांत आलेला आहे. एकदां मगधाच्या राजानें आपला वकील बुद्धाकडे पाठविला व त्याला वाजि ( कौटिल्यानें ज्याचा व्रजि असा उल्लेख केलेला आहे ) लिच्छयी, ( यांचाच कौटिल्य लिच्छविक असा उल्लेख करतो ) व विदेह यांच्यावर स्वारी करून त्यांना जिकावें काय ? असा प्रश्न त्या वकिलानें विचारला. पण गौतम बुद्धानें त्याच्याशीं कांहींच न बोलतां आपला आनंद नांवाचा जो शिष्य होता त्याला असें म्हटलें कीं :-

(१) आनंदा, जोंपर्यंत वाजिसंघराज्यांतील लोक वारंवार आपल्या लोकसभेंत विचारविनिमयार्थ एकत्र येऊन बसतात व त्यांची अधिकांत अधिक सभासद-संख्या या बैठकींच्या वेळीं उपस्थित असते,

(२) जोंपर्यंत ते एकत्र बसतात, एकत्रच उत्थान पावतात व प्रत्येक गोष्ट सहविचारानें करतात,

(३) जोंपर्यंत ते आपल्या पूर्वीच्या परंपरांना अनुसरून वागतात, दृढमूल झालेल्या निष्ठांच्या विरुद्ध जात नाहीत, व त्यांच्या प्राचीन रीतीभातींचा आश्रय घेऊन राहतात,

(४) जोंपर्यंत आपल्या संघांतील अनुभवी व मुरब्बी वृद्धांच्यावर प्रेम करून त्यांच्याविषयी ते आदर व पूज्यभाव बाळगतात, प्रत्येक गोष्टीत त्यांचें साहाय्य घेतात व त्यांच्या शब्दाला मान देणें हें आपलें कर्तव्य समजतात,

(५) जोंपर्यंत आपल्या संघांतील स्त्रियांच्यावर ते अत्याचार व बलात्कार करीत नाहींत,

(६) जोंपर्यंत ते आपल्या पूजास्थानांच्या विषयीं आदर बाळगून त्यांना सतत साहाय्य करतात,

(७) जोंपर्यंत संरक्षण, प्रतिकार व साहाय्य या त्रिविध स्वरूपाचा सैनिक–शिक्षणांत त्यांतील प्रत्येक सभासद प्रावीण्य मिळवून आहे व एकसमयावच्छेदेंकरून त्यांची एकजूट होते, तोंवर हे आनंदा, वाजीचा उत्कर्ष होत जाईल.त्यांचें अध:पतन मुळीच संभवनीय नाहीं. बुद्धाचें हें आनंदाशी झालेलें भाषण ऐकल्यावर मगध सम्राटाचा वकील काय समजावयाचें तें समजून चुकला. त्याला वेगळें बुद्धाजवळ बोलण्याची आवश्यकता वाटली नाहीं व तो स्वत:शीं असें पुटपुटला कीं, "मग मगध राजाला वाजींवर हल्ला करण्यांत कांहीं लाभ नाहीं. केवळ त्यांच्यांत भेद उत्पन्न करणें हा एकमात्र मार्ग आहे." ( दीघनिकाय बुद्धसंवाद–पान ७९ ते ८५. )

या ठिकाणीं कोणत्या पद्धतीनें संघराज्यें अथवा गणराज्यें चालत असतील याची या बुद्धसंवादावरून कल्पना येते. भेद हेंच गणराज्याच्या विनाशाचें खरें कारण आहे.दुसऱ्या कोणत्याही कारणांनीं गणराज्य नष्ट होऊं शकत नाहीं असाच अभिप्राय कौटिल्यानेंही व्यक्त केलेला आहे. किंबहुना कौटिल्य असें म्हणतो कीं, "संघांत परस्परभेद नसला तर हेरांनीं तो उत्पन्न करून त्यांना कमजोर करावें." तो म्हणतो :–

**सर्वेषां आसन्नाः सत्रिणः संघानां परस्परन्यंग द्वेषवैर–**
**कलहस्थानानि उपलभ्य क्रमाभिनीतं भेदमुपचारयेयुः ।**

( कौटिलीय अर्थशास्त्र ११ वें अधिकरण अध्याय १३५ पृष्ठ १४६ )

गुप्त हेरांनीं या सर्व संघांत शिरून त्यांच्यांत एकमेकांविषयीं तिटकारा, द्वेष, वैर, इत्यादि कलहाचीं कारणें असतील तीं पाहून ठेवावीं आणि मग त्यांच्यांत हळुहळू वितुष्ट पाडण्यास सुरुवात करावी. एकदां असा कलह उत्पन्न झाला म्हणजे त्यांचा नाश करणें सोपें जातें. कौटिल्यानें संघात कोणकोणत्या पद्धतीनें भेद पाडतां येणें शक्य आहे, याचें तपशीलवार विवेचन केलेलें असून शेवटीं असे उद्गार काढलेले आहेत कीं,

**एवमादिषु कलहस्थानेषु स्वयमुत्पन्ने वा कलहे तीक्ष्णैरुत्पादिते वा हीनपक्षं राजा कोषदण्डाभ्यामुपगृह्य विगुणेषु विक्रमेदपवाहयेद् वा । संघेषु एवं एकराजो वर्तेत । संघाश्चापि एवं एकराजादेतेभ्यो अतिसंधानेभ्यो रक्षयेयुः । संघमुख्यश्च संघेषु न्यायवृत्तिहितः प्रियः दान्तो युक्तजनः तिष्ठेत् सर्वचित्तानुवर्तकः ॥**

—( कौटिलीय अर्थशास्त्र ११ वे अधिकरण अध्याय १३५ पृष्ठ १४९ )

“अशीं भेदाचीं कारणें उपस्थित करून स्वतः किंवा गुंड हेरांकरवीं तंटे लावले म्हणजे राजानें कमजोर पक्षास द्रव्याचें व सैन्याचें साहृय देऊन बलिष्ठ पण प्रतिकूल पक्षाविरुद्ध उठावयास त्यांस प्रवृत्त करावें. अथवा त्यास दुसरीकडे धाडून द्यावें. याप्रमाणें सम्राटानें गणराज्यावर अथवा संघराज्यावर भेदाच्या मार्गानें आधिपत्य मिळवावें. त्याचप्रमाणें अशा आक्रमक साम्राज्यवादापासून संघराज्यानेंही आपसांत भेद कसा उत्पन्न होणार नाहीं या बाबतींत दक्षता घेऊन विश्वासघातापासून आपलें संरक्षण करावें. सर्वात महत्त्वाची गोष्ट ही कीं, संघराज्याच्या मुख्य पुढाऱ्यांनीं न्यायानें व प्रेमानें वागून इंद्रियें ताब्यांत ठेवून आणि आपल्या अनुयायांच्या मनाप्रमाणें वर्तन ठेवून सर्वांचें प्रेम संपादन करावें.”

या ठिकाणी कौटिल्यानें संघाच्या राज्यासंबंधीं जे विचार प्रदर्शित केलेले आहेत, तेच विचार महाभारतांतील शांतिपर्वाच्या राजधर्मप्रकरणांत गणराज्याचें ज्या ठिकाणी विवेचन येतें त्या-ठिकाणीं प्रदर्शित केलेले आढळतात. माझ्या महाभारतावरील व्याख्यानें या ग्रंथांत गणराज्यासबंधीचे महाभारतांतील सर्व विचार एकत्र ग्रथित केलेले असून ते या बाबतींत चांगला प्रकाश टाकूं शकतात. ( महाभारतावरील व्याख्यानें पृष्ठें ११० ते १२० ) त्यांतील कांहीं महत्त्वाचे विचार मी येथें ग्रथित करतों :—

**भेदमूलो विनाशो हि गणानामुपलक्षये ।**
**मंत्रसंवरणं दुःखं बहूनामिति मे मतिः ॥ ८**
**गणानां च कुलानां च राज्ञां भरतसत्तम ।**
**वैरसंदीपनावेतौ लोभामर्षो नराधिप ॥ १०**
**तत्रादानेन भिद्यन्ते गणाः संघातवृत्तयः ।**
**भिन्ना विमनसः सर्वे गच्छन्त्यरिवशं भयात् ॥ १३**
**भेदे गणा विनश्युर्हि भिन्नास्तु सुजयाः परैः ।**
**तस्मात्संघातयोगेन प्रयतेरन् गणाः सदा ॥ १४**
**अर्थाश्चैवाधिगम्यन्ते संघातबलपौरुषैः ।**
**बाह्याश्च मैत्रीं कुर्वन्ति तेषु संघातवृत्तिषु ॥ १५**
**ज्ञानवृद्धाः प्रशंसन्ति शुश्रूषन्तः परस्परम् ।**
**विनिवृत्ताभिसन्धानाः सुखमेधन्ति सर्वशः ॥ १६**
**भेदाच्चैव प्रदानाच्च भिद्यन्ते रिपुभिर्गणाः ॥ ३१**
**तस्मात्संघातमेवाहुर्गणानां शरणं महत् ॥ ३२**

—महाभारत शांतिपर्व अ. १०७

"गणराज्यांचा नाश त्यांच्यांत होणाऱ्या फुटीवर अवलंबून आहे असें मला वाटतें. संघराज्यें व कुलराज्यें यांच्यांत परस्परांत लोभ व मत्सराच्या पोटीं जन्माला येणारा क्रोध हेच वैर उत्पन्न करतात व वाढवितात. संघराज्यामध्यें फुटीरपणा सुरू झाला कीं ते परस्परांविषयीं उदासीन व एकमेकांपासून विलग होतात. त्यामुळें त्यांची संघशक्ति विलयास जाऊन आपआपसांतच जीवित-रक्षणा-

साठीं ते एकमेकांना भिऊं लागतात व शेवटीं शत्रूंच्या हस्तगत होतात. गणांतलें सांघिक जीवन नष्ट होऊन ते फुटले कीं त्यांचा नाश ओढवलाच म्हणून समजावें. ते विलग झाले की शत्रूचें भक्ष्य झालेच. म्हणून त्यांनीं नेहमीं आपलें संघजीवन मुळींच कसें फुटणार नाहीं याची पूर्णपणें काळजी घेतली पाहिजे. गणांतील सर्वच लोक सैनिक असतात. त्यामुळें तें नेहमींच बलवान् राष्ट्र असतें. सांघिक बळामुळें व सांघिक पराक्रमामुळें गणराज्य समृद्ध तर होतेंच; परंतु बाहेरचे लोक देखील त्यांच्याशीं मैत्री व सौहार्द उत्पन्न करण्याचा प्रयत्न करतात. चांगल्या गणराज्यांत जे ज्ञानवृद्ध लोक असतात ते सर्वांच्या अंतःकरणांतील संघजीवनांत विलीन होऊन जाण्याच्या व व्यक्तित्व उरूं न देण्याच्या वृत्तीला नेहमींच उत्तेजन देतात. परस्परांतील आंतलें बाहेरचें कांहीं एक न ठेवतां ते परस्पराशीं शुद्ध व सरळ व्यवहार करतात व त्यामुळेंच गणराज्यांत सर्व प्रकारचें सुख नांदतें.

**भेदाद्विनाशः संघानां संघमुख्योऽसि केशव।**
**यथा त्वां प्राप्य नोत्सीदेदयं संघस्तथा कुरु ॥ २५**
**नान्यत्र बुद्धिक्षान्तिभ्यां नान्यत्रेन्द्रियनिग्रहात्**
**नान्यत्र धनसंत्यागाद्गणः प्राज्ञेऽवतिष्ठते ॥ २६**

— महाभारत, शांतिपर्व अ. ८१

"भेदांतच संघराज्याचा नाश आहे. तूं या संघराज्याचा मुख्य आहेस. तुझ्यासारखा नेता लाभला असतां संघ नष्ट होणार नाहीं असेंच तुला वागलें पाहिजे. केवळ युक्ति आणि सहनशीलता, स्वतःच्या सैराट धांवणाऱ्या मनोवृत्तीवर पूर्ण ताबा असणें आणि नेहमीं अनेकांचा सत्कार करण्याची प्रवृत्ति असणें व त्यासाठीं लागेल ती घस सोसणें या गोष्टी ज्या शहाण्या माणसाजवळ असतील तोच संघराज्याचा नेता होऊं शकतो."

कौटिल्यासारखा राज्यशास्त्रज्ञ ज्या अर्थानें संघ व गण व तेथील राज्यव्यवस्था आणि त्या विशिष्ट राज्यतंत्राचें सामर्थ्य आणि त्याच्या विनाशाचीं कारणें यांच्यासंबंधीं विवेचन करतो त्यांत आणि महा-

भारतांतील विवेचनांत कांहींही भिन्नता नाहीं हें ध्यानांत येईल. संघ व गण हे दोन्हीही शब्द राज्यसंस्था अथवा राज्ययंत्राचा एक प्रकार ( A form of Government ) या अर्थाचाच वाचक असून लोकसत्ताक राज्यपद्धतीचा तो निदर्शक आहे हें यावरून स्पष्ट होईल. हिंदुस्थान देशाच्या आत्माभिमानावर डंख मारावयास प्रवृत्त झालेले बुल्हेरसारखे कित्येक पाश्चात्य संशोधक अथवा डॉ. फ्लीट यांच्यासारखे हटवादी लोक, मॉनिअर विल्यमस्ची डिक्शनरी अथवा रघुवंश काव्याच्या इंग्रजी भाषांतरासारखीं दिव्य प्रमाणें यांच्या भरंवशावर 'गण' शब्दाचा अर्थ जातिसंघ ( Tribe ) अथवा व्यापारी संघ अथवा कामगार संघ ( कार्पोरेशन ऑफ ट्रेड्स्मेन ऑर वर्कमेन ) असा करीत असतात तो किती चूक आहे, हें यावरून दिसून येईल. डॉ. जयस्वाल यांचा या बाबतींतील एक महत्त्वाचा उतारा मी दिलेलाच आहे. कामगार संघाला उद्देशून कौटिलीय अर्थशास्त्राच्या तिसऱ्या अधिकरणांतील १४ व्या अध्यायांत कौटिल्यानें स्वतंत्रपणें विवेचन केलेलें असल्या-मुळें कुलसंघ अथवा वर दिलेले संघराज्यासंबंधांतील कौटिल्याचे उतारे हे लोकतंत्रात्मक राज्यपद्धतीचे ( फॉर्म ऑफ डेमोक्रॅटिक गव्हर्मेंटस् ) निदर्शक आहेत हें स्पष्ट होतें. भारतीय गण-राज्यांच्या या पद्धतीवरूनच बुद्धानें आपल्या भिक्षुसंघाची रचना केलेली आहे. गण ही प्रजासत्ताक शासनपद्धति असून हिंदुस्थानां-तील वांशिक एकसत्तात्मक अशा मूळच्या शासनपद्धतींतून ती उत्पन्न झालेली आहे असें स्पष्टपणें दिसतें. राजाधीन व गणाधीन अशीं दोन्ही प्रकारचीं राज्यें हिंदुस्थान देशांत होतीं याचे किती तरी पुरावे बौद्ध व जैन धर्मांचें वाङ्मय, कौटिलीय अर्थशास्त्र, इतकेंच नव्हे तर मेगॅस्थनीससारख्या चंद्रगुप्त मौर्याच्या सभेंत असलेल्या ग्रीक वकिलाच्या ग्रथित वृत्तांतावरूनही दृष्टोत्पत्तीस येतात. अवदान शतकांत या बाबतींत असलेला सुस्पष्ट उल्लेख लक्षांत ठेवण्या-सारखा आहे. तो असा:—

**अथ मध्यदेशात् वणिजो दक्षिणमापथं गताः**
**तैः राज्ञो महाकप्फिणस्य प्राभृतं उपनीतं ।**

राज्ञा उक्तं भो वणिजः कस्तत्र राजेति ।
वणिजः कथयंति देव केचित् देशा गणाधीनाः केचिद्राजाधीनाः इति ॥
(R. D. Speyer, Petrograd 92, 11. Page 103)

"मध्य हिंदुस्थानांतून कांहीं व्यापारी दक्षिण हिंदुस्थानांत गेले. त्यांनी महाकप्रफिण नांवाच्या राजाची भेट घेऊन त्याला नजराणा दिला. राजानें त्या व्यापाऱ्यांना विचारलें: हे व्यापाऱ्यांनो तुमच्या येथें कोण राजा आहे? त्या व्यापाऱ्यांनीं सांगितलें कीं, कांहीं प्रदेश 'राजाधीन' आहेत तर कांहीं प्रदेश 'गणाधीन' आहेत." कोणत्याही परिस्थितींत येथील गण शब्दाचा अर्थ व्यापारी संघ, कामगार संघ अथवा ट्राईब्ज असा करतां येणें शक्य नाहीं. ग्रीक प्रवाशांना तर हिंदुस्थान देशामध्यें अशीं किती तरी गणराज्यें आढळलीं व त्या गणराज्यांचें वर्णन Free, autonomous, independent या शब्दांमध्यें ग्रीक इतिहासकारांनीं केलेलें आहे. या राज्यांना उद्देशून Republic असाच शब्द ग्रीक इतिहासकार लावतात. पण अगदीं पहिल्या व्याख्यानांत उद्धृत केलेल्या प्राच्यविद्यापरिषदेच्या इतिहासशाखेच्या अध्यापकाच्याच साक्षींत म्हटल्याप्रमाणें ग्रीक प्रवाशांच्या या उल्लेखाचें प्रामाणिक भाषांतर करणेंसुद्धां इंग्रज ग्रंथकार टाळतात. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, हिंदुस्थानांतील ग्रामपंचायतीसच ग्रीक इतिहासकारांनीं Republics असें नांव दिलेलें आहे. पण स्वतःच्या देशांत रिपब्लिकच्या राज्यपद्धतीचा प्रत्यक्ष अनुभव घेत असलेल्या आणि प्लेटो व ॲरिस्टॉटल यांच्यासारख्या श्रेष्ठ राज्यशास्त्रज्ञांना जन्म देणाऱ्या ग्रीक इतिहासकारांना ग्रामपंचायती व रिपब्लिक्स् यांच्यामधील भेद कळत नव्हता असें मानणें महामूर्खपणाचें तरी आहे किंवा ढोंगी हटवादाचें तरी आहे. पाश्चात्य संशोधकावर मी मूर्खपणाचा आरोप करीत नाहीं. दुसरीच गोष्ट खरी आहे असें माझें मत आहे. चंद्रगुप्त मौर्याच्या सभेंत असलेला ग्रीक वकील मेगॅस्थनीस याला या रिपब्लिक्सची उत्तम माहिती होती असें त्याच्या उल्लेखावरून स्पष्ट दिसतें. त्यानें असें म्हटलें आहे कीं,

" They report everything to the King where the people have a King and to the Magistrates where the people are self-governed."

"ज्या देशांत राजा असतो तेथील लोक राजाकडे जाऊन दाद मागतात व ज्या प्रदेशांतील शासन लोकतंत्रानें चाललेलें असतें तेथील लोक प्रमुख पुरुषांच्या अथवा अध्यक्षांच्या कानावर आपलें गाऱ्हाणें घालतात. मेगॅस्थनीसला भारतीय राज्यतंत्राचें 'राजतंत्र' व 'लोकतंत्र' असे दोन्ही प्रकार ठाऊक होते हें यावरून स्पष्ट होतें. ॲलेक्झांडर दि ग्रेटनें हिंदुस्थान देशावर ज्या स्वाऱ्या केल्या आहेत त्या स्वाऱ्यांतून त्याला अशीं अनेक संघराज्यें लागली. तीं सारीं अत्यंत प्रबळ होतीं. त्यांपैकी कित्येकांच्या हातून त्याला प्रखर मारही खावा लागला. याचें वर्णन ठिकठिकाणीं ग्रीक प्रवाशांनीं केलेलें आहे. इतकेंच नव्हे तर त्यांच्या लोकसभा किती भव्य असत, याचेंही त्यांतून वर्णन आढळतें. माझ्या महाभारतावरील व्याख्यानें या ग्रंथाच्या उपसंहारांत ॲलेक्झांडरच्या सैन्याचा बिआस नदीच्या कांठावरील एका गणसंघानें कसा पराभव केला होता याचा एक पुरावाच उद्धृत केलेला आहे. आणखी कांहीं निदर्शनें मी येथें उद्धृत करतों.

अलेक्झांडर ज्या वेळीं बिआस नदीच्या कांठीं पोहोंचला त्या वेळीं त्याला त्या ठिकाणीं जें गणराज्य लागलें त्याचें वर्णन करीत असतांना ग्रीक इतिहासकार असें वर्णन करतात कीं,

" Land was exceedingly fertile and the inhabitants were good agriculturists, brave in war, and living under an excellent system of internal Government. "

—( M. C. Crindle, A. I.—Alezander,–Page 121.)

"भूमि अत्यंत सुपीक असून तेथील रहिवासी उत्कृष्ट शेती करणारे होते. ते रणधीर असून त्यांच्यांतील अंतर्गत राज्यव्यवस्था अतिशय चांगली होती." कौटिल्यानें वार्ताशास्त्रोपजीवी म्हणून ज्या गणराज्याचें वर्णन केलें आहे तें हेंच गणराज्य होय. गणराज्यांच्या सबलतेविषयीं स्वतः कौटिल्य काय म्हणतो व गौतम बुद्धही काय

म्हणतो तें आपण पाहिलेंच आहे. अलेक्झांडर दि ग्रेटच्या सैन्याचा या संबंधांतील प्रत्यक्ष अनुभव लक्षांत घेण्यासारखा आहे. मालव गणसंघाच्या सैनिकांशीं अलेक्झांडरच्या सैन्याची गांठ पडतांच त्याची काय अवस्था झाली याचें पुढील वर्णन पहा:–

" The Macedonians lost their heart at the prospect of meeting this army. ".. " When the Macedonians found that they had still on hand a fresh war in which the most war-like nations in all India would be their antagonists, they were struck with an unexpected terror, and began again to upbraid the King in the language of sedition. "

—(M. C. Crindle, A. I.—Alexzander–Page 234.)

" या सैन्याशी गांठ पडतांच ग्रीक सैन्याचा सर्व धीर सुटला. पुन्हां यानंतर आपल्याला नवीन युद्ध करावें लागेल व भारतांतील युद्धपिपासु अशा अनेक राष्ट्रांशी गांठ घ्यावी लागेल या कल्पनेनें अनपेक्षितपणें त्यांचा थरकांप उडाला व ते आपल्या राजाविरुद्ध हवें तें बोलू लागले." 'अधृष्य: परेषां' हें जें कौटिल्यानें गणांच्या संबंधी म्हटलेलें आहे व बुद्धानें आणि महाभारतानें या संबंधांत जे विचार व्यक्त केले आहेत तेच ग्रीक सैन्याचा हा प्रत्यक्ष अनुभव अधिक दृढ करीत नाही काय? ग्रामपंचायतींचा व गणांचा कांहीं संबंध नाहीं असें सिद्ध करणारे ग्रीकांचेच अनुभव या संबंधांत लक्षांत घेतले पाहिजेत. त्यांच्या वेगवेगळ्या घटनांचें वर्णन करीत असतां कौटिल्यानें ज्यांना राजशब्दोपजीविन् म्हटलें आहे त्यांच्या राज्ययंत्रासंबंधीं ग्रीक इतिहासकारांनी असें वर्णन केलें आहे कीं :–

" A City of great note with a political Constitution drawn on the same line as the Spartan; for in this community the command in war vested in two hereditary kings of two different houses while a Council of Elder ruled the whole State with Paramount authority. "

—( M. C. Crindle, A. I. —Alexzander–Page 296. )

"तें शहर विख्यात असून तेथील राज्यघटना स्पार्टन लोकांप्रमाणें होती. तेथील संघाचें आधिपत्य वंशपरंपरागत चालत आलेल्या दोन

कुलाधिपतींकडे असे व कुलमुख्याची सभा राज्यसत्तेचा सर्वश्रेष्ठ अधिकार चालवीत असे." कौटिल्यानें ज्यांना राजशब्दोपजीविन् असें म्हटलें आहे त्या गणसंघाची ही घटना आहे. कांहीं गणांत कुळांचे अधिपति हे राजा ही पदवी धारण करून असत. त्यांची एक सभा असे. त्या सभेचा एक मुख्य असे. व त्याच्या नेतृत्वाखाली अथवा मार्गदर्शनाखालीं अंतिमाधिकार स्वतःकडे घेऊन ती सभा राज्याधिकार चालवी. कोठें सर्वच गणप्रजाजन राजशब्दाचा मुळींच उपयोग न करतां प्रजातंत्रानुसार आपला कारभार करीत. दोन्ही प्रकार असलेल्या गणराज्यांचीं अथवा संघराज्यांची निदर्शक अशीं नाणीं सांपडतात. ही गणराज्यें अथवा संघराज्यें म्हणजे एकतंत्री राज्यसंस्थेचा विकास होता असें मेगॅस्थनीसनें आपल्या हिंदुस्थानविषयक वृत्तांतांत म्हटलें आहे. तो म्हणतो :—

Sovereignty was dissolved and democratic Governments set up.

मेगॅस्थनीसच्या या स्पष्ट उल्लेखावरूनही एकसत्ताक राज्यपद्धतीचें विकसन म्हणूनच गणराज्यें होतीं. त्यांचें भाषांतर Republics या शब्दानेंच करणें योग्य होईल. याविषयी अधिक सांगण्याची आवश्यकता नाहीं. कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रांत उल्लेखिलेल्या व्रजि, कुकुर इत्यादि गणसंघाबरोबरच कठ, शूद्रक मालव, शिबि, यहुदेय इत्यादि गणराज्यांचा ग्रीक अितिहासकार उल्लेख करतात. कौटिल्य व ग्रीक अितिहासकार ज्या अर्थानें गण व संघ या शब्दांचा उपयोग करतात त्याच अर्थानें महाभारतकारही उल्लेख करतात हें आपण पाहिलेंच आहे. त्यामुळें महाभारतकालीन यादवांचें गणराज्य अथवा संघराज्य हें राजशब्दोपजीविन् असें संघराज्य ( Republic ) होतें व त्यावर लादण्यांत येणाऱ्या ट्राईब्स्च्या कल्पना सर्वस्वीं खोट्या आहेत हें आपोआपच स्पष्ट होईल.

## यादवांचें गणराज्य व त्याची घटना

यादवांचें हें गणराज्य मथुरेंत होतें. यदु हा मूळ पुरुष असून त्याच्यापासून जीं अनेक कुळें उत्पन्न झालीं त्यांपैकीं वृष्णी व अंधक

या दोन प्रमुख गणांचें मथुरेच्या प्रदेशावर राज्य होतें. पुराणकारांनीं ययातीच्या शापाच्या कथेंतून त्यांच्यांत ‘ राजा ’ या शब्दानें निर्दिष्ट होणारी एकतंत्री राज्यघटना नव्हती असें स्पष्ट म्हटलें आहे. पण हरिवंशांत यादव कुळांतील अनेक पुरुषांचा उल्लेख राजा या शब्दानें होतो व उग्रसेन राजा होता असेंही म्हटलेलें आढळतें. पण येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, वृष्णी व अंधक यांना गण या शब्दानें संबोधून शिवाय त्यांतील पुरुषांना व खरें म्हटलें तर अंधक कुळांतील पुरुषांना राजा हा शब्द लावण्यांत येतो. याचें कारण कौटिलीय अर्थशास्त्रावरून स्पष्ट होतें. कौटिल्यानें राजा या पदवीचा वापर करणाऱ्या संघराज्याचा उल्लेख केला असून त्यांत मथुरामंडलाच्या या अंधक अथवा कुकुरांची गणना केलेली आहे. अर्थशास्त्राच्या संघवृत्त नांवाच्या प्रकरणांत कौटिल्य ‘ वार्ताशास्त्रोपजीविन्’ व ‘राजशब्दोपजीविन्’ असे संघराज्यांचे दोन प्रकार निवेदन करून ‘ राजशब्दोजीवी ’ संघराज्यांची अशी यादी देतो कीं, लिच्छिविक, व्रजिक, मल्लक, भद्रक, कुकुर, कुरु, पाञ्चालादयो राजशब्दोपजीविनः। म्हणजे हे संघ राजा ही पदवी धारण करून क्षत्रिय धर्मानुसार निर्वाह करीत असत. कुकुर हेच कौटिल्यानें उल्लेखिलेले मथुरामंडलांतील अंधक होत. अंधक व कुकुर हीं दोन्हीही नांवें कुळपुरुषामुळें पडलेली नांवें असून कुकुर हा अंधकाचाच मुलगा होता असें हरिवंशांत म्हटलें आहे. हरिवंशांत जी परंपरा दिलेली आहे त्या परंपरेच्या अनुसार अंधकाचा कुकुर हा मुलगा असून उग्रसेन व त्याचा मुलगा कंस हे या अंधक अथवा कुकुराच्या वंशांतीलच होत. हरिवंशांतील ही परंपरा पुढीलप्रमाणें आहे :—

**अन्धकात्काश्यदुहिता चतुरोऽलभतात्मजान् ।**
**कुकुरं भजमानं च शमिं कम्बलबर्हिषम् ।। १७ ।।**
**कुकुरस्य सुतो धृष्णुर्धृष्णोस्तु तनयस्तथा ।**
**कपोतरोमा तस्याथ तैत्तिरिस्तनयोऽभवत् ।। १८**
**जज्ञे पुनर्वसुस्तस्मादभिजित्तु पुनर्वसोः ।**
**तस्य वै पुत्रमिथुनं बभूवाभिजितः किल ।। १९ ।।**

**आहुकश्चाहुकी चैव ख्यातौ ख्यातिमतां वरौ ॥ २०**
**आहुकस्य तु काश्यायां द्वौ पुत्रौ संबभूवतुः ॥ २६**
**देवकश्चोग्रसेनश्च देवपुत्रसमावुभौ ॥ २७**
**नवोग्रसेनस्य सुतास्तेषां कंसस्तु पूर्वजः ॥ ३०**

—महाभारत हरिवंशपर्व अ. ३७

"अंधकापासून काशी राजाच्या मुलीच्या ठिकाणीं कुकुर, भजमान, शमी व कम्बलबर्ही या नांवाची चार मुलें झाली. ज्येष्ठ मुलगा जो कुकुर त्याला धृष्णु, त्या धृष्णुचा कपोतरोमा, त्यापासून तैत्तिरी व त्यापासून पुनर्वसु नांवाचा मुलगा झाला. या पुनर्वसूला आहुक व आहुकी या नांवाचें जुळें झालें. आहुकाला काशीकन्येच्या ठिकाणीं देवक व उग्रसेन या नांवाचीं दोन मुलें झाली. या देवकाची मुलगी देवकी ही भगवान् श्रीकृष्णांची माता होय. उग्रसेनाच्या मुलांपैकीं सर्वांत वडील मुलगा म्हणजेच सुप्रसिद्ध कंस होय."

तात्पर्य कौटिल्यानें राजशब्दोपजीवी म्हणून वर्णन केलेला कुकुर लोकसंघ हाच होय. इतक्या प्राचीन परंपरांचीं गणराज्यें शिकंदराच्या स्वारीपर्यंत चालत आलीं होतीं. डॉ. जयस्वाल यांनीं मालव गणराज्याच्या विषयीं अशीच एक जुनी परंपरा आपल्या ग्रंथांत उल्लेखिलेली आहे :—

" The representatives of the Malav are reported to have said that they were attached more than others to freedom and autonomy, and their freedom had been preserved in tact from the time of Dionysius." (By whom the Greeks probably meant Balaram).

—(Hindu Polity–Page 66).

"मालव संघाच्या प्रतिनिधींनीं असें सांगितल्याचे उल्लेख आहेत कीं, इतर कोणाहीपेक्षां स्वातंत्र्य व स्वायत्तता या तत्त्वांना ते अधिक धरून राहिलेले असून त्यांनीं आपलें स्वातंत्र्य डायोनेसिसच्या पासून तसेंच संरक्षिलेलें आहे. ( बलरामाला ग्रीक इतिहासकार डायोनेसिस या नांवानें संबोधतात. )"

तात्पर्य, प्राचीन काळापासून संघराज्यांच्या या परंपरा अखंडितपणें शिकंदराच्या स्वारीपर्यंत चालू होत्या. असो. उग्रसेन या कुकुर

वंशीय गणाध्यक्षाला राजा ही पदवी होती. एवढाच उग्रसेन राजा या शब्दाचा अर्थ आहे. या अंधक अथवा कुकुर गणाचें राज्य मथुरा प्रांतांत होतें. त्याच्याजवळच दुसरें एक वृष्णी लोकसंघाचें संघराज्य होतें. हा संघ मात्र राजशब्दोपजीवी दिसत नाहीं. ह्या वृष्णीमध्येंच भगवान् श्रीकृष्ण उत्पन्न झालेले आहेत. वृष्णी कुळाचा उग्रसेनाच्या समकालीन पुढारी अक्रूर अथवा बभ्रु हा होता. वृष्णींच्या मध्येंच शूर नांवाच्या विख्यात व्यक्तीचे चिरंजीव वसुदेव हे होत. अंधक कुळांतील देवकाची मुलगी देवकी वसुदेवांना देण्यांत आली होती. वृष्णींचा व अंधकांचा श्रीकृष्णाच्या जन्मपूर्वकाळीं हा संबंध जुळून आल्यावर अधिक घनिष्ठ स्वरूपाचें नातें त्यांच्याशी करावयाची आवश्यकता अंधक संघाला उत्पन्न झाली व त्या नव्या नात्यानें अंधक व वृष्णी ही दोन्हीही संघराज्यें एकरूप होऊन गेलीं. भगवान् श्रीकृष्णांच्या काळीं अंधकांचा व वृष्णीचा राज्यघटनेच्या दृष्टीनें पूर्ण एकोपा असला तरी घटनेचें स्वरूप द्विराज्य पद्धतीच्या देखाव्यासारखें असावें. उग्रसेनालाच पुष्कळ ठिकाणीं आहुक असेंही म्हटलेलें आहे. राजा ही पदवी असलेला आहुक उग्रसेन हा अंधकांचा नायक व बभ्रु अथवा अक्रूर हा वृष्णीचा नायक हे दोघेही अंधकवृष्णींच्या लोकसभेंत बसून वादविवाद करीत व या दोघांच्याही वर गणाध्यक्ष भगवान् श्रीकृष्ण हे संघमुख्य म्हणून त्यांना दोघेही नेता म्हणून मान देत.

कधीं कधीं संघमुख्य म्हणून श्रीकृष्णांना या दोन्ही पक्षांचीं दुरुत्तरें सहन करावी लागत व तीं अगदीं असहनीय होऊन जात. पण कोणाही एकाची कड न घेतां त्यांना दोन्ही पक्षांना संभाळून घ्यावें लागे. श्रीकृष्ण नारदांना म्हणतात:—

**स्यातां यस्याहुकाक्रूरौ किं नु दुःखतरं ततः ।**
**यस्य चापि न तौ स्यातां किं नु दुःखतरं ततः ॥ १०**
**सोऽहं कितवमातेव द्वयोरपि महामते ।**
**एकस्य जयमाशंसे द्वितीयस्यापराजयम् ॥ ११**

—महाभारत शांतिपर्व अध्याय ८१

"आहुक व अक्रूर हे ज्याच्या बाजूला असतील त्याची यापेक्षां अधिक दुर्दशा असू शकणार नाही. त्याच प्रमाणें ते ज्याच्या बाजूला नसतील त्याच्याही दुर्दशेला पारावार उरणार नाहीं. मला या दोघांहीपैकीं कोणत्याही एका पक्षाचा जसा जय इच्छितां येत नाहीं त्याचप्रमाणें कोणत्याही एका पक्षाचा पराजय व्हावा असेंही इच्छितां येत नाही. दोन जुगाऱ्यांच्या आईसारखी माझी अनुकंपनीय अवस्था झालेली आहे. ते परस्परांत द्यूत खेळत असतां दोन्ही स्वतःचीच मुलें असल्यामुळें त्यांच्या आईला ज्याप्रमाणें एकाचा विजय इच्छून दुसऱ्याच्या पराजयाची कल्पना करणें अशक्य आहे तीच माझी अवस्था आहे."

वृष्णी व अंधकांच्या या संघराज्याची सुधर्मा या नांवाची एक लोकसभा असून तिच्यांत गणप्रमुख जमत. त्यांत या सभेचा सभापालही असे. आकस्मिक संकटाच्या वेळी सर्व गणप्रमुखांना कसें बोलाविलें जाई व ते तत्परतेनें कसे जमत, काय घडलें आहे हें त्यांना सभापाल कसें सांगे, या सर्व गोष्टींचें उत्कृष्ट चित्रण महाभारतांत सुभद्राहरणाच्या प्रकरणांत केलेलें आढळतें.

**ह्रियमाणां तु तां दृष्ट्वा सुभद्रां सैनिका जनाः ।**
**विक्रोशन्तोऽद्रवन्सर्वे द्वारकामभितः पुरीम् ॥ ९**
**ते समासाद्य सहिताः सुधर्मामभितः सभाम् ।**
**सभापालस्य तत्सर्वमाचख्युः पार्थविक्रमम् ॥ १०**
**तेषां श्रुत्वा सभापालो भेरीं सांनाहिकीं ततः ।**
**समाजघ्रे महाघोषां जाम्बूनदपरिष्कृताम् ॥ ११**
**क्षुब्धास्तेनाथ शब्देन भोजवृष्ण्यन्धकास्तदा ।**
**अन्नपानमपास्याथ समापेतुः समन्ततः ॥ १२**
**तत्र जाम्बूनदाङ्गानि स्पर्ध्यास्तरणवन्ति च ।**
**मणिविद्रुमचित्राणि ज्वलिताग्निप्रभाणि च ॥ १३**
**भेजिरे पुरुषव्याघ्रा वृष्ण्यन्धकमहारथाः ।**
**सिंहासनानि शतशो धिष्ण्यानीव हुताशनाः ॥ १४**
**तेषां समुपविष्टानां देवानामिव संनये ।**
**आचख्युः चेष्टितं जिष्णोः सभापालः सहानुगः ॥ १५**

—महाभारत आदिपर्व अध्याय २२०

"अर्जुनानें सुभद्रा पळवून नेल्यावर विलाप करीत संरक्षक द्वारकेंत परतले. त्यांनीं सुधर्मा सभेंत येऊन सभापालाला अर्जुनाचें तें कृत्य सांगितलें. तें ऐकतांच सभापालानें सर्व गणप्रमुखांना एकत्रित करण्यासाठीं जिच्यावर सोन्याचें काम केलेलें आहे व जिचा आवाज मोठा आहे अशी सर्वांना बोलाविण्याचा जिच्या बाबतींत संकेत आहे ती भेरी वाजविली. भेरीचा शब्द ऐकतांच कांहींतरी भयानक स्वरूपाचें आकस्मिक संकट उद्भवलें हें ओळखून खाणेंपिणें देखील सोडून क्षुब्ध झालेले सर्व गणमुख्य एकत्र आले व आपल्या रत्नमय आणि अग्नीप्रमाणें तेजस्वी अशा सुवर्णाच्या आसनावर बसले. वेदींत प्रकाशित होणाऱ्या अग्नीप्रमाणे ते तेजस्वी दिसत होते. देवसभेंतील सभासदांप्रमाणें असणाऱ्या त्या सर्व सभासदांना नीट बसलेले पाहून सभापालानें अर्जुनाचें तें कृत्य त्यांना निवेदन केलें."

श्रीकृष्णजन्मापूर्वी आपआपल्या घटनेनुसार वागणाऱ्या या अंधक–वृष्णींवर एक विलक्षण आपत्ति येऊन कोसळली व तिच्या निवारणाचा एक उपाय म्हणून अंधक व वृष्णी एकत्रित आले. त्या आपत्तीचें स्वरूप काय ? तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

# कृष्णजन्मापूर्वीचा इतिहास

यादवांच्या वृष्णी व अंधकांच्या गणराज्यांपैकीं अंधकांच्या गणराज्यावर एक विलक्षण स्वरूपाची आपत्ति आली. ती आपत्ति जरासंधाच्या साम्राज्यवादाची होय. राजा जरासंधाचा साम्राज्यवाद कोणत्या स्वरूपाचा होता याचें विवेचन मी माझ्या महाभारतावरील व्याख्यानमालेंत राजसंस्थेचा अधःपात चित्रित करतांना केलेलें आहे. भारतीय राजसंस्था व सम्राटसंस्था या दोन्हीही लोकांतून उत्पन्न झालेल्या असून त्या लोकाभिमुख असत. राजसंस्थेवर पौरजानपद सत्ता, सचिवसत्ता, अमात्यसत्ता, व तपस्विसत्ता यांचें नियंत्रण कसें असे, या सर्व नियंत्रणांवरही धर्मसत्तेचें नियंत्रण कसें राही, व सर्व राजे मिळून धर्म, प्रताप इत्यादि गुणविशेषांना पाहून आपला नेता अथवा सम्राट कसा निवडीत याचें महाभारतांतील अंतर्गत पुराव्यावरून व इतर वाङ्मयांतीलही पुराव्यावरून साधार व सविस्तर विवेचन मी माझ्या "महाभारतावरील व्याख्यानें" या ग्रंथांत केलेलें आहे. त्याप्रमाणें राजसंस्थेच्या या तत्त्वाला पायाखालीं तुडवून जरासंधानें तिचें विडंबन कसें चालविलें होतें हेंही मी तेथेंच दाखविलें आहे. त्याचा मी येथें विस्तार करीत नाहीं. जरासंधाच्या साम्राज्यवादाच्या रूपानें धर्माऐवजीं बळाला महत्त्व चढलें. सम्राट निवडण्याच्या प्राचीन पद्धतीला पूर्णपणें अर्धचंद्र मिळून जो बलवान् असेल त्यानें इतरांचे न्याय्य अधिकारही लुबाडून अधिराज्य गाजवावें व सम्राटपदावर आरूढ व्हावें, आणि आपण जें करूं तेंच धर्म्य आहे असा दर्प मिरवावा अशी वस्तुस्थिति उत्पन्न झाली. ज्याच्या समर्थ नेतृत्वाखालीं हा आसुरी साम्राज्यवाद उत्पन्न झाला तो पुरुष म्हणजे मगध देशाचा राजा ( हल्लींचा बिहार ) जरासंध होय. त्यानें चंद्र व सूर्य कुळांतील सर्व राजांना मुळापासून उखडून टाकावयाचा प्रयत्न केला. आपल्याला कोणीही विरोध करूं नये म्हणून जुने राजवंश नष्ट करून टाकणें व उग्र

---

व्याख्यान ७ वें दि. २-४-५२

दण्डाच्या भयानें धार्मिकांनाही आपल्या सत्तेचे दास करणें हें त्याच्या साम्राज्यवादाचें स्वरूप होतें. चंद्र व सूर्य वंशांचीं जीं शंभर कुळें होतीं त्यांतील ८६ राजांना त्यानें आपल्या पराक्रमानें जिंकलें. जे आपल्या सत्तेचे अंकित होतील त्यांना तो जीवदान देई; व बाकीच्या रण करावयास उद्युक्त झालेल्या राजांचा केवळ पराभव करून त्याचें समाधान नव्हतें तर त्या सर्व राजांना महादेवाला नरबळी वा राजबळी देण्याचा त्यानें निश्चय केला होता. अशा ८६ राजांना त्यानें पकडून ठेविलें होतें. व यज्ञीय पशु म्हणून बलिदान करण्यासाठीं त्यांजवर प्रोक्षण करून त्यानें त्यांना आपल्या गिरिव्रज नांवाच्या राजधानीत बंदिवासांत आणून टाकलें होतें. केवळ १४ राजांना त्यानें जिंकावयाचें राहिलें होतें. व शंभराची ही संख्या पूर्ण झाली म्हणजे शतराजबलींचा तो नरमेध-समारंभ व्हावयाचा होता! सर्व हिंदुस्थान आपल्या साम्राज्याखालीं आणावयाचें म्हणजे गणराज्यें बुडविण्याचें धोरण जरासंधाला स्वीकारणें अवश्य होतें. गण-राज्याच्या एकसंधतेमुळें तें बुडविणें सुलभ होत नाही व म्हणून तें बुडविण्यासाठीं वेगळ्याच मार्गाचा अवलंब करावा लागतो. गण-राज्यांत स्वातंत्र्याच्या निर्मल सुखाचा लाभ व समानतेचें वातावरण सर्वांना अनुभवावयास मिळत असल्यामुळें गण सहसा कोणाच्याही अंकित होत नाहीत. कोणत्याही स्वरूपाच्या आक्रमणकारी साम्राज्य-वादाची अधिसत्ता आपल्यावर गाजवू न देतां ती उखडून टाकण्याचाच गणांचा स्वाभाविक प्रयत्न असतो. सम्राटानें एवढ्यासाठीं गण बुडविण्याचा कार्यक्रम बहुधा अंगीकारलेला असतो. पण गणराज्य बुडणार कसें? भेद हेंच गणांच्या बुडण्याचें साधन आहे. बाह्य आक्रमणांनीं गण बुडू शकत नाहीं. आपसांतील मतभेदाच्या, मत्स-राच्या व भांडणांच्या आपत्तीमुळेंच गण बुडतात हें आपण मागील व्याख्यानांत पाहिलेंच आहे. म्हणून कौटिल्यानें गणराज्यें कशीं बुडवावीं हें सांगतांना असें म्हटलें आहे कीं,—

**विगुणान् भेददण्डाभ्याम्** —कौटिलीय अर्थशास्त्र पृ. १८६.

आधीं गणांत फूट पाडावी व एकदां फूट पडली कीं मग दण्डाचा वापर करून गणराज्य नष्ट करावें. जरासंधानेंही मथुरेच्या गण-

राज्याचा याच पद्धतीनें विध्वंस करावा अशी परिस्थिति त्याच्या दैवानें त्याला उपलब्ध करून दिली. अंधकांचें हें राज्य दान, पराक्रम इत्यादि गोष्टींनीं विख्यात होतें. त्या अंधकांच्या राज्याचा राजा ही पदवी धारण करणारा गणमुख्य जो उग्रसेन त्याचा वडील मुलगा कंस हा अत्यंत पराक्रमी होता. कंसाच्या सामर्थ्यावर प्रसन्न होऊन असो, अथवा इतर कोणत्याही कारणास्तव असो, पण जरासंधानें आपल्या अस्ति व प्राप्ति या नांवाच्या दोन मुली कंसाला दिल्या. संघराज्याच्या नियमानुसार प्रत्येक व्यक्तीचें घटकत्व त्या राज्याचा घटक–प्रजाजन म्हणून असावयाचें व व्यक्ति या नात्याचें त्याचें वैशिष्टच हें द्वितीय श्रेणींतलें समजलें जावयाचें असा नियम असे. या नव्या नात्यापूर्वी कंसाचीही हीच वस्तुस्थिति होती. पण जरासंधासारख्या जगज्जेत्या व अत्यंत बलसंपन्न अशा सम्राटाचा तो जांवई होतांक्षणींच त्याच्या पाठीशीं मगध सम्राटाचें महान् सामर्थ्य उभें राहिलें व मगध सम्राटाच्याच प्रेरणेनें त्यानें गणराज्याचें स्वरूप नष्ट करून त्या जागी स्वतःची सत्ता प्रस्थापित करण्याचा कसोशीचा प्रयत्न चालविला. अर्थातच स्वतंत्र गणराज्याचे सदस्य व कुळांचे मुख्य त्याला विरोध करूं लागले. पण मूळचाच स्वार्थी व आतां सत्ताभिलाषा उत्पन्न झालेला कंस त्यांच्या विरोधाला भीक घालण्याइतका दुर्बळ उरला नव्हता, त्यानें लोक आपल्याविरुद्ध उठतात असें पाहून त्यांचें दमन करण्यासाठीं मगध सम्राटाकडून साह्य घेतलें व मगधांच्या साह्यानें सर्व यादवांना विशेषतः अंधक गणांतील लोकांना 'त्राहि भगवन्' करून सोडलें. अशा वेळीं अंधक गणांतील मुख्यांचा त्याच्याशीं जो संघर्ष सुरू झाला, त्यांत टिकाव लागावा म्हणून वृष्णिसंघाशीं अंधकांनीं नातें जोडलें व उग्रसेनाची मुलगी त्यांच्या मुख्याला देऊन अधिक जिव्हाळ्यानें हे दोन्ही संघ एकत्रित झाले. भगवान् श्रीकृष्णांनीं स्वतःच यासंबंधीं असें म्हटलें आहे कीं,

**अस्तिः प्राप्तिश्च नाम्ना ते सहदेवानुजेऽबले ।**
**बलेन तेन स्वज्ञातीनभिभूय वृथामतिः ॥ ३१**

श्रैष्ठ्यं प्राप्तः स तस्यासीदतीवापनयो महान् ।
भोजराजन्यवृद्धैश्च पीडयमानैर्दुरात्मना ।। ३२
ज्ञातित्राणमभीप्सद्भिरस्मत्संभावना कृता ।
दत्वाऽक्रूराय सुतनुं तामाहुकसुतां तदा ।। ३३
संकर्षणद्वितीयेन ज्ञातिकार्यं मया कृतम् ।
हतौ कंससुनाभानौ मया रामेण चाप्युत ।। ३४

—— महाभारत सभापर्व अ. १४

" कांहीं काळानंतर खोटचा बुद्धीच्या कंसानें अस्ति व प्राप्ति या राजा जरासंधाच्या दोन मुलीशीं लग्नें करून त्याच्या सैन्याचें साहाय्य घेतलें व यादवांचें प्रमथन करून त्यांची गणराज्य घटना नष्ट करून स्वतःची एकतंत्री सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न चालविला. (श्रैष्ठ्यं प्राप्तः याचा अर्थ या सत्ताभिलाषा-शिवाय दुसरा असूं शकत नाहीं. 'अतीवापनयो महान्' या शब्दांचें स्वारस्य त्याविना स्पष्ट होऊं शकत नाही.) हाच त्याचा सर्वांत मोठा अन्याय होता. त्या दुरात्म्याकडून भोजगणराज्यांतील (अंध-कांनाच भोज हेंही दुसरें नांव होतें.) मुख्यांना (वृद्ध या शब्दाचा मुरब्बी, व अनुभविक असे अधिकारी असा अर्थ होतो. व गणघटनेंत तसाच अर्थ केला आहे हें महाभारताच्या शांतिपर्वांतील गणघटना-विषयक वर्णन बारकाईनें पाहिलें असतां ध्यानांत येतें) अतोनात त्रास होऊं लागल्यावर स्वतःच्या ज्ञातीचें अथवा अंधकांचें संरक्षण होण्यासाठीं (व आज जी आपत्ति अंधकांवर आहे तीच वृष्णींवरही येऊं नये या भावनेनेंच बहुधा पुढच्या बेताला व अंधकांशीं मिळून एका समानघटनेनें राहून संरक्षणात्मक फळी उभारावयास वृष्णीही सिद्ध झाले असले पाहिजेत.) अंधकांनीं आहुकाची अथवा उग्र-सेनाची सुतनु या नांवाची मुलगी अक्रुराला देऊन (वृष्णिगणाचा मुख्य अक्रुर होता.) आपल्याशीं संबंध जोडला."

पण अंधक व वृष्णि एकत्र आले तरी सुद्धां जरासंधाच्या सामर्थ्याच्या पोलादी पार्श्वभूमीवर उभारलेला कंसाचा सत्तावाद त्यामुळें डळमळणें अशक्य होतें. त्यानें कांहींएक न जुमानतां जे जे विरोधक म्हणून आडवे आले त्यांपैकीं कित्येकांना सीमापार

व्हावयास लावून तर कित्येकांचा वध करून व कित्येकांचा भयानक छळ करून पिळवणुकीकर आधारलेलें आपलें सत्तातंत्र सुरू केलें. पदवीधर राजा न राहतां तो खऱ्या अर्थानेंच यादवांचा एकमुखी राजा झाला. त्याचा बाप उग्रसेन हा आपल्या मुलाच्या या आक्रमणकारी प्रवृत्तीला पायबंद घालण्याचा प्रयत्न करूं लागतांच त्यानें उग्रसेनासच पकडून बंदिवासांत टाकून दिलें. हरिवंशांत दोन ठिकाणीं कंसाच्या या आक्रमणाचें वर्णन आलेलें असून श्रीमहाभारताच्या उद्योगपर्वांत स्वतः श्रीकृष्णांच्या उद्‌गारांनीं त्याला पाठिंबा मिळतो. हरिवंशात आलेलें तें वर्णन पुढीलप्रमाणें:—

**कंसो नाम विशालाक्षो भोजवंशविवर्धनः ।**
**राजा पृथिव्यां विख्यातः सिंहविस्पष्टविक्रमः ।। ६५**
**राज्ञां भयंकरो घोरः शंकनीयो महीक्षिताम् ।**
**भयदः सर्वभूतानां सत्पथाद्‌बाह्यतां गतः ।। ६६**
**दारुणाभिनिवेशेन दारुणेनान्तरात्मना ।**
**युक्तस्तेनैव दर्पेण प्रजानां रोमहर्षणः ।। ६७**
**न राजधर्माभिरतो नात्मपक्षसुखावहः ।**
**नात्मराज्ये प्रियकरश्चण्डः कररुचिः सदा ।। ६८**

—महाभारत, हरिवंश पर्व अ. ५४

"कंस नांवाचा विशालनेत्र व सिंहाप्रमाणें पराक्रमी असा भोज कुळांतील राजा पृथ्वीवर विख्यात आहे. तो सर्व सामंतांना अत्यंत भयंकर वाटत असून सर्व राजांच्या अंतःकरणांत त्याच्याविषयीं एक प्रकारचा धाक आहे. चारित्र्य व नीतीचा मार्ग त्यानें केव्हांच सोडलेला असून सर्व प्राणिमात्रांना तो अत्यंत भयावह आहे. त्याचें अंतःकरण अत्यंत दुष्ट असून त्याचा अभिनिवेश अत्यंत दारुण आहे. गर्वोद्धत होऊन प्रजांच्या अंगावर कांटा उभा राहील असें वर्तन तो करतो. राजा होऊनही राजधर्मावर त्याचें मुळींच प्रेम नाहीं. स्वकीयांवर तो अत्याचार करीत असल्यामुळें त्यांना तो असुखकारक आहे. अत्यंत उग्र स्वभावाचा व कर लादून प्रजेची पिळवणूक करणारा तो असल्यामुळें स्वतःच्या राज्यांत तो अत्यंत अप्रिय आहे."

हरिवंशांतील दुसरा उल्लेख पुढीलप्रमाणें आहे:—

**जरासन्धस्य कल्याण्यौ पीनश्रोणिपयोधरे ।**
**उभे कंसस्य ते भार्ये प्रादाद्बार्हद्रथो नृपः ॥ ६**
**स ताभ्यां मुमुदे राजा बद्ध्वा पितरमाहुकम् ।**
**समाश्रित्य जरासंधमनादृत्य च यादवान् ॥**
**शूरसेनेश्वरो राजा यथा ते बहुशः श्रुतः ॥ ७**

—महाभारत, हरिवंश विष्णुपर्व अ. ३४

"जरासंधानें आपल्या दोन सुन्दर मुली कंसाला दिल्या. त्यामुळें मिळालेल्या जरासंधाच्या आश्रयानें यादवांचा अनादर करून व आपल्या पित्याला बंधनांत टाकून तो शूरसेनेश्वर झाला."

पित्याच्या बंधनाची हीच गोष्ट महाभारतांत पुढीलप्रमाणें सुचविली आहे.

**भोजराजस्य वृद्धस्य दुराचारो ह्यनात्मवान् ।**
**जीवतः पितुरैश्वर्यं हृत्वा मृत्युवशं गतः ॥ ३७**

—महाभारत, उद्योगपर्व अ. १२८

"वृद्ध भोजराजाचा अंतःकरण स्वाधीन नसलेला दुराचारी पुत्र जिवंत असलेल्या बापाचें वैभव बळानें हिरावून घेऊन मृत्यूच्या तावडींत सांपडला."

याप्रमाणें एकमुखी सत्तावाद ही यादवांच्यावरील आपत्ति वृष्णि व अंधक गणांच्या एकत्र येण्यानेंसुद्धां टळू शकली नाहीं. वृष्णिगणांतील लोक यादव राज्यघटनेंत वेगवेगळ्या अधिकारावर होते. त्यांतील दोन उग्रसेनाशीं संबद्ध होते. ते दोन म्हणजे भगवान् श्रीकृष्णांचे वडील वसुदेव व वृष्णि संघाचा पुढारी अक्रूर हे होत. उग्रसेनालाच बंदींत टाकल्यावर व कंस बलात्कारानें राजा झाल्यावर या दोघाही महापुरुषांना अर्थातच वाईट वाटलें व त्यांनीं या सत्तेला विरोध सुरू केला. त्यामुळें त्यांच्यावर व त्यांतल्या त्यांत वसुदेवावर कंसाचा अतिशय विलक्षण राग झालेला आहे. कंसाचा राग वसुदेवावर कां झाला असावा याचें हरिवंशांत दिलेलें कारण पुढीलप्रमाणें आहे:—

**ज्ञातिकार्यार्थसिद्धयर्थमुग्रसेनर्हिते रतः ।**
**वसुदेवोऽभवन्नित्यं कंसो न ममृषे च तम् ॥ ८**

—महाभारत, हरिवंश विष्णुपर्व अ. ३४

“ज्ञातिकार्याची सिद्धि व्हावी म्हणून उग्रसेनाच्या हिताला वसुदेव दक्षतेनें जपत असे. तें कंसाला सहन झालें नाहीं.” ज्ञातिकार्याची सिद्धि म्हणजे अनियंत्रित एकमुखी सत्तेऐवजीं पुन्हां गणघटनेची स्थापना हीच होती. उग्रसेनाच्या हिताची जपणूक त्या गोष्टीसाठींच वसुदेव करीत होता. कोणत्याही अनियंत्रित व सत्तेचा अभिलाष डोळ्यावर आलेल्या व्यक्तीला ही गोष्ट कशी सहन होईल? स्वाभाविकपणेंच कंसाचें व वसुदेवाचें वाकडें आलें व तो वसुदेवांना पाण्यांत पाहू लागला.”

वसुदेवाचें व कंसाचें अशा प्रकारें विलक्षण वाकडें आलें. पण तसें म्हटलें तर अक्रूराचेंही तितकेंच वाकडें यावयास हवें होतें. पण अक्रूराचें तसें वाकडें आलेलें दिसत नाहीं. पुढें कंसाच्या वधासाठीं व मथुरेच्या राज्यसंस्थेच्या शुद्धीकरणासाठीं जे महान् क्रांतिप्रयत्न झाले त्यांत अक्रूराचाही हात होता असें दाखविणारे पुष्कळ पुरावे उपलब्ध आहेत व ते योग्यस्थळीं पुढें आपण विचारांत घेऊंही. पण वसुदेवाइतकाच अक्रूरही कंसाच्या विरुद्ध असला तरी कंसाचा त्याच्यावर इतका राग तर ओढवला नव्हताच, पण उलट त्याच्याविषयीं कंसाला कांहींसें प्रेमही वाटत होतें असें दिसतें. श्रीकृष्णांना मथुरेंत बोलाविण्याचें कारस्थान करीत असतां त्यांना बोलावण्याची प्रत्यक्ष कामगिरी त्यानें अक्रूरावरच सोपविलेली आहे. इतकेंच नव्हे तर ती जबाबदारीनें सोपविली गेली आहे. कंस अक्रूराला म्हणतो :

**अक्रूर गच्छ शीघ्रं त्वं तावानय ममाज्ञया ।**
**संकर्षणं च कृष्णं च द्रष्टुं कौतूहलं हि मे ॥ ९४**

**तयोरागमने प्रीतिः परमा मत्कृता भवेत् ।**
**दृष्ट्वा तु तौ महावीर्यौ तद्विधास्यामि यद्धितम् ॥ ९५**

**शासनं यदि वा श्रुत्वा मम तौ परिभाषितम् ।**
**नागच्छेतां यथाकालं निग्राह्यावपि तौ मम ॥ ९६**

सान्त्वमेव तु बालेषु प्रधानं प्रथमो नयः ।
मधुरेणैव तौ मन्दौ स्वयमेवानयाशु वै ॥ १७
अक्रूर कुरु मे प्रीतिमेतां परमदुर्लभाम् ।
यदि वा नोपजप्तोऽसि वसुदेवेन सुव्रत ॥१८

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. २२

"हे अक्रूरा, तूं माझ्या आज्ञेनें शीघ्र वृंदावनास जा व कृष्ण आणि बलराम यांना येथें घेऊन ये. त्यांना तूं येथें आणल्यास मला खराखरा आनंद होईल. ते महापराक्रमी माझे शत्रू येथें आल्यावर मला जें आवश्यक वाटेल तें मी करीन. माझी आज्ञा ऐकूनही ते जर येथें येणार नाहींत तर माझ्या आज्ञेनें तूं त्यांना बंदी करून येथें घेऊन ये. ही मला सर्वांत प्रिय गोष्ट तूं कर. वसुदेवानें तुझे कान फुंकले नसतील तर तूं ताबडतोब जाऊन ही गोष्ट कर."

कंसानें ज्या अक्रूराला विश्वासानें ही गोष्ट सांगितली त्या स्वतः अक्रूराच्या कंसाविषयींच्या काय भावना होत्या हें अक्रूरानें गोकुळांत जाऊन श्रीकृष्णाची भेट घेतल्यावर त्यांच्याशीं जें संभाषण केलें आहे त्यावरून चांगलेंच व्यक्त होतें. तो श्रीकृष्णांना म्हणतोः—

पितरं वसुदेवं च सततं दुःखभाजनम् ।
दीनं पुत्रवधश्रान्तं युवामद्य समेष्यथः ॥५
सततं पीडचमानं च कंसेनाशुभबुद्धिना ।
दशान्ते शोषितं वृद्धं दुःखैः शिथिलतां गतम् ॥ ६
कंसस्य भयसंत्रस्तं भवद्भ्यां च विनाकृतम् ।
वह्यमानं दिवा रात्रौ सोत्कण्ठेनान्तरात्मना ॥ ७
तां च द्रक्ष्यसि गोविन्द पुत्रैरमृदितस्तनीम् ।
देवकीं देवसंकाशां सीदन्तीं विहतप्रभाम् ॥ ८
यथा नागः सुदुर्वृत्तो दमितो यमुनाह्रदे ।
विमूलः स कृतः शैलो यथा वै भूधरस्त्वया ॥ १९
दर्पोत्सिक्तश्च बलवानरिष्टो विनिपातितः ।
परप्राणहरः केशी दुष्टात्मा च हयो हतः ॥ २०
एतेनैव प्रयत्नेन वृद्धावुद्धृत्य दुःखितौ ।
यथा धर्ममवाप्नोषि तत्कृष्ण परिचिन्त्यताम् ॥ २१

निर्भर्त्समानो यैर्दृष्टः पिता ते कंससंसदि ।
ते सर्वे चक्रुरश्रूणि नेत्रैर्दुःखान्विता भृशम् ।। २२
गर्भावकर्तनादीनि दुःखानि सुबहून्यपि ।
माता ते देवकी कृष्ण कंसस्य सहतेऽवशा ।। २३
मातापितृभ्यां सर्वेण जातेन तनयेन वै ।
ऋणं वै पितृकर्तव्यं यथायोगमुदाहृतम् ।। २४

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. २६

" हे श्रीकृष्णा, तूं मथुरेंत आलास तर पुत्रांच्या वधामुळें अत्यंत दुःखी असलेल्या, दीन, दुर्बुद्धि कंसाकडून सतत गांजलेल्या, कंसाच्या भयानें त्रस्त झालेल्या, व तुमचा वियोग झालेल्या आणि त्यामुळेंच उत्कंठित व आतुरलेल्या मनानें तुमच्याकडे डोळे लावून असलेल्या आपल्या पित्याला तूं तेथें पाहशील. तसेंच पुत्रवियोग व त्यामुळें झालेल्या अतीव दुःखानें निस्तेज झालेल्या आपल्या मातेला-देवकीलाही तूं पाहाशील. ज्याप्रमाणें अत्यंत दुर्वृत्त असा कालिया नाग तूं दमन करून हाकलून दिलास, मुळापासून तूं जसा गोवर्धन पर्वत उपटलास, मदांध व बलवान् अशा अरिष्टाला तूं ज्याप्रमाणें ठार मारलेंस, दुसऱ्याचे प्राण हरण करणाऱ्या दुष्टबुद्धि केशीचा जसा तूं वध केलास, त्याचप्रमाणें आपल्या पित्याचें हें कंसरूपी दुःखही तूं जर नाहींसें करून टाकशील तर तुला अत्यंत मोठ्या पुण्याची प्राप्ति होईल. ज्यांनीं भर सभेमध्यें कंसानें निर्भर्त्सना केलेला तुझा पिता पाहिला त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें. गर्भ-कृंतनासारखीं अत्यंत भयानक दुःखें तुझ्या देवकीमातेनें सहन केलीं आहेत. आईबापांच्या पोटीं जन्म घेणाऱ्या मुलानें—विशेषतः तुझ्या-सारख्या मुलानें—जें ऋण फेडावयाचें असतें तें तूं फेडलें पाहिजेस."

अक्रूराच्या तोंडून कंसाविषयीं जे कडवट उद्‌गार बाहेर पडले आहेत त्या पद्धतीचे उद्‌गार प्रत्यक्ष गांजलेल्या वसुदेवाच्याही तोंडून बाहेर पडल्याचें दिसत नाहीं. यावरून अक्रूराच्या कंसाविषयींच्या भावना किती जळजळीत होत्या हें स्पष्टपणें व्यक्त होतें. अक्रूर हा उग्रसेनाचा जांवई म्हणजे कंसाचा मेव्हणा होता. म्हणून कंसानें

त्याला छळलें नसेल या तर्कांतही कांहीं अर्थ नाहीं. कारण कीं वसुदेवही कंसाचा मेव्हणाच होता. वसुदेव मेव्हणा असला तरी अक्रूर हा प्रत्यक्ष सख्या बहिणीचा पति व वसुदेव मात्र चुलत बहिणीचा पति असाही श्लेष काढण्यांत कांहीं अर्थ नाहीं. देवकीच्या वरातीच्या वेळीं कंसानें स्वतः तिच्या रथाचें सारथ्य केलें होतें. (प्रगृहीतम् कंसम् या भागवतांतील उद्गारांवरून त्याचें देवकीवर सत्ताभिलाषेपूर्वीं प्रेम होतें असें दिसतें.) आणि सर्वांत मोठी गोष्ट ही कीं, जन्मदात्या बापाला जो बंधनांत टाकावयास तयार झाला त्या कंसासारख्या अरेरावाला मेव्हण्याची फारशी पर्वा असेल असें समजण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मग कंसाच्या सत्तेचे दोघेही विरोधक असतांना त्याचा सर्व राग एकटचा वसुदेवावर केंद्रित झाला व अक्रूरावर झाला नाहीं याचें कारण कांहीं तरी वेगळें असलें पाहिजे. तें वेगळें कारण म्हणजे कंस व वसुदेव यांच्या स्वभावरचनेंतील भिन्नता हें होय. वसुदेव धर्मनिष्ठ व साधु होते. त्यांची सत्यनिष्ठा अलौकिक होती. त्यांच्या तीव्र धर्मनिष्ठेमुळें लोकांत त्यांच्याविषयीं अतिशय आदर होता असें भागवतांत ठिकठिकाणीं वर्णन आहेच. हरिवंशांतीलही त्यांच्यासंबंधींच्या विविध उल्लेखांवरून तसेंच दिसतें.

कंसानें वसुदेवाचा अपमान केल्यानंतर अंधक नांवाच्या त्याच्या वृद्ध पणजोबानें त्याची निर्भर्त्सना करतांना वसुदेवाविषयीं काढलेले पुढील उद्गार पहा.

**गुरोरनवलिप्तस्य मान्यस्य महतामपि ।**
**क्षेपणं कः शुभं मन्ये द्विजस्येव वधे कृते ।। ११**

**यस्त्वं देवोपमं वृद्धं वसुदेवं वसूपमम् ।**
**मोहात्क्षिपसि दुर्बुद्धे कुतस्ते शान्तिरात्मनः ।। ३५**

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. २३

"आपल्यापेक्षां वडील, जो सदा सावध आहे, सर्व लोकांना इतकेंच नव्हे तर थोर लोकांना देखील जो अत्यंत मान्य आहे, त्याचा उपमर्द करणें खात्रीनें हिताचें नाहीं. ब्रह्महत्येसारखेंच तें महान् पातक होय. देवांच्या योग्यतेच्या अथवा वसूंच्या योग्यतेच्या

वृद्ध वसुदेवाची, मदांध होऊन निंदा करण्याची दुर्बुद्धि तुला झाली, यावरूनच तुला शांति लाभणें केवळ अशक्य आहे हें उघड होतें." तात्पर्य वसुदेव हे लोकप्रिय तर होतेच, पण विशुद्ध धार्मिक म्हणून त्यांच्याविषयीं लोकांच्या अंतःकरणांत एक विशिष्ट स्वरूपाचा पूज्यभाव होता. अक्रूर हा प्रवृत्तीनें धार्मिक असला तरी वसुदेवाप्रमाणें तो केवळ कर्तव्यनिष्ठ धर्मात्मा दिसत नाहीं.अभिलाषा असणें, ती पुरविण्यासाठीं क्वचित प्रसंगीं वाममार्गाचाही अवलंब करणें, प्रसंग पडेल तसें वागणें, व स्वतःला बचावण्याचें धोरण संभाळूनच कार्याच्या व्यापांत पडणें, या सर्व गोष्टी अक्रूराच्या ठिकाणीं पूर्ण होत्या असें त्याच्या आयुष्याचा आढावा घेतला तर आढळून येतें. भगवान् श्रीकृष्ण यादवांचे मुख्य झाल्यावर अक्रूराशीं अत्यंत संबद्ध असें स्यमंतक मण्याचें एक प्रकरण उद्भवलेलें आहे. त्या प्रकरणावरून अक्रूराची मनोरचना पूर्णपणें ध्यानांत यावयास हरकत नाहीं. तें प्रकरण असें:—

द्वारकेंतील एक प्रमुख पुरुष सत्राजित हा सूर्याचा परममित्र असून सूर्यानें त्याला स्यमंतक नांवाचा अत्यंत तेजस्वी असा मणि दिला होता. हा मणि म्हणजे सर्वांचें आकर्षण होऊन राहिला होता. व त्यापासून रोज आठभार सुवर्णाची प्राप्तीही होत असे. सत्राजिताजवळ हा अलौकिक मणि आहे असें कळतांच तो त्याच्या एकटयाच्या मालकीचा न राहतां राज्याचें भूषण म्हणून राहावा या इच्छेनें भगवान् श्रीकृष्णांनीं सत्राजिताजवळ त्या मण्याची मागणी केली. पण स्वतःची चांगली वस्तु सत्राजित द्यावयास सिद्ध होईना. श्रीकृष्णांनीं त्याचा नाद सोडला. पुढें सत्राजिताचा भाऊ प्रसेन हा तो मणि कंठांत घालून मृगयेसाठीं गेला असतां त्याला एका सिंहानें ठार मारलें व पुढें त्या सिंहालाही ठार मारून त्याच्या जवळून तो मणि जांबवंतानें नेला. आपल्या मुलाचें खेळणें म्हणून त्यानें तो मणि मुलाच्या झोंपाळयावर लटकावून दिला. मण्याचा व तो कंठांत घालून गेलेल्या आपल्या भावाचा अशा दोघांचाही पत्ता नाहीं असें पाहून सत्राजिताला श्रीकृष्णांनींच आपल्या भावाला ठार मारून मणि लांबविला असावा अशी शंका आली व ती नुसती

मनांतच न ठेवतां तो तशा अर्थाचें लोकांत बोलूं लागला. अर्थातच लोकांत तो एक चर्चेचा विषय झाला व कर्णोपकर्णी ती वार्ता भगवान् श्रीकृष्णांच्याही कानावर गेली. आपली अकारण अपकीर्ति पसरत आहे असें पाहून श्रीकृष्णांनीं स्वतः त्या मण्याचा शोध करावयाचें ठरविलें. तदनुरूप द्वारकेंतील कांहीं महत्त्वाचे लोक बरोबर घेऊन ते शोध करावयास गेले असतां प्रसेनाचें प्रेत त्यांनीं शोधून काढलें. त्यानंतर त्या प्रेताजवळ सिंहाचीं पावलें आढळलीं म्हणून त्या पावलांच्या अनुरोधानें त्यांनीं सिंहाचा माग काढावयास प्रारंभ केला. सिंहाचेंही प्रेत सांपडलें. पण त्याच्याजवळ जांबवंताचीं पावलें आढळलीं. त्या पावलांच्या अनुरोधानें श्रीकृष्ण जांबवंताच्या गुहेंत गेले. मण्यासाठीं त्यांचें कित्येक दिवस घोर युद्ध झालें. कृष्ण पुष्कळ दिवस बाहेर येत नाहींत असें पाहून त्यांच्या अनुचरांना ते त्या गुहेंत ठार झाले असावेत असें वाटून ते विषण्ण अंतःकरणानें द्वारकेंत परतले. पुढें श्रीकृष्णांनीं जांबवंताचा पराभव करून व त्याच्या कन्येशीं विवाह करून नववधू व तें रत्न यासहित कृष्ण द्वारकेंत आले. सुधर्मा सभेंत सर्व लोकांसमक्ष श्रीकृष्णांनीं हें सर्व वृत्त सांगून आपल्याविरुद्ध उठलेला अपवाद नाहींसा केला. आतां बाजू सत्राजितावर उलटून त्याला तोंड काढावयास जागा उरली नाहीं. लोक त्याला दूषणें देऊं लागले. शेवटीं त्यानें भगवान् श्रीकृष्णांना आपली मुलगी सत्यभामा ही देऊन आंदण म्हणून तो मणि दिला. कृष्णांनीं सत्यभामेचा स्वीकार केला. पण मणि मात्र स्वतः न घेतां तो सत्राजिताच्या स्वाधीन केला. या मण्याविषयीं अक्रूराच्या मनांत लोभ उत्पन्न झाला व त्यानें शतधन्वा नांवाच्या दुसऱ्याच एका यादवाला हाताशीं धरून कारस्थान उभारलें. पूर्वीं केव्हां तरी ही सत्यभामा शतधन्वा याला द्यावयाचें घाटत होतें. त्या विषयांतील त्याचा मत्सर जागृत करून या कृष्णभक्त म्हणून गाजलेल्या अक्रूरानें सत्राजिताची हत्या करविली व मणि आपल्या पदरांत पाडून घेतला. हरिवंशकार म्हणतात :

यत्तत्सत्राजिते कृष्णो मणिरत्नं स्यमन्तकम् ।
अदात्तद्धारयामास बभ्रुर्वै शतधन्वना ॥ १
यदा हि प्रार्थयामास सत्यभामामनिन्दिताम् ।
अक्रूरोन्तरमन्विच्छन् मणिं चैव स्यमन्तकम् ॥ २
सत्राजितं ततो हत्वा शतधन्वा महाबलः ।
रात्रौ तं मणिमादाय ततोऽक्रूराय दत्तवान् ॥ ३
अक्रूरस्तु ततो रत्नमादाय भरतर्षभ ।
समयं कारयांचक्रे नावेद्योऽहं त्वयेत्युत ॥ ४
वयमभ्युपयास्यामः कृष्णेन त्वामभिद्रुतम् ।
ममाद्य द्वारका सर्वा वशे तिष्ठत्यसंशयम् ॥ ५

—महाभारत, हरिवंशपर्व अ. ३९

"सत्राजिताला श्रीकृष्णानें स्यमंतक मणि दिल्यावर शतधन्व्याच्याकरवीं अक्रूरानें तो मणि पळविला. सत्यभामा त्या शतधन्व्याला पत्नी म्हणून हवी होती. त्याच्या अंतःकरणांतील त्या विशिष्ट भावनेला चाळवून रोज सुवर्ण देणारा तो मणि पदरांत पाडून घेण्यासाठीं अक्रूरानें कारस्थान उभारलें. बलवान् शतधन्व्यानें अक्रूराच्या प्रेरणेवरून रात्रीं सत्राजिताला ठार मारून तो मणि ताब्यांत घेतला व अक्रूराला देऊन टाकला. अक्रूरानें शतधन्व्याशीं असा करार केला कीं, स्यमंतक मणि माझ्याजवळ आहे असें तूं कोणासही सांगूं नकोस व श्वशुराच्या वधाचा सूड म्हणून कृष्णानें जर तुझ्यावर चढाई केली तर आम्ही सर्वस्वीं तुला साहाय्य करून त्याच्यापासून तुझें संरक्षण करूं. कारण ही संपूर्ण द्वारका आज माझ्या स्वाधीन आहे."

भगवान् श्रीकृष्णांविरुद्ध द्वारकेंत उत्थान घडवून आणण्यापर्यंत अक्रूराच्या निदान मनाची तरी मजल गेली होती हें यावरून स्पष्ट होतें. पुढें सत्यभामेनें हें शोककारक वृत्त त्या वेळीं हस्तिनापुरास असलेल्या श्रीकृष्ण—बलरामांना कळविलें. संतापलेल्या श्रीकृष्णांनीं शतधन्व्यावर चढाई केली. श्रीकृष्णांसारख्या बलवंताशीं गांठ पडतांच घाबरून शतधन्व्यानें कराराप्रमाणें अक्रूराला साहाय्य मागितलें. पण बलवंतांशीं विग्रहाचा प्रसंग पाहून आपला सर्वनाश

होऊं नये म्हणून पूर्वी दिलेल्या वचनाला त्यानें हरताळ फासला. शेवटीं धूर्तांच्या कलानें वागणाऱ्या मूर्खांचें जें होतें तेंच शतधन्व्याचेंही झालें. हरिवंशकार म्हणतात :

ततः प्रववृते युद्धं तुमुलं भोजकृष्णयोः ।
शतधन्वा ततोऽक्रूरमवैक्षत्सर्वतो दिशम् ॥ १२
संरब्धौ तावुभौ दृष्ट्वा तत्रभोजजनार्दनौ ।
शक्तोऽपि शाठ्याद्धार्दिक्यमक्रूरो नाभ्यपद्यत ॥ १३
अपयाने ततो बुद्धिं भोजश्चक्रे भयार्दितः ।
योजनानां शतं साग्रं हयया प्रत्यपद्यत ॥ १४

—महाभारत, हरिवंशपर्व अ. ३९

"नंतर श्रीकृष्ण व शतधन्वा यांचे घनघोर युद्ध झालें. शतधन्व्यानें साहाय्यासाठीं अक्रूराची पुष्कळ अपेक्षा केली. पण साहाय्य करण्याची शक्यता असून सुद्धां अक्रूरानें खोटेपणानें शतधन्व्याला साहाय्य केलें नाहीं. भयभीत होऊन शतधन्वा पळून गेला."

पण श्रीकृष्णांनीं पाठलाग करून त्याला मिथिलेजवळ ठार मारलें. शोध करूनही स्यमंतक मणि कांहीं त्याच्याजवळ सांपडला नाहीं. परत आल्यावर श्रीकृष्ण कदाचित त्याचा अधिक जारीनें शोध करतील असें अक्रूराला वाटून त्यानें यज्ञदीक्षेचें सोंग उभारलें व आपण व्रतस्थ आहों अशी बतावणी करून कांहीं दिवस स्वतःला वांचविलें. लबाडी करणाऱ्या लोकांच्या अनेकविध साधनांत या प्रकाराचा समावेश कणिक नांवाच्या विख्यात अर्थशास्त्रज्ञानें केला आहे. तो म्हणतो :

अग्न्याधानेन यज्ञेन काषायेण जटाजिनैः ।
लोकान्विश्वासयित्वैव ततो लुम्पेद्यथा वृकः ॥ १९

—महाभारत, आदिपर्व अ. १४०

"अग्निहोत्र घेऊन यज्ञयागाच्या दीक्षेचें ढोंग उभारून, भगवें वस्त्र परिधान करून, जटा वाढवून वा कृष्णाजिनें पांघरून ढोंगीपणानें लोकांच्या अंतःकरणांत विश्वास उत्पन्न करावा व नंतर लांडग्याच्या वृत्तीनें त्यांना लुबाडावें." अक्रूरानें हेंच केलें. हरिवंशकार म्हणतात :

**एतस्मिन्नेव काले तु बभ्रुर्मतिमतां वरः ।**
**नानारूपान् क्रतून् सर्वानाजहार निरर्गलान् ॥ २४**
**दीक्षामयं सकवचं रक्षार्थं प्रविवेश ह ।**
**स्यमन्तककृते प्राज्ञो गान्दीपुत्रो महायशाः ॥ २५**

——महाभारत, हरिवंशपर्व अ. ३९

"बुद्धिमंतांत श्रेष्ठ असलेल्या अक्रूरानें एकामागून एक यज्ञ करावयास प्रारंभ केला होता. किती तरी दिवस स्वतःच्या रक्षणासाठीं व स्यमंतक आपल्याजवळ कोणी मागूं नये वा आपल्या येथें शोध करावा असें कोणाच्या मनांतही येऊं नये म्हणून यज्ञदीक्षा घेऊन तो ढोंगीपणानें दीक्षित म्हणून राहिला. (येथें रक्षार्थ यावर टीकाकारांनीं पुढीलप्रमाणें स्पष्ट टीप जोडली आहे व ती अत्यंत मार्मिक आहे यांत शका नाहीं. ती टीप अशी : तेनैव स्वशरीररक्षाऽपि कृता इत्यर्थः । याच ढोंगी मार्गानें त्यानें स्वतःचेंही रक्षण करून घेतलें). अक्रूराचे ते यज्ञ, खूप अन्नदान, इतर दानें व भरपूर दक्षिणा यामुळें बरेच गाजले. मांजर डोळे मिटून दूध पितांना जगाचेही डोळे असेच मिटलेले असल्यामुळें आपणाला कोणी पहात नाहीं असें समजत असतें. पण जग मांजराला पाहिल्याविना रहात नाहीं. अक्रूराचें ढोंग त्याच्या यज्ञाच्या थाटावरून श्रीकृष्णांच्या ताबडतोब ध्यानांत आलें. हें हेरतांच आपल्या गणांसहित स्थलांतर करून अक्रूर काशीला निघून गेला. श्रीकृष्ण त्याला जावयास बंदी करूं शकत होते अथवा काशीला जाऊनही त्याला ठार मारूं शकत होते. पण वृष्णि गणांच्या एका पक्षाचा तो पुढारी असल्यामुळें आपसांत संघर्ष व गणांत भेद नको म्हणून त्यांनीं बुद्धिपुरःसर त्याच्याकडे दुर्लक्ष केलें. अक्रूरानें बरेच दिवस बाहेर काढले. पण श्रीकृष्णांशीं सदाचें वैर असणें व त्यांनीं आपणांकडे उपेक्षा वृत्तीनें पहाणें ही गोष्ट हिताची नाहीं हें ओळखून अक्रूरानें द्वारकेंत परत येऊन समारंभपूर्वक आपली मुलगी श्रीकृष्णांना दिली व श्रीकृष्णांशीं नवा संबंध जोडला. श्रीकृष्णांच्या मनांत ही सर्व वस्तुस्थिति बलरामांना पटवून द्यावयाची होती. म्हणून त्यांनीं भर सभेमध्यें अक्रूराला असें म्हटलें कीं, "तुमच्याजवळ बरेच दिवसांपासून आमचा

स्यमंतक मणि आहे. मी आपणांशीं सरळपणें वागतों. आपणही माझ्याशीं कपटानें वागूं नये. त्या मण्यावर माझा अधिकार आहे. पुष्कळ दिवस तुम्ही त्याचा उपभोग घेतला. आतां तरी तो मला द्या." सर्व लोकांसमोर भरसभेंत श्रीकृष्णांनीं हें म्हटल्यावर अक्रूरानें मुकाट्यानें मणि श्रीकृष्णांच्या स्वाधीन केला. श्रीकृष्णांना मणि नको होता. त्यांना केवळ अक्रूर काय आहे हें बलराम व इतर लोकांना पटवून द्यावयाचें होतें. तेवढें काम करून त्यांनीं मणि परत अक्रूराला देऊन टाकला व आपल्यापुरता त्या प्रकरणास पूर्ण विराम दिला.

ही गोष्ट विस्तारानें देण्याचें कारण अक्रूराचा स्वभाव पूर्णपणें कळावा व वसुदेव आणि अक्रूर हे दोघेही सारख्याच मताचे होते तरी कंसाचा राग सहन करण्याची पाळी अक्रूरावर न येतां केवळ वसुदेवांवरच ती कां आली यांतील रहस्य स्पष्ट व्हावें इतकेंच आहे.

## वसुदेवावरील रागाचें पर्यवसान

बंधनांत टाकलेल्या आपल्या पित्याचा पक्ष घेऊन वसुदेव बंडाळी करतो व उघड तोंडावर कांहीं बोलत नसला तरी त्याच्या कारस्थानांनीं आपला पक्ष अथवा आपण उत्पन्न केलेली सत्ता स्थिर रहाणार नाहीं अशा कल्पनेनें, तसेंच वसुदेवाची नागवणूक केली व त्याच्यावर दारुण अत्याचार केले म्हणजे आपल्या विरुद्ध वर्तन करूं इच्छिणाऱ्या लोकांना खराखुरा धाकही उत्पन्न होईल अशाही कल्पनेनें, कंसानें वसुदेवाचा छळ करावयास प्रारंभ केला. हरिवंशांत असें वर्णन आहे कीं, खट्वांग वनांत नारदांनीं कंसाची भेट घेऊन त्याला असें सांगितलें कीं,

**तत्रैषा देवकी या ते मथुरायां लघुस्वसा ।**
**योऽस्यां गर्भोऽष्टमः कंस स ते मृत्युर्भविष्यति ॥ १६**
**देवानां स तु सर्वस्वं त्रिदिवस्य गतिश्च सः ।**
**परं रहस्यं देवानां स ते मृत्युर्भविष्यति ॥ १७**

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. १

"तुझी जी मथुरेंत देवकी नांवाची धाकटी बहीण आहे तिचा आठवा गर्भ तुला ठार मारील. तो स्वर्गांत राहाणाऱ्या देवांचा

सर्वस्वीं आधार असून तो देवांचें परम रहस्य आहे. तोच तुझा मृत्यु होईल."

श्रीमत् भागवतांत या गोष्टीचें वेगळ्या स्वरूपाचें वर्णन आहे. तें असें कीं,

**पथि प्रग्रहिणं कंसं आभाष्याहाऽशरीरवाक् ।**
**अस्यास्त्वामष्टमो गर्भो हन्ता यां वहसेऽबुध ।। ३४**

-- (भागवत दशम स्कंध अ. १)

"देवकीच्या वरातीच्या वेळीं तिचें सारथ्य करणाऱ्या कंसाला उद्देशून आकाशवाणीनें असें सांगितलें कीं, हे मूर्खा, तूं जिचें सारथ्य करतो आहेस त्या देवकीचा आठवा गर्भ तुला ठार मारील."

भागवत व हरिवंश यांतील कथांत इतकाच फरक आहे कीं, भागवताच्या अनुसार ही गोष्ट कंसाला ऐन लग्नाच्याच वेळीं कळली व हरिवंशाच्या अमुसार ही गोष्ट कंसाला लग्नानंतर पुष्कळ दिवसांनीं कळली. भागवतांत सुद्धां नारदाचा संबंध आहेच. येवढेंच कीं भागवतांत प्रथम आकाशवाणी व नंतर नारद असा क्रम आहे व हरिवंशांत आकाशवाणीचा संबंध नसून नारदानेंच ती गोष्ट पहिल्या प्रथम सांगितली असें आहे. इतकेंच नव्हे तर नारदानें कंसाला तो मूळचा यादव नसून कोणीतरी कालनेमी नांवाचा दैत्य आहे आणि यादवांचें नि त्याचें फार दिवसापासून वैर आहे असेंही समजावून सांगितलें. स्वतः कंसाच्याच तोंडीं त्याच्या जन्माची हरिवंशांत जी गोष्ट घातली आहे ती तो उग्रसेनाचा मुलगा नसून कोणीतरी वेगळाच आहे असें दाखविलें आहे.

**न चाहमुग्रसेनेन जातः किल सुतार्थिना ।**
**मानुषेणाल्पवीर्येण यथा मामाह नारदः ।। ३८**
**अलं बलेन वीर्येणानयेन विनयेन च ।। ११३**
**प्रमाणैर्वाऽपि वीर्येण तेजसा विक्रमेण च ।**
**सत्येन चैव दानेन नान्योऽस्ति सदृशः पुमान् ।। ११४**
**विदित्वा सर्वमात्मानं वचनं श्रद्दधाम्यहम् ।**
**क्षेत्रजोऽहं सुतस्तस्य उग्रसेनस्य हस्तिप ।। ११५**

मातापितृभ्यां संत्यक्तः स्थापितः स्वेन तेजसा ।
उभाभ्यामपि विद्विष्टो बान्धवैश्च विशेषतः ॥ ११६
एतानपि हनिष्यामि यादवान् कृष्णपक्षिणः ।
तदिमौ घातयित्वा तु हस्तिना गोपकिल्बिषौ ॥ ११७
—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. २८

"मी उग्रसेनापासून जन्माला आलेलों नाहीं हें मला नारदानें सांगितलें व तें खरेंही आहे. कारण उग्रसेनासारख्या दुर्बल मनुष्याकडून माझा जन्म होणें कसें शक्य आहे? बल, वीर्य, पराक्रम, विनय, तेज, सत्य, दान या सर्व दृष्टींनीं सर्वश्रेष्ठ असलेला माझ्यासारखा प्रतापी पुरुष उग्रसेनासारख्या क्षुद्राचा पुत्र असूंच शकत नाहीं. या माझ्या लौकिक आईबापांनीं माझी सदैव उपेक्षा केली व सर्व बांधवांनीं माझें वैर केलें. कृष्णपक्षीय सर्व यादवांना तर मी ठार मारणारच आहें पण माता-पित्यांनाही ते माझे वस्तुतः कोणीच नसल्यामुळें मी ठार करीन."

ह्या कथेचा व उद्गारांचा बारकाईनें विचार केला तर सत्ताभिलाषी व स्वार्थांध मनुष्य आपल्या स्वार्थासाठीं स्वजनद्रोहाची कोणती पायरी गांठूं शकतो हें स्पष्ट झाल्याविना राहत नाहीं. ज्याचा गुप्त वध किंवा नाश करावयाचा आहे त्याच्या बाबतींत कौटिल्यानें जे अनेक कूटप्रयोग सांगितलेले आहेत त्यांत एक प्रयोग असा सांगितला आहे कीं :–

दूष्यमहामात्रपुत्रमात्मसम्भावितं वा सत्री–राजपुत्रस्त्वं शत्रुभयादिह न्यस्तोऽसि इत्युपचरेत्। प्रतिपन्नं राजा रहसि पूजयेत् प्राप्तयौवराज्यकालं त्वां महामात्रभयान्नाभिषिञ्चामि इति। तं सत्री महामात्रवधे योजयेत्। विक्रांतं तत्रैव घातयेत्-पितृघातकोऽयम् इति।
—कौटिलीय अर्थशास्त्र अध्याय ९१ पंचमअधिकरण पृष्ठ २

"राजद्रोही प्रधानाला अहंमन्य पुत्र असेल तर त्या पुत्रास सत्री हेरांनीं वास्तविक तूं राजपुत्र आहेस, शत्रूंच्या भीतीनें तुला येथें ठेवण्यांत आलें आहे असें सुचवावें. या गोष्टीवर त्याचा विश्वास बसल्यावर राजानें त्याचा एकांतांत सन्मान करून सांगावें

कीं, तुला यौवराज्याचा अधिकार देण्याचा काळ आला आहे खरा; पण प्रधानाच्या भीतीमुळें अभिषेक करतां येत नाहीं. नंतर सत्री हेरानें त्याला प्रधानाचा वध करावयास सांगावें. अमात्याचा अंत झाल्यावर अमात्यपुत्राला पितृघातक म्हणून मारून टाकावें.

या प्रयोगावरून एक गोष्ट ध्यानांत येईल कीं, जिचा विनाश करावयाचा आहे अथवा समाजकल्याणाच्या दृष्टीनें जिचा विनाश आवश्यक आहे अशा व्यक्तीला एखादा विशिष्ट अपसमज तिच्या अंतःकरणांत दृढ करून तिच्या हातून अनन्वित कृत्यें घडविणें ही गोष्ट राजनीतीचा एक प्रयोग म्हणून करण्यांत येते. नीतिकुशल लोकांनीं कंसाच्याही अंतःकरणांत त्याचे विकार ओळखून असेच कांहीं अप-समज हेतुतः निर्माण केले असले पाहिजेत. अथवा आपआपसांतील मत्सरामुळें किंवा तापल्या तव्यावर स्वतःचा पानगा भाजून घ्यावा ह्या वृत्तीला अनुसरून कंसाकडून स्वतःचा लाभ काढून घ्यावा म्हणूनही कदाचित् वसुदेवपुत्राच्या हातूनच्या मृत्यूची व यादवा-विषयींच्या द्वेषमूलक भावनेची कल्पना त्याच्या अंतःकरणांत दृढ-मूल करण्यांत आली असली पाहिजे. तो अरेराव सुलतान होता हें स्पष्टच आहे. कल्पना त्याच्या मनांत कोणीतरी बाहेरून भरवून दिली हेंही स्पष्ट आहे व उद्दाम आणि स्वार्थी प्रवृत्तीमुळें तो या कल्पनेला कवटाळून बसला हेंही स्पष्ट आहे. ती कोणी भरवून दिली हा काय तो प्रश्न आहे, त्याची हरिवंश व भागवतांतील पौराणिक पद्धतीप्रमाणें असलेली अलौकिक उपपत्ति वर निर्दिष्ट केलेलीच आहे. लौकिक दृष्टीनें या संबंधांत काय संभवनीय असूं शकतें हें केवळ मी स्पष्ट करून सांगितलें. तात्पर्य इतकेंच कीं, वसु-देवाचे पुत्र आपणांस ठार मारणार आहेत अशी कंसाच्या मनांत दृढ-मूल कल्पना झाली वा त्यानें ती सोयिस्कर रीतीनें करून घेतली व वसुदेवाचा सर्वनाश करण्याच्या हेतूनें त्यानें त्याचीं मुलें ठार मारण्याच्या कृत्यास हात घातला. आपले लोक बोलावून त्यासाठीं त्यानें योजना केली. आपल्या स्वकीयांना तो म्हणाला:

**सोऽज्ञापयत संरब्धः सचिवानात्मनो हितान् ।**
**यत्ता भवत सर्वे वै देवक्या गर्भकृन्तने ॥ १**

प्रथमादेव हन्तव्या गर्भास्ते सप्त एव हि ।
मूलादेव तु हन्तव्यः सोऽनर्थो यत्र संशयः ।। २
देवकी च गृहे गुप्ता प्रच्छन्नैरभिरक्षिता ।
स्वैरं चरतु विश्रब्धा गर्भकाले तु रक्ष्यताम् ।। ३
—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. २

"आपल्या हितकर्त्या सल्लागारांना एकत्र करून कंसानें त्यांना असें सांगितलें कीं, देवकीचे गर्भ मारून टाकण्यासाठीं तुम्ही सज्ज रहा. तिला होणारें प्रत्येक अपत्य मारून टाकलें पाहिजे. मुळापासूनच हा अनर्थ उखडून टाकणें चांगलें. देवकीच्या प्रवृत्तींवर नियंत्रण ठेवूं नका. तिच्यावर गुप्त लक्ष ठेवा. पण तें तिच्या ध्यानांत न आलें पाहिजे. इतर वेळीं तिच्यावर नियंत्रण वा लक्षाची गरज नाहीं. पण गरोदर अवस्थेंत मात्र तिच्यावर सावधतेनें लक्ष ठेवा." ती गरोदर झाल्यापासून अपत्यप्रसूतीचे महिने स्त्रियांनीं ध्यानांत ठेवावे. तिला मुलगा झाल्यावर त्याचा विनाश कसा करावयाचा हें मी माझ्या मनाशीं ठरवीन. अप्रत्यक्षपणें हें कारस्थान करावयाचें असल्यामुळें अंतःपुरांत वसुदेवाच्या संचाराला बंदी करण्याचें कारण नाहीं. मात्र अंतःपुरांतील सर्व लोकांनीं अत्यंत सावध राहून दिवसां व रात्रीं वसुदेवावर सतत गुप्तपणें लक्ष ठेवावें. प्रसूतीनंतर तो मुलाला तेथून पळविण्यांत अथवा हलविण्यांत यशस्वी न झाला पाहिजे.

याप्रमाणें कंसानें सर्व योजना ठरवून दिल्यानंतर देवकी जसजशी प्रसूत होऊं लागली तसतसें कंसाच्या क्रौर्यपूर्ण नाटयाचे भयानक आविष्कार प्रकट होऊं लागले. मुलगा जन्माला आला कीं कंसानें तो दगडावर आपटून ठार मारावा. मुलें मारण्याचा त्याचा हा प्रकारही त्याच्या क्रूरतेला साजेसाच होता.

षड्गर्भान्निःसृतान् कंसस्तान् जघान शिलातले ।।
—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. ४

"देवकीला सात मुलें झालीं त्यांतील सहा मुलें कंसानें दगडावर आपटून ठार मारलीं."

हा प्रकार अव्याहतपणें सुरू राहिला. त्यामुळें कंसानें जरी तो स्वतःचा धाक उत्पन्न होण्यासाठीं अवलंबिलेला असला तरी

त्याच्याविषयीं विलक्षण स्वरूपाचा तिरस्कार उत्पन्न होण्यांत त्याचें स्वाभाविपणेंच पर्यवसान झालें. पुत्रांच्या या क्रूर मृत्यूनें अत्यंत दुःखी झालेल्या वसुदेवांना त्यांचा कांहीं अपराध नसल्यामुळें स्वाभाविकपणेंच अंतःपुरांतील लोकांचीही सहानुभूति मिळाली असली पाहिजे. देवकीचा सातवा गर्भ म्हणजे बलराम यांना महाविष्णूच्या आज्ञेवरून रोहिणी नांवाच्या त्यांच्या स्त्रीच्या गर्भांत योगमायेनें प्रविष्ट केलें असें भागवत व हरिवंशांत वर्णन आहे. त्यांतील दैवी भाग सोडून दिला तर अंतःपुरांतील लोकांच्या साह्यानें आपल्या सातव्या मुलाला युक्तीनें पळवून नेण्यांत दुःखी वसुदेव यशस्वी झाले असें दिसतें. देवकीचा आठवा गर्भ म्हणजे भगवान् श्रीकृष्ण होत. सातव्या गर्भाच्या संबंधांत कंसाच्या समाधानासाठीं गर्भ त्याच्या भीतीनें गळून पडला व आंतल्या आंत विलय पावला अशी कंसाची समजूत करून दिल्याचें भागवतांत वर्णन आहे. त्यामुळें आठव्यांदा ज्या वेळीं देवकी गरोदर राहिली त्या वेळीं कंसानें आपली व्यवस्था विशेषच वाढविली. सातवा गर्भ वसुदेवाचा एक गोपमित्र नंद यानें स्वतःच्या घरीं आश्रय देऊन व रोहिणीचा मुलगा म्हणून संरक्षिलेला होता. पुत्रनाशामुळें दुःखी झालेल्या वसुदेवांनी या आठव्या पुत्राच्या संरक्षणासाठीं पुनश्च त्याचाच आश्रय घ्यावयाचें ठरविलें. पण तें त्याला न कळत कसें पार पाडतां येईल याच्या ते विचारांत असतां विधिघटनेनें त्यांची ती इच्छा पूर्ण केली. ज्या सुमारास देवकी गरोदर होती त्या सुमारास नंदपत्नी यशोदा हीही गरोदर होती. व त्या दोघीही एकाच वेळीं आठव्याच महिन्यांत बाळंत झाल्या. भगवान् श्रीकृष्णांचा जन्म कोणत्या वेळीं झाला यासंबंधीं वेगवेगळ्या पुराणांत वेगवेगळे उल्लेख आहेत. हरिवंश हें महाभारताचें पूरकपर्व असल्यामुळें त्यांतील उल्लेखच आपणांस प्रमाण म्हणून गृहीत धरून चाललें पाहिजे. हरिवंशांत या संबंधांत असलेला उल्लेख पुढील प्रमाणें आहे :—

**गर्भकाले त्वसंपूर्णे अष्टमे मासि ते स्त्रियौ ।**
**देवकी च यशोदा च सुषुवाते समं तदा ।। ११**

यामेव रजनीं कृष्णो जज्ञे वृष्णिकुलोद्वहः ।
तामेव रजनीं कन्यां यशोदाऽपि व्यजायत ॥ १२
नन्दगोपस्य भार्यैका वसुदेवस्य चापरा ।
तुल्यकालं च गर्भिण्यौ यशोदा देवकी तथा ॥ १३
देवक्यजनयद्विष्णुं यशोदा तां तु दारिकाम् ।
मुहुर्तेऽभिजिति प्राप्ते सार्धरात्रे विभूषिते ॥ १४
महर्षयः सगन्धर्वा उपतस्थुः सहाप्सराः ।
जायमाने हृषीकेशे प्रहृष्टमभवद् जगत् ॥ २०
श्रीवत्सलक्षणं दृष्ट्वा युतं दिव्यैश्च लक्षणैः ।
उवाच वसुदेवस्तु रूपं संहर वै प्रभो ॥ २२
वसुदेववचः श्रुत्वा रूपं चाहरदच्युतः ।
अनुज्ञाप्य पितृत्वेन नन्दगोपगृहं नय ॥ २४
वसुदेवस्तु संगृह्य दारकं क्षिप्रमेव च ।
यशोदाया गृहं रात्रौ विवेश सुतवत्सलः ॥ २५
यशोदायास्त्वविज्ञातः तत्र निक्षिप्य दारकम् ।
प्रगृह्य दारिकां चैव देवकीशयनेऽन्यसत् ॥ २६

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. ४

"गर्भकाल पूर्ण होण्याच्या आधींच अष्टमी तिथीला यशोदा व देवकी या एकाच वेळीं बाळंत झाल्या. वृष्णि कुळाचा उद्धार करणारे श्रीकृष्ण ज्या वेळीं जन्माला आले, त्याच वेळीं यशोदेलाही मुलगी झाली. कारण नंदगोपाची पत्नी यशोदा व वसुदेवाची पत्नी देवकी या एकाच वेळीं गरोदर होत्या. देवकीनें भगवंताच्या या अवताराला जन्म दिला व यशोदेनें एका मुलीला जन्म दिला. अभिजित मुहूर्तावर ऐन मध्यरात्रीं भगवान् श्रीकृष्णांचा जन्म झाला. त्या वेळीं सागर खवळून उठले. पर्वतांना कंप उत्पन्न झाला. अग्नि शांत होते. पण तरीही ते प्रज्वलित होते. वातावरणांत धूळ कोठेंही नव्हती. वारे शुभ अवस्थेंत वहात होते. आकाशांत तारका व तेजस्वी ग्रह लकाकत होते. ज्या रात्रीं भगवान् श्रीकृष्णांचा जन्म झाला त्या वेळीं अभिजित् नांवाचें नक्षत्र होतें. जयंती हें त्या रात्रीचें नांव. विजय नांवाचा

मुहूर्त होता. अव्यक्त, शाश्वत, सूक्ष्म असा साक्षात् प्रभु नारायणच देवकीच्या उदरीं जन्म पावला. त्या जन्मकालींच भगवंतांनीं आपल्या सुन्दर नेत्रांनीं पहाणाऱ्यांच्या अंतःकरणांत मोह उत्पन्न केला. कोणीही न वाजवितांच स्वर्गलोकांत दुंदुभि वाजल्या. देवेंद्रानें आकाशांतून पुष्पवृष्टि केली व देवांगना मंगल गीतें गाऊं लागल्या. महर्षि, गंधर्व व अस्परा आनंदित झाल्या. भगवंतांच्या जन्माच्या वेळीं सर्व जग आनंदानें फुलून निघालें. देवेंद्रानें देवासहित भगवंताची स्तुति केली. श्रीवत्स व इतर दिव्य लक्षणें पाहून व त्यांचें तें स्वरूप अवलोकन करून वसुदेवानें त्यांना हात जोडून अशी विनंती केली कीं, आपण आपलें हें दिव्य स्वरूप आवरा. मी कंसापासून भितों. आपले सर्व वडील बंधु त्यानें ठार मारले. भगवंतांनीं आपलें तें दिव्य स्वरूप आवरून वसुदेवाला असें सांगितलें कीं, मला नंदगोपाच्या घरीं न्या. त्याप्रमाणें वसुदेवानें रात्रीच्या वेळीं त्या मुलाला नंदाच्या घरीं यशोदेच्या शयनावर नेऊन ठेविलें. तिलाही तें कळलें नाहीं. व तिची मुलगी देवकीच्या शयनावर आणून ठेवली. मुलांची ही अदलाबदल करण्यांत पूर्ण यशस्वी होऊन वसुदेव कृतार्थ झाले."

भागवतांतील वसुदेव बंधनांत होते म्हणजे खास तुरुंगांत होते व नंदगोप हा व्रजांत रहात असून यशोदा तेथें बाळंत झाली होती व यमुना नदी पार करून वसुदेवानें कृष्णांना तेथें पोहोंचवून दिलें हा प्रकार हरिवंशानुसार तरी बरोबर वाटत नाहीं. भागवत निर्माण होण्याचा हेतु अत्यंत विभिन्न असल्यामुळें त्याच्या वर्णनपद्धतींतील ऐतिहासिकतेचा अधिक विचार करण्याचें कारण नाहीं. इहलोकीं आयुष्यभर निरतिशय शांति देणारा व परलोकीं परमपद प्राप्त करून देणारा प्रेममय भक्तवत्सल प्रभु व्यक्तिमात्रास सुलभतेनें मिळवून देणारा व त्या हृदयस्थ परमात्म्याची अनन्य भक्ति करण्यास शिकवून सर्व साधनमार्गांची एकवाक्यता साधणारा अपूर्व परमार्थमय ग्रंथ भागवताविना दुसरा नाहीं. प्रत्येक अध्याय, प्रत्येक श्लोक, प्रत्येक ओळ किंबहुना प्रत्येक शब्द श्रीकृष्णभक्तीच्याच प्रतिपादनास लावलेला केवळ भागवतांतच आढळेल. परमेश्वराची निराकांक्ष भक्ति हा भागवताचा प्रतिपाद्य विषय आहे. व या अमृतसागरा-

भोंवतीं सर्वांनीं गोळा होऊन भक्तिसुधेचें अखंड पान करावें ही स्वतः भागवतनिर्मात्यांचीही इच्छा आहे. त्याचदृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें पाहिजे. भागवतधर्माचें प्रेमसाम्राज्य भागवतानें प्रतिपादन केलें. हरिवंशाचा हा उद्देश नाहीं. हरिवंशाला श्रीकृष्णचरित्रांतील घटना वर्णन करावयाच्या आहेत. त्यामुळें क्वचितप्रसंगीं भागवताइतकी उत्कट प्रेममयता हरिवंशांत आढळत नाहीं. दोन ग्रंथांतील उद्देशांच्या या भिन्नतेनुरूप ऐतिहासिकतेच्या दृष्टीनें हरिवंशांतील उल्लेखांना अधिक महत्त्व दिलें पाहिजे. स्वात्मोद्धाराप्रीत्यर्थ मात्र भागवताचीच कांस धरावी असें कोणीही म्हणेल. शिवाय भागवताचा काळ व कर्ताही प्राचीन आहे हें सिद्ध केलें तरी तसा कसोशीनें प्रयत्न करून इ. स. ३०० ते ४०० च्या सुमारास भागवत झालें असावें असें म्हणतात. तरीही हरिवंश भागवतापेक्षां अधिक प्राचीन असल्यामुळें त्यांतील उल्लेख ऐतिहासिक दृष्टचा अधिक महत्त्वाचा मानणें प्राप्त आहे. असो.

हरिवंशानुसार नंदगोप हे देवकीच्या बाळंतपणाचे वेळीं मथुरेंतच होते. वसुदेवाचे ते घनिष्ठ मित्र होते. यशोदा मथुरेंतच नि आपल्या घरीं बाळंत झाली असें दिसतें. कारण मुलांच्या अदलाबदलीनंतर व देवकीचा आठवा गर्भ म्हणजे मुलगी आहे अशा कल्पनेनें तिच्या विनाशाचे प्रयत्न करून कंस निघून गेल्यानंतर वसुदेवानें नंदाला मथुरेंतूनच व्रजास जावयास सांगितलें आहे. नंद नेहमीं व्रजांत राहात पण श्रीकृष्ण जन्माच्या सुमारास मात्र ते मथुरेंत येऊन राहिले होते असें स्पष्ट दिसतें. वसुदेवाची पत्नी रोहिणी हिला नंदानीं स्वतः मथुरेंत असतां व्रजांत ठेविलें होतें असा हरिवंशांत उल्लेख आहे. हरिवंशकार हणतातः

**प्रागेव वसुदेवस्तु व्रजे शुश्राव रोहिणीम् ।**
**प्रजातां पुत्रमेवाग्रे चन्द्रात्कान्ततराननम् ।।१**
**स नन्दगोपं त्वरितः प्रोवाच शुभया गिरा ।**
**गच्छानया सहैव त्वं व्रजमेव यशोदया ।। २**
**तत्र तौ दारकौ गत्वा जातकर्मादिभिर्गुणैः ।**
**योजयित्वा व्रजे तात संवर्धय यथासुखम् ।। ३**

अहं वाच्यो भविष्यामि पितृपक्षेषु पुत्रिणाम् ॥ ४
योऽहमेकस्य पुत्रस्य न पश्यामि शिशोर्मुखम् ।
ऱ्हियते हि बलात् प्रज्ञा प्राज्ञस्यापि सतो मम ॥ ५
—महाभारत, हरिवंश विष्णुपर्व अध्याय ५

"रोहिणीला पुत्र झाल्याचें वसुदेवाला पूर्वीच कळलें होतें. त्यानें नंदगोपाची भेट घेतली व त्यांना असें सांगितलें कीं, तूं यशोदेला घेऊन व्रजांत जा व माझ्या आणि तुझ्या अशा दोन्ही मुलांचे जातकर्मादि संस्कार करून त्या दोन्ही मुलांना व्यवस्थितपणें वाढव. रोहिणीच्या ठिकाणीं झालेला माझा जो मुलगा व्रजांत आहे त्याचें तूं आपल्या मुलाप्रमाणें रक्षण कर. जगांतील सर्व पिते मी स्वतःच्या मुलाचें रक्षण करूं शकलों नाहीं म्हणून मला दूषण ठेवतील यांत शंका नाहीं. एकाही मुलाचें तोंड मी पाहूं शकलों नाहीं. मी जागरूक असतांना सुद्धां माझीं सर्व मुलें मारलीं गेलीं. याचा अर्थ मी इतकाच करतों कीं, दैवाच्या बळासमोर बुद्धिमंतांच्या बुद्धीचेंही बळ चालूं शकत नाहीं. या अत्यंत क्रूर, कंसापासून माझ्या मुलांना सदैव भीति आहे. त्यामुळें तूं आपल्या मुलाचें जसें संरक्षण करशील तसेंच या माझ्या मुलाचेंही संरक्षण कर. माझा मुलगा मोठा व तुझा मुलगा लहान आहे. ते दोघेही एकमेकांचे सहोदर बंधु आहेत अशा दृष्टीनेंच तूं त्यांच्याकडे पहा. त्यांचीं वयें जवळजवळ सारखीच आहेत. एकत्रच दोघांना व्यवस्थितपणें वाढव. लहानपणीं खेळणें सर्वांनाच प्रिय असतें. भुरळ सहज पडूं शकते व प्रमादाचा संभव असतो. म्हणून म्हणतों, तूं मुलांवर नीट लक्ष ठेव. वृंदावनांत केशी नांवाचा अत्यंत घातक असा दुष्ट राहतो. त्यामुळें आपला गौळवाडा घेऊन तूं तेथें राहूं नकोस. सरपटणारे प्राणी, कीटक, व भयानक पक्षी यांच्यापासून तसेंच गोठ्यांतील गाईवत्सांपासूनसुद्धां मुलांना इजा होऊं देऊं नकोस. नंदा, आतां रात्र संपत आली आहे. शुभशकुन दिसत आहेत. वेगानें जाणाऱ्या वाहनानें तूं जा. याप्रमाणें वसुदेवानें एकांतांत सांगितल्यावर यशोदेसहित व मुलाला नीटपणें जवळ घेऊन नंद मथुरा सोडून व्रजाकडे निघून गेला. जलमार्गानें यमुनातीरावरून कोणाच्याही लक्षांत न येईल इतक्या गुप्तपणें तो निघून गेला."

मुलांची अदलाबदल नंदाच्याही लक्षांत येणार नाहीं इतक्या गुप्तपणें करण्यांत आली होती असें दिसतें. कारण येथें वसुदेव कृष्णाला नंदाचा मुलगा म्हणून व बलरामाला स्वतःचा मुलगा म्हणून संबोधीत आहेत. याप्रमाणें सद्‌भाग्यानें वसुदेव आपल्या दोन मुलांना वांचवूं शकले. सर्व जगाचा शाश्वत मंत्रद्रष्टा व आमूलाग्र परिवर्तन घडवून धर्माची प्रतिष्ठापना करणारा युगपुरुष पूर्णावतार भगवान् श्रीकृष्ण गुप्त मार्गानें कोणाच्याही लक्षांत न येतां व्रजमंडलाला सनाथ करावयास निघून गेला. सर्व भावयोगाच्या उपासकांना सदाचा आधारभूत व माधुर्य रसाच्या आविष्काराची चरम सीमा गांठणारा श्रीकृष्णांचा बाल्यावस्थेचा कालखंड व्रजांतच गेलेला आहे व गणराज्याच्या सिद्धीप्रीत्यर्थ कंसाचें राज्ययंत्र उलथून पाडणाऱ्या महान् क्रांतीची सिद्धताही तेथेंच झालेली आहे. त्याकडे आपण पुढील व्याख्यानांत दृष्टिक्षेप करूं.

---

# श्रीकृष्णांचें बालपण

भगवान् श्रीकृष्णांच्या गोकुळांतील अथवा व्रजांतील जीवनाचें अतिशय मनोरम वर्णन श्रीमद्भागवतांत आलेलें असून हरिवंशांतही त्यांच्या बालपणींच्या भागवतांत आलेल्या सर्व कथांचा समावेश आहे. भागवताच्या प्रेमसाम्राज्याचा गाभा म्हणजे त्याचा दशम स्कंध होय. सर्व संस्कृतवाङ्मयांत माधुर्याच्या दृष्टीनें भागवत सर्वश्रेष्ठ, त्या भागवतांत दशमस्कंध सर्वश्रेष्ठ, व त्या दशमस्कंधांत त्याचा पूर्वार्ध सर्वांत श्रेष्ठ आहे. हा पूर्वार्ध म्हणजेच भगवान् श्रीकृष्णांचें बालचरित्र होय. ह्या पूर्वार्धाची संपूर्ण भारतवर्षांतील वैष्णव संप्रदायावर इतकी विलक्षण छाप बसलेली आहे कीं, सूरदास, मीराबाई, यांचे काव्योदधि तर त्यावरच उभारलेले आहेत. पण महाराष्ट्रांतील कोणत्याही संताची गाथा श्रीकृष्णांच्या बालपणींच्या या जीवनांतील लीलांचा आढावा घेतल्याविना पूर्ण झालेली नाहीं. श्रीकृष्ण गोकुळांत येतांच भागवतकार म्हणतात :—

**तत आरभ्य नन्दस्य व्रजः सर्वसमृद्धिमान् ।**
**हरेर्निवासात्मगुणै रमाक्रीडमभून्नृप ॥ १८**

—भागवत, दशमस्कन्ध, अ. ६

"हे राजा, तेव्हांपासून नंदाचें तें गोकुळ धनधान्यांनीं समृद्ध झालें आणि श्रीहरीच्या वास्तव्यामुळें सर्वांना आवडणारें व सर्व गुणांनीं युक्त असें तें लक्ष्मीचें एक क्रीडास्थान बनलें." गोकुळांतल्या त्या काळामध्यें भगवान् श्रीकृष्णांच्या अंगचे कितीतरी गुण व नेतृत्वाचीं अनेक वैशिष्टयें प्रकट झालेलीं आढळतात.

## सौंदर्य

भगवान् श्रीकृष्ण हे दिसावयास अत्यंत सुन्दर होते ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. त्यांचे वडील वसुदेव हेही अत्यंत सुन्दर होते असें हरिवंशांत वर्णन आहे.

---

व्याख्यान ८ वें दिनांक ३-४-५२

वसुदेवो महाबाहुः पूर्वमानकदुन्दुभिः ।
जज्ञे यस्य प्रसूतस्य दुन्दुभ्यः प्राणदन्दिवि ।। १८
मनुष्यलोके कृत्स्नेऽपि रूपे नास्ति समो भुवि ।
यस्यासीत्पुरुषाग्र्यस्य कान्तिश्चन्द्रमसो यथा ।। २०

—महाभारत, हरिवंशपर्व अ. ३४

"महाबाहु वसुदेवाला आनकदुंदुभि असेंही म्हणतात. वसुदेवांच्या जन्माबरोबर स्वर्गामध्यें दुंदुभि वाजल्या व भेरींचा देवांनीं मोठा नाद केला. ( त्याच्या अतिशय धार्मिक प्रवृत्तीचें हें निदर्शन आहे. ) संपूर्ण मनुष्यलोकांत त्याच्याइतका रूपानें सुन्दर असलेला पुरुष दुसरा कोणीही नव्हता. चंद्राप्रमाणें त्याची कांति अत्यंत आल्हाद-दायक अशी होती." भगवान् श्रीकृष्ण व सुभद्रा यांना अनुपम सौंद-र्याची लाभलेली देणगी ही पैतृकसंपत्तीच होय असें म्हटलें पाहिजे. असो.

श्रीकृष्णांच्या त्या बालस्वरूपांचें जर कोणाला दर्शन झालें तर पुन्हां दुसरें कांहींही पहावयाची इच्छा उरणार नाहीं असा ध्यानयोगी नेहमींच इशारा देत असतात. "साक्षात् मन्मथमन्मथः।" सर्व जगाला आपल्या सौंदर्यानें मोहित करणाऱ्या मदनालाही स्वतःच्या सौंदर्यानें मोह उत्पन्न करूं शकणारें अशा रीतीनें श्रीकृष्णांचें वर्णन वारंवार येत असतें. श्रीकृष्णांचा वर्ण श्याम होता असें म्हणतात. श्याम या शब्दाचा अर्थ सामान्यतः काळा असा केला जातो. परंतु श्रीकृष्णांच्या शरीरवर्णाचें वर्णन मेघाप्रमाणें सांवळा अथवा जवसाच्या फुलाच्या रंगाचा असेंच येतें. श्याम शब्दाचा अर्थ करतांना 'तप्तकांचन-वर्णाभः।' तापलेल्या सुवर्णाप्रमाणें झगझगीत कांतीचें लावण्य असा त्याचा अर्थ होईल. कृष्णांच्या या स्वरूपसौंदर्यानें त्यांच्याकडे जे कोणी पहातील त्यांच्या सर्व अंतःकरणप्रवृत्ति त्यांच्याकडे आपोआप खेचल्या जात असत. त्यांच्या या अलौकिक सौंदर्याबरोबरच विलक्षण स्वरूपाचें आकर्षक व्यक्तिमत्त्व त्यांना लाभलें होतें.गोपांचा वेष धारण केलेले व आपल्या सहकाऱ्यांबरोबर गोकुळांतील व वृंदा-वनांतील वातावरणांत स्वतःच्या सहकाऱ्यांबरोबर फिरणारे श्रीकृष्ण ज्यांनीं ज्यांनीं पहावे त्यांचें त्यांचें सर्व भान हरपून त्यांना तेथून

दृष्टि काढूंच नये असें वाटे. त्यांचा वेष, वर्ण, सौंदर्य, हातांतील बांसरी, यांचीं श्रीमत् भागवतांत अतिशय आकर्षक वर्णनें आहेत. श्रीकृष्णांची बांसरी तर सुप्रसिद्धच आहे. बांसरीच्या नादमधुरतेनें गोकुळांतील लोकांचे त्या काळीं तर मन रिझविलेंच, पण आजही भाव समाधींत तिचा नाद ऐकून साधक देहभान विसरून जातात. श्रीकृष्णांच्या अत्यंत आकर्षक व्यक्तिमत्त्वाची विलक्षण मोहिनी सर्वत्र कशी भरून राहिली होती याचीं श्रीमत् भागवतांतील कांहीं वर्णनें पहाण्यासारखीं आहेत.

**नौमीड्य तेऽभ्रवपुषे तडिदम्बरायगुञ्जावतंसपरिपिच्छलसन्मुखाय ।**
**वन्यस्रजे कबलवेत्रविषाणवेणुलक्ष्मश्रिये मृदुपदे पशुपाङ्गजाय ॥ १**

—भागवत, दशमस्कन्ध, अ. १४

"ब्रह्मदेव म्हणतात: मेघासारखें श्यामल शरीर धारण करून विद्युल्लतेप्रमाणें सतेज वस्त्र परिधान करणाऱ्या, कानांत गुंजांचे तुरे व मस्तकावर मोरांच्या पिसांचा मुकुट धारण करणाऱ्या, गळ्यांत वनमाला, हातावर दहीभाताचा घास, खाकेंत बांसरी, शिंग व वेताची छडी, धारण करणाऱ्या हे मृदुल पावलांच्या गोपपुत्रा, तुला आम्ही साष्टांग नमस्कार करतों."

**श्यामं हिरण्यपरिधिं वनमाल्यबर्हधातुप्रवालनटवेषमनुव्रतांसे ।**
**विन्यस्तहस्तमितरेण धुनानमब्जं कर्णोत्पलालककपोलमुखाब्जहासम् ॥ २२**
**प्रायः श्रुतप्रियतमोदयकर्णपूरैर्यस्मिन्निमग्नमनसस्तमथाक्षिरन्ध्रैः ।**
**अन्तः प्रवेश्य सुचिरं परिरभ्य तापं प्राज्ञं यथाभिमतयो विजहुर्नरेन्द्र ॥२३**

—भागवत, दशमस्कन्ध, अ. २३

पिवळा पितांबर, गळ्यांत आपादलंबिनी वनमाला, मस्तकावर मयूरपिच्छांचा मुकुट, अंगाला लावलेली उटी, कानावर खोविलेले कोंवळे पल्लव इत्यादिकांनीं शोभणारी ती श्यामसुन्दर श्रीकृष्णमूर्ति पाहून जणूं काय परमेशानें नरवेषच धारण केला आहे असें त्यांना भासलें. त्या वेळीं श्रीकृष्णानें आपला एक हात एका सवंगड्याच्या खांद्यांवर ठेविला होता व दुसऱ्या हातानें तो एक

कमळ लीलेनें फिरवीत होता. कानांतील कुंडलें, गालावर विखुरलेले कुरळे केस, व मुखकमलावरील मंद हास्य अशी ती कृष्णमूर्ति शोभत होती."

गोकुळांतल्या जनमनावर या आकर्षक व्यक्तिमत्त्वाची किती विलक्षण छाप पडलेली होती व त्यांच्या सहज साध्या हालचालींतून आविष्कृत होणाऱ्या रम्यतेचा लोकांना कसा ध्यास लागून राही याचें अतिशय उत्कृष्ट वर्णन भागवतांत ( दशमस्कन्ध अं. २१ ) केलेलें आढळतें. तें असें:—

"शुकाचार्य म्हणाले: हे राजा, याप्रमाणें शरद् ऋतूमध्यें वृंदावनांतील सर्व नद्या व सरोवरें इत्यादिकांचें पाणी स्वच्छ होऊन सुगंधी कमलांवरून मंद व शीतल वायु वहात असतां एके दिवशीं श्रीकृष्ण आपल्या गायी—गोपालांसह तेथें क्रीडा करूं लागले. त्या प्रफुल्लित झालेल्या वनांतील पुष्पांचा मकरंद चाखून उत्पन्न झालेल्या भ्रमरांच्या गुंजारवांनीं व पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं नद्या, पर्वत, सरोवरें इत्यादि अगदीं दुमदुमून गेलीं. अशा त्या सुरम्य स्थळीं बलराम व सवंगडी यांसह गायी चारतां चारतां श्रीकृष्णानें आपली मधुर मुरली वाजविण्यास प्रारंभ केला. ते भावोद्दीपक मधुर वेणुगीत ऐकतांच गोकुळांतील स्त्रिया आपल्या मैत्रिणींपाशीं बालकृष्णांच्या रूपगुणांची प्रशंसा करूं लागल्या. श्रीकृष्णांच्या रूपगुणांची प्रशंसा करण्यास त्यांनीं प्रारंभ केला खरा; पण त्याची श्यामसुन्दर मूर्ति अंतःकरणाच्या फलकावर येऊन उभी रहातांच त्यांचें इतकें भावनोद्दीपन झालें व हृदय उचंबळून आलें कीं, त्यांना बोलतां येणें अशक्य झालें. मस्तकावर पुष्पमुकुट धारण केलेले, त्यावर मोरपिसांचा तुरा खोवलेले, कानांत कर्णकार पुष्प लटकाविलेले, सुवर्णाच्या रंगाचें वस्त्र परिधान केलेले, गळ्यांत आपादलंबिनी वनमाला असलेले, सवंगडी सभोंवतीं गोळा होऊन ज्यांच्या कीर्तीचें गायन करीत आहेत आणि अधरसुधेनें आपल्या बांसरीचें प्रत्येक रंध्र भरून त्यांतून अमृताचा वर्षाव करणारे श्रीकृष्ण वृंदावनांत आले व सारें वृंदावन लावण्यानें न्हाऊन निघालें. त्यांच्या त्या बांसरीच्या निनादानें सर्वच प्राणिमात्र आनंदित झाले. गोपी

आपल्या मैत्रिणींना म्हणूं लागल्या, " कृष्णाच्या मुखकमलाचें दर्शन घेणें हेंच डोळे असण्याचें खरें सार्थक होय. आपल्या मित्रांसह रानांत गाई चरावयास नेऊन मुरली वाजवीत प्रेमळ कटाक्ष फेंकणाऱ्या नंदपुत्र कृष्णाचें ज्यांनीं यथेच्छ अवलोकन केलें त्यांच्या डोळ्यांचें खरोखरच सार्थक झालें. कोवळीं आंब्याचीं पानें, मोराचीं पिसें, फुलांचे तुरे व पांढऱ्या–निळ्या कमळांच्या माळा ज्यांच्या वस्त्रा-वरून लोळत असल्यामुळें ज्यांचीं रूपें मोठीं विचित्र दिसत आहेत असे ते भगवान् रामकृष्ण आपल्या सोबत्यांमध्यें मुरली वाजवूं लागले म्हणजे कधीं कधीं रंगभूमीवर सुरेल गायन करणाऱ्या उत्तम नटाप्रमाणेंच सुन्दर दिसतात. या बांसरीनें निश्चितच कांहीं तरी पुण्य केलें असलें पाहिजे. कारण या दामोदराच्या अधरामृताचें तीच हक्कानें सेवन करते. आपल्या पाण्यानें वेढलेल्या वेणुवृक्षा-पासून या बांसरीचा जन्म झालेला आहे म्हणून तिचा नाद ऐकतांच नद्यांच्या अंगावर प्रफुल्लित कमलांच्या रूपानें जणुं रोमांचच उभे राहिले आहेत असें दिसतें. वेणुवनांतील वेळूचे वृक्षही श्रीकृष्णांनीं या बांसरीला आश्रय दिल्यामुळें कुळांतील वृद्ध माणसांप्रमाणें धन्यता मानून दंवाच्या रूपानें आनंदाश्रू ढाळीत आहेत. सख्यांनो, हें वृंदावन साऱ्या पृथ्वीचेंच यश वाढवीत आहे. कारण जिकडे तिकडे श्रीकृष्णाच्या पावलांचीं चिन्हें उमटल्यामुळें त्याला अप्रतिम शोभा आली आहे. श्रीकृष्णाचा वेणुनाद ऐकून हा मंद गर्जना करणारा मेघच आहे असें वाटून ज्यांचें हृदय मत्त झालें आहे असे मयुर आनंदानें नाचत आहेत आणि तें नृत्य पाहून डोंगराच्या दऱ्यांखोऱ्यांतून फिरणारे सर्व प्राणी जणुं जागच्या जागीं चित्रा-सारखे स्तब्ध उभे आहेत. मूढ योनींत उत्पन्न झालेल्या या हरिणीही धन्य आहेत. कारण मनोहर वेष धारण करून मधुर स्वरानें मुरली वाजविणाऱ्या विचित्र वेषधारी नंदकुमाराकडे आपल्या पतीसह त्या प्रेमभरानें पहात त्या अवलोकनानेंच त्याची पूजा बांधीत आहेत. - वेणूचें गीत ऐकून स्वर्गांगनांची सुद्धां कशी विलक्षण अवस्था झाली आहे पहा ! या गायींची तरी अवस्था पाहिलीत का ? बांसरीच्या नादानें आकृष्ट होऊन आपले कान उंच उभारून

त्या जणुं कांहीं कर्णसंपुटांत प्रत्येक नादमधुर स्वरलहरी सांठवीत आहेत. जणुं श्रीकृष्णांना मनोमय भेटून त्या आनंदाश्रू ढाळीत आहेत. वासरें देखील दूध पीत असतां बांसरीचा स्वर कानांत पडला कीं, तोंडांत घेतलेला दुधाचा घोट तसाच दोन्ही बाजूंनीं गळत टाकून श्रीकृष्णाकडे पहात स्तब्ध उभीं आहेत. एक गोपी आपल्या आईला म्हणाली : या वनांतील पक्षी बहुधा ध्यानस्थ ऋषीच असावेत. कारण ते नूतन पालवी फुटलेल्या झाडांच्या खांद्यावर सारखे डोळे उघडे ठेवून किलबिलाट न करतां श्रीकृष्ण-दर्शनाचें सुख अनुभवीत व त्याच्या मुरलीचा मंजुळ ध्वनि ऐकत स्वस्थ बसले आहेत. या पहा नद्या देखील हा आवाज ऐकून भोंव-ऱ्यांच्या रूपानें आपली भावक्षुब्धता व्यक्त करून तरंगरूपी हातानें श्रीकृष्णाच्या चरणावर कमलें अर्पण करीत आहेत. मेघाची व श्रीकृष्णाची अत्यंत मैत्री आहेसें दिसतें. कारण श्रीकृष्ण ज्या वेळीं बलराम व इतर सवंगडी यांसह गायी चारतांना त्यांच्या मागें मुरली वाजवीत फिरतो, त्या वेळीं त्याला उन्हाचा त्रास न व्हावा म्हणून हा मेघ स्वत: तेथें येऊन त्याच्यावर छत्रीप्रमाणें सावली करतो व त्याच्या शरीराला गारवा वाटण्यासाठीं पुष्पवृष्टीप्रमाणें मधून मधून जलतुषारांची त्याच्यावर वृष्टि करतो. केशराप्रमाणें आरक्तवर्ण अशीं श्रीकृष्णांचीं पदकमळें ज्या गवतावर उमटलीं त्यांची उटी आपल्या हृदयांना लावणाऱ्या ह्या रानवट स्त्रिया खरोखर धन्य होत. हा गोवर्धन पर्वत अत्यंत श्रेष्ठ आहे. याला रामकृष्णांच्या पादस्पर्शाचा निरंतर लाभ होत असून हा आपल्या-वरील पाणी, उत्तम प्रकारचें गवत, विश्रांतीला दऱ्यांखोऱ्यांतील सांवलीची जागा व खाण्यास कंदमुळें इत्यादि अर्पण करून रामकृष्णांचें व गोपगोपांचें आनंदानें आदरातिथ्य करीत असतो. सख्यांनो, हे रामकृष्ण गायींचीं दावीं व दोऱ्या डोक्यावर घेऊन मोठ्या गवळ्या-सारखे गायींना घेऊन मधुर मुरली वाजवीत डौलानें चालले म्हणजे त्यांच्या मुरलीचा मधुर नाद ऐकून सारे पशुपक्षी अगदीं तटस्थ होतात व वृक्षलतांच्या अंगावर रोमांच उभे राहतात. हें मोठेंच आश्चर्य होय !"

श्रीकृष्णाच्या बालचरित्रावरील आधारभूत प्राचीन ग्रंथ हरिवंश होय. त्यावरूनच भागवताची, विशेषत: कृष्णचरित्राची भागवतांत उभारणी झालेली आहे. पण हरिवंशापेक्षां भागवतांतील वर्णनांत उत्कटता अधिक असल्यामुळें व्यक्तित्वाची नीट कल्पना यावी म्हणून येथें आवश्यक तेथें भागवताचाच उपयोग केलेला आहे. यांतील काव्यात्मक भाग बाजूला केला तरी मुख्य गोष्ट जी अनुपम सौंदर्य व विलक्षण आकर्षक व्यक्तिमत्त्व त्याची कल्पना येते. या दोन गुणांबरोबरच श्रीकृष्णांच्या बालपणींच्या गोकुळवृंदावनांतील वास्तव्यांत दुसरी ध्यानांत भरणारी गोष्ट म्हणजे त्यांची विलक्षण लोकप्रियता होय.

## विलक्षण लोकप्रियता

भगवान् श्रीकृष्णाच्या दर्शनाबरोबर गोकुळांतील आबालवृद्ध किती आतुरतेनें व उत्कटतेनें त्यांच्याकडे धांव घेत याचें एक अतिशय सुन्दर वर्णन भागवतांत आलेलें आहे. अशीं वर्णनें वस्तुत: ठिकठिकाणीं आहेत. ज्या वेळीं कालियाच्या प्राणघातक आपत्तींत श्रीकृष्ण स्वत: सांपडले त्या वेळीं त्यांना नागबंधनांत पाहून गोकुळाची काय अवस्था झाली याचें वर्णन करतांना भागवतकार (दशम स्कंध अ. १६) म्हणतात :

"कालियानें श्रीकृष्णाला वेढून टाकल्यावर तो अगदीं निश्चेष्ट झाला आहे असें दृष्टीस पडतांच त्याचे आवडते असे ते गोप अगदीं घाबरून गेले. त्यांनीं आपला जीव, इष्टमित्र व सर्वस्व श्रीकृष्णाला अर्पण केलें होतें. ते शोक करूं लागले. भीतीनें त्यांचें मन गोंधळून जाऊन ते मूर्च्छित पडले. मग कृष्णाच्या दर्शनाविषयीं उत्सुक झालेले गोकुळांतील सारे आबालवृद्ध स्त्रीपुरुष दीनवाणे होऊन गुराप्रमाणें हंबरडे फोडीत त्याच्या शोधासाठीं बाहेर निघाले. वाटेंत ठिकठिकाणीं कमल, यव, अंकुश, वज्र व ध्वज या चिन्हांनीं युक्त अशीं गायींच्या पावलांच्या मधून उमटलेलीं त्याचीं पावलें निरखीत थोड्याच वेळांत ती सर्व मंडळी यमुनेवर येऊन पोहोंचली. तेथें डोहामध्यें कालियानें कृष्णाच्या अंगाला विळखा घातल्यामुळें तो

निश्चेष्ट झाला आहे आणि जवळच नदीतीरावर सर्वत्र गायी व गोप त्याच्या शोकानें विव्हल झाले असून बावरल्यामुळें दीन मुद्रेनें हंबरडे फोडीत व आक्रोश करीत आहेत असें पाहून तेही शोकानें अगदीं मूर्च्छित झाले. श्रीकृष्णाचें आपल्यावरील निरतिशय प्रेम, त्याचें मंदस्मित, त्याचें मधुर भाषण इत्यादिकांची त्यांना आठवण झाली व कृष्णविरहित सारें त्रिभुवन त्यांना अगदीं शून्य वाटूं लागलें."

अक्रूर ज्या वेळीं श्रीकृष्णांना गोकुळांतून मथुरेस न्यावयास आला त्या वेळीं तेथील गोपींची कशी विलक्षण अवस्था झाली याचें भागवतांतील पुढील वर्णन (दशमस्कंध अ. ३९) पहा.

" बलराम व श्रीकृष्ण यांना मथुरेस नेण्याकरितां अक्रूर गोकुळास आला आहे हें वर्तमान ऐकून सर्व गोपींना फारच दुःख झालें. त्या त्या अनुचिंतनानें इतकी एकतानता पावल्या कीं सर्व व्यापार बंद होऊन आत्मलोकीं गेल्याप्रमाणें त्यांना या जगाचा विसरच पडला. आपल्याला आतां श्रीकृष्ण अंतरणार अशी त्यांना भीति वाटूं लागली व त्यांचें मन कृष्णमय होऊन त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्या एकत्र गोळा झाल्या आणि थव्याथव्यांनीं आपआपसांत बोलूं लागल्या. काळ्या कुरळ्या केसांनीं शोभणारें, उन्नत नासिकेचें व कपोल अत्यंत सुंदर असणारें, शोक दूर करणारें श्रीकृष्णांचें मंदस्मितयुक्त मुखकमल आम्हांला दाखवून पुन्हां तें तूं आमच्यापासून दृष्टीआड करतोस, तेव्हां ब्रह्मदेवा, तुझ्यासारखा दुष्ट कोणी नाहीं, आम्ही तुझ्या सृष्टिरचनेचें कौशल्य व लावण्यसारसर्वस्व श्रीकृष्णाच्या एकेका अवयवांत पहात होतों पण आज अक्रूर या नांवानें तूं त्याला आमच्यापासून दूर नेत आहेस. तूं किती क्रूर आहेस. श्रीकृष्णास नेणाऱ्या या असल्या-पुरुषाचें अक्रूर हें नांव असणें योग्य नाहीं. तो फारच क्रूर आहे. दुःखितांचें सांत्वन न करतां उलट आम्हांस प्रिय असलेल्या श्रीकृष्णांस आम्हांपासून तो दूर घेऊन जात आहे. याप्रमाणें बोलतां बोलतां सारा संकोच बाजूला करून हे गोविंदा, दामोदरा; माधवा, अशा करुणामय स्वरांत त्याला मोठ्यानें हांक मारून त्या रडूं लागल्या. शेवटीं कृष्णाचा रथ चालूं लागल्यावर प्रथम तो रथ, नंतर त्या रथाव-

रील ध्वज, व रथाच्या धांवण्यानें उडणारी धूळ दिसत होती तों-पर्यंत त्या तेथेंच चित्रासारख्या स्थिर उभ्या राहिल्या. एकदां गोकुळ सोडून श्रीकृष्ण मथुरेंत आल्यावर पुन्हां म्हणून ते तेथें परत गेले नाहींत. त्यानंतर फक्त उद्धव व एकवार बलराम त्यांचें सांत्वन करण्यासाठीं तेथें गेले असतां गोकुळांतील सर्व लोकांनीं त्यांच्या-जवळ जे उद्‌गार काढले त्यावरून श्रीकृष्णांवरील त्यांच्या उत्कट प्रेमाची व लोकांच्या हृदयांत कृष्णांनीं कोणतें स्थान मिळ-विलें होतें याची कल्पना येते. भागवतकार (दशमस्कंध अ. ४६) म्हणतात :

"एकदां तरी आपल्या लोकांना पहाण्यासाठीं श्रीकृष्ण येथें येईल काय? तो इकडे येईल तरच त्याचें तें सुंदर व हांसरें मुख आम्हांला पुन्हां पाहतां येण्याची शक्यता आहे. कृष्णाचे पराक्रम, त्याचें सहज पाहणें, हांसणें, बोलणें, या सर्व गोष्टींची आठवण झाली कीं कांहींही करावेंसें वाटत नाहीं व कशांतच लक्ष लागत नाहीं. यमुना नदी, गोवर्धन पर्वत, वृंदावन इत्यादि ठिकाणची त्या मुकुंदाच्या पावलानें रमणीय झालेली भूमि आणि त्याचीं खेळण्याचीं ठिकाणें आमच्या दृष्टीस पडलीं म्हणजे आमचें मन सर्वतोपरी तन्मय होऊन जातें. त्याचें सुंदर चालणें, मोहक हास्य, विलासयुक्त कटाक्ष, गोड भाषण, इत्यादिकांनीं आमचें मन वेधून गेल्यामुळें त्याचा आम्हांला विसर पडावा तरी कसा?"

भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या गोकुळ व वृंदावनांतील जीव-नाच्या या काळांत म्हणजे इतक्या लहानपणीं जें विलक्षण आकर्षण व लोकांच्या हृदयांत स्वतःला स्थान मिळविलें होतें, त्याचें कारण काय असेल? श्रीकृष्ण त्या लोकांच्या जीवनांत स्वतःचे सारे श्रेष्ठ भाव विसरून इतके एकरूप झाले होते कीं, त्यामुळें त्यांच्याशीं बोलतांना व वागतांना कोणालाही कसलाही संकोच वाटत नव्हता. जनतेंतून उत्पन्न होणारें नेतृत्व गोकुळच्या त्या जीवनांत श्रीकृष्णांना अगदीं लहानपणीं लाभलें होतें असें दृष्टोत्पत्तीस येतें.

मॅक्झिम गॉर्कीनें लेनिनची व आपली भेट केव्हां झाली याचें वर्णन करतांना असें म्हटलें आहे कीं, एका ठिकाणीं लेनिनचें

व्याख्यान ठरलें असतांना ठरल्यावेळेपेक्षां पुष्कळच आधीं तेथें येऊन तो तेथील सामान्य प्रतीच्या लोकांबरोबर कोपऱ्यांत गप्पा मारीत बसला होता. नेता म्हटला कीं, त्याच्या रूढ कल्पनांनीं स्वत: गॉर्कीचेंही अंत:करण इतकें भारलेलें होतें कीं तेथें बसलेल्या लोकांत लेनिन असेल अशी त्याला कल्पनाही आली नाहीं. पुढें सभेची वेळ झाल्यावर नांव घोषित झाल्यानंतर लेनिन ज्या वेळीं बोलावयास येऊन उभा राहिला त्या वेळीं गॉर्कीला इतक्या सामान्य लोकांत इतका वेळ लेनिन बसला होता या गोष्टीचें अतोनात आश्चर्य वाटलें. लोकांच्या जीवनांत अशी समरस होऊन जाण्याची भगवान् श्रीकृष्णांची पहिल्यापासून प्रवृत्ति असल्यामुळें साऱ्या गोकुळाचे ते वर वर्णन केल्याप्रमाणें कंठमणि होऊन राहिले होते. तुम्ही विद्वान् असलात तर लोक तुमच्याविषयीं आदर बाळगतील. तुम्ही पराक्रमी असलांत तर लोक तुमच्याविषयीं भय बाळगतील. तुम्हीं एखादें आश्चर्यकारक कृत्य आपल्या कर्तृत्वानें पार पाडलें तर लोक तुमच्याकडे पाहून आश्चर्यचकित होतील व आपल्या पराक्रमानें तुम्हीं लोकांचें दु:खमोचन केलें तर लोक तुमचे उपकार सदैव स्मरून तुमच्याविषयीं कृतज्ञ राहतील. पण म्हणून कांहीं आपल्या हृदयांतील प्रेम ते तुम्हांला अर्पण करणार नाहींत. आपल्याविषयीं जनतेच्या अंत:करणांत प्रेम व जिव्हाळा उत्पन्न करावयाचा असला तर त्यासाठीं प्रथम त्यांच्या जीवनांत तुम्हीं स्वत: डोकावलें पाहिजे. जिव्हाळा व प्रेम या गोष्टी अशा आहेत कीं त्या जितक्या द्याव्या तितक्या उलट परत मिळतात. तें केवळ हृदयाचें दान आहे. पराक्रमाचें व बुद्धिमत्तेचें दान नाहीं. जितकें प्रेम द्यावें तितकें तें मिळेल. हृदय द्यावें व हृदय घ्यावें.

श्रीकृष्णांवरील अलौकिक जनप्रेमाचा त्यांच्या बालकथा ऐकणाऱ्या राजा परीक्षितीला सुद्धां इतका विलक्षण विस्मय वाटला कीं न राहवून त्यानें शुकाचार्यांना असा प्रश्न विचारला (भागवत १०-१४ ते ४९) कीं,

"श्रीकृष्ण दुसऱ्याचा मुलगा असतांही गोपगोपींचें प्रेम त्याच्यावर इतकें कसें बसलें? तसें त्यांचें प्रेम स्वत:च्या पुत्रावरही कधीं

नव्हतें. हें कसें झालें तें आपण मला सांगा."

आचार्य शुकांनीं आध्यात्मिक दृष्टिकोनांतून त्या प्रश्नाचें पुढील-प्रमाणें उत्तर दिलें आहे:—

**सर्वेषामपि भूतानां नृप स्वात्मैव वल्लभः ।**
**इतरेऽपत्यवित्ताद्यास्तद्वल्लभतयैव हि ॥ ५०**
**देहोऽपि ममताभाक् चेत् तर्ह्यसौ नात्मवत्प्रियः ।**
**यज्जीर्यत्यपि देहेऽस्मिञ्जीविताशा बलीयसी ॥ ५३**
**तस्मात्प्रियतमः स्वात्मा सर्वेषामपि देहिनाम् ।**
**तदर्थमेव सकलं जगदेतच्चराचरम् ॥ ५४**
**कृष्णमेनमवेहि त्वमात्मानमखिलात्मनाम् ।**
**जगद्धिताय सोऽप्यत्र देहीवाभाति मायया ॥ ५५**

—भागवत, दशमस्कन्ध, अ. १४

"प्राणिमात्राची आपल्या आत्म्यावर विलक्षण प्रीति असते. मुलेंबाळें, धनसंपत्ति, इत्यादि त्या आत्म्यावरील प्रेमामुळेंच प्रिय वाटतात. देह हाही वस्तुतः आत्मा नसून केवळ आत्म्याचें आवरण असल्यामुळें तोही आत्म्याप्रमाणें प्रिय नाहीं.कारण हा देह जीर्ण झाला तरी प्राणिमात्रांला आपण जगावें ही आशा कधींही सुटत नाहीं. यावरून कोणालाही झालें तरी आत्मा हा सर्वांत अधिक प्रिय असून केवळ त्याच्यासाठींच चराचर जग प्रिय वाटत असतें." कृष्ण म्हणजे सर्व प्राणिमात्रांचा आत्मा. त्यामुळें लोकांचें त्यांच्यावर असें प्रेम नसलें तरच आश्चर्य. भगवान् श्रीकृष्णांच्या दिव्य रहस्याला जाणणाऱ्या शुकमुनींनीं जें हें उत्तर दिलें तें त्यांच्या अतिश्रेष्ठ अवस्थेला योग्यच आहे. पण आमच्यासारख्या अतिस्थूल दृष्टीच्या लोकांना भगवंताच्या बाह्य आचरणांतून या बाबतींत प्रकाशाचे चार कण मिळावेत अशी इच्छा असते, व त्या दृष्टीनें पाहिलें तर भगवान् श्रीकृष्ण गोकुळांतील लोकांच्या जीवनांत आपपर भाव विसरून इतके मिसळून गेलेले दिसतात कीं, त्याच्यांतच लोकांचें हृदय आपल्याकडे ओढून घेण्याचें बीज सांपडतें. परमेश्वराचा हा कांहीं एकच अवतार नाहीं. प्रत्येक अवतारांत आत्मतत्त्वच व्यक्तीच्या रूपानें साकारलें आहे. पण त्या अवतारांमध्यें आदर, भय,

कृतज्ञता, इत्यादि गोष्टींचाच जनहृदयांत आविष्कार झालेला आहे. श्रीकृष्ण हे मात्र प्रेमजगताचे महान् सम्राट् आहेत. त्यांच्या त्या विशिष्ट वागणुकीकडे पाहिलें असतां लौकिकदृष्टीनें त्यांतील रहस्य प्रकाशित होईल. त्यांच्या या विशिष्ट जीवनाचीं कांहीं निदर्शनेंच (भागवत–१०-१५ ) पहा:–

"अशी ती वृंदावनाची रमणीय शोभा पाहून श्रीकृष्णाला फार आनंद झाला. गाई-वासरांना चरावयास लावून डोंगराजवळून वहाणाऱ्या नदीच्या तीरावर तो आपल्या सवंगडयांसह नानाप्रकारचे खेळ खेळूं लागला. कांहीं वेळ त्यानें गळयांत माळा घालून बलराम व इतर मित्र यांसह फुलांतील रस पिऊन धुंद झालेल्या भुंग्याच्या गुंजारवाच्या साथीवर गायन केलें. नंतर थोडावेळ कलहंसांचें अनुकरण करून त्यांच्यासारखा मधुर ध्वनि काढीत आपल्या मित्रांना हंसविण्यासाठीं मोरासमोर उभे राहून त्याच्यासारखें तो नृत्य करी. कधीं आपल्या मेघासारख्या आवाजानें दूर गेलेल्या गाई-वासरांना त्यांनीं हांका माराव्यात, कधीं चकोर, क्रौंच, चक्रवाक, मोर या पक्ष्यांसारखे स्वर काढावेत, तर कधीं हिंस्र श्वापदांच्या भयानें आपल्या सोबत्यांबरोबर पळूंही लागावें. खेळ खेळून दमल्यावर बलराम आपल्या स्नेह्यांच्या मांडीवर डोकें ठेवून विश्रांति घेत असले तर श्रीकृष्णांनीं स्वतः त्यांचे पाय चेपून आपला विनय व्यक्त करावा. मंडळी नाचूं लागली तर त्यांनींही नाचावें. बडबडूं लागली तर बडबडावें. कुस्ती खेळत असले तर आपणही कुस्ती खेळावी. ते दमले तर आपणही दमावें. कृष्ण दमून विश्रांति घेत त्यावेळीं कोवळीं पानें अंथरून मित्रांनीं त्यांच्यासाठीं शय्या तयार करावी. मित्रांनीं त्याचें अंग चेपून द्यावें. कोणी वारा घालावा, तर कित्येकांनीं प्रेमानें भरून आलेल्या हृदयानें त्यांच्या प्रशंसेचीं गीतें गावींत. लक्ष्मी ज्याच्या चरणांची सेवा करते त्या भगवान् श्रीकृष्णानें मायेच्या योगानें आपलें खरें स्वरूप गुप्त ठेवून आपल्या आचरणानें त्या खेडवळांच्या जीवनाशीं पूर्णपणें एकरूप होऊन तन्मयता दाखविली. पण त्या तन्मयतेंतही ते त्यांच्यापैकींच एक होऊन राहिले नाहींत तर त्यांच्या श्रेष्ठत्वाचा

प्रत्यय प्रत्येक प्रसंगीं आल्याविना राहात नसे. व इतका श्रेष्ठपुरुष आपल्या जीवनांत इतका मिसळून जातो, या जाणिवेनें तर ते त्यांच्याकडे अधिकच आकर्षित होत व आधारासाठीं त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर अधिकच विसावत. नुसतें दुसऱ्याच्या जीवनाशीं समरस होऊन त्याचें प्रेम संपादन करतां आलें तरी तेवढयानें नेतृत्व उत्पन्न होत नाहीं. त्यासाठीं ज्याप्रमाणें लौकिक जीवनांतीलस हृसंवेदनेचा, तन्मयतेचा, दुःखानें दुःखी होण्याचा व सुखानें सुखी होण्याचा व अपूर्व जिव्हाळयाचा लौकिक आविष्कार व्हावा लागतो, त्याच प्रमाणें आधार म्हणून लोकांनीं आपल्यावरच विसावण्यासाठीं महान् लोकोत्तरतेचाही आविष्कार व्हावा लागतो. भगवान् श्रीकृष्णांच्या या बालजीवनांत जसा लौकिकतेचा पूर्ण आविष्कार झालेला आहे, त्याचप्रमाणें त्यांच्या लोकोत्तरतेचाही तसाच विलक्षण आविष्कार झालेला आहे. लहानपणापासूनच अन्यायाविरुद्ध विलक्षण चीड, स्वार्थरहितता, व प्रचंड आक्रमणाचें निखंदन करणारा अपूर्व पराक्रम त्यांच्या ठिकाणीं व्यक्त झालेला आहे. गोकुळांतील या जीवनांत पूतना, धेनुकासुर, शंखचूड, अरिष्टासुर, केशी दैत्य व नागराज कालिया या सर्व समाजकंटक व बलदर्पित दुष्टांना श्रीकृष्णांनीं शासन केलें आहे. कोणास त्यांनीं ठार मारून टाकलें तर दुसऱ्याच्या प्रदेशांत जबरदस्तीनें घुसून तेथील जीवन विषमय करून टाकणाऱ्या लोकांना त्यांनीं कठोर शासन करून त्यांना त्यांच्या भूप्रदेशांत जावयास लाविलें आहे. जी गोष्ट होणें केवळ अशक्यप्राय वाटत होती ती गोष्ट भगवान् श्रीकृष्णांनीं करून दाखविली. आपण असमर्थ असल्यामुळेंच प्रबलांचे अत्याचार सहन करणें हेंच एकमात्र आपलें काम आहे, शक्य तोंवर आपण कोणालाही उपद्रव देऊं नये, आपल्याला कोणी उपद्रव दिलाच तर तो मुकाटयानें सहन करावा, रहाणें अशक्य झालें तर आपणच आपलें स्थान सोडून निघून जावें, याहून दुसरें आपण काय करूं शकतों? अशा धारणेच्या लोकांच्या जीवनांत आपण जाण्याऐवजीं दुसऱ्यांना घालवून देण्याची शक्यता आहे, वध आपलाच होतो असें नाहीं तर तो दुसऱ्याचाही होऊं शकतो, लोक आपल्या पायाशीं नम्र होण्याची सुद्धां शक्यता आहे, या

गोष्टींचा प्रत्यय प्रथम भगवान् श्रीकृष्णांनीं दिला व अपार सामर्थ्य केवळ दलन करणारेंच असतें असें नाहीं तर तें न्यायी, धर्ममय, दर्प-हीन व निःस्वार्थ व प्रेमपूर्णही असूं शकतें, याही गोष्टीचा प्रत्यय देऊन शिवाय मी तुमच्याचपैकीं एक आहे अशी जाणीव त्या लोकांच्या अंतःकरणांत त्यांनीं उत्पन्न केली. त्यामुळें केवढें अपूर्व आकर्षण त्यांच्या अंतःकरणांत निर्माण झालें! पहातां पहातां पूतना, बकासुर व अघासुर यांना फाडून टाकणारा श्रीकृष्ण नंदाचे जोडे त्यांच्या पायांत घालतो, बांसरी वाजवून व खांद्यावर हात ठेवून आपल्याबरोबर वृंदावनाची सहल करतो, केशी, वृषभ, यांना ठार मारणारा, आणि कालियासारख्या दुष्टाला आपल्या पायाशीं नम्र करणारा श्रीकृष्ण आपल्याबरोबर कुस्ती खेळतांना मात्र यमुनेच्या वाळवंटांत आपल्या हातून लोळविला जातो, वाटीभर आंबट ताका-साठीं नृत्य करतो, वडीलधारीं माणसें रागावलीं तर घाबरतो, व गोपालकाल्याच्या रूपानें शिदोरींत व उपभोगाच्या पदार्थांत, संघजीवनांत काडीइतकाही भेद न करतां सहजीवनाचा, एकरूपतेचा पूर्ण प्रत्यय देण्यासाठीं सारें कांहीं एकत्र करून खातो, पितो, व मिसळतो. आपलें दुखलें, खुपलें तर तो तळमळतो.उलट आपण तळ-मळावें अशी मुळींच अपेक्षा करीत नाहीं, संकटप्रसंगीं तो आपलें समाधान करील व त्या संकटाचेंही निवारण करील. पण आपल्या कडून मात्र साध्या कृतज्ञतेचीसुद्धां अपेक्षा करणार नाहीं. स्वतः सर्वांचा आधार होऊन राहील पण त्याला मात्र आधाराची मुळींच अपेक्षा नाहीं. हें भगवान् श्रीकृष्णांचें लोकोत्तरत्व त्यांनीं अनुभविलें व त्यामुळेंच सर्वांच्या मनावर त्यांचें अप्रतिहत साम्राज्य गाजलें. चंद्रप्रकाशाच्या सुरम्य रात्रीं सारी सृष्टि शांत व धवल ज्योत्स्नेनें न्हाऊन निघत असतां सामर्थ्य, सौंदर्य, ज्ञानमयता व प्रेम यांचें निधान असलेले भगवान् श्रीकृष्ण एका शिलाखंडावर बसले आहेत, मधून मधून त्यांच्या चरणस्पर्शाची इच्छा करीत त्या ज्योत्स्नेंतूनही वृक्षांच्या पुसट काळचा छाया त्यांच्या पायापर्यंत येऊन भिडलेल्या आहेत, सभोंवार आपलें हृदयसर्वस्व अर्पण करणारे गोप–गोपी आहेत, आणि ओंठाला बांसरी लावून त्या अपूर्व नादमाधुरीनें

स्थिरचर विश्वांत माधुर्य भरलें जात आहे, या दृश्याची एकदा कल्पना तर करा! पहा अंतःकरणांत कोणत्या विलक्षण संवेदना उत्पन्न होतात तें. नुसत्या मनश्चक्षूसमोर हें दृश्य उभें राहिलें तरीही देहबंध विसरून मीरा आणि सूरदास एकतानता पावले. प्रत्यक्ष ज्यांनीं हें अनुभविलें असेल व जे हें रोज अनुभवीत असतील त्यांच्या अंतःकरणाची काय अवस्था होत असेल!

## क्रांतीची सिद्धता

भगवान् श्रीकृष्णांच्या या गोकुळांतील वास्तव्यांत मथुरेच्या गणराज्यावरील कंसाच्या आक्रमणाचें हें दृढ झालेलें अनिवार्य संकट नष्ट करण्याचा पद्धतशीर विचार चालू होता. श्रीकृष्ण वसुदेवाचा मुलगा आहे ही गोष्ट मथुरेंतील महत्त्वाच्या यादवांच्यापासून कांहीं लपलेली नव्हती. मधूनमधून मथुरेंतून असे महत्त्वाचे लोक व्रजांत येऊन वारंवार नंदाच्या व श्रीकृष्णांच्या भेटी घेत. यादवांचा पुरोहित गर्ग यानें येऊन अशी भेट घेतल्याचा उल्लेख हरिवंश व भागवत या दोन्ही पुराणांत आहे. भगवान् श्रीकृष्णांची अद्‌भुत लोकप्रियता, अघासुरापासून केशीपर्यंत अनेक दुष्टांना दमन करण्यांत व विशेषतः नागांचा पुढारी कालिया याला हुसकावून लावण्यांत त्यांचें प्रकट झालेलें अपूर्व सामर्थ्य, न्याय व सत्य यांच्या प्रीत्यर्थच केवळ लढा देण्याची त्यांची असलेली प्रवृत्ति, त्यांचें सर्वसंग्राहकत्व व इतर गुण यांमुळें स्वजनद्रोह करणाऱ्या, बापाला तुरुंगांत टाकणाऱ्या, संशय व भय यांनीं प्रेरित होऊन यादवांचा छळ करणाऱ्या, परक्या मगधांच्या हातांतलें बाहुलें बनलेल्या अशा अरेराव कंसाची सत्ता, श्रीकृष्णांच्या आश्रयानें उखडून टाकून पुन्हां नवें गणराज्य स्थापन करतां येईल अशी जाणत्या यादवांना स्वाभाविकपणेंच आशा वाटू लागली. प्रत्यक्ष श्रीकृष्णांचें कंसाशीं दोन कारणांस्तव वैर होतें. एक तर तो स्वजनद्रोही व नीतिमूल्यांचा विध्वंस करणारा दुष्ट म्हणून व दुसरें केवळ अपसमजुतीस्तव आपल्या भावांना अकारण क्रूरपणें ठार मारणारा व

आईबापांचा छळक म्हणून. क्रांतीची सिद्धता होऊं लागली. क्रांति ही समाजजीवनांत अनिवार्य म्हणूनच आली असली पाहिजे. उत्क्रांतीच्या वाटा बंद झाल्यावर त्या मोकळ्या व्हावयासाठींच क्रांतीची आवश्यकता असते. क्रांति समाजाची अनिवार्य गरज म्हणून उत्पन्न झाली पाहिजे व समाजांतून स्वाभाविकपणेंच तिच्या उत्थानाला अनुकूल अशी मनोवृत्ति सिद्ध झाली पाहिजे. क्रांतीचें हें पहिलें तत्त्व मथुरेंतील राज्यक्रांतीला पूर्णपणें लागू होतें. कंसाच्या जुलमी अरेरावीला व स्वजातीच्या अधिक्षेपणाला लोक इतके कंटाळले होते कीं आतां परिणामांचा व सत्ताधाऱ्यांच्या रागाचा मुळींच विचार न करतां ते तोंडावरही कंसाची निर्भर्त्सना करूं लागले होते. जनतेचा हा राग व तिरस्कार कोणत्या थराला पोंचला होता याचें एक निदर्शनच येथें देतों. कंसानें सभेंत एकदां वसुदेवाची निर्भर्त्सना करून सारे यादव आपले शत्रु आहेत व आपण त्यांचा सूड घेतल्याविना राहणार नाहीं असें वारंवार म्हटलें असतां यादवसभेंतील एक वृद्ध मुत्सद्दी अंधक अथवा कंक यानें भरसभेंत त्याच्या तोंडावरच असें सांगितलें कीं,

अयादवो यदि भवान् शृणु तावद्यदुच्यते ।
न हि त्वां यादवं वीर बलात्कुर्वन्ति यादवाः ।। ४
अश्लाघ्या वृष्णयः पुत्र येषां त्वमनुशासिता ।
इक्ष्वाकुवंशजो राजा विनिवृत्तः स्वयं सकृत् ।। ५
भोजो वा यादवो वाऽसि कंसो वाऽसि यथा तथा ।
सहजं ते शिरस्तात जटी मुण्डोऽपि वा भव ।। ६
उग्रसेनस्त्वयं शोच्यो योऽस्माकं कुलपांसनः ।
दुर्जातीयेन येन त्वमीदृशो जनितः सुतः ।। ७
त्वं चापि स्वजनद्वेषी राजधर्मपराङ्मुखः ।
अनिमित्तागतक्रोधः सन्निकृष्टभयो ह्यसि ।। ३४

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. २३

"वारंवार मी यादव नाहीं अशी तूं जी घोषणा करतोस ती आम्हांला मान्य आहे. यादव न राहूं इच्छिणाऱ्या व्यक्तीस बला-

त्कारानें यादव करण्याची यादवांचीही इच्छा नाहीं. फार कशाला, तुला यादव राहावयाचें नसेल तर आम्हींही तुला यादव समजत नाहीं. इक्ष्वाकु वंशांत एक महान् स्वजनद्रोही असा राजपुत्र होता असें म्हणतात. तो दुष्ट व असमंज नांवाचा राजा तुझ्या रूपानें पुन्हां येथें जन्माला आला आहे असें दिसतें. तुझ्यासारखा अधम अधिपति म्हणून लाभावा ही यादवांना निश्चितपणें कलंकभूत गोष्ट आहे. तुला वाटेल तर स्वतःला भोज म्हण. हवे तर स्वतःला यादव म्हणवून घे. आणि हें कांहींच मान्य नसेल तर तूं स्वतःला खुशाल नुसताच साधा कंस समज. तुझें मस्तक तुझ्या स्वाधीन आहे. हवें तर डोक्यावरचे सगळे केस काढून टाक व मुंडण करून उभा राहा अथवा जटा वाढव. (ही येथील भाषा शुद्ध राजकीय संकेताची आहे. येथें डोकें याचा अर्थ राजसत्तेचें सूत्रचालकत्व असा आहे. जटा म्हणजे डोक्यावरील केस. याचाच अर्थ सत्तेचे अमात्य, वयोवृद्ध मुत्सद्दी, व मुरब्बी असे सूत्रचालक होत. कंस त्यांचा द्वेष करीत असे; व मुडण याचा अर्थ हे मूर्धन्य अथवा डोक्यावरील केस काढून टाकावयाचे. याचा अर्थ केवळ आपल्याला आड ते येतात म्हणून अथवा आपल्या अन्यायाविरुद्ध बोलतात म्हणून त्यांची कत्तल करून टाकणें असा आहे. अंधक येथें कंसाला असें सुचवितो कीं सत्ता सध्यां बळानें तुझ्या ताब्यांत आहे. हवें तर तूं त्या सत्तेचे जुने आधारस्तंभ मुत्सद्दी शिल्लक ठेव. हवे तर त्या सर्वांना यमसदनास पाठवून आधारहीन हो. केस जसे परवश असतात तसेच हेही आहेत. त्यांचा कसलाही आग्रह नाहीं व तुझ्याविषयीं त्यांच्या अंतःकरणांत कांहीं प्रेमही उरलेलें नाहीं.) जर खरोखरी कोणाला नांवें ठेवावयाचीं असलीं तर तीं या कुलंगार उग्रसेनालाच ठेविलीं पाहिजेत. कारण कीं त्या कुलांगारानेंच तुझ्यासारख्या दुष्ट पुत्राला जन्म दिलेला आहे. तूं स्वतः स्वजनांचा द्वेष करणारा, राजधर्माविषयीं पराङ्मुख असलेला, लहरीनुसार रागावून आग पाखडणारा, असा असल्यामुळें तुझा नाश अगदीं जवळ येऊन ठेपलेला आहे." तात्पर्य क्रांतीच्या सिद्धतेंतील पहिली गोष्ट येथें होती. दुसरी महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, क्रांतीचें अधिष्ठान अत्यंत उदात्त,

निःस्वार्थ भूमिकेचें व केवळ जनहिताचेंच असलें पाहिजे. स्वार्थाचा संबंध आला कीं क्रांतीचें अधिष्ठान दूषित होतें. मथुरेच्या राज्य-क्रांतीचे नेते भगवान् श्रीकृष्ण यांचे ठिकठिकाणचे उद्गार त्यांचें कंसवधानंतरचें धीरोदात्त वर्तन लक्षपूर्वक पाहिलें तर हें दुसरेंही अधिष्ठान तेथें सिद्ध होतें असें दिसतें. या क्रांतीचें संपूर्ण वर्णन करून शेवटीं तिची मीमांसा आपण करूं.

चिडलेले व पिळले जाणारे लोक आणि आपल्या गणतंत्राचें पुनरुत्थान करूं इच्छिणारे मुत्सद्दी हे दोघेही कंसाच्या वधावांचून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें दमन थांबणें व राज्ययंत्राचें शुद्धीकरण होणें अशक्य आहे या सिद्धांतावर येऊन पोंचले, व म्हणून दुसऱ्या कोणत्याही उपायानें या गोष्टी घडून येणें अशक्य असल्यामुळें कंसाचा वध करण्याचा त्यांनीं निश्चय केला. पण हें कार्य प्रत्यक्ष घडवून आणणार कोण? व्रजवासी भगवान् श्रीकृष्णांना त्यांच्या लोकप्रियतेमुळें व सामर्थ्यामुळें हे मथुरेचे लोक व गणनायक आपला बंधविमोचक म्हणून पाहूं लागले, व त्यांतच तो वसुदेवाचा मुलगा म्हणून यादव गणराज्याचा उद्धार करणें हें त्याचें कर्तव्यच आहे असेंही ते मानूं लागले. श्रीकृष्णाशीं भेटून क्रांतीची गुप्त सिद्धता त्यांनीं चालविली. सिद्धता चालू होती पण ती इतकी गुप्त होती कीं पुष्कळ दिवस कंसाच्या ती ध्यानांतही आली नाहीं! 'फलानु-मेयाः प्रारंभाः' असें राजव्यवहाराचें कालिदासानें वर्णन केलें आहे. राजकीय व्यवहार हा इतक्या गुप्ततेनें घडला पाहिजे कीं केवळ परिणामावरून त्याचा प्रारंभ ओळखतां आला पाहिजे. पुष्कळ दिवसपर्यंत ही गोष्ट कंसाच्या ध्यानांत न आली तरी मथुरेपासून अवघ्या तीनचार मैलांवर असलेल्या गोकुळवृंदावनांत वृषभ, केशी-सारख्या दृढमूल झालेल्या व आपल्याशीं संबद्ध असलेल्या समर्थांचे एकामागून एक वध होत असलेले पाहून व विशेषतः नागराज कालियाला तो तेथें बद्धमूल झाला असतांही हाकलून दिलेलें पाहून हें नवें सामर्थ्य कोणतें आहे याकडे त्याचें लक्ष स्वाभाविकच वेधलें. त्यानें चौकशी केली, तेव्हां ज्याच्या त्याच्या तोंडीं त्याला कृष्ण हें नांव कळलें. तें नांव अतिशय लोकप्रिय आहे असें पाहून हा

लोकप्रिय व समर्थ पुरुष स्वजनांचें कल्याण याच भूमिकेवरून प्रेरित होऊन आपला प्रत्यक्ष संबंध असो अगर नसो, पण अन्यायाचा प्रतिकार करतो हें त्यानें ओळखलें. मथुरेंतही तो लोकप्रिय आहे असें पाहून हें संकट कदाचित् आपल्यावरही येईल म्हणून भयानें त्यानें हा कृष्ण आहे तरी कोण याची चौकशी चालविली. त्या चौकशींत त्याला असें आढळून आलें कीं आपण ज्याच्या वधाची इच्छा करीत होतों तो हा वसुदेवाचाच आठवा पुत्र असून आपणांवर मात करून वसुदेवानें त्याची नसलेली मुलगी आपणांस दाखविली व स्वतःच्या मुलाला गुप्तपणें पळविलें. ही गोष्ट कळतांच कृष्णाच्या रूपानें त्याचा मृत्यूच त्याच्या समोर उभा राहिल्याचा त्याला भास झाला. प्रत्यक्ष स्वतःचा अपराध न करणाऱ्या कालियाला, तो लोकांना उपद्रव देतो म्हणून ज्यानें हुसकावून दिलें तो आपले स्वतःचे भाऊ क्रौर्यानें ठार मारणाऱ्या व पित्याचा दुःस्वास करणाऱ्याचा विनाश करण्याची तर निश्चितच खटपट करील अशी त्याला खात्री वाटली. येथून कृष्णाविषयीं त्याचें अंतःकरण द्वेष, मत्सर, व दुष्टावा यांनीं भरून गेलें. अशीच परिस्थिति त्याच्या ध्यानांत आली कीं एकतर आपण विनाश तरी पत्करला पाहिजे किंवा स्वतःला वांचवावयाचें असलें तर कृष्णाला तरी ठार मारलें पाहिजे. आतां यांतून मध्यम मार्ग कोणताही निघणारा नव्हता. तो जों जों विचार करूं लागला तों तों त्याला कृष्णांचें वाढतें सामर्थ्य व त्यांची वाढती लोकप्रियता यांची अधिकाधिक भीति वाटूं लागली. हरिवंशकार (विष्णुपर्व अ. २२) म्हणतात :–

"वसुदेवपुत्र कृष्ण व्रजांत आहे आणि एखाद्या अग्नीप्रमाणें तो वाढतो आहे हें पाहून कंसाला अतिशय उद्वेग उत्पन्न झाला व त्याला त्याचें भयही वाटूं लागलें. पूतनेचें मरण, कालियाचा पराजय, धेनुक-प्रलंब यांचा वध, गोवर्धन–प्रकरण, अरिष्ट इत्यादि सामर्थ्यवंतांचा वध, यादवांत आपले वाढत चाललेले शत्रू या सर्व गोष्टींचा विचार करून त्याची भीति वाढली व त्याचें भान नाहीसें झालें."

आतां कंसासमोर स्वतःच्या संरक्षणाचे केवळ दोन मार्ग शिल्लक होते, कृष्णाच्या विनाशाशिवाय स्वतःचें जीवन अशक्य हें त्यास स्पष्टपणें दिसत होतें. एकतर आपला सासरा मथुराधिपति सम्राट जरासंध याच्या आश्रयाला जाऊन राहणें किंवा कारस्थानानें व युक्तीनें श्रीकृष्णाला ठार मारणें. हे दोनच मार्ग त्याच्यासमोर होते. तरी पण आलेल्या संकटाची त्याला नीट कल्पना नसावी. श्रीकृष्णाचें सामर्थ्य किती वाढलें आहे याची त्याला असावी तशी कल्पना आलेली दिसत नाहीं. श्रीकृष्ण नुसते लोकप्रियच नव्हते तर जनमनावर त्यांचें अप्रतिहत साम्राज्य होतें. त्यांच्या शब्दाला विलक्षण मान होता. त्यांनीं म्हटलें तर दृढमूल झालेल्या प्रथाही लोक सोडून द्यावयास सिद्ध होत असत. श्रीकृष्णांच्या जीवनांतील गोवर्धन-प्रकरण हें याचें उत्कृष्ट उदाहरण आहे. गोकुळांतील लोकांच्या अंतःकरणांत पर्जन्याची देवता जी इंद्र तिच्याविषयीं विलक्षण स्वरूपाची भक्ति होती. प्रतिवर्षी या इंद्रदेवतेच्या कृपाप्रसादानें आपल्याला व आपल्या गाईवासरांना जीवन मिळतें या कल्पनेनें ते इंद्रदेवतेच्या पूजेचा फार मोठा महोत्सव करीत. पण बुद्धिवाद करून कोणत्याही कारणास्तव असो, श्रीकृष्णानें इंद्रदेवतेची पूजा बंद करून त्याच्या जागीं गोवर्धनाच्या पूजेची नवी प्रथा पाडली व त्याच्या शब्दासरशीं परंपरेनें दृढमूल झालेली संवय सोडून कोण-ताही विरोध न करतां लोक नव्या प्रथेचा अंगीकार करावयास एकमुखानें सिद्ध झाले. जनमनावरील विलक्षण प्रभुत्वाचें हें लक्षण आहे. श्रीकृष्णांच्या पाठीशीं असलेल्या विलक्षण जनशक्तीची व आपलें सिंहासन किती पोखरलें गेलें आहे या गोष्टीची कंसाला कल्पना नसल्यामुळें त्यानें जरासंधाच्या आश्रयाला जाण्याचा पहिला मार्ग पत्करतां त्याच्या उलट कारस्थान करून श्रीकृष्णांना सहजपणें मारण्याचा दुसरा मार्ग पत्करला. म्हणूनच तो स्वतःच सहजपणें मारला गेला. त्याच्या उतावळ्या दर्पांध, व मूर्ख स्वभा-वाच्या अनुरूप त्यानें यादव व वसुदेव यांनीं आपणांस फसविलें असें समजून एक सभा बोलाविली व तेथें सर्वांचीच खरडपट्टी काढली. हरिवंशकार (विष्णुपर्व अ. २२) म्हणतात :-

"नंतर त्या उग्रशासन कंसानें मध्यरात्रीच्या शांतवेळीं आपला पिता उग्रसेन व यादवांतील वसुदेव, कंक, सत्यक, दारुक, कंकाचा कनिष्ठ बंधु भोज इत्यादि सर्व यादवांना बोलाविलें व मथुरेश्वर राजा कंस त्यांच्याशीं बोलूं लागला. तो म्हणाला कीं, तुम्ही सगळे लोक घटनेप्रमाणेंच मला बरें वाटेल तें करणारे असतांना मला अनर्थकारक अशी गोष्ट दृढमूल होऊन वाढत असतां तुम्ही त्या गोष्टीची उपेक्षा कशी केलीत ? व्रजांत नंद गोपाचा मुलगा म्हणून विख्यात असलेला हा कृष्ण दिवसेंदिवस समुद्राप्रमाणें वाढत असून आमच्या राज्यसत्तेचा पायाच तो मुळांतून उखडून टाकीत आहे. मला कोणीही अनुकूल नाहीं. हेरांनीं मला जें वेळीच कळवावयास हवें होतें तें कळविलें नाहीं. किंबहुना हा माझा विनाशकारक शत्रु सर्वांनीं मिळून नंद गोपाच्या घरीं बुद्धया संरक्षण देऊन वाढविलेला आहे. उपेक्षा केलेला रोग जसा वाढतो, वाफ सांठत असलेल्या मेघाचा आकार जसा वाढतो, उन्हाळ्याच्या शेवटीं वर्षाऋतूचा सूचक म्हणून मेघ ज्याप्रमाणें गर्जना करतो, त्याप्रमाणें हा दुरात्मा कृष्ण वाढतो आहे. नंद गोपाच्या घरीं झालेल्या व आश्चर्यकारक कर्मं करणाऱ्या या माझ्या शत्रूची चाल, त्याचें उद्दिष्ट व त्याचा पराक्रम यांची कांहींच कल्पना होत नाहीं. तो कोणी अद्‌भुत देवपुत्र आहे असें म्हणतात व त्याचीं कर्मेंही मानवापेक्षां विलक्षण आहेत असेंही सांगतात. त्याच्या कर्मावरून त्याचें सामर्थ्य मात्र स्पष्ट होतें. प्रसिद्ध पूतना पक्षी त्यानें ठार मारला. तेथें बद्धमूल झालेल्या कालिया नागाचें त्यानें दमन केलें व त्याच्या मूलस्थानीं त्याला हाकलून दिलें. येवढ्या भीषण संकटांत त्याला स्वतःला मात्र कांहीं झालें नाहीं. धेनुप्रलंब, अरिष्ट या लोकांनाही त्यानें सहजपणें ठार मारल्याच्या वार्ता आहेत. एकामागून एक ज्याच्या या विलक्षण कृत्यांची वार्ता ऐकूं येते, तो हा कृष्ण आहे तरी कोण? तुम्हांला काय वाटतें कीं कृष्ण मला माहीत नाहीं? या वसुदेवाविषयीं माझ्या मनांत शंका आहे. अथवा शंका कशाला? निश्चितपणेंच यानें आपल्या बुद्धिकौशल्यानें आम्हांला संकटांत टाकलें आहे. खट्वाङ्ग वनामध्यें मी व नारद यांची एकांतांत भेट झाली असतां त्यांनीं मला

असें सांगितलें कीं देवकीच्या गर्भापासून तुला मृत्यु आहे हें जाणून तूं वसुदेवाच्या मुलांना जगांतून नाहींसें करण्याचा प्रयत्न केलास पण ज्या मुलापासून तुला मृत्यु होता त्याला मारण्याच्या बाबतींत मात्र तू पूर्णपणें अयशस्वी झालास. वसुदेवानें रात्रीच्या अंधाराचा लाभ घेऊन तुझ्यावर मात केली व तुझे उद्देश धुळीस मिळविले. वसुदेवाची मुलगी या समजुतीनें तू ज्या मुलीला दगडावर आपटलेंस ती वस्तुत: यशोदेची मुलगी असून कृष्ण हा वसुदेवाचा मुलगा होय. तुझ्या विनाशाच्या इच्छेनें शत्रु म्हणून पण मित्ररूपानें वावरणाऱ्या वसुदेवानें मुलांची अदलाबदल करून तुला फसविलें. कृष्ण हा वसुदेवाचा मुलगा आहे हें निश्चित. त्यामुळें चुलत बहिणीचा मुलगा म्हणून नात्यानें तो जरी माझा बांधव असला तरी अंत:-करणानें मात्र तो माझा विनाशक शत्रु आहे. या नीच वसुदेवाला पाहिलें कीं मला कावळ्याची आठवण होते. मांस खाण्याचा लोभ असलेला कावळा ज्याच्या डोक्यावर बसतो त्याचेच जसे डोळे फोडतो, त्याचप्रमाणें आपल्या पुत्र व नातलग यांसहित हा वसुदेव माझ्या भरंवशावर जगतो, माझ्या पदरचें खातो व मलाच मुळापासून उखडून काढण्याचा प्रयत्न करतो. स्त्रीहत्या, गोवध, भ्रूणहत्या या पातकांपासून सुद्धां सुटका होऊं शकते, पण स्वत:च्या नातलगाशीं कृतघ्नता करणाऱ्या मनुष्याला मात्र सद्गति कधींही मिळत नाहीं. वरून प्रेम दाखवून आंतून कृतघ्नता करणारा कपटी मनुष्य पतित होऊन अधोगतीला जातो. निष्पाप व्यक्तीवर दारुण प्रहार कपटीपणानें करणाऱ्या मनुष्याला शेवटीं घोर नरकाला जावें लागतें. मी कीं स्वत:चा मुलगा यांत वसुदेवानें माझ्याच बाजूला राहावयास पाहिजे होतें. या मूर्खाला हें साधें कळत नाहीं कीं दोन बलिष्ठ लोकांच्या भांडणांत लुडबूड करणाऱ्या व भेद उत्पन्न करणाऱ्या मध्यस्थांचाच वध होत असतो. ते दोघे पुन्हां एकही होतात. वनामध्यें भांडणारे दोन हत्ती युद्धानंतर एकत्र बसून भक्ष्य खातात, मधल्या झाडांचा मात्र विनाश होतो. बांधवांच्या भांडणांतही अशीच गोष्ट आहे. या राजसत्तेचा व कुळाचा विरोध करणारा हा वसुदेवरूपी काळ मी अकारण पोसला

व विनाश ओढवून घेतला. मत्सरी, दुष्ट, पापबुद्धि व अकारण वैर करणाऱ्या या वसुदेवानें संपूर्ण यादव कुळाला कलंक लावलेला आहे. केंस पिकले म्हणजे मनुष्य वृद्ध होत नाहीं. त्याला अक्कल असावी लागते. शरद् ऋतूंतला मेघ जसा वृथा वृद्ध, तसाच हा वसुदेवही आहे. मूर्खा, तुला असें वाटलें काय कीं आपण कंसाला ठार मारून आपल्या मुलाला मथुरेच्या गादीवर बसवूं? पण तुझी आशा पूर्ण होणार नाहीं. जो माझ्या मार्गांत आडवा उभा राहील त्यानें आपल्या जीविताची आशाच सोडावी. माझ्यासारख्या आश्रयदात्याचा तूं विश्वासघात केलास. तूं पहात असतां तुझ्या मुलाला ठार मारून मी तुझी आशा तोडीन. माझ्या हातून कधीं वृद्धाचा वध, द्विजहत्या, स्त्रीवध, व बांधवांचा घात झाला नाहीं. (हें सारें सैतानाचें साळसूद धर्मप्रवचन आहे हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे.) येथें तूं वाढलास. माझ्या वडिलांनीं तुला आश्रय दिला. माझी चुलतबहीण तुला दिली. यादवांमध्यें तूं सर्वांत श्रेष्ठ म्हणून समजला जातोस. धार्मिक व श्रेष्ठ लोकांनीं धर्मनिष्ठ समजून तुला मान दिला. पण तुझें स्वरूप आतां उघडें पडलें आणि तुझ्या नीच वर्तनानें आमच्या श्रेष्ठ कुळाच्या तोंडाला काळें फांसलें गेलें. कृष्णाचें व माझें आतां कधींही न शमणारें वैर उत्पन्न झालेलें आहे. त्याचा उद्रेक होईल, व कोणी तरी एक मेल्यावांचून आतां शांतता प्रस्थापित होणें केवळ अशक्य आहे."

गंभीर वसुदेवांनीं त्या निर्भर्त्सनेनें आपलें अंत:करण यत्किंचित्‌ही विचलित न होऊं देतां कांहींही उत्तर दिलें नाहीं. उन्मत्तांना उत्तर कृतीनें द्यावयाचें असतें. शब्दांचें काय? पण आपल्या अपसमजुतीसाठीं खाटकासारखीं ज्यानें वसुदेवाचीं मुलें ठार मारलीं, पितापुत्राचें नैसर्गिक प्रेम विसरून स्वत:च्या मुलाला वांचविल्याबद्दल जो आग पाखडीत होता व स्वार्थी अभिलाषेपायीं परक्यांची मदत घेऊन व पित्याला बंधनांत ठेवून स्वजनांच्या दमनाचें कांड ज्यानें चालू ठेवलें, त्याचा अत्याचार लोक तरी किती सहन करणार? हरिवंशकार (विष्णुपर्व अ. २२) म्हणतात :—

"याप्रमाणें निर्भर्त्सना होत असतांही समुद्रासारख्या विशाल हृदयाच्या व वसूप्रमाणें तेजस्वी अशा वसुदेवांनीं आपलें अंतःकरण मुळींच कंपित न होऊं देतां ते स्वस्थ बसले. पण वसुदेवाची अशी निर्भर्त्सना होत असतां सभ्य मात्र खालीं माना घालून 'धिक्कार धिक्कार' असे शब्द पुटपुटले." उग्रशासन कंसाचें त्यांनाही भय वाटत होतेंच. कंक नांवाच्या एका सभासदानें मात्र कंसाला उत्तर दिलें. त्यानें असें सांगितलें (हरिवंश विष्णुपर्व अ. २३) कीं,

"मान्य, व सत्काराला योग्य असे राजवटींतील मुरब्बी लोक हे अग्नीसारखे असतात. त्यांचा क्रोध गुप्त राहणाऱ्यांना सुद्धां जाळल्याखेरीज राहात नाही. तूं केवळ दर्पामुळें अग्नी-सारख्या वृद्धांचा मर्मभेदी प्रहार करून अपमान करतोस. योग्य मंत्र न म्हणतां दिलेली आहुति जसा यजमानाचा विनाश करते तसेंच तुझेंही होईल. क्रूर पुत्र असला तरीही बाप त्याच्यावर प्रेम करतो. मग आपल्या पुत्राला वसुदेवानें वांचविणें किती नैसर्गिक आहे! तूं अकारण त्याचीं मुलें मारीत सुटलास. त्यानें त्यांना वांचविण्याचा प्रयत्न केला तर त्यांत त्याचें काय चुकलें? स्वतःच्या मुलांचें संरक्षण करणें हा जर अपराध असला तर तुझ्यासारख्या दुष्ट मुलाला वांचविल्याबद्दल उग्रसेनाला कां दोष देऊं नये? त्यानेंही तुला लहानपणीं कां ठार मारलें नाहीं? आधीं आपल्या बापाला विचार व मग दुसऱ्यांना दोष दे. कृष्ण व बलराम हेही यादव आहेत, तूंही यादव आहेस. तूं यादव असून यादवांचें वैर करतोस, त्यांनीं मात्र तसें कधीं केलें नाहीं. यादव असणाऱ्या श्रीकृष्णाशीं अकारण वैर करून व वसुदेवाच्या या निर्भर्त्सनेनें सर्व यादवांचा तूं फक्त क्रोध ओढवून घेशील. उघडउघड भयसूचक व विनाशक निमित्तें दिसत आहेत. ज्योतिषी लोक राजाच्या विनाशाच्या वेळीं जे अपशकुन होत असल्याचें सांगतात ते सर्व अशुभ अपशकुन आज स्पष्टपणें दिसत आहेत. तुला आम्हीं नको आहोंत. आमच्याही दृष्टीनें या कुळाला तूं विघातकच आहेस. आम्हीं तुझा परित्याग करतों."

कंक हा कंसाचा पितामह आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे चाललेला प्रकार त्याला किती तापदायक वाटत असेल व त्यामुळेंच त्याच्या रागाचा हा स्फोट कसा झाला तें ध्यानांत येतें. दर्पांध कंसानें वसुदेवाला अधिक चिडविण्यासाठीं व सभासदांचा अधिक्षेप करण्यासाठीं कृष्णाच्या विनाशाची योजना तत्काळ आंखली. नुसतीच आंखली नाहीं तर ती मूर्खपणानें सभेंत सांगितलीही व तुमच्या डोक्यावर पाय देऊन मी कृष्णाला ठार मारीन हें व्यक्तविण्यासाठींच त्यानें अक्रुराला त्याच सभेंत कृष्णाला व्रजांतून कांहीं निमित्तानें मथुरेंत घेऊन येण्याची आज्ञा केली. मगर आपल्या स्थानाहून गजेंद्राला सुद्धां जसें मारतो तसेंच आपल्या राजधानींत शत्रूला बोलावून त्याला सहज मारतां येईल अशी कंसाची कल्पना होती. अक्रूराला उद्देशून तो म्हणाला (हरिवंश, विष्णुपर्व अ.२२) कीं, "हे दानपते अक्रूरा, तू शीघ्र व्रजांत जा व नंद गोप आणि गवळी यांना अशी राजाज्ञा सांग कीं, वार्षिक कर देण्यासाठीं या वेळीं राजानें तुम्हांला प्रत्यक्ष बोलाविलें आहे. तसेंच कृष्ण व बलराम हीं जीं वसुदेवाचीं दोन मुलें तुमच्याजवळ तेथें आहेत त्यांनाही आपल्या मंडळीसह पहाण्याची राजाची इच्छा आहे. दोन्ही मुलें मल्लयुद्धांत अत्यंत प्रवीण आहेत असें राजानें ऐकलें आहे. आमच्या येथेंही मल्लयुद्धांत अग्रेसर असलेले दोन मल्ल आहेत. आजवर गौळवाड्यांत रानटी जीवन घालविलेलीं आमच्या बहिणीचीं हीं दोन्ही मुलें पहाण्याची आमची इच्छा आहे असें त्यांना सांग. तसेंच याच वेळीं राजा धनुर्याग करीत असल्यामुळें यज्ञाला आवश्यक म्हणून दूध, दहीं इत्यादि गोरस भरपूर प्रमाणांत घेऊन येण्यास सांग. त्या दोघांना वाटेल तें करून तूं येथें घेऊन ये. शक्य तोंवर आपल्या खऱ्या भावाचें प्रदर्शन न करतां तूं त्यांना सामोपचारानेंच येथें घेऊन ये. मात्र जर ते ऐकणार नाहींत तर त्यांना कैद करून सुद्धां आणल्याविना राहूं नकोस. जर वसुदेवानें तुझे कान फुंकले नसतील तर तूं माझें हें काम करावेंस अशी माझी इच्छा आहे. कंसाची आज्ञा घेऊन अक्रूर निघाला. वेड्या कंसाला तो आपल्याच बाजूचा आहे असें वाटत होतें. पण इतरां-

प्रमाणें त्याच्याही हृदयांत कंसवधाचीच इच्छा होती. कंसाचा आजा कंक यानें तर पुन्हां एकदां आपले भाव प्रदर्शित केले. कंसाला उद्देशून तो म्हणाला (हरिवंश, विष्णुपर्व अ. २३):–

"हा अक्रूर खरोखरी धन्य आहे कीं, जो कमलाप्रमाणें विशाल नेत्र असलेल्या श्रीकृष्णाला पाहील. हा यदुवंश तुझ्यामुळें नष्ट होण्याच्या पंथास लागला आहे. श्रीकृष्ण आपल्या कर्तृत्वानें पुन्हां सर्व स्वकीयांचें संघटन करून त्यांचें भाग्य उजळील. मला तर असें वाटतें कीं गर्व न धरतां वसुदेवाचें साहाय्य घेऊन तूं कृष्णाकडे जाऊन त्याच्याशीं संधि करणेंच हिताचें आहे."

पण कालनदीच्या कांठावर आलेल्या कोणाला आजवर तेथून परतवितां आलें आहे ? कंसाचा निरोप घेऊन अक्रूर व्रजांत गेला व श्रीकृष्णांची भेट घेऊन त्यानें त्यांना सर्व वृत्त सांगितलें. त्यांचा संताप वाढवीत, त्या विशिष्ट संधीचें महत्त्व प्रतिपादन करीत व कंसाच्या वधाची आवश्यकता प्रतिपादीत अक्रूरानें श्रीकृष्णास सांगितलें (हरिवंश, विष्णुपर्व अध्याय २६) कीं, –

"हे श्रीकृष्ण, हे सर्व गोप कंसाच्या आज्ञेनें वार्षिक खंडणी घेऊन मथुरेंत जातील. तेथें कंसाचा थाटांत होणारा धनुष्ययाग तुम्हीं सगळी मंडळी पहाल. विशेषतः आपण पुत्रवधामुळें अत्यंत दीन झालेल्या व सतत दुःख भोगावें लागणाऱ्या आपल्या पित्याला, वसुदेवाला पहाल. दुष्टबुद्धि कंसानें सतत अतिशय छळल्यामुळें त्यांना यावें त्यापेक्षांही लवकर म्हातारपण आलेलें आहे. दिवसरात्र त्यांचें अंतःकरण उत्कंठेनें व दुःखानें जळत असतें आणि श्रीकृष्णा, पुत्राला हृदयाशीं लावण्याचा आनंद इतकीं मुलें होऊनही जिला कधींच उपभोगतां आला नाहीं, ती तुझी माता शोकामुळें कांति नष्ट झालेली, वत्स नसलेल्या गायीप्रमाणें दीनपणें विलाप करणारी, तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसलेली दीन देवकी या येण्यांत पहातां येईल. जर माता देवकीची तुला कांहीं चाड असेल तर तिला शोकसमुद्रांत बुडत असतां त्यांतून बाहेर काढणें हें तुझें पहिलें कर्तव्य आहे. वसुदेवाचाही शोक नाहींसा करणें हाही तुझा धर्म आहे.

तुझ्यांत सामर्थ्य नाहीं काय ? दुर्वृत्त नाग यमुनेमध्यें तूं दमविलास, गोवर्धन पर्वताला तू मुळापासून उपटलेंस, मदांध व बलवान् अरिष्टाला तू ठार मारलेंस, दुसऱ्यांचे प्राण हरण करणारा दुष्ट केशी तू नुकताच ठार मारलास,मग असाच प्रयत्न करून वसुदेवाचें दुःख तू कां हरण करीत नाहींस ? त्यांतच तुला धर्म लाभेल. कंसानें भरसभेंत तुझ्या पित्याची केलेली निर्भर्त्सना ज्यांनीं ज्यांनीं ऐकली त्या प्रत्येकानें आपल्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहविला. मुलें मारण्याचें दुःख तुझ्या आईला सहन करावें लागलें आहे हें तूं ध्यानांत घे व जातिवंत आईबापांच्या पोटीं जन्माला आलेल्या तेजस्वी व कर्तृत्वान् मुलानें जें ऋण फेडणें आवश्यक आहे तें फेडण्यास सिद्ध हो."

अक्रूर जें बोलला त्यावरून या क्रांतीच्या उत्थानांत त्याचा केवढा भाग होता हें स्पष्ट दिसतें. श्रीकृष्णांनीं अक्रूराचें म्हणणें शांतपणें ऐकून घेतलें. हरिवंशकार म्हणतात (हरिवंश, विष्णुपर्व अ. २६) कीं, "आधींच या गोष्टी श्रीकृष्णांना माहीत होत्या. पण मुळींच न रागावतां ते अक्रूराला फक्त ठीक आहे असें म्हणाले. अक्रूराच्या रथांतूनच भगवान् श्रीकृष्ण व बलराम मथुरेस गेले. त्यांच्या आधींच नंदादि गोप तेथें गेले होते. श्रीकृष्ण मथुरेला जाऊन पोहोंचतांच त्यांच्या दर्शनासाठीच उत्कंठेनें अनेक लोक तेथें उपस्थित होते. नव्या पुनर्रचनेची सिद्धता त्यांच्या रूपानेंच साकारली होती. लोक तिचीच वाट पहात होते. कंसाला लोक किती विटले होते व श्रीकृष्णांच्या स्वागताला ते किती उत्सुक होते याचीं कांहीं प्रत्यंतरें त्यांना तेथल्या तेथेंच आलीं. मथुरा पाहण्याच्या निमित्तानें म्हणून श्रीकृष्ण व बलराम राजमार्गानें जात असतां एक धोबी कपडे घेऊन जात असलेला त्यांना दिसला. श्रीकृष्णांनीं त्याला कपडे मागितले. अगदीं सहज थट्टा म्हणूनच तो प्रकार होता. पण तो राजाचा खास धोबी असल्यानें सूर्यापासून उष्णता घेणाऱ्या वाळूप्रमाणें तोही अधिकच तापदायक होता. तो श्रीकृष्णांना म्हणाला ( भागवत १०-४१ ) कीं "डोंगरावर व रानांत राहणाऱ्या तुम्हीं रानटी लोकांनीं असलीं राजवस्त्रें कधीं परिधान केलीं होतीं काय ? उन्मत्त मूर्खांनो,

तुम्हांला जर जगण्याची इच्छा असेल तर येथून लवकर चालते व्हा. तुमच्यासारख्या मूर्ख गर्विष्ठांना राजाचे सेवक बांधतात, मारतात, व लुबाडून घेतात हें पक्कें लक्षांत ठेवा. श्रीकृष्णांना त्याच्या त्या उन्मत्त भाषेचा इतका संताप आला कीं भररस्त्यांत त्यांनीं त्याचें मस्तक धडावेगळें केलें. पण त्यामुळें परिणाम काय झाला ? लोकांनीं त्यांचा प्रतिकार करण्याऐवजीं त्यांचें उलट स्वागत करून त्यांचा ठिकठिकाणीं सत्कार करावयास प्रारंभ केला. एका कोष्टचानें त्यांजवर संतुष्ट होऊन श्रीकृष्ण व बलराम यांना तीं वस्त्रें सुव्यवस्थित रीतीनें परिधान करून दिलीं. नंतर ते दोघे सुदामा नांवाच्या माळचाच्या घरी गेले. रामकृष्णांना पहातांच त्या माळचानें उठून त्यांना साष्टांग नमस्कार घातला. बसावयास आसनें देऊन उभयतांचे पाय धुतले व फुलांच्या माळा, विडे, उटचा व भेटीचे पदार्थ इत्यादिकांनीं त्या उभयतांची पूजा केली. पुढें राजमार्गानें जात असतांना श्रीकृष्णानें सुंदर तोंडवळचाच्या परंतु शरीराला कुबड असलेल्या एका तरुण स्त्रीला हातांत उटीचें पात्र घेऊन जातांना पाहिलें. त्यांनीं तिला विचारलें, हे सुंदरी, तूं कोण आहेस आणि ही उटी कोणाची आहे? आम्हांला ही उटी दे. तुझें कल्याण होईल. ती कुब्जा म्हणाली, माझें नांव त्रिवक्रा असून अंगराग तयार करण्याच्या कामांत कंसाला मान्य असलेली अशी मी एक दासी आहें. मी केलेलें चंदन त्याला फारच आवडतें, पण खरें सांगावयाचें तर या चंदनाला तुम्हां दोघांवांचून दुसरा कोणता पुरुष योग्य आहे ! ''

भगवान् श्रीकृष्ण मथुरेच्या परिसरांतून वावरूं लागतांच नव्या विलक्षण वातावरणाचा त्यांना अनुभव येऊं लागला. फलोन्मुख झालेल्या क्रांतीचीं तीं प्रसादचिन्हें होतीं. पुढें सत्ताधिपाच्या अंतःकरणांत न्यूनगंड व धाक उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें ज्याच्या भरंवशावर धनुर्याग व्हावयाचा होता तें धनुष्यच तोडून टाकावयाचा श्रीकृष्णांनीं निश्चय केला. युद्धांत मानसशास्त्रीय परिणामांचा विचार करून आधारलेली क्रिया शेवटीं अतिशय महत्त्वाची ठरते. अलिकडच्या युद्धांतही फ्रान्स स्वाधीन करून घेतांना हिटलरनें फ्रेंच

लोकांच्या अंतःकरणांत कमालीचा न्यूनगंड उत्पन्न करण्याचे सर्व प्रयत्न केले होते. असो.

पौरांना धनुष्याचें स्थान कुठें आहे असें विचारीत श्रीकृष्णांनीं त्या धनुष्याचा माग काढला. भागवतकार त्यांचें वर्णन करतांना (भागवत १०-४२) म्हणतात :—

"लोकांनीं पूजिलेल्या व अनेकांनीं संरक्षिलेल्या त्या धनुष्याला संरक्षक मनाई करीत असतांही श्रीकृष्णांनीं एकदम हात घातला आणि तें सज्ज करीत असतांनाच एखाद्या हत्तीनें उसाचें कांडें सहज मोडून टाकावें त्याप्रमाणें तें वांकवून क्षणार्धांत मोडून टाकलें. त्या धनुष्याचें संरक्षण करणारे कंसाचे सेवक रागावून कृष्णांच्या अंगावर धांवले व धरा, बांधा अशा आरोळ्या ठोकीत त्यांनीं श्रीकृष्णांना घेरून टाकलें. श्रीकृष्ण व बलराम यांनीं मोडलेल्या धनुष्याचेच तुकडे घेऊन त्यांना ठार मारलें व आपली वाट काढली. श्रीकृष्णांच्या या धनुर्भंगाच्या कृत्याचा मानसशास्त्राच्या दृष्टीनें व्हावयाचा तो परिणाम निश्चित झाला. हरिवंशांत (विष्णुपर्व अ. २८-१) म्हटलें आहे कीं, धनुष्याच्या भंगाचा वारंवार विचार मनांत येऊन कंस अत्यंत दुःखी व विमनस्क झाला. त्याचा धीर सुटला. भागवतकारांनीं तर त्याच्या या मनःस्थितीचें चित्रच उभें केलें आहे. ते म्हणतात :—

**कंसस्तु धनुषो भङ्गं रक्षिणां स्वबलस्य च ।**
**वधं निशम्य गोविन्दरामविक्रीडितं परम् ॥ २६**
**दीर्घप्रजागरोभीतो दुर्निमित्तानि दुर्मतिः ।**
**बहून्यचेष्टो भयथा मृत्योर्दौत्यकराणि च ॥ २७**
**अदर्शनं स्वशिरसः प्रतिरूपे च सत्यपि ।**
**असत्यपि द्वितीये च द्वैरूप्यं ज्योतिषां तथा ॥ २८**
**छिद्रप्रतीतिश्छायायां प्राणघोषानुपश्रुतिः ।**
**स्वर्णप्रतीतिर्वृक्षेषु स्वपदानमदर्शनम् ॥ २९**

स्वप्ने प्रेतपरिष्वंगः खरयानं विषादनम् ।
यायान्नलदमाल्येकस्तैलाभ्यक्तो दिगम्बरः ।। ३०
अन्यानि चेत्थंभूतानि स्वप्नजागरितानि च ।
पश्यन्मरणसंत्रस्तो निद्रां लेभे न चिन्तया ।। ३१

—भागवत, दशमस्कंध अ. ४२

धनुष्याचा भंग, आपल्या रक्षकांचा व सैन्याचा नाश, व श्रीकृष्णाचा व बलरामाचा पराक्रम इत्यादि गोष्टी ऐकून तो दुष्ट बुद्धीचा कंस अगदीं घाबरून गेला. त्याला त्या रात्रीं बराच वेळपर्यंत झोपही आली नाहीं. झोपेंत व जागेपणीं त्याला मृत्युसूचक अशीं दुष्ट स्वप्नें पडूं लागलीं. आरशांत प्रतिबिंब पहात असतां त्याला त्यांत आपलें मस्तकच दिसत नाहींसें झालें. तसेंच डोळ्यांत फेरफार होण्यासारखें दुसरें कोणतेंही कारण नसतां त्याला चंद्र, तारे, इत्यादिकांचीं दोन दोन प्रतिबिंबें दिसूं लागलीं. सावलीच्या ठिकाणीं त्याला छिद्रें दिसूं लागलीं. कानांत बोटें घातलीं असतां प्राणघोष ऐकूं येईनासा झाला. वृक्ष सोन्यासारखे दिसूं लागले. आणि धुराळ्यांत उमटलेलीं स्वतःचीं पावलेंही त्याला दिसत नाहींशीं झालीं. आपण स्वतः प्रेताला आलिंगन देत आहों, गाढवावर बसून जात आहों, गळ्यांत काळ्या फुलांच्या माळा घालून व अंगास तेल लावून नागव्यानें आपण एकटेंच भटकत आहों असें त्याला स्वप्नांत दिसलें. जागेपणीं व स्वप्नामध्येंही अशा प्रकारचीं दुसरीं कित्येक दुश्चिन्हें पाहून कंसाला मरणाची फारच भीति वाटूं लागली. या चिंतेमुळें त्याला मुळींच झोंप लागली नाहीं.

तात्पर्य मानसिक परिणामाच्या दृष्टीनें जें व्हावयास हवें होतें तें बरोबर घडून आलें. श्रीकृष्ण व बलराम यांना ठार मारून टाकण्यासाठीं कंसानें विचारपूर्वक जें कारस्थान रचलें होतें त्यांतील एक भाग ते आपल्या राजधानींत आल्यामुळें आपणच बलवान् राहून त्यांना मारणें सोपें जाईल हा होता; पण लोकांनीं श्रीकृष्णाचें केलेलें स्वागत पाहून त्यांनाच जनानुकूल्य असल्याचें त्याच्या प्रत्ययास आल्यामुळें तो भाग संपला होता. तथापि त्यानें असें कारस्थान रचलें कीं सकाळीं मल्लमहोत्सवाच्या निमित्तानें जमलेल्या लोकांसमोर

प्रवेशद्वारावरच कुवलयापीड नांवाच्या भयावह हत्तीला उभें करावयाचें व त्याला अंगावर घालून कृष्णाला मारावयाचें. त्यांतून तो वांचलाच तर चामूर व मुष्टिकादि इतर मल्लांकरवीं मल्लयुद्धांत त्यांना ठार मारावयाचें. रात्रीं त्यानें अस्वस्थ अवस्थेंतच मल्लांना बोलाविलें व कुवलयापीडाच्या खास माहुतालाही बोलाविलें व त्यांना असें सांगितलें (हरिवंश विष्णुपर्व अ. २८) कीं, –

" आजपर्यंत खात्रीचे म्हणून सत्कारपूर्वक मी तुमची जोपासना केली आहे. त्याचा मोबदला देण्याची वेळ आतां आली आहे. उपकारांचें कांहीं स्मरण असेल तर उद्यां तुम्ही माझी इच्छा पूर्ण केली पाहिजे. कृष्ण आणि बलराम हे दिसावयास लहान असले तरी बलवान् व भयावह आहेत. त्यांना तुम्हीं उद्यां कुस्तीचें आव्हान द्यावें व त्यांची पाठ जमिनीला लागतांच गर्दी करून त्यांना ठार मारून टाकावें. ते लहान आहेत इत्यादि खुळच्या कल्पना मनांत आणून असावध राहूं नका व गयही करूं नका. एकदां हें झालें म्हणजे तुम्ही माझें काम केलें असें होईल. त्या गर्विष्ठ मल्लांनीं राजाला असें आश्वासन दिलें कीं ते आमच्यासमोर उभे राहिले कीं ठार मेलेच म्हणून समजा. मल्लांना निरोप देऊन कंसानें महामात्र नांवाच्या आपल्या माहुताला असें सांगितलें कीं, प्रवेशद्वाराजवळच आपला मदोन्मत्त, बलवान, चंचल डोळ्यांचा, व माणसें पाहिल्याबरोबर एकदम धांव घेणारा, कुवलयापीड हत्ती दारासमोर उभा कर आणि हीं दोन मुलें आलीं कीं हत्तीला त्यांच्या अंगावर घालून रगडून ठार मार. जर त्या दोघांना तूं मारलेंस तर आधारहीन वसुदेव व कृष्णावर अवलंबूनअसलेले मूर्ख यादव मेलेच म्हणून समज. त्यांतून हत्तीकडून ते वांचलेच तर मल्लांकडून व शेवटीं मी स्वतः त्यांना मारीन, व शेवटीं स्वतः यादवांची सरसकट कत्तल उडवून मी निर्भय व निर्वैर होईन. माझा बाप आणि इतर यादव यांचा मी मनानें केव्हांच परित्याग केला आहे."

सकाळ उजाडली. मंडळींचे थवेच्या थवे मल्लक्रीडेच्या जागीं येऊं लागले. निरनिराळीं वाद्यें वाजूं लागलीं. अशा [redacted]

असलेले श्रीकृष्ण व बलराम त्या स्थानाकडे जावयास निघाले. माहूत प्रवेशद्वारावर हत्ती घेऊन उभा होता. तो आपल्याचसाठीं आहे हें श्रीकृष्णांनीं ताबडतोब ओळखलें. त्यांनीं दरडावून माहुताला सांगितलें, 'हत्ती बाजूला करून माझी वाट सोड. नाहीं तर हत्ती व तूं दोघेही यमसदनास जाल.' उन्मत्त माहुतानें तो भयानक हत्ती श्रीकृष्णांच्या अंगावर घातला ! 'मेला मेला' अशी एकच आरोळी समाजांतून उठली. श्रीकृष्णांनीं त्या हत्तीला आपल्या अंगावर घेतलें. हत्ती आणि बालक यांचें विलक्षण युद्ध सुरू झालें. अखेरीस आपल्या चपलतेनें हत्तीला फसवून त्यांनीं त्याला जेरीस आणलें व दोघांनीं त्याचे दोन दांत उपटून त्यांनींच हत्ती व माहूत या दोघांनाही ठार मारलें. लहान वय, पण महान् पराक्रमाचा आविष्कार, अत्यंत नाजुक सौंदर्य, हत्तीच्या मदाचें व रक्ताचें जणुं स्नान घडलेलें, खांद्यावर एकेक मोठा हस्तिदंत अशा अवस्थेंतील वीर कृष्णाचें तें ध्यान जगांतील सर्व उन्मत्तांना सर्व काळीं कंपित करणारें, सर्व दलितांना आश्वासन देणारें व सर्व कर्मयोग्यांना अपूर्व मार्गदर्शन करणारें आहे या जाणिवेनें जणुं कांहीं भागवतकरांनीं तें पुढीलप्रमाणें चित्रित केलें आहे:–

**मल्लानामशनिर्नृणां नरवरः स्त्रीणां स्मरो मूर्तिमान् ।**
**गोपानां स्वजनोऽसतां क्षितिभुजां शास्ता स्वपित्रोः शिशुः ॥**

**मृत्युर्भोजपतेर्विराडविदुषां तत्त्वं परं योगिनाम् ।**
**वृष्णीनां परदेवतेति विदितो रङ्गं गतः साग्रजः ॥१७**

—भागवत, दशमस्कंध अ. ४३

"वीर कृष्णांची ती रक्तलांछित मूर्ति, आखाड्याच्या त्या प्रवेशद्वारावर येऊन उभी राहतांच मल्लांनीं त्यांच्याकडे दृष्टि रोखली. तों यांनींच कुवलयापीडाला ठार मारलें या जाणिवेनें त्यांना ते वज्राप्रमाणें कठोर भासूं लागले. उपस्थित जनतेला ते महापुरुष वाटले. वीर्य व सौंदर्य यांचें विलक्षण एकीकरण झालेलें तें रूप स्त्रियांना मदनाप्रमाणें वाटलें. गोपांना मात्र तो आपला सवंगडीच वाटला. आईबापांना आपलें मूल एका संकटांतून बाहेर पडलें

म्हणून वात्सल्यभाव उत्पन्न झाला. कंसानें त्यांच्याकडे दृष्टि रोखली तों पहातां पहातां हत्ती ठार झालेला पाहून प्रत्यक्ष मृत्यूच आपल्या-समोर उभा आहे या जाणिवेनें त्याचें हृदय थरकांपून उठलें. अज्ञ लोकांना त्यांच्या सामर्थ्याचा विस्मय वाटूं लागला. यादवांना वाटलें हा दलितांचा उद्धारक कोणी देव तर नाहीं ? योग्यांच्या दृष्टीनें ते परब्रह्मच होते."

कुवलयापीडाच्या हत्येनें डोळेच फाटल्यासारखे होऊन कंसाचा धीर जवळजवळ सुटला. येवढ्यांत राजाच्या इषाऱ्याप्रमाणें चामुरानें कृष्णांना युद्धासाठी आव्हान केलें. अधर्म त्याच्या अंगीं चिकटवून तो समाजाच्या तिरस्कारास पात्र व्हावा म्हणून श्रीकृष्ण त्याला म्हणाले.

**प्रजा भोजपतेरस्य वयं चापि वनेचराः ।**
**करवाम प्रियं नित्यं तन्नः परमनुग्रहः ॥ ३७**
**बाला वयं तुल्यबलैः क्रीडिष्यामो यथोचितम् ।**
**भवेन्नियुद्धं माऽधर्मः स्पृशेन्मल्लसभासदः ॥ ३८**

—भागवत, दशमस्कंध अ. ४३

" आम्ही वनांत फिरणारे लोकही भोजराज कंसाचीच प्रजा आहोंत. त्याचें प्रिय करणें आमचें कर्तव्य आहे. त्याची आज्ञा आम्हांस मान्य आहे. पण आम्हीं लहान मुलें आहोंत. तेव्हां आमच्या बरो-बरीच्या मल्लाशींच आम्हीं युद्ध करूं म्हणजे तें योग्य होईल. आणि तेणेंकरून मल्लयुद्धांत अन्याय केल्याचा दोषही सभेच्या सभासदांना लागणार नाहीं." पण चामुरानें तें कांहीं न ऐकतां श्रीकृष्णांना हात धरून आखाड्यांत ओढलें व मुष्टिकानें बलरामाला ओढलें. कांहीं वेळ तें युद्ध झाल्यावर पहातां पहातां सर्वांसमक्ष श्रीकृष्णांनीं चामुराला व बलरामानें मुष्टिकाला रगडून टाकलें. तें पहातांच कूट, तोबलक आणि शल हे तीन मल्ल त्यांच्या अंगावर धांवून आले. पण एकेका ठोकरीसरशींच त्यांनीं त्यांना यमसदनास पाठविलें. जिकडे तिकडे वाद्यांचा गजर होऊं लागला. लोक जयजयकार करूं लागले. अशा स्थितींत कंस संतापला. त्याचें भान हरपल्यासारखें झालें. तो आपल्या जागेवरून उठला व ओरडून वाद्यें बंद करावयास

सांगून किंचित् भ्रमिष्ट अवस्थेंत आपल्या सेवकांना ओरडून म्हणूं लागला: "या दुष्ट गवळ्याच्या पोरट्यांना मारून हाकलून द्या. नंद गवळ्याच्या पायांत बेड्या अडकवून त्याला साखळदंडानें बांधून ठेवा. वसुदेव आणि माझा बाप उग्रसेन या दोघांनाही ठार मारा. त्याचे ते निरर्गल प्रलाप व विशेषत: आपल्या पित्याचा त्यानें चालविलेला अधिक्षेप पाहून व क्रांतियज्ञाची शेवटची आहुति घ्यावयास हीच वेळ योग्य आहे हें ओळखून श्रीकृष्णांनीं एकदम आखाड्यांतून सिंहासनावर झेप घेतली व केस धरून त्याला ओढून खालीं आपटलें. श्रीकृष्णांना जवळ आलेले पहातांच मृत्यूच्या नुसत्या कल्पनेनेंच त्यानें डोळे फाडले होते. त्यांनीं त्याच्या केसांना हात घालतांच त्याची प्राणज्योति संपावयास आली. आतां परका जरासंध राहिला दूर. फक्त मृत्यु आला समोर. श्रीकृष्णांच्या त्या केंस धरून खेंचण्यांतच कंस संपला. त्याचा देह फरफरा ओढून श्रीकृष्णांनीं तो आखाड्यांत प्रवेशद्वाराजवळ आणून टाकून दिला, त्याचे आठ भाऊ त्यांच्यावर धांवून आले, तों बलरामानें एक लोखंडी कांब घेऊन त्यांना ठार मारून टाकलें. अत्याचाराचें राज्य संपलें. धर्मविजयाचा पहिला उषाकिरण फांकला. गणराज्यावरील एकसत्तात्मक अरेरावी संपली. प्रगतीचे अडविलेले प्रवाह पुनश्च गतिमान् होण्याची वाट यापुढें मोकळी झाली. धर्मसंरक्षणार्थ अवतीर्ण झालेल्या परमेश्वरी अवताराच्या कर्तृत्वाचें पहिलें टिपरूं याप्रमाणें पशुत्वानें भरलेल्या जगताच्या डंक्यावर पडलें. भागवतकार म्हणतात (दशमस्कन्ध अ. ४४) कीं,–

"कंसाच्या मस्तकावरचा मुकुट अगोदरच डळमळूं लागला होता. तशा स्थितींत श्रीकृष्णानें त्याचे केंस धरून त्याला सिंहासनावरून खालीं आखाड्यांत पाडलें. आणि तो विश्वाश्रय, आत्मनय भगवान् त्याच्या अंगावर पडला. सिंह ज्याप्रमाणें हत्तीला ओढतो त्याप्रमाणें श्रीकृष्णानें त्या मृत कंसाला सर्वांसमक्ष जमिनीवरून फरफरा ओढलें. त्याबरोबर सर्व लोकांत एकच हाहा:कार झाला. कंसाचा वध झालेला पाहून कंक, न्यग्रोध, इत्यादि कंसाचे धाकटे आठ भाऊ अत्यंत क्रोधाविष्ट झाले. आणि आपल्या भावाच्या

वधाचा सूड घेण्यासाठीं श्रीकृष्णांच्या अंगावर ते धांवून आले. पण सिंह ज्याप्रमाणें पशूंचा नाश करतो त्याप्रमाणें बलरामानें कांटे लावलेल्या लोखंडी सोटद्यानें त्यांना ठार मारलें. आकाशांत देव-दुंदुभी वाजूं लागल्या. ब्रह्मदेव-शंकर इत्यादि देवाधिदेव स्तुति करूं लागले. देवांगनांनीं कल्पवृक्षाचीं फुलें श्रीकृष्णांवर उधळलीं. धर्मक्रांतीच्या यज्ञकुंडांत अरेराव कंस व त्याची सुलतानी राजवट यांची आहुति पडली.

---

# जरासंधाशीं लढा

कंसाला ठार मारल्यावर विजेत्याचें राज्य या नियमानुसार तें सर्व राज्य भगवान् श्रीकृष्णांचेंच होतें. स्वतःच्या पराक्रमानें त्यांनीं तें संपादन केलेलें असल्यामुळें त्यांनीं नुसता इषारा केला असता तरीही सिंहासन त्यांच्या स्वाधीन होतें. राजवट बदलावयास लोक इतके उत्सुक होते व श्रीकृष्णांवर त्यांचें इतकें विलक्षण प्रेम होतें कीं, तशी इच्छा त्यांनीं दर्शविली असती तर लोकांनीं अतिशय आनंदानें त्यांना 'राजा' म्हणून पत्करलें असतें. पण सत्ताभिलाषासाठीं काय वाटेल तें कुकर्म करावयास सिद्ध असलेल्या अधःपतित राजसंस्थे-समोर भगवान् श्रीकृष्णांनीं ध्येयनिष्ठ व आत्मत्याग यांचा अतिशय श्रेष्ठ असा आदर्श निर्माण केला. कंसाच्या मृत्यूनंतर त्याच्या प्रेताच्या संस्काराचा प्रश्न उपस्थित झाला तेव्हां उग्रसेनानें त्यांना भेटून अशी विनंति केली कीं हें संपूर्ण राज्य तुमचें असून तुम्ही त्याचा स्वीकार करा. हरिवंशकार म्हणतात—

**प्रकृतयोऽनुयास्यन्ति स्तोष्यन्ति त्वां द्विजातयः ।**
**सन्धिविग्रहमुख्यास्त्वां प्रणमिष्यन्ति मन्त्रिणः ॥ २१**
**हस्त्यश्वरथसंपूर्णं पदातिगुणसंकुलम् ।**
**प्रतिगृहाण कृष्णेदं कंसस्य बलमव्ययम् ॥ २२**
**कृणुष्व वदतां वीर कृपणानामिदं वचः ।**
**अस्य त्वत्कोपदग्धस्य कंसस्याशुभकर्मणः ॥ २६**
**तव प्रसादाद्गोविन्द प्रेतकार्यं क्रियेत ह ।**
**तस्य कृत्वा नरेन्द्रस्य विपन्नस्यौर्ध्वदेहिकम् ॥ २७**
**सस्नुषोऽहं सभार्यश्च चरिष्यामि मृगैः सह ।**
**प्रेतसत्कारमात्रेण कृते बान्धवकर्मणि ॥ २८**

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. ३२

"सर्व प्रजा तुमच्या मागोमाग येईल. तपस्वी ब्राह्मण तुम्हांस आशीर्वाद देतील. राज्यकार्यकुशल मंत्री तुम्हांस वंदन करतील. कंसाचें

---

**व्याख्यान ९ वें दिनांक ४–४–५२**

चतुरंग सैन्य तुमच्या स्वाधीन होईल. विजेते या नात्यानें तुम्ही या सर्वांचा स्वीकार करा. तुमच्या रागाच्या अग्नीत पापी कंस जळून भस्म झाला. त्या मेलेल्या कंसाचे प्रेतसंस्कार करण्याची मला आज्ञा हवी आहे. कंसाचें और्ध्वदेहिक संपवून माझ्या सुनांसहित मी अरण्यवास पत्करावयास निघून जाईन. उग्रसेनानें हें म्हणणें अगदीं स्वाभाविक होतें. कारण विजेते सत्ताभिलाषी नसल्याचे आदर्श तत्कालीन राजसत्तांतून जवळजवळ लोप पावले होते. बापाला तुरुंगांत टाकणारे, कुलस्त्रियांचा अपमान करणारे, संपत्तीसाठीं द्यूतादि वाम मार्गाचा अवलंब करावयास किंचित्‌ही दिक्कत न वाटणारे असेच सत्ताधिपति भोंवतीं पसरले असतां व स्वतःचें नसलेलें सिंहासनही बळकाविण्यासाठीं पंच महापातकांसारखी पातकें करावयास दिक्कत न वाटणारे लोक सभोंवार उभे असतां इतका उच्च आदर्श श्रीकृष्णांनीं उत्पन्न केला कीं, त्यानें कोणीही स्तिमित व्हावें. त्यांनीं उग्रसेनाला सांगितलें—

**स्वदोषेणैव दग्धस्य सूनोस्तव नराधिप ।**
**नाहं वै कारणं तत्र कालस्तत्र च कारणम् ।। ४४**
**अथवाऽहं भविष्यामि कारणं नात्र संशयः ।**
**परायणपरः कालः किं करिष्यत्यकारणः ।। ४५**
**न हि राज्येन मे कार्यं नाप्यहं नृप कांक्षितः ।**
**न चापि राज्यलुब्धेन मया कंसो निपातितः ।। ४८**
**किं तु लोकहितार्थाय कीर्त्यर्थं च सुतस्तव ।**
**व्यंगभूतः कुलस्यास्य सानुजो विनिपातितः ।। ४९**
**अहं स एव गोमध्ये गोपैः सह वनेचरः ।**
**प्रीतिमान् विचरिष्यामि कामचारी यथा गजः ।। ५०**
**एतावच्छतशोऽप्येवं सत्येनैतत् ब्रवीमि ते ।**
**न मे कार्यं नृपत्वेन विज्ञाप्यं क्रियतामिदम् ।। ५१**
**भवान् राजाऽस्तु मान्यो मे यदूनामग्रणीः प्रभुः ।**
**विजयायाभिषिच्यस्व स्वराज्ये नृपसत्तम ।। ५२**
**यदि ते मत्प्रियं कार्यं यदि वा नास्ति ते व्यथा ।**
**मया निसृष्टं राज्यं स्वं चिराय प्रतिगृह्यताम् ।। ५३**

—महाभारत, हरिवंश, विष्णुपर्व अ. ३२

" हे महाराज, स्वतःच्याच दोषांमुळें आपला मुलगा कंस स्वतः उत्पन्न केलेल्या असंतोषाच्या अग्नींत जळून भस्म झाला आहे. मी त्याच्या मृत्यूचें कारण नाहीं. काळ हेंच त्याच्या मृत्यूचें कारण आहे. अथवा कर्मानुसारच काळही प्रवृत्त होतो. या नियमानुसार कंस स्वतःच्या कर्मानेंच मेला व त्याच्या मृत्यूसाठीं काळानें शस्त्र म्हणून माझा उपयोग करून घेतला. मला हें राज्य नको. राज्यपदाची मला कधींही आकांक्षा नव्हती व राज्याच्या लोभानें मी कंसाला ठार मारलेंही नाहीं. आपला मुलगा कंस हा या कुलाचा कलंक असून त्यानें स्वतःच्या अस्तित्वानें या कुळाची इभ्रत धुळीस मिळविली होती. लोकांच्या हितासाठीं व कुळाच्या इभ्रतीप्रीत्यर्थ मी त्याला ठार मारलें. येथेंच माझें काम संपलें. मला राज्याशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. मी पुनश्च गायी-गोपाळांत माझें जीवन घालवीन. आमच्या त्या वृंदावनाच्या जीवनांत मी आनंदांत राहीन. ज्याप्रमाणें स्वच्छंदपणें वनांत राहणारा हत्ती आनंदांत राहतो तसा मीही आनंदांत राहीन. मला राज्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं हें मी शतवार सांगतों. आपण यादवांचे मुख्य आहांत. तें मुख्याचें स्थान तुम्हीच पत्करलें पाहिजे. विजेत्याचें राज्य म्हणून जर तें तुम्ही मला देत असाल तर मी तें स्वेच्छेनें आपणांस दिलें आहे असें समजा व आपलें पूर्वींचेंच पद आपण ग्रहण करा. जर आपण माझें कांहीं प्रिय करूं इच्छीत असाल तर आपण माझी ही विनंति मान्य करावी."

श्रीकृष्ण एवढें बोलूनच राहिले नाहींत; तर त्यांनीं उग्रसेनाला अभिषेक केला. या त्यांच्या व्यक्तित्वहीन व लोकहितात्मक श्रेष्ठ धारणेनें त्यांनीं बाह्य सिंहासन नाकारलें असलें तरी यादव गणराज्याच्या लोकांच्या हृदयसिंहासनाचे ते सदाचे सम्राट् बनले. कंसाच्या या वधाच्या प्रकरणांतून भगवान् श्रीकृष्णांच्या अंगचे निर्भयता, आत्मप्रतीति, स्थिरचित्तता, योग्य वेळींच उत्थान करणें, दीर्घसूत्रतेचा पूर्णपणें अभाव, सामाजिक अधिष्ठान, कमलाच्या पानाप्रमाणें निर्लेप प्रवृत्ति, केवळ सामाजिक कृत्याचीच दृष्टि, पूर्ण स्वार्थहीनता इत्यादि किती तरी गुण व्यक्त झाले आहेत. विशेषतः कोणतीही क्रांति, तिचें नेतृत्व व्यक्तिवादशून्य असलें, अधिष्ठान

उदात्त व केवळ जनहिताचेंच असलें, व नेतृत्व समाजजीवनाच्या सर्व थरांत एकरूप होणारें असून अनिवार्य गरज म्हणून समाज-जीवनांतून क्रांति उत्पन्न झाली तर ती यशस्वी कशी होते इत्यादि क्रांतीच्या शास्त्रांतील अनेक सिद्धांत स्पष्ट झाले आहेत. यानंतर श्रीकृष्ण उज्जयिनीला सांदीपनी नांवाच्या गुरूकडे विद्याध्ययनार्थ आपल्या बंधूसह मौंजीबंधनानंतर कांहीं काळ जाऊन राहिले. विद्याध्ययनानंतर त्यांनीं काय हवें म्हणून गुरूला विचारलें त्या वेळीं त्यांनीं ते प्रभासपट्टणास समुद्रस्नानास गेले असतांना एका दैत्यानें आपल्या मुलाला हिरावून नेल्याचें वृत्त सांगितलें. श्रीकृष्णांनीं तो मुलगा परत आणून देण्याचें मान्य केलें व त्याप्रमाणें शंखोद्धार[1] बेटावर जाऊन (हें बेट प्रभासपट्टणच्या[2] जवळच आहे.) त्यांनीं त्या असुराला ठार मारलें व त्या मुलाला परत आणलें. गुरूला संतुष्ट करून व त्यांचे आशीर्वाद घेऊन श्रीकृष्ण मथुरेंत परत आले. परत आल्यावर उग्रसेनाच्या आधिपत्याखालीं ते आपल्या गणराज्याची नवी घडी बसवूं लागतात न लागतात तोंच मथुरेच्या राज्यावर विलक्षण स्वरूपाचें संकट आलें. तें संकट म्हणजे जरासंधाच्या आक्रमणाचें संकट होय.

## जरासंधाचें मथुरेवरील आक्रमण

कंस हा राजा जरासंधाचा जावई होता. याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. अस्ति व प्राप्ति या जरासंधाच्या दोन मुली पति-निधनानंतर माहेरीं गेल्या व त्यांनीं जरासंधाला आपल्या वैधव्याचें सर्व कारण सांगितलें. जांवयाच्या मरणानें दु:खी झालेल्या सम्राटानें संपूर्ण पृथ्वी अयादवी करण्याचा निश्चय केला. त्याच्या नेतृत्वाखालीं भारतवर्षांतील सर्व राजे लोक कसे एकत्रित झाले होते हें मी महाभारतावरील व्याख्यानांत सांगितलेंच आहे. शिवाय श्रीकृष्णानें म्हणजे प्रजेपैकींच एकानें, अधम कां होईना, पण सिंहासनस्थ राजाला ठार मारणें हा स्वयंभू व अनियंत्रित

१. शंखोद्धार म्हणजे हल्लींचें बेट द्वारका होय.
२. सौराष्ट्रांतील सोरटी सोमानाथ हें प्रभासपट्टण होय.

राजसत्तेच्या प्रतोदांच्या नि पुरस्कर्त्यांच्या अंत:करणांत भय उत्पन्न करणारा प्रकार असल्यामुळें सर्वच राजे जरासंधाच्या या स्वारींत समाविष्ट होणें अगदीं स्वाभाविक होतें. श्रीकृष्णांच्या काळापर्यंत सिंहासनाच्या मूलभूत तत्त्वांना कलंकित करणाऱ्या राजसत्ताधाऱ्यांना दूर करण्याचे प्रकार झाले नव्हते असें नाहीं. पण ते प्रकार राजसत्तेपेक्षां वरिष्ठ असलेल्या तपस्वी सत्तेकडून झाले होते. पण प्रजाजनापैकीं एकानें उठून ही गोष्ट करावी हा प्रकार सामान्यत: तरी नवा होता. असो. हरिवंशकार ( विष्णुपर्व अ. ३४–१० ) म्हणतात :–

"सम्राट् जरासंधाच्या मुलींनीं त्याला वारंवार आपलें दु:ख सांगून प्रेरणा दिल्यावर तो क्रोधानें अग्नीप्रमाणें जळून उठला. सर्व राजेलोकांसहित अगणित सैन्य बरोबर घेऊन तो मथुरेवर चाल करून गेला. त्यानें मथुरा नगरी वेढून टाकली. आलेल्या आपत्तीला तोंड द्यावयाचें म्हणून भगवान् श्रीकृष्णांनीं यादवांसह त्याच्याशीं टक्कर दिली. एका बाजूला स्वत:चें स्वातंत्र्य अबाधित टिकवूं इच्छिणारे अल्पसंख्य पण ज्वलंत निष्ठेचे लोक होते तर दुसऱ्या बाजूला केवळ सूड, मत्सर, गर्व व अभिलाषा यांनीं भारलेले बहुसंख्य आक्रमक होते. अशा युद्धांत जें व्हावयाचें तेंच झालें. जरासंधाचा पराभव झाला व त्याला माघार घ्यावी लागली. आयुष्यांत त्याचा इतक्या लहान राज्याकडून झालेला हा पहिलाच पराभव होता. पण तेंवढ्यानें मथुरेवरील संकट टळण्यासारखें नव्हतें. जरासंधानें पुन्हां सैन्याची जमवाजमव करून मथुरेवर दुसरी स्वारी केली. श्रीकृष्णांच्या कुशल नेतृत्वाखालीं यादवांनीं तीही परतवून लाविली. पण तरीही पुन्हां तिसऱ्यांदा जरासंधानें श्रीकृष्णांवर हल्ला चढविलाच. सम्राट् जरासंधानें मथुरेवर एकंदर सतरा स्वाऱ्या केल्या. त्याचें सैन्य अगणित असल्यामुळें व भारतवर्षांतील सर्व राजसत्तांचें सम्राट् म्हणून त्याला पूर्ण पाठबळ असल्यामुळें यादवांना त्याला मारतां येणें शक्य झालें नाहीं. त्याचे हंस व डिंभक या नांवाचे दोन विख्यात सेनापती होते. त्यांच्यासहित जरासंध हा केवळ अद्वितीय होता. त्याचें एकंदर सैन्य वीस अक्षौहिणी होतें असें हरिवंशांत

वर्णन आहे. (भागवतांत या सैन्याचा आंकडा २३ अक्षौहिणी असा दिलेला आहे.) वारंवार इतक्या अगणित सैन्याशीं अविरत झगडा देण्याचा प्रसंग आल्यास केवढेंही शूर लोकांचें राष्ट्र असलें तरी तें पुरें कसें पडणार? शेवटीं सरळ युद्धाबरोबरच कौटिल्यानें वाखाणलेल्या व जगांतील सर्व राजनीतिशास्त्रज्ञांनीं अग्रस्थान दिलेल्या आणि आजवरच्या सर्व यशस्वी राजपुरुषांनीं अवलंबिलेल्या कारस्थानी युद्धाच्या पद्धतीचा अवलंब करणें अल्पसंख्यांचे नेते असल्यामुळें श्रीकृष्णांना भाग पडलें. गरुडाचे दोन्ही पंखच काढून टाकावेत त्याप्रमाणें श्रीकृष्णानें युक्तीनें जरासंधाच्या दोन सेनापतीचा नाश करून त्याला हतबल करावयाचें ठरविलें. कूट युद्धास अथवा कारस्थानीपणाच्या युद्धास शत्रूच्या अंतःकरणाच्या मर्मस्थानांची संपूर्ण माहिती लागते व त्या मर्मस्थानांवर प्रहार करणें हाच खरा उपाय असतो. हंस व डिंभक या दोघांचेंही परस्परांवर विलक्षण प्रेम होतें. इतकें कीं एकाविना दुसऱ्याला जगण्याची कल्पनासुद्धां ‘असह्य होती. श्रीकृष्णांनीं त्यांच्या अंतःकरणाचें हें मर्मस्थान ओळखून त्यावरच प्रहार करावयाचें ठरविलें. जरासंधानें केलेल्या १७ व्या स्वारींत बलरामांनीं हंस नांवाच्या दुसऱ्याच एका राजाला ठार मारलें. विस्तृत रणक्षेत्रावर खऱ्या अर्थानें कोण मेला हें दुसऱ्या आघाडीवर लढत असलेल्या हंसाला माहीत असणें शक्य नव्हतें. हें ओळखून श्रीकृष्णांनीं ‘तुझा मित्र हंस मेला’ हें डिंभकाच्या कानावर घालण्याची व्यवस्था केली. या दुःखद वार्तेचें त्या वेड्या डिंभकाला इतकें वाईट वाटलें कीं त्याच्या दुःखाचें पर्यवसान अधिक जोमानें शत्रूवर हल्ला करण्याऐवजीं त्यानें शेजारीं वहात असलेल्या यमुना नदीच्या प्रवाहांत उडी घेऊन स्वतःचा जीव दिला. डिंभक मेल्याचें पाहून वेगळ्या आघाडीवर लढणाऱ्या हंसाच्या कानावर श्रीकृष्णांनीं ती वार्ता घालण्याची व्यवस्था केली. हंसही नुसत्या आपल्या नांवासाठीं डिंभकानें यमुनेंत जीव दिला हें पाहून भावनेच्या भरांत आला व त्यानेंही यमुनेच्या प्रवाहांत उडी घेऊन स्वतःची जीवितयात्रा संपविली. सैन्याचे हे दोन आधारस्तंभ मरतांच सैन्यांत कंपिततेचें वातावरण उत्पन्न झालें व त्याचा धीर

सुटला. हें पाहून व त्या वार्ता ऐकून जरासंधाच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. पंख तुटलेल्या पक्ष्याप्रमाणें त्याची विलक्षण अवस्था झाली व विमनस्क अंतःकरणानें हें सतरावेंही युद्ध गमावून जरासंध मगधाकडे निघून गेला. विजयश्रीची माळ घेऊन यादव परतले व सतराव्या स्वारीचें मथुरेवरील संकट कूटयुद्धानें टळलें. स्वतः भगवान् श्रीकृष्णच या प्रकाराचें वर्णन करतांना महाभारतांत म्हणतातः—

**संकर्षणद्वितीयेन ज्ञातिकार्यं मया कृतम् ।**
**हतौ कंससुनाभानौ मया रामेण चाप्युत ॥ ३४**
**भये तु समतिक्रान्ते जरासन्धे समुद्यते ।**
**मन्त्रोऽयं मन्त्रितो राजन् कुलैरष्टादशा वरैः ॥ ३५**
**अनारमन्तो निघ्नन्तो महास्त्रैः शत्रुघातिभिः ।**
**न हन्यामो वयं तस्य त्रिभिर्वर्षशतैर्बलम् ॥ ३६**

—महाभारत, सभापर्व अ. १४

"संकर्षणाला बरोबर घेऊन यादवांच्या कल्याणासाठीं कंस व सुनाभा यांना मी ठार मारल्यावर आमच्यावर जरासंधाच्या एकामागून एक स्वाऱ्या होऊं लागल्या. आम्ही त्या परतविल्या. पण त्याचें सैन्य इतकें अफाट होतें कीं मुळींच विश्रांति न घेतां शत्रूचा घात करणाऱ्या महास्त्रांचा सतत प्रयोग करीत राहूनही तीनशें वर्षें आम्ही लढा दिला असता तरीही त्याचें तें अगाध सैन्य, आम्ही संहरूं शकलों नसतों या निर्णयावर आम्हीं आलों." त्याचे देवा-प्रमाणें बलवान् व ज्यांना शस्त्रानें मरण येणें केवळ अशक्य असें दोन सेनापती होते. एकाचें नांव हंस व दुसऱ्याचें नांव डिभक. हंस, डिभक व जरासंध हे तिघे मिळून साऱ्या त्रैलोक्याला पुरे पडले असते. मग इतर राजे अथवा आमचें छोटेसें राज्य त्यांच्यासमोर कोठून टिकाव धरणार! शेवटीं त्याच्या अंतःकरणाचें मर्मस्थान आम्हीं ओळखलें. सतराव्या स्वारीच्या वेळीं रामानें हंस नांवाच्या दुसऱ्याच एका राजाला ठार मारलें. तो हंस मेल्याची डिभकाला कोणी वार्ता सांगतांच त्यानें यमुनेंत उडी घेतली. हंसाशिवाय मी जगूंच शकत नाहीं अशी त्याची भावना होती. त्याचा मृत्यु पाहून

पराक्रमी हंसानेंही तोच मार्ग पत्करला व तें पहातांच हताश व विमनस्क होऊन जरासंध मगधाकडे निघून गेला.

## जरासंधाची १८ वी स्वारी

जरासंध आपल्या राजधानींत गेला तरी त्याचें तेथें समाधान होण्यासारखें नव्हतें. कारण त्याच्या मुली त्याला पुन:पुन्हां प्रेरणा देतच होत्या व त्यांच्या भद्रकपाळी आलेलें वैधव्य त्याचें अंत:करण करपवून टाकीत असे. श्रीकृष्ण म्हणतात (सभापर्व अ. १४–४६) कीं, जरासंधाची मुलगी व कंसाचा भार्या 'माझ्या पतीला ठार मारणाऱ्याला तुम्ही मारा' असें जरासंधाला वारंवार सांगत होती. शेवटीं जरासंधानें पुनश्च आठराव्यांदा यादवांवर चालून जाण्याची प्रचंड सिद्धता केली. तें ऐकल्याबरोबर मात्र यादवांच्या तोंडचें पाणी पळालें. युद्धें तरी एखादी छोटी राजधानी किती दिवस करूं शकणार? युद्धें नेहमीं परराष्ट्रांत घडवावींत. स्वराष्ट्रांत कधींही घडूं देऊं नयेत असा राजनीतिशास्त्राचा नियम आहे. कारण कीं स्वराष्ट्रांत घडणाऱ्या युद्धांत शत्रूचा पराजय व स्वत:चा जय झाला तरी तो जय खऱ्या अर्थानें कधीच पदरांत पडूं शकत नाहीं. कारण अशा युद्धांत हानि शेवटी आपलीच होत असते. नागर-जीवन उद्ध्वस्त केलें जातें व शेवटीं आपसांत मतभेद उत्पन्न होऊन राष्ट्रांत भेद होण्याचा संभव उत्पन्न होतो. अठराव्या स्वारीच्या वेळीं तिची नुसती वार्ता ऐकतांच यादवांची एक विशेष सभा भरली. व त्या सभेंत विकद्रु नांवाच्या यादवानें श्रीकृष्णांना उद्देशून असें सांगितलें (हरिवंश विष्णुपर्व अध्याय ३८) कीं,—

"जरासंध हा अत्यंत बलवान् असून सर्व राजांच्यामध्यें अग्रेसर आहे. त्याचें बळ मर्यादातीत असून आपल्याजवळची युद्धसामग्री त्या मानानें अतिशय तोकडी आहे. या आपल्या राजधानीसभोवार असावी तशी समर्थ तटबंदी नसल्यामुळें व आहे तीही तटबंदी एक सारख्या सतरा स्वाऱ्यांमुळें ढासळलेली असल्याकारणानें त्या दृष्टीनें आपण असुरक्षित आहोंत. शिवाय सतत झालेल्या या स्वाऱ्यांमुळें

नागरजीवन उद्ध्वस्त झालेलें असून पुरेसा युद्धसामग्रीचा व अन्नाचा पुरवठाही नाहीं. कंसानें बलात्कारानें येथील राज्य बळकाविलेलें असल्यामुळें व त्याच्या पाठीशीं जरासंधाचें बळ असल्यामुळें लढाऊ राजधानी या नात्यानें या स्थानाची जी रचना करणें अवश्य होतें ती मुळींच करण्यांत आलेली नाहीं. लोकांच्याही अंत:करणांत सततच्या अत्याचारांमुळें असा विचार करण्याची कधीं प्रेरणा उत्पन्न झाली नाही. खंदक खणण्यापासून साऱ्या गोष्टी नव्या उभाराव्या लागतील व तितका वेळ नाहीं. कंस नुकताच मारला गेला आहे. नवें राज्य नुकतेंच स्थापन झालेलें आहे. सततच्या स्वाऱ्यांमुळें इतर कशाहीकडे लक्ष द्यावयास मुळींच वेळ झालेला नाहीं. अशा स्थितींत 'मथुरा' जरासंधाचा प्रतिकार करूं शकेल असें वाटत नाहीं. आपला जर पराभव झाला तर हें आपलें राष्ट्र संपलेंच म्हणून समजा. आपलीं ज्यांच्याशीं पूर्वींचीं वैरें आहेत तेही लोक आपली दुर्बलता व जरासंधाचें सामर्थ्य यांचा विचार करून आपल्याला बुडवावयास याचवेळीं प्रयत्न करतील. या स्थितींत केवळ नव्या सत्तेमुळें आपलें नागरजीवन उद्ध्वस्त झालें म्हणून प्रजेंतील लोकही आपल्यालाच ठपका देऊन आपल्याविरुद्ध होतील. वैर आपल्यामुळें उत्पन्न झालेलें आहे. आपण आमचे नेते आहांत. ह्या दोन्ही गोष्टींचा विचार करून आमचें व आपलें असें दोघांचेंही संरक्षण करण्याचा आपणच विचार करा." शेवटीं श्रीकृष्णांनीं राजधानी बदलून ती दूर नेण्याचा विचार केला व मथुरेऐवजीं द्वारका ही नवी राजधानी त्यांनीं ठरविली. उत्तरेंतून यादवांचें राज्य सौराष्ट्रप्रदेशांत ( हल्लींचा गुजराथ ) द्वारकेंत आलें तें या कारणास्तव होय. श्रीकृष्णांनीं त्या लोकांना असें सांगितलें (हरिवंश, विष्णुपर्व अ. ३९) कीं,—

"मी स्वत: बलरामांच्यासहित मथुरेंतून गोमंत पर्वताकडे निघून जातो. जरासंधाची स्वारी ही मुख्यत: माझ्यावर असल्यामुळें मी एकदां निघून गेलों कीं तो मथुरेवर स्वारी न करतां माझा पाठलाग करील व त्या अवधींत तुम्हां सर्वांना द्वारकेकडे मथुरा सोडून निघून जातां येईल. त्यांनीं हा बेत ठरविला तोंच एक

नवें संकट त्यांच्यासमोर येऊन उभें राहिलें. कालयवन नांवाच्या जरासंधाच्या एका मित्रराजाला त्यानें श्रीकृष्णांवर स्वारी करण्यासाठीं पाठविलें होतें. त्याचा बेत असा होता कीं, श्रीकृष्णाला कालयवनाशीं लढण्यांत गुंतवून ठेवावें व आपण पिछाडीहून हल्ला करून शत्रु संपवून टाकावा. सतरा वेळां पराभव झाल्याकारणानें त्यानेंही युद्धकुशलतेचा व सामर्थ्याचा धाक घेतलाच होता. हें नवें संकट पहातांच कालयवनाच्या वीरवृत्तीचा विचार करून व बलरामाशी विचारविनिमय करून श्रीकृष्ण एकटेच कोणतेंही आयुध बरोबर न घेतां मथुरेंतून बाहेर पडले. तें पाहिलें मात्र; कालयवनानें योद्धा म्हणून त्यांची कीर्ति ऐकली होती, त्याला त्यांचें मोठें नवल वाटलें, व 'तुला हें शोभत नाहीं, माझ्याशीं द्वंद्वयुद्ध कर' असें म्हणून तो त्यांच्या पाठीस लागला. श्रीकृष्णांनीं त्याच्याकडे मुळींच लक्ष न देतां अरण्यांत त्याला दूर एका गुहेंत नेलें. तोही हट्टास पेटून त्यांच्या पाठोपाठ गेला व त्या गुहेंतच श्रीकृष्णांच्या तेजानें तो दग्ध झाला. सेनापति मारला गेल्यावर उरलेल्या सैन्यास कोण विचारतो? त्याच्या त्या सैन्याचा पार विध्वंस करून ठरल्या योजनेनुरूप श्रीकृष्ण बलरामासहित मथुरेच्या बाहेर पडले. ते गोमंतपर्वताकडे निघून गेले. हें कळतांच त्यांच्या कल्पनेनुरूप जरासंधानें मथुरेकडे दुर्लक्ष करून त्यांना पकडण्यासाठीं गोमंतपर्वताकडे आपली दृष्टि वळविली. तो त्यांचा पाठलाग करूं लागला.

गोमंतपर्वत म्हणजे हल्लींचा काठेवाडांतील गिरनार पर्वत होय. कृष्ण-बलरामांचा तेथपर्यंत पाठलाग करून त्यानें त्यांना पकडण्याचा प्रयत्न केला, पण ते सांपडत नाहींत असें पाहून त्यानें चहूं बाजूंनीं त्याला आग लावून दिली. आग लागलेली पहातांच श्रीकृष्ण व बलराम वेगळ्याच रस्त्यानें पायउतार होऊन काठेवाडांत उतरले व तेथून रेवतक पर्वताजवळील (गिरनार टेकड्यांच्या रांगापैकीं एक टेकडी) प्रभासपट्टणांत येऊन तेथें त्यांनीं वास्तव्य केलें. एकामागून एक यादव कुटुंबें तेथें येऊन राहिलीं व भगवान् श्रीकृष्णांनीं तेथेंच प्रभासपट्टणापासून वीस मैलांवर त्याच्या पूर्वेस कुशस्थली नांवाच्या प्रांतांत समुद्रांत किल्ला बांधला. हल्लीं

सुद्धां त्याला मूळ द्वारका असें म्हणतात. हा किल्ला समुद्रांत होता. हल्लीं एक खेडें मूळ द्वारका या नांवाचेंच प्रभासपट्टणापासून २० मैलांवर आहे. तेथील समुद्रांत श्रीकृष्णांचा हा किल्ला असावा असें प्रा. आठवले ( किर्लोस्करवाडी ) यांनीं आपल्या संशोधनानें सिद्ध केलेलें आहे. अशा प्रकारें विलक्षण संकटाच्या काळीं राजधानी बदलविल्याचीं व तरीही राष्ट्रें जिवंत ठेवल्याचीं अनेक उदाहरणें इतिहासांत आहेत. मराठ्यांच्या राज्यावर प्राणघातक संकट आलें असतां औरंगजेबाच्या सैन्यासमोर आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून छत्रपति राजारामानें आपली राजधानी महाराष्ट्रांतून कर्नाटकांत जिंजीला नेली होती हें प्रसिद्धच आहे. भगवान् श्रीकृष्ण स्वत:च्या तोंडानेंच आपल्या या पलायनाचें वृत्त जें निवेदन करीत आहेत तें या दृष्टीनें पाहण्यासारखें आहे. श्रीकृष्ण म्हणतात :—

**ततो वयं महाराज तं मन्त्रं पूर्वमन्त्रितम् ॥ ४७**
**संस्मरन्तो विमनसो व्यपयाता नराधिप ।**
**पृथक्त्वेन महाराज संक्षिप्य महतीं श्रियम् ॥ ४८**
**पलायामो भयात्तस्य ससुतज्ञातिबान्धवाः ।**
**इति संचिन्त्य सर्वे स्म प्रतीचीं दिशमाश्रिताः ॥ ४९**
**कुशस्थलीं पुरीं रम्यां रैवतेनोपशोभिताम् ।**
**ततो निवेशं तस्यां च कृतवन्तो वयं नृप ॥ ५०**
**तथैव दुर्गसंस्कारं देवैरपि दुरासदम् ।**
**स्त्रियोऽपि यस्यां युध्येयुः किमु वृष्णिमहारथाः ॥ ५१**

—महाभारत, सभापर्व अ. १४

"नंतर आम्ही पुष्कळ विचार करून आपलें निवासस्थान बदलावयाचें ठरविलें व त्याच्या भयानें वेगवेगळे असे आपआपली संपत्ति घेऊन मुलांबाळांसहित व नातलगांसहित पश्चिमेकडे रेवतक पर्वताजवळ कुशस्थली नांवाच्या नगरींत गेलों व तेथेंच निवास केला. त्या ठिकाणीं आम्ही इतका सुरक्षित किल्ला बांधला कीं, आतां तेथें बायका सुद्धां युद्ध करूं शकतील. मग योद्ध्यांची

गोष्टच सोडा. मागध जरासंध निघून गेला व सभोंवतीं पर्वतांचा कडा असलेलें सुरक्षित असें स्थळ आम्हांस राहावयास सांपडलें त्यामुळें आम्ही सर्व आनंदित झालों. वज्राप्रमाणें भयंकर असे सारे योद्धे व प्रमुख यादव वीर आज द्वारकेंत राहात असले तरी आमचा मूळ जो मध्यदेश ( मथुरा व त्याच्या सभोंवारचा प्रांत ) त्याची आम्हांला वारंवार आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं." याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णांनीं मथुरा सोडली व ते द्वारकाधीश झाले. ( काठेवाडामध्यें द्वारका दोन आहेत. भगवान् श्रीकृष्ण सभापर्वांतील आपल्या भाषणांत ज्या कुशस्थलीचा व द्वारकेच्या किल्ल्याचा उल्लेख करीत आहेत ती आजची द्वारका नव्हे. कारण ही आजची द्वारका रेवतक पर्वताजवळ नाही. शिवाय श्रीकृष्णांची ती द्वारका भगवान् श्रीकृष्णांच्या निधनानंतर समुद्रांत बुडाल्याचा उल्लेख आहे. सभापर्वांत श्रीकृष्ण जिचा उल्लेख करतात ती द्वारका म्हणजे जुनें प्रभासपट्टण अथवा हल्लींचें सोरटी सोमनाथ याच्याजवळ १७–१८ मैल पूर्वेस 'मूळ द्वारका' नांवाचें जें खेडें आहे तें होय. जरासंधाच्या भीतीनें मथुरा सोडून ज्या द्वारकेस भगवान् श्रीकृष्ण आले व जेथें त्यांनीं दुर्ग निर्माण केला ती ही मूळ द्वारका. हल्लींची जी द्वारका म्हणतात ती या मूळ द्वारकेपासून १७५ मैल दूर असून शाल्ववधानंतर ती श्रीकृष्णांनीं वसविली. सध्यां बेट द्वारका ज्याला म्हणतात त्याचें पूर्वीचें नांव शंखोद्धार असें असून तेथेंच गुरु सांदीपनींच्या मुलाला सोडविण्यासाठीं भगवान् श्रीकृष्ण गेले असतां त्यांनीं पंचजन नांवाच्या असुराला मारून त्याच्या जवळून पांचजन्य नांवाचा विख्यात शंख मिळविला. या सर्वच प्रांताला भगवान् श्रीकृष्णांच्या तेथील राज्यस्थापनेनंतर द्वारका असें म्हणण्यांत येऊं लागलें व तें स्वाभाविकही आहे. )

## रुक्मिणीचें स्वयंवर

भगवान् श्रीकृष्णांनीं नागरी जीवन उद्ध्वस्त होऊं नये म्हणून याप्रमाणें द्वारकेंत वस्ती केल्यानंतर त्यांच्या जीवनांतील अतिशय महत्त्वाचा असा एक प्रसंग उद्भवला कीं ज्यामुळें पुनश्च त्यांचा

पराक्रम व तेज सर्वत्र फांकून त्यांची कीर्ति सर्व राजमंडळांत स्थिरपद झाली. श्रीकृष्णांच्या जीवनांतील तो अत्यंत महत्त्वाचा प्रसंग म्हणजे रुक्मिणीचें स्वयंवर होय.

भगवान् श्रीकृष्णांच्या जीवनांतील हा प्रसंग अनेक कवींच्या प्रतिभेचा वर्ण्यविषय झाला असून पंडित कवि सामराजापासून तो संतश्रेष्ठ श्रीएकनाथापर्यंत अनेक कवीच्या प्रतिभेचा त्यावर अलंकार चढलेला आहे. विदर्भ देशाचा राजा भीष्मक याची रुक्मिणी ही कन्या होय. राजा भीष्मक हा अत्यंत संपन्न व बलवान् असल्याचें महाभारतांत स्वत: श्रीकृष्णांनीच वर्णन केलें असून तो मागधराजा जरासंध याचा अनुचर व त्याच्या अंकित असलेल्या मांडलिक राजांपैकीं एक होता. या राजाला सुवर्णाची फार आवड असावी असें दिसतें. त्याला पांच मुलगे व एक मुलगी होती. सर्वांत वडील मुलाचें नांव रुक्मी असें असून रुक्रथ, रुक्बाहु, रुक्केशी व रुक्ममाली अशी उर्वरित मुलांचीं नांवें होतीं. मुलगी ही सर्वांत धाकटी असून तिचें नांव रुक्मिणी असें होतें. रुक्मिणी ही साक्षात् लक्ष्मीचा अंश होय असें सर्व भारतीय वाङ्मय सांगतें. ती अतिशय सुन्दर व लावण्यसंपन्न असून पित्याची अत्यंत लाडकी असे. तत्कालीन पद्धतीप्रमाणें अनेक तपस्वी लोक राजा भीष्मकाकडे येत. स्वाभाविकपणेंच वधूपिता या नात्यानें राजा अनुरूप राजपुत्राचा त्यांच्याजवळ शोध करी. शौर्य, कर्तृत्व, सौंदर्य, व जरासंधासारख्या सम्राटाचा सतरा वेळां पराभव करण्याचें प्रदीप्त यश या दृष्टींनीं भगवान् श्रीकृष्णांचें नांव सर्वत्र गाजत असल्यामुळें या तपस्वी लोकांनीं असा कांहीं विषय राजाच्या सभेंत निघाला कीं त्यांचेंच नांव सांगावें. राजा हा स्वत: मागध जरासंधाचा अंकित असल्यामुळें त्यावर तो स्पष्टपणें कांहीं बोलत नसे. पण त्या सभेंत चालणारें हें गुणगान नित्य कानावर पडत असल्याकारणानें सौंदर्यसारसर्वस्व असलेल्या त्या राजकन्येच्या अंत:करणांत हळुहळूं भगवान् श्रीकृष्णांची भावमूर्ति तयार झाली व लवकरच तिच्या अंतरंगांतील भावराज्याचे श्रीकृष्ण हे सम्राट् झाले. तिला बाहेरच्या द्वेषमूलक राजकारणाशीं काय करावयाचें होतें? पित्यानें

वरसंशोधन चालविलें असतां तिनें आपला हा मनोदय त्याच्या कानावर घातला. पण त्याचा ज्येष्ठपुत्र युवराज रुक्मी हा जरासंधाच्या खास पंखाखालील असल्यामुळे त्याला हा विचार मुळींच मान्य झाला नाही. सम्राटाच्या वैऱ्याला आपली मुलगी देऊन त्याच्यासारख्या राजबली महादेवास अर्पण करावयास निघालेल्या क्रूर बलवताशी वैर पत्करणें कदाचित् भीष्मकालाही जड वाटलें असावें. त्या ऐवजी सम्राटाची कृपा आपल्याकडे वळावी म्हणून श्रीकृष्णांचा आतेभाऊ पण त्यांचा वैरी व सम्राट् जरासंधाचा सेनापति चेदि देशाचा राजा शिशुपाल हा त्यानें सुयोग्य वर ठरविला. रुक्मिणीला स्वार्थ व मोहासाठीं चाललेलें हें आपलें बलिदान अर्थातच आवडलें नाहीं. ती अत्यंत खिन्न झाली. पण ती अत्यंत चतुर असल्यामुळें तिनें आपलें मनोगत सुदेव नांवाच्या स्वतःवर अत्यंत प्रेम करणाऱ्या एका विश्वासू ब्राह्मणाजवळ व्यक्त केलें व भगवंतांच्या पराक्रमावर आणि कर्तृत्वावर तिची नितांत श्रद्धा असल्यामुळें त्याच्याबरोबर तिनें आपला संदेश अथवा पत्रिका श्रीकृष्णांकडे पाठविली. भागवतकार लिहितात ( दशमस्कन्ध अ. ५२–२६) की, " हें वृत्त कळल्यावर काळेभोर नेत्र असलेली ती रुक्मिणी मनांत अत्यंत खिन्न झाली आणि तिनें आपला हितचिंतक असा एक ब्राह्मण श्रीकृष्णाकडे पाठविला. तो ब्राह्मण द्वारकेस गेल्यावर द्वाररक्षकांनीं त्याला श्रीकृष्णांच्या मंदिरांत नेलें. तेथें सुवर्ण सिंहासनावर बसलेल्या श्रीकृष्णांना त्यानें पाहिलें." ब्रह्मण्यदेव श्रीकृष्णांनी त्याचा गौरव करून मोठा आदरसत्कार केला व त्याचें भोजन वगैरे झाल्यावर त्याला त्यांनीं असें विचारलें कीं, "आपण विदर्भ नगराहून येथें आला आहांत. आपला राजा अत्याचारी नाहीं ना ? प्रजेचें त्याच्याकडून कांहीं अकल्याण होत नाहीं ना? राजाकडून आपलें हित होत असतें ना ? ज्याच्या देशामध्यें प्रजा सुरक्षितपणें व सुखानें राहतात तो राजा मला फार आवडतो. कठिण मार्ग उल्लंघून आमच्या या समुद्रांतील राजधानींत आपण आला आहांत. तेव्हां तसेंच कांहीं कारण असल्याविना आपण येणार नाहीं हें निश्चित. सांगा मी आपलें कोणतें काम करूं ? "

दुष्ट राजांचा प्रशासक 'लोकनेता' म्हणून श्रीकृष्ण प्रसिद्ध होते व धर्ममूर्ति श्रीकृष्णाला आपल्याकडे अशाच स्वरूपाच्या कांहीं कामास्तव हा तपस्वी आला असेल असें स्वाभाविकपणेंच वाटलें. पण त्या ब्राह्मणानें हांसून आपलें काम सांगितलें व स्पष्ट आशय व्यक्त करणारी रुक्मिणीची पत्रिका त्यानें भगवंतांना दिली. सर्व कवींच्या प्रतिभेचें महान् आलंबन झालेली रुक्मिणीची ती सुप्रसिद्ध पत्रिका पुढीलप्रमाणें :—

श्रुत्वा गुणान् भुवनसुन्दर शृण्वतां ते
निर्विश्य कर्णविवरैर्हरतोऽङ्गतापम् ।
रूपं दृशां दृशिमतामखिलार्थलाभम्
त्वय्यच्युताविशति चित्रमपत्रपं मे ॥ ३७

का त्वा मुकुन्द महती कुलशीलरूप
विद्यावयोद्रविणधामभिरात्मतुल्यम् ।
धीरा पतिं कुलवती न वृणीत कन्या
काले नृसिंह नरलोकमनोभिरामम् ॥ ३८

तन्मे भवान् खलु वृतः पतिरङ्ग जाया—
मात्मार्पितश्च भवतोऽत्र विभो विधेहि ।
मा वीरभागमभिमर्शतु चैद्य आराद्
गोमायुवन्मृगपतेर्बलिमम्बुजाक्ष ॥ ३९

पूर्तेष्टदत्तनियमव्रतदेवविप्र—
गुर्वर्चनादिभिरलं भगवान् परेशः ।
आराधितो यदि गदाग्रज एत्य पाणिं
गृह्णातु मे न दमघोषसुतादयोऽन्ये ॥४०

श्वो भाविनि त्वमजितोद्वहने विदर्भान्
गुप्तः समेत्य पृतनापतिभिः परीतः ।
निर्मथ्य चैद्यमगधेन्द्रबलं प्रसह्य
मां राक्षसेन विधिनोद्वह वीर्यशुल्काम् ॥ ४१

अन्तःपुरान्तरचरीमनिहत्य बन्धू—
स्त्वामुद्वहे कथमिति प्रवदाम्युपायम् ।
पूर्वेद्युरस्ति महती कुलदेवियात्रा
यस्यां बहिर्नववधूर्गिरिजामुपेयात् ॥ ४२

यस्याङ्घ्रिपंकजरजः स्नपनं महान्तो
वाञ्छन्त्युमापतिरिवात्मतमोपहत्यै ।

यर्ह्यम्बुजाक्ष न लभेय भवत्प्रसादं
जह्यामसून् व्रतकृशान् शतजन्मभिः स्यात् ॥ ४३
--(भागवत, दशमस्कंध अ. ५२)

"हे भुवनसुंदरा श्रीकृष्णा, ऐकणाऱ्यांच्या कर्णरंध्रांनीं हृदयांत शिरून त्यांचे सर्व ताप दूर करणारे तुझे गुण व पाहणाऱ्यांच्या नेत्रांना आत्यंतिक आनंद देणारें तुझें रूप यांचें वर्णन ऐकून माझें मन स्वाभाविक संकोचही टाकून तुझ्या चरणीं लीन झालें आहे. हे पुरुषोत्तमा, मुकुंदा, कुलशील, रूप, विद्या, वय, ऐश्वर्य आणि प्रभाव यांनीं सर्वस्वीं अनुरूप असणाऱ्या व सर्वांना सदैव आनंद देणाऱ्या आपल्यासारख्या श्रेष्ठ पुरुषाला पति म्हणून वरावयाची इच्छा कोणती कुलीन पण धैर्यवान् मुलगी करणार नाहीं? मनानें मी आपणांस पति म्हणून वरलें आहे. माझें सर्वस्व मी आपणांस समर्पण केलें आहे. पराक्रमी पुरुषाला योग्य असें आपण करावें अशी माझी प्रार्थना आहे. सिंहाचा भाग कोल्ह्यांनीं स्पर्शिणें अयोग्य आहे. मनानें मी सर्वस्वीं आपल्याला समर्पण केलेलें असल्यामुळें चैद्यपति शिशुपालाचा मला स्पर्श न व्हावा. दान, धर्म, उपासना, नियम व व्रतें, देव, ब्राह्मण व गुरु इत्यादिकांची उपासना करून जर कांहीं पुण्य माझ्या गांठीं पडलें असेल तर श्रीकृष्णांनींच माझें पाणिग्रहण करावें. शिशुपालादिकांचा मला स्पर्श न व्हावा. या माझ्या विवाहांत चेदिराज शिशुपालाबरोबरच जरासंधादि मोठमोठे पराक्रमी पुरुष आज आपलीं अगणित सैन्यें घेऊन येणार आहेत. मी असें ऐकलें आहे कीं आपण सर्वसमर्थ व अजिक्य असे योद्धे आहांत. विवाहाच्या आधल्या दिवशीं आपण गुप्तपणें आपल्या सेनापतींना घेऊन यावें व पराक्रम हाच जेथील निर्णायक प्रकार आहे त्या राक्षसविवाहाच्या पद्धतीनें चैद्य, जरासंधादि लोकांची व त्यांच्या सैन्याची धूळदाण उडवून आपल्या प्रतापानें मला घेऊन जावें. मी अंतःपुरांत राहणारी राजकन्या असल्यामुळें माझ्या सर्व बांधवांना कंठस्नान घातल्याविना मला कसें घेऊन जातां येईल अशी शंका आपल्या मनांत येईल. पण मी आपणांस

मार्ग सुचविते. आमच्या घराण्याच्या प्रथेप्रमाणें विवाहाच्या पूर्वदिवशीं आमच्या कुलदेवीची मोठी यात्रा भरते. त्या वेळीं नवऱ्या मुलीला नगराबाहेर गिरिजेच्या दर्शनाला जावयाचें असतें. (येथें रुक्मिणीनें तिला न्यावयाची संधि सुचविली आहे.) हे कमल-नयना श्रीकृष्णा, मोठमोठे अधिकारी आपल्या अज्ञानाच्या निरसना-साठीं तुमच्या चरणाची धूलि स्वतःच्या मस्तकावर घेतात. आपली जर माझ्यावर कृपा होणार नसेल तर व्रतोपवासांनीं शरीर शुष्क करून मी प्राणत्याग करीन व आज नाहीं तरी शेंकडों जन्मांनीं आपली प्राप्ति मी करून घेईनच." ब्राह्मणानें सांगितलें, मी आणलेला रुक्मिणीचा गुप्त संदेश असा आहे. श्रीकृष्णांनीं त्या प्रीतिसंदेशाचा विचार करून विदर्भ नगरींत जावयाचें ठरविलें. ज्याप्रमाणें श्रीकृष्णांचें गुणवर्णन ऐकून रुक्मिणी त्यांच्याकडे आकृष्ट झाली होती तशीच तिच्याही सौंदर्याची कीर्ति भगवान् श्रीकृष्णांनीं ऐकली होती. रुक्मिणीहरणानें तीन गोष्टी साधणार होत्या. पहिली गोष्ट म्हणजे रुक्मिणीची इच्छा सफळ होणार होती. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे एका राजघराण्याशीं घनिष्ठ व नाजूक स्वरूपाचा संबंध उत्पन्न होऊन त्यामुळें त्यांना कराव्या लागणाऱ्या संघर्षांत एका राजपुरुषाच्या साहाय्याची भर पडणार होती; व तिसरी आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे मगधराज जरासंधाचा पुन्हां एकदां पराभव करून त्याच्या अंकित असलेल्या राजमंडळाची खोडकी जिरविण्याची ती चालून आलेली संधि होती. त्यांनीं त्या ब्राह्मणाबरोबरच रथांतून विदर्भ नगरीकडे प्रयाण केलें. श्रीकृष्णांचें हें प्रयाण बलरामांना कळतांच बंधुप्रेमानें प्रेरित होऊन यादवांचें सैन्य बरोबर घेऊन तेही निघाले. या लग्ना-साठीं जरासंध, शाल्व, दंतवक्र, विदूरथ, पौंड्रक इत्यादि मोठमोठे बलवान् राजे आपआपल्या सैन्यासह आले होते. श्रीकृष्ण येण्याचा संभव त्यांनाही कळला होता. त्यामुळें तेही लोक सिद्धतेनेंच आले होते. इकडे आपण पाठविलेला ब्राह्मण अद्याप परत कां येत नाहीं म्हणून रुक्मिणी अत्यंत चिंताक्रांत होऊन खिन्न मनःस्थितींत होती. इतक्यांत तिच्या आतुरलेल्या नेत्रांना तो ब्राह्मण दिसला.

सारे शुभशकुन झाले व भाग्यदेवता प्रसन्न असल्याचा तिला प्रत्यय मिळाला. आलेल्या इतर पाहुण्यांबरोबर राजानें श्रीकृष्णांचेंही स्वागत केलें. दुसऱ्या दिवशीं मुलगी देवीच्या दर्शनाला जावयाची म्हणून त्या सौंदर्यसंपन्न नववधूला पाहाण्यासाठी आलेले वीर पुरुष मार्गावर ओळीनें आपआपल्या वाहनांतून बसले होते. त्या सर्वा-समक्ष ठरल्या संकेतस्थळीं भगवान् श्रीकृष्णांनी, सिंहानें कोल्हयांच्या तावडींतून स्वतःचा भाग न्यावा, त्याप्रमाणें रुक्मिणीला नेलें. भागवतांत (दशमस्कन्ध अ. ५३ ) या सर्व प्रसंगाचें अतिशय गोड वर्णन आहे. तें पुढीलप्रमाणें:-

"ती कन्या अंतःपुरांतून बाहेर पडून अंबिकेच्या देवळाकडे जावयास निघाली. अनेक योद्धे तिच्या रक्षणार्थ तिच्याबरोबर होते. पार्वतीचें दर्शन घेण्यासाठी ती पायीच निघाली होती. मनांत मात्र श्रीकृष्णांच्या चरणांचें ध्यान चालू होतें. रुक्मिणीनें मौन धारण केलें होतें. अनेक वृद्ध स्त्रिया बरोबर होत्या. सख्याही बरोबर होत्या. श्रीकृष्ण तेथें येऊन थडकल्यामुळें त्यांचा धाक घेतलेल्या राजांनीं आपआपले निवडक योद्धेही रक्षणार्थ बरोबर दिले होते. नाना प्रकारचीं वाद्यें वाजत होती. बंदिजन वेगवेगळी कवनें म्हणत होते. ब्राह्मण स्त्रियाही बरोबर होत्या. अंबिकेची अनेक स्तोत्रें म्हणणें चालू होतें. मंदिराजवळ येतांच रुक्मिणीनें हस्तपाद-प्रक्षालन केलें व ती आंत मंदिरांत गेली. ब्राह्मण स्त्रियांच्या आज्ञेनुसार तिनें देवीला वंदन केलें, व हात जोडून प्रार्थना केली कीं, हे माते, आपल्या अपत्यासह असलेल्या तुला मी साष्टांग नमस्कार करतें. तुझ्या कृपेनें भगवान् श्रीकृष्णच मला पति म्हणून लाभोत. अनेक पूजाद्रव्यांनीं देवीची पूजा केल्यावर नंतर तिनें ब्राह्मण व सुवासिनींची पूजा केली. त्यांनीं तिला देवीचा प्रसाद दिला. नंतर त्यांचे आशीर्वाद घेऊन व मौनव्रत सोडून आपल्या रत्नमुद्रेनें शोभणाऱ्या हातानें एका सखीचा हात धरून ती मंदिराच्या बाहेर पडली. परमेश्वराच्या मायेप्रमाणें वीरांना मोह उत्पन्न करणारें तिचें विलक्षण लावण्य होतें. तारुण्याच्या देहलीवर ती उभी होती. तिच्या कानांतील सुवर्णकुंडलें तिच्या

मुखाला अधिकच शोभा आणीत होतीं. तिच्या कटिप्रदेशाभोंवतीं रत्नमेखला होती. तापल्या सुवर्णाप्रमाणें तिचा वर्ण होता. मुखावर आलेले केस वारंवार ती सावरीत होती. तिच्या जीवनांतील तोच निर्णायक प्रसंग होता. जमलेल्या राजसमूहाच्या गर्दीत आपल्या जीविताचा नाथ कुठें आहे म्हणून चंचल नेत्रांनीं ती त्या समूहाकडे कोणाच्या लक्षांत न येईल अशा पद्धतीनें पहात होती. मंदस्मित ओंठावर झळकत होतें. अधरोष्ठ बिंबफलाप्रमाणें लाल होतें. मूळचे तिचे दांत कुंदकळ्यांप्रमाणें सुंदर असूनही ओठांची रक्तिमा त्यांच्यावर आपली आभा पसरीत होती. गति राजहंसाप्रमाणें सुंदर असून पायांतील मंजुळ नाद करणाऱ्या नुपूरांनीं तिच्या त्या गतींत अधिकच आकर्षण निर्माण झालें होतें. ती मधून मधून वर पहात होती, श्रीकृष्ण कोठें दिसतील म्हणून; पण तिच्या नुसत्या दर्शनानें वेडावलेले राजे लोक तिचें तें मुखमंडल पाहतांच इतकें देहभान विसरले की त्यांच्या हातांतील हत्यारें खालीं गळून पडलीं तरी त्यांना त्याचें भान राहिलें नाहीं. कित्येक तर स्वतः-देखील वाहनावरून पडले. हळूहळू पावलें टाकीत जात असतां पुन्हां तिनें वर पाहिलें तोंच श्रीकृष्ण तिच्या दृष्टीस पडले. श्रीकृष्णांनीं वेगानें आपला गरुडचिन्हांकित रथ त्या गर्दीतून वाट काढीत अनपेक्षितपणें रुक्मिणीच्या जवळ आणला व तिला आपल्या रथांत घेऊन व आडव्या येणाऱ्या सर्व राजे लोकांचा पराभव करून तो द्वारकेच्या रोखानें वळविला."

जमलेल्या जरासंधप्रमुख राजांना तो आपला मोठाच अपमान वाटला व त्यांनीं श्रीकृष्णांवर मागाहून चढाई केली. पण बलराम व इतर यादव वीर यांनीं पराक्रम करून शत्रूंच्या मस्तकांचे पर्वत रचले व उष्ण रक्तांचे डोह निर्माण करून त्या सर्वांना पिटाळून लावलें. रुक्मिणीचा वडील बंधु रुक्मी, 'मी श्रीकृष्णांना मारून रुक्मिणीला परत आणल्याशिवाय पुन्हां राजधानीचें तोंड पहाणार नाहीं' म्हणून निघाला. त्यानें श्रीकृष्णांना रस्त्यांत गांठलें. पण त्या नरकेसरीनें थोड्याच वेळांत रुक्मीचा पराभव करून त्याला मारावयास खड्ग उपसलें. भाऊ मरतो असें पाहून

रुक्मिणीनेंच श्रीकृष्णांचे पाय धरून विनवणी केली. भागवतकार म्हणतात: "भीतीनें थरथरा कांपणाऱ्या, म्लानवदन रुक्मिणीला पाहून तिच्यासाठीं श्रीकृष्णांनीं रुक्मीला ठार मारलें नाहीं. त्याला ध्वजस्तंभाशीं बांधलें व विरूप करून टाकलें. त्याच्या सैन्याचा यादव वीरांनीं फडशा पाडला."

पुढें बलरामांनीं रुक्मीची सुटका केली. द्वारकेंत भगवान् श्रीकृष्णांचा हा विवाहोत्सव भव्य वैभवानें पार पडला. पुन्हां एकदां श्रीकृष्णांच्या पराक्रमाचें यश दिगंतांत दुमदुमून उठलें.

श्रीमन्महाभारताच्या संहितेंत भगवान् श्रीकृष्ण जे आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात ते यानंतर दृष्टोत्पत्तीस येतात. त्यांच्या चरित्राची ही पार्श्वभूमि लक्षांत घेतली म्हणजे पांडवांना त्यांनीं आधार देतांच पांडवांसारखे पराक्रमी पुरुष त्यांना विनम्र कां झाले हें स्पष्ट होतें. महान् पराक्रमी, निःस्वार्थी, गणराज्याचा संस्थापक व अतिशय श्रेष्ठ पुरुष हें द्रौपदीच्या स्वयंवरांत पांडवांच्या दृष्टीस पडलेल्या श्रीकृष्णांचें स्वरूप आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं पांडवांच्या साधनयंत्रानें धर्ममूल्यांच्या स्थापनेच्या महत्कार्यास हात घालण्यापूर्वीं भारत राष्ट्राच्या जीवनांत त्यांचें स्वतःचें स्थान कोणतें होतें हा प्रश्न महाभारताच्या इतिहासाच्या वाचकाला स्वाभाविकपणेंच उत्पन्न होतो. ही पार्श्वभूमि त्या प्रश्नावर योग्य तो प्रकाश टाकील.

---

# श्रीकृष्णांचे गुणविशेष

द्वारकेंत स्थिरपद झालेल्या व यादवांची राज्यसंस्था विशुद्ध स्वरूपांत प्रथापित केलेल्या भगवान् श्रीकृष्णांनीं आतां शेष भारताकडे दृष्टि वळविली. माझ्या महाभारतावरील व्याख्यान-मालेंत दाखविल्याप्रमाणें समाजजीवनांतील सर्व संस्था जिच्यावर अवलंबून आहेत ती राज्यसंस्था ही तपस्विसत्ता, अमात्यसंस्था, पौर-जानपदांची सत्ता व धर्मसस्था यांचीं बंधनें झुगारून देऊन अनियंत्रित व स्वयंभू झाली असल्याचें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. राज्यसंस्था ही सर्वांत श्रेष्ठ असून तिच्यावर सर्व धर्मांचें विकसन किंवा अधःपात अवलंबून आहे असें पूर्वीपासूनच भारतीय द्रष्टयांच्या प्रत्ययास आलेलें आहे. महाभारताच्या शांतिपर्वांत असें म्हटलें आहे कीं,–

**सर्वे धर्मा राजधर्मप्रधानाः सर्वे वर्णाः पाल्यमाना भवन्ति ।**
**सर्वस्त्यागो राजधर्मेषु राजंस्त्यागं धर्मं चाहुरग्र्यं पुराणम् ॥२७**
**मज्जेत् त्रयी दण्डनीतौ हतायां सर्वे धर्माः प्रक्षयेयुर्विबुद्धाः ।**
**सर्वे धर्माश्चाश्रमाणां हताः स्युः क्षात्रे त्यक्ते राजधर्मे पुराणे ॥२८**

–(महाभारत, शान्तिपर्व अ. ६३)

"सर्व धर्म राजधर्मामुळेंच रक्षिले जातात. सर्व वर्गाचें संरक्षण राजधर्मामुळेच होतें. राजधर्मांत सर्वच गोष्टींचा त्याग अभिप्रेत आहे आणि त्याग हा सर्वश्रेष्ठ धर्म आहे असें प्राचीनांचें म्हणणें आहे. राजधर्म जर नष्ट झाला तर त्रयी नष्ट होते. वाढलेले आणि बद्धमूल झालेले धर्मसुद्धां नष्ट होतात. क्षत्रप्रधान राजधर्माचा परि-त्याग केला तर सर्व आश्रमधर्म नष्ट होतात." त्यामुळें राजसंस्थेचें शुद्धीकरण हाच धर्मसंस्थापनेचा म्हणजे सांस्कृतिक जीवनमूल्यांच्या प्रतिष्ठापनेचा एकमात्र उपाय भगवान् श्रीकृष्णांना दिसून आला. राजसंस्थेचें हें शुद्धीकरण दोन प्रकारांनीं होण्यासारखें होतें. एकतर

---

**व्याख्यान १० व ११ वें, दि. ५ व ६–४–५२**

असलेल्या राजसंस्थेपैकीं कोणाला तरी हाताशीं धरून, अथवा नवी राजसंस्था निर्माण करून. असलेली राजसंस्था स्वयंभू व अनियंत्रित, व सुख आणि अधिकार यांना इतकी वश झालेली होती कीं तिला पुन्हा नियंत्रित व धर्मोन्मुख करणें केवळ अशक्यप्राय होतें. अशा स्थितींत नवी राजसंस्था निर्माण करणें हा एकच मार्ग शिल्लक होता. कोणाला हाताशी धरून ही राजसंस्था निर्माण करतां येईल याचा विचार करीत असतां श्रीकृष्णांना फक्त पाण्डव हेच असे दिसून आले की ज्यांना हाताशी धरलें असतां हें कार्य होण्यासारखें होतें. तात्पर्य, ब्रह्म व क्षत्र या दोहोंच्या अधःपाताची ही वेळ आलेली होती. ब्रह्म हे समाजाचें नेतृत्व असले तर क्षत्र हे सामर्थ्य होते. समाजांत धर्म टिकावयास दोहोंच्या विशुद्धतेची आवश्यकता होती. म्हणून श्रीकृष्ण या कार्यास प्रवृत्त झाले. पांडवांत त्यांना संघटित नेतृत्व दिसून आलें. त्या नेतृत्वांत जसें सामर्थ्य होतें, त्याचप्रमाणें आत्यंतिक त्याग, अपार सत्यनिष्ठा, धर्माचें नियंत्रण मानण्याची स्वाभाविक प्रवृत्ति इत्यादि गुण विशेष एकवटलेले होते. भगवान् श्रीकृष्णांनीं या नेतृत्वाला सिंहासनस्थ करणें हा एकच धर्मसंस्थापनेचा उपाय आहे हें ओळखलें व पांडवांना आपल्या कार्याचें साधन म्हणून वापरावयाचें ठरविलें. त्या नेतृत्वांत कांहीं दोष नव्हतेच असें नाही; पण स्वतःच्या सामर्थ्यानें व प्रभावानें ते दोष नष्ट करतां येतील असा त्यांना विश्वास होता. मनाशीं निश्चय ठरतांच त्यांनीं पांडवांकडे आपली दृष्टि वळविली. पांडवांची व श्रीकृष्णांची पहिली भेट द्रौपदीच्या स्वयंवराच्या वेळीं झालेली आहे आणि तीही अशा एका विशिष्ट परिस्थितीत कीं, ज्यामुळें पांडवांनीं मनानें तरी त्यांना सदाचें कृतज्ञ रहावें! राजा या नात्यानें युधिष्ठिरांची योग्यता केवढी श्रेष्ठ आहे हें आपल्या यौवराज्याच्या अत्यल्प काळांत युधिष्ठिरांनीं दाखवून दिलेलें होतें. चुलत्याच्या जाचामुळें हक्काच्या राज्याला पारखें झालेले, अंगीं सर्व प्रकारची योग्यता असूनही आश्रयहीन अवस्थेंत अनाथाप्रमाणें भटकणारे, व अपार सामर्थ्य असूनही योग्य मार्गदर्शनाची अपेक्षा असलेले पांडव द्रौपदीच्या स्वयंवरांत दृष्टोत्पत्तीस

येतांच त्यांचें कार्य हें आपलेंच कार्य समजून श्रीकृष्णांनीं त्यांना आधार द्यावयाचें ठरविलें. या विशिष्ट स्थितींत जो कोणी पांडवांना आधार देईल त्याचें पांडवांना जीवनभर अर्थातच महत्त्व वाटणार होतें. संपत्तीच्या काळांत कोणीही पांडवांच्याकडे आला असता. विपत्तीच्या काळांत पाठीवरून आधाराचा समर्थ हात फिरविणारा केवळ श्रीकृष्णच होता. लाक्षागृहदाहांतून सुरक्षितपणें बाहेर पडून द्रौपदीच्या स्वयंवरांत ब्राह्मण वेषांत पांडव उपस्थित राहिले. राजमंडळावरून दृष्टि फिरवितां फिरवितां सहज ब्राह्मण समाजाकडे श्रीकृष्णांची दृष्टि गेली. तों भस्मानें झांकलेल्या अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेल्या पांडवांना त्यांनीं तत्काळ ओळखलें. त्यांनीं बलरामांना त्यांची ओळख करून दिली. महभारतकार म्हणतात ( आदिपर्व अ. १८७–९, १० ) कीं,– "मत्तगजेंद्राप्रमाणें दिसणाऱ्या अथवा भस्माच्छन्न अग्नीप्रमाणें भासणाऱ्या पांडवांना पाहून युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन, नकुल व सहदेव या सर्वांची त्यांनीं ओळख करून दिली." प्रथम रामांना त्यांची ओळख पटेना. पण हळुहळू त्यांची त्यांना ओळख पटली. एकदां ओळख पटल्यावर व स्वयंवराच्या निमित्तानें झालेल्या नंतरच्या युद्धांत भीमार्जुनांचा पराक्रम प्रत्ययास आल्यानंतर मानापमानादि विकारांची अंतःकरणावर अणुमात्रही छाया नसलेले भगवान् श्रीकृष्ण बलरामासहित स्वतः होऊन कुंभारवाड्यांत कोणीही पहाणार नाहीं अशा वेळीं ऐन मध्यरात्रीं त्यांच्याकडे गेले व त्यांनीं त्यांच्याशीं आपला संबंध स्वतः होऊन प्रस्थापित केला. महाभारतकार म्हणतात (आदिपर्व अ.१९१–१८ ते २२५) कीं, "बलरामासहित श्रीकृष्ण पांडवांचा शोध करीत करीत ते रहात होते त्या कुंभाराच्या घरीं गेले. त्या ठिकाणीं मध्यभागीं बसलेला आजानुबाहू युधिष्ठिर व त्याच्या सभोंवार बसलेले अग्नीप्रमाणें तेजस्वी असे त्याचे बंधु त्यांनीं पाहिले. स्वतः होऊन श्रीकृष्णांनीं आंत जाऊन युधिष्ठिराला वंदन करून मी कृष्ण आहें असें सांगितलें. युधिष्ठिराच्या मागोमाग त्यांनीं आपली आत्याबाई जी कुंती तिलाही वंदन केलें. युधिष्ठिरांना एकाएकीं अनपेक्षितपणें या

महापुरुषाचें तें वंदन हर्षमिश्रित आश्चर्यांत टाकणारेंच होतें. गोंधळून त्यांनीं विचारलें, "श्रीकृष्णा, आम्ही येथें गुप्तपणें राहात असतां तू आम्हांला ओळखलेंस कसें ?" श्रीकृष्णांनी त्यांना उलट उत्तर दिलें : "अग्नि गूढ असला तरी त्याला ओळखतां येत नाहीं काय ? मत्स्ययंत्राचा वेध व सर्व राजे लोकांचा पराभव ही अपूर्व पराक्रमाचीं कृत्यें पांडवांशिवाय दुसरा कोण करूं शकणार आहे ? ही अत्यंत सद्भाग्याची गोष्ट आहे कीं, तुम्हीं लाक्षागृह व तत्समान अनेक जीवघेऊं आपत्तीतून वाचलांत व धृतराष्ट्राचा पापी पुत्र आपल्या कारस्थानांत यशस्वी झाला नाहीं. तुमचें कल्याण असो! अग्नीप्रमाणें तुमचें तेज वाढो. कोणीही तुम्हांला तुमची इच्छा असेपर्यंत ओळखूं नये अशीच माझीही इच्छा आहे. म्हणून मी आमच्या शिबिरांत जातों."

पांडवांचा निरोप घेऊन बलरामासहित घाईघाईनें श्रीकृष्ण आपल्या शिबिराकडे निघून गेले. द्रौपदीचें स्वयंवर झाल्यावर पांडवांनाच वाढवावयाचें असें मनाशीं ठरवून या विपत्तीच्या काळांत नवें राज्य उभारावयास त्यांना सर्वांत अधिक धनाची आवश्यकता लागेल हें ओळखून श्रीकृष्णांनी त्यांना तें साहाय्य भेटींच्या रूपानें दिलें. महाभारतकार वर्णन करतात (आदिपर्व अ. १९९–१३ ते १९) कीं नंतर विवाह झालेल्या पांडवांना नाना प्रकारची रत्नें, सुवर्णांचे अलंकार, निरनिराळ्या देशांतील भारी वस्त्रें, अनेक प्रकारचीं आसनें, श्रीमंती थाटाचीं व राजवैभवाची द्योतक असलेलीं वाहनें व इतर सामान, उत्कृष्ट दासी, हत्ती, घोडे, रथ व अमाप सोनें त्यांनीं दिलें. आपत्तीच्या काळांत पाठीराखा म्हणून उभ्या राहिलेल्या श्रीकृष्णांच्या अंतःकरणाला बरें वाटावें म्हणून युधिष्ठिरांनीं या सर्व गोष्टींचा स्वीकार केला. ज्यांना आश्रय नव्हता त्यांच्या पाठीशीं आतां सर्वश्रेष्ठ व बलवान् अशी यादवांची सत्ता उभी राहिली. धनाशीं ज्यांचा संबंध नाहीं त्यांचा धनकोश समृद्ध झाला. भगवान् श्रीकृष्णांनीं सुवर्णाचेंच पहिलें साहाय्य पांडवांना कां केलें असेल? राजनीतीशास्त्राकडे एकवार दृष्टि फेंकली तर त्याचीं कारणें दिसून येतात. अर्थशास्त्रांत राजर्षिवृत्तामध्यें कौटिल्य म्हणतोः

**अर्थ एव प्रधानः इति कौटिल्यः अर्थमूलौ हि धर्मकामौ इति ।**

—(कौटिलीय अर्थशास्त्र अध्याय ७)

"सर्वांत अर्थाचेंच महत्त्व अधिक आहे. कारण धर्म व काम शेवटीं अर्थावरच अवलंबून असतात. सैन्यबळ अधिक असलेल्याला मित्रराजानें जवळ करावें की अर्थबळ अधिक असलेल्याला ? सैन्य आणि अर्थ यांच्यांत श्रेष्ठ कोण ? याचा विचार करीत असतां कौटिल्यानें दिग्दर्शित केलेले पुढील विचार या दृष्टीनें पहाण्यासारखे आहेत. तो म्हणतो:–

**पुरुषभोगं हिरण्यभोगं वा मित्रमिति । 'पुरुषभोगं मित्रं श्रेयः, पुरुषभोगं मित्रं प्रतापकरं भवति । यदा चोत्तिष्ठते तदा कार्यं साधयति' इत्याचार्याः ।**

**नेति कौटल्यः । हिरण्यभोगं मित्रं श्रेयः, नित्यो हिरण्येन योगः कदाचिद् दण्डेन दण्डश्च हिरण्येनान्ये च कामाः प्राप्यन्त इति ।**

—(कौटिलीय अर्थशास्त्र अ. १०७)

"ज्याच्याजवळ पुष्कळ शूर लोक आहेत असा मित्र चांगला कीं ज्याच्याजवळ पुष्कळ संपत्ति आहे असा मित्र चांगला ? आमचे गुरु म्हणतात, ज्याच्याजवळ पुष्कळ शूर लोक आहेत तो चांगला. कारण तो आपल्या सैन्यासहित एकदां उठला कीं काम यशस्वी केल्याविना राहणार नाहीं असा पराक्रम तो गाजवितो. परंतु यावर कौटिल्य म्हणतो, तसें नाही. ज्याच्याजवळ भरपूर संपत्ति आहे तो चांगला. कारण पैशाचें काम नेहमीं लागतें. सैन्याचें काम नेहमींच लागतें असें नाहीं. त्यांतूनही पैसा असला म्हणजे सैन्य मिळतें आणि दुसरेंही हवें तें मिळतें."

**कोशदण्डव्यसनयोर्दण्डव्यसनम् इति कौणपदन्तः । दण्डमूलो हि मित्रामित्रनिग्रहः परदण्डोत्साहनं स्वदण्डप्रतिग्रहश्च । दण्डाभावे च ध्रुवः कोशविनाशः । कोशाभावे च शक्यः कुप्येन**

**भूम्या परभूमिस्वयंग्रहेण वा दण्डः पिण्डयितुम् । दण्डवता च कोशः । स्वामिनश्चासन्नवृत्तित्वादमात्यसधर्मा दण्ड इति ।**

**नेति कौटल्यः । कोशमूलो हि दण्डः । कोशाभावे दण्डः परं गच्छति, स्वामिनं वा हन्ति । सर्वाभियोगकरश्च । कोशो धर्मकामहेतुः । देशकालकार्यवशेन तु कोशदण्डयोरन्यतरः प्रमाणीभवति । लम्भपालनो हि दण्डः कोशस्य । कोशः कोशस्य दण्डस्य च भवति । सर्वद्रव्यप्रयोजकत्वात् कोशव्यसनं गरीय इति ।**

—कौटिलीय अर्थशास्त्र अध्याय ११७

"कौणपदंत म्हणतो : पैशाच्या अभावामुळें येणारी आपत्ति व सैन्याच्या अभावामुळें येणारी आपत्ति, यांत सैन्याची आपत्ति अधिक भयंकर होय. मित्रांवर व शत्रूवर सैन्यामुळें छाप बसते; शत्रूच्या सैन्यास सैन्याच्या जोरावर वश करतां येतें; राज्यांतील कारभार सैन्यावर चालतो. सैन्य नसेल तर तिजोरी गेली असें समजावें. तिजोरी नसली तरी खाणीतून अगर वनांतून कच्चा माल काढून, जमीन पेरून अथवा शत्रूची जमीन काबीज करून सैन्य जमवितां येतें. सैन्याच्या जोरावर पैसा मिळवितां येतो. राजाच्या सन्निध राहण्याच्या दृष्टीनें अमात्य व दंड यांच्यांत साधर्म्य आहे.

कौटिल्य म्हणतो : सैन्य पैशावर अवलंबून असतें. पैशाच्या अभावीं सैन्य शत्रूस जाऊन मिळतें. राजास मारतें; आणि अनेक विघ्नें उत्पन्न करतें. पैसा धर्माचरणास व मनोरथसिद्धीस कारणीभूत होतो. तथापि स्थलपरत्वें, कालपरत्वें, व कार्यपरत्वें कधीं पैसा तर कधीं सैन्य अधिक कार्यकारी ठरतें. सैन्याच्या जोरावर पैसा मिळवितां येईल व जतन करून ठेवितां येईल. पण मिळालेला पैसा व सैन्य दोन्ही पैशाच्या जोरावरच राखतां येतील. ज्या अर्थी पैशापासून सर्व कांहीं मिळतें, त्या अर्थी पैशाची आपत्ति अधिक भयंकर होय."

पांडवांचें सद्भाग्य असें कीं त्यांना अतिशय श्रेष्ठ असा मित्र मिळाला. सैन्य व धन या दोन्हींचें अपूर्व सामर्थ्य एकवटलेला

असा साहाय्यक त्यांना मिळाला. श्रीकृष्ण याप्रमाणें संकटकाळीं पांडवांच्या सर्वस्वीं उपयोगी पडले व त्यामुळें त्यांच्या विषयींच्या कृतज्ञतेच्या जाणिवेनें पांडव त्यांच्या सदैव लगामीं राहिले तरी पांडवांसारखे वीर पुरुष श्रीकृष्णांच्या हातांत स्वतःचें जीवन देऊन व सर्व प्रकारचा विनीत भाव धारण करून श्रीकृष्णांच्या महत् कार्याचें साधन म्हणून स्वतःचा वापर करूं द्यावयास कां सिद्ध झाले असतील? हा मोठाच प्रश्न आहे. संकटकाळांत विदुरही पांडवांच्या उपयोगी पडले होते. किंबहुना विदुर नसते तर लाक्षागृहदाहासारख्या प्रसंगांतून पांडवांची सुटका कधींही झाली नसती. अशा स्थितींत कृतज्ञतेचा भाव विदुराविषयीं पांडवांच्या अंतःकरणांत नसेल असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं. शिवाय महापराक्रमी, पूर्ण आत्माभिमान असलेले, भीति हा पदार्थ ठाऊक नसलेले, व दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी प्यावयास मनानेंच प्रतिकूल असलेले पांडव अगदीं यंत्राप्रमाणें श्रीकृष्णांच्या स्वाधीन झाल्याचें व त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत त्यांनीं सर्वस्वीं आत्मार्पण केल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. कालांतक महारुद्रासमोर सुद्धां मान न वाकविणारा पार्थ, मोडेन पण वाकणार नाहीं अशा मनोवृत्तीचा भीम, सर्व प्रकारच्या मोहाचा परित्याग केलेले युधिष्ठिर यांनीं एखाद्याच्या व्यक्तिमत्त्वांत आत्मार्पण करावें ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. काय म्हणून पांडवांनीं हें आत्मार्पण केलें? पहिल्याच भेटींत कांहीं तें घडलेलें नाहीं. तें हळुहळू घडलेलें आहे. आपल्यापेक्षां प्रत्येक गोष्टींत कितीतरी श्रेष्ठ असलेली महत्ता पांडवांच्या प्रत्ययास आली म्हणून श्रीकृष्णांच्या व्यक्तिमत्त्वासमोर पांडव नमले व त्यांच्या महत् कार्याचें साधनयंत्र बनून त्यांच्या इच्छाशक्तीनुरूप वागावयास ते सिद्ध झाले. श्रीकृष्णांचे हे महत्तम व्यक्तिविशेष अथवा विभूतिवैशिष्टयें काय आहेत हें पहाणें अवश्य आहे. श्रीकृष्ण हे महापुरुष होते, युगपुरुष होते व अवतारही होते. पांडवांच्या पहिल्या सहवासांत त्यांना त्यांचें महापुरुषत्व अथवा विभूतिमत्त्व प्रत्ययास आलें. तें काय आहे तें आपण पाहूं.

पांडव व विशेषत: श्रीकृष्णांचा सखा अर्जुन हा खऱ्या क्षात्र धर्माचा मूर्तिमंत आविष्कार असून त्याचा त्यासंबंधींचा आत्माभिमान अतिशय विलक्षण होता. त्या आत्माभिमानासाठीं त्यानें श्रीकृष्णांचा मेव्हणा व भोजकटाचा राजा रुक्मी ह्याचें साहाय्य सुद्धां नाकारलें असा इतिहास आहे. भगवान् श्रीकृष्णांच्यांत क्षात्र धर्म परिपूर्णावस्थेला गेलेला पांडवांना दिसून आला व त्यांच्या गुणविशेषांत किंबहुना प्रत्येक वैशिष्टयांत ते सर्वश्रेष्ठ आहेत असें आढळून आलें. म्हणून अर्जुनासारखा श्रेष्ठ क्षत्रिय त्यांच्यासमोर वाकला. श्रीकृष्णांचें पहिलें श्रेष्ठत्व त्यांच्या अद्वितीय पराक्रमांत त्याला दिसलें. भगवद्गीतेंत क्षत्रियाचीं स्वभाववैशिष्टयें सांगतांना तीं अशीं सांगितलीं आहेत कीं,

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥** –गीता अ. १८–४३

शौर्य, तेज, धैर्य, दक्षता, युद्धांत कधींही पाठ न दाखविणें, औदार्य व नियंत्रकत्वाची भावना हें क्षत्रियाचें स्वभावैशिष्टय होय. क्षत्रिय म्हटला कीं तो या गुणांचा अथवा वैशिष्टयांचा प्रतिनिधि असला पाहिजे. भगवान् श्रीकृष्ण हे तत्कालीन सर्व समाजांत या दृष्टीनें सर्वश्रेष्ठ होते.

## श्रीकृष्णांचें शौर्य

आपण क्रमानें या एकेका वैशिष्टयाचा विचार करूं. क्षत्रियाचें श्रेष्ठत्व सांगतांना व त्या विषयांत श्रीकृष्ण सर्वांत श्रेष्ठ कसे आहेत हें स्पष्ट करतांना राजसूय यज्ञाच्या वेळीं त्यांच्या अग्रपूजेचें समर्थन करतांना भीष्म म्हणतात :

**क्षत्रियः क्षत्रियं जित्वा रणे रणकृतां वरः ।**
**यो मुञ्चति वशे कृत्वा गुरुर्भवति तस्य सः ॥ ७**
**अस्यां हि समितौ राज्ञामेकमप्यजितं युधि ।**
**न पश्यामि महीपालं सात्वतीपुत्रतेजसा ॥ ८**

–(महाभारत, सभापर्व अ. ३८)

"क्षत्रियानें युद्धांत क्षत्रियाला जिंकून व आपल्या स्वाधीन करून घेऊन जर त्याला जिवंत सोडलें तर या स्थितींत विजेता हा निःसंशय श्रेष्ठ समजला जातो. राजसूय यज्ञाच्या निमित्तानें येथें जमलेल्या या विशाल राजसमुदायांत भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या पराक्रमानें ज्याला जिंकलें नाहीं असा एकही राजा वा क्षत्रिय मला दिसत नाही. म्हणून सर्व क्षत्रियांत श्रीकृष्ण सर्वांत श्रेष्ठ आहेत."

श्रीकृष्णांच्या पराक्रमाचा व त्यांच्या यशस्वी विजेतृत्वाचा तत्कालीन सर्वच लोकांना विलक्षण प्रत्यय आहे. राजनीतिकुशल विदुर द्रौपदीस्वयंवरांत प्रकट झालेल्या पांडवांच्यावर एकदम चढाई करून त्यांना जिंकण्याची कल्पना मनांत आणणें देखील मूर्खपणाचें कसें आहे हें धृतराष्ट्राला समजावून सांगतांना म्हणतो :

**बलवन्तश्च दाशार्हा बहवश्च विशांपते ।**
**यतः कृष्णस्ततः सर्वे यतः कृष्णस्ततो जयः ॥ २६**

–(महाभारत, आदिपर्व अ २०५)

"यादव बलवान् व पुष्कळ आहेत. श्रीकृष्ण जो पक्ष धरील तोच यादवही धरतील हे निश्चित आहे. अशा स्थितीत जिकडे श्रीकृष्ण त्याच पक्षाचा विजय होणार ही गोष्ट निश्चित असल्यामुळें या वेळीं श्रीकृष्णांनी पांडवांचा पक्ष उचलून धरलेला आहे ही गोष्ट ध्यानांत घेऊन त्यांच्यावर चढाई करण्याची कल्पना आत्मघातकीपणाची आहे हें नीट ध्यानांत बाळगून ती सोडून द्यावी."

नरोत्तम म्हणून महाभारतकारांनी ज्याला वाखाणलें व ज्याच्या पराक्रमांच्या वर्णनानें, इंद्राच्या वर्णनानें जशी ऋग्वेदाचीं, तशींच महाभारताचीं बहुसंख्य पृष्ठें व्यापिलेली आहेत, त्या अर्जुनाच्या अंतःकरणांत सुद्धां श्रीकृष्णांच्या पराक्रमाविषयी व शौर्याविषयीं विलक्षण प्रत्यय असलेला दृष्टीस पडतो. किंबहुना यासंबंधांत असलेलें श्रीकृष्णांचें श्रेष्ठत्व त्याच्या अंतःकरणाला इतका मोह उत्पन्न करतें कीं, अशा पराक्रमी पुरुषाला सखा म्हणून आपण संबोधूं शकतों या गोष्टीचेंच त्याला विलक्षण महत्त्व वाटतें. खांडववनप्रकरणांत श्रीकृष्णांच्या विषयीं विश्वास देतांना अर्जुन म्हणतो :–

**चक्रपाणिर्हृषीकेशो विचरन्युधि वीर्यवान् ।**
**चक्रेण भस्मसात्सर्वं विसृष्टेन तु वीर्यवान् ।**
**त्रिषु लोकेषु तन्नास्ति यन्न कुर्याज्जनार्दनः ॥ ३१**

–(महाभारत, आदिपर्व अ. २२५)

"चक्रपाणि हृषिकेश, हातांत आपले चक्र घेऊन रणक्षेत्रांत उतरला म्हणजे तो चक्रानें जे भस्मसात् करणार नाही असें जगांत कांहींही नाही." पराक्रमी श्रीकृष्णाच्या अद्वितीय शौर्याविषयी अर्जुनाच्या अंतःकरणांत केवढा विलक्षण आत्मप्रत्यय आहे याचें निदर्शन उद्योगपर्वांत (अ. ४८–६९ ते ८८) संजयाला निरोप देतांना त्यानें जें भाषण केले आहे त्यांत दृष्टीस पडतें. तो संजयाला म्हणतोः–

"मला जर कोणी असें विचारले कीं या युद्धांत वज्रपाणि महेंद्र व श्रीकृष्ण यांतून तुला कोण साहाय्यक हवा तर वज्रपाणि महेंद्राऐवजीं मी श्रीकृष्णानाच माझा साहाय्यक निवडीन. सुदैवानें तो श्रीकृष्ण मला या युद्धांत साहाय्यक मिळाला आहे. देव मला साहाय्यक आहे इतकाच याचा अर्थ आहे. प्रत्यक्ष युद्ध न करतांदेखील केवळ मनानें श्रीकृष्ण ज्याच्या जयाची इच्छा करील त्याचे विरोधक शत्रू म्हणून महेंद्रासहित सारे देव व मानव एकवटून उभे राहिले तरीही त्या पुरुषाचाच जय होईल. आम्ही युद्ध करून कृष्णाला जिंकू अशी जर तुमची कल्पना असेल तर ती निव्वळ मूर्खपणाची आहे. अगाध समुद्राला पोहून तरून जाण्याची इच्छा जितकी आत्मघाताची तितकीच तेजस्वी व शूर श्रीकृष्णाला युद्धांत जिकण्याची इच्छाही आत्मघाताची व खुळेपणाचीच आहे. चंद्र, सूर्य व अग्नि यांना आपल्या हातानें निवारण करण्याची इच्छा करणें किवा युद्धांत देवांजवळून अमृत हरण करण्याची इच्छा बाळगणें व युद्धांत श्रीकृष्णाला शौर्याच्या भरवंशावर जिकण्याची इच्छा करणें या गोष्टी समान आहेत. त्यानें एकटयानें सर्व राजांचा पराभव करून रुक्मिणीच्या विवाहप्रसंगीं आपला पराक्रम प्रकट केला. नग्नजित् राजाच्या दुष्ट पुत्रांनीं शीलवान् व देवांनीही ज्याला वाखाणावें अशा सुदर्शनाला बंदींत ठेवलें असतां कृष्णानें केवळ

एकटयानेंच गांधार देशांतील लोकांचा संहार करून व नग्नजिताच्या पुत्रांना जिंकून सुदर्शनाला सोडविलें. केवळ छातीच्या धक्क्यानेंच यानें पांड्याला ठार मारलें. कलिंग देशांतील लोकांचा संहार यानेंच केला. काशीनगरी ह्यानें उद्ध्वस्त केल्यावर कित्येक दिवसपर्यंत ती पुन्हां वसली नाहीं. सर्व योद्धयांत अजिक्य ठरलेल्या निषादराज एकलव्याला यानें द्वंद्वयुद्धांत ठार मारलें. जंभासुराचें तर शिलेच्या एकाच आघातानें ह्यानें चूर्ण केलें. अगदीं लहानग्या वयांत भरसभेंत कंसाला ठार मारून व उग्रसेनाला राज्य देऊन आपलें कर्तृत्व व आपला पराक्रम यानें सर्व जगांत प्रस्थापित केला आहे. विख्यात पराक्रमी शाल्व कूटयुद्ध करून याला जिंकावयास आला असतांना ह्याच्याच क्रोधाग्नीत तो स्वतःची आहुति देऊन भस्मसात् झाला. प्राग्ज्योतिषपुरावर चढाई करून देवांनाही अजिक्य झालेल्या नरकासुराला ह्यानें ठार मारलें व त्यानें पळविलेलीं अदितीचीं कुंडलें तिला परत आणून दिलीं. मुर दैत्याला ठार मारून व अंगावर चालून आलेल्या सर्व दैत्यसंघाला भस्मसात् करून सहा हजार दुष्ट शत्रूंची यानें एकटयानें कत्तल उडविली. त्या युद्धांतील याचा विलक्षण पराक्रम पाहून युद्धाचे श्रम तुला बाधूं शकणार नाहीत व शस्त्रांचा व्रण तुला होऊं शकणार नाहीं असें देवांनींच याला वरदान दिलें. अशा या महाबल, अप्रमेय, असह्य, अनंतवीर्य कृष्णाला जिंकण्याची दुर्योधन इच्छा करतो काय ?"

किंबहुना श्रीकृष्णांच्या विरोधी पक्षांत असलेल्या लोकांचीही त्यांच्या शौर्याविषयीं व पराक्रमाविषयी अशीच विलक्षण निश्चिति आहे. "आपल्या शक्तीच्या भरंवशावर मी कोणालाही ठार मारूं शकेन व म्हणून माझ्या भरंवशावर तूं निश्चित राहा" असे दुर्योधनाला युद्धासाठीं वारंवार उत्तेजन देत असतांना सांगणाऱ्या कर्णाला महेंद्रानें दिलेल्या त्याच्या शक्तीचा सहजपणें घात करूं शकणारी पराक्रमी व्यक्ति म्हणून भीष्मांनीं श्रीकृष्णांचेंच नांव सुचविलें आहे. कोणाच्याही रागालोभाची पर्वा न करतां त्यांच्या योग्यतेविषयीं व पराक्रमाविषयीं निःस्पृहपणें योग्य तेंच मत प्रदर्शित करणारे भीष्म कर्णाला उत्तर देतांना म्हणतात :—

यां चापि शक्ति त्रिदशाधिपस्ते ददौ महात्मा भगवान् महेन्द्रः ।
भस्मीकृतां तां समरे विशीर्णां चक्राहतां द्रक्ष्यसि केशवेन ॥ ९
बाणस्य भौमस्य च कर्ण हन्ता किरीटिनं रक्षति वासुदेवः ।
यस्त्वादृशानां च वरीयसां च हन्ता रिपूणां तुमुले प्रगाढे ॥ ११
—(महाभारत, उद्योगपर्व अ. ६२)

"देवांचा अधिपति महेंद्र यानें तुला जी अमोघ शक्ति दिली आहे तिचा घात पांडवसैन्यांत कोणीही करूं शकणार नाहीं असें तुला वाटत असेल तर तो तुझा निव्वळ भ्रम आहे. आपल्या सुदर्शन चक्रानें स्वत: श्रीकृष्ण तुझ्या त्या अमोघ शक्तीचे तुकडेतुकडे करून तिचें भस्म करील याचा तूं कांहीं विचार केला आहेस काय? अर्जुन एकटा आहे व म्हणून शक्तीचा उपयोग करून तू त्याचा पराभव करूं शकशील असें जर तुला वाटत असेल तर तें चुकीचें आहे. बाणासुर व नरकासुर यांना ठार मारणारा आणि भयानक युद्धांत तुझ्यासारख्याच काय पण तुझ्यापेक्षांही अधिक पराक्रमी असलेल्या लोकांना सहजपणें ठार मारणारा श्रीकृष्ण अर्जुनाचा संरक्षक आहे ही गोष्ट तुला विसरतां येणार नाहीं."

भीष्मांचें हें उत्तर ऐकल्यावर कर्ण स्वत: काय म्हणाला तेंही विचारांत घेण्यासारखें आहे. गर्व व ताठा यांचा मूर्तिमंत पुतळा असलेला आणि केवळ आत्मश्लाघा हाच ज्याचा स्थायी भाव बनून राहिला होता तो कर्ण स्वत:ची अमोघ शक्ति श्रीकृष्ण तुकडे करून नष्ट करूं शकतील या भीष्मांच्या उद्‌गारांवर असें म्हणतो कीं,

असंशयं वृष्णिपतिर्यथोक्तस्तथा च भूयांश्च ततो महात्मा ॥ १२
—(महाभारत, उद्योगपर्व अ. ६२)

"तुम्हीं जें श्रीकृष्णांविषयीं म्हणालात तें नि:संशय खरें आहे. श्रीकृष्ण इतका सामर्थ्यसंपन्न आहेच, किंबहुना यापेक्षांही तो अधिक सामर्थ्यसंपन्न आहे."

पण पुढें कर्णानें असें म्हटलें आहे कीं, हें जरी सारें खरें असलें तरी माझा तुम्हीं भरसभेंत अपमान करीत आहांत म्हणून मी तुमचा निषेध म्हणून हें सभास्थान सोडून येथून निघून जातों.

स्वतःच्या एकटयाच्या भरंवशावर श्रीकृष्णांनी शाल्वाशीं त्याच्या सैन्यासहित टक्कर दिली व त्याला ठार मारलें. या त्यांच्या कृत्याचें विस्तारपूर्वक वर्णन महाभारताच्या वनपर्वांत आढळतें. युद्धाच्या प्रत्येक कलेंत ते तत्कालीन कोणत्याही पुरुषापेक्षां अधिक श्रेष्ठ असून त्यांचीं आयुधें नुसतीं पेलणें सुद्धां इतरांना अशक्य आहे. स्वतः श्रीकृष्णांनींच आपल्या तोंडानें महाभारताच्या सौप्तिक पर्वांत (अ. १२–११ते२४) यासंबंधाची एक गोष्ट सांगितली आहे. श्रीकृष्ण युधिष्ठिराला म्हणातात :–

"हे राजन्, तू वनांत असतां हा अश्वत्थामा द्वारकेंत येऊन राहिला. यादवांनीं त्याचा मोठा आदरसत्कार केला. एकदा द्वारकेंत मी समुद्रतीरावर एकांतांत असतां हा माझ्याकडे आला व मला म्हणूं लागला कीं, हे श्रीकृष्णा, अत्यंत उग्र तपश्चर्या करून अगस्त्या-पासून कुरुपांडवांचे आचार्य यांनी जे ब्रह्मशिरस् नांवाचें देव-गंधर्वांनीं पूजिलेलें अस्त्र मिळविलें तें अस्त्र पित्याप्रमाणेंच मलाही येतें. तें दिव्य अस्त्र तू माझ्याजवळून घे व त्याच्या मोबदल्यांत शत्रूंना ठार मारणारें तुझें सुदर्शन चक्र तू मला दे. वारंवार तो ज्या वेळीं मला हें म्हणू लागला त्या वेळी मी त्याला असें सांगितलें कीं, देव, दानव, गंधर्व, मनुष्य, पक्षी, सर्प यांचें सामर्थ्य माझ्या सामर्थ्याच्या शतांशसुद्धां नाही. हें धनुष्य, ही शक्ति, हें चक्र, ही गदा, येथें आहेत. माझ्या या सर्व आयुधांपैकी तुला जें हवें असेल तें तूं खुशाल घे. जें शस्त्र तू उचलू शकशील व रणांत ज्याचा तूं सहज वापर करूं शकशील असें कोणतेंही शस्त्र तू खुशाल घे. मला त्याच्या मोबदल्यांत तुझ्याजवळून कांहींही नको. तसेंच तू शस्त्र घ्यावयास माझा नकार नाही. त्या उन्मादी अश्वत्थाम्यानें तेथें असलेल्या सहस्र धारेच्या सुदर्शन चक्राला एकदम उठून हात घातला. त्यानें डाव्या हातानें तें चक्र उचलण्याचा प्रयत्न केला, पण तें जागचें हाललें सुद्धां नाहीं. शेवटीं उजवा हातही डाव्या हाताला साहय देऊन व दोन्हीं हातांनीं सारें बळ एकवटून दांतओंठ खात तो सुदर्शन उचलूं लागला. तरीही तें त्याला उचलणें व पेलणें

अशक्य झालें. त्यामुळें तो खिन्न झाला व थकून त्या कर्मापासून निवृत्त झाला."

सर्व प्रकारच्या युद्धकलेंत श्रीकृष्ण हे श्रेष्ठ होते. प्रत्यक्ष धनुर्विद्येंत सुद्धां अर्जुनापेक्षां ते अधिक श्रेष्ठ होते. श्रीमत् भागवतांत ( दशमस्कंध अ. ८३–१९ ते २६ ) त्यांच्या धनुर्वेद-कौशल्याची एक सुन्दर गोष्ट आलेली आहे. श्रीकृष्णांच्या अष्ट नायिकांपैकीं लक्ष्मणा नांवाची एक पत्नी आहे. मद्रदेशचा राजा बृहत्सेन याची ही मुलगी. तिच्या स्वयंवराच्या वेळीं द्रौपदीच्या स्वयंवराप्रमाणेंच मत्स्ययंत्राचा पण होता. पण द्रौपदीच्या स्वयंवरांतील मत्स्यवेधापेक्षांही हा मत्स्यवेध अधिक कठिण होता. त्याचें वर्णन व तेथील प्रसंगांत श्रीकृष्णांचें धनुर्विद्येंतील कुशलतेचें वृत्त स्वत: लक्ष्मणेनेंच द्रौपदीला प्रभास क्षेत्रावर सांगितलें आहे. ती द्रौपदीला म्हणते :

" हे द्रौपदी ज्याप्रमाणें तुझ्या स्वयंवराचे वेळीं तुला अर्जुनच पति मिळावा या बुद्धीनें मत्स्ययंत्र केलें होतें, तसेंच एक यंत्र माझ्या स्वयंवराचे वेळीही करविलें होतें. मात्र त्यांत भेद एवढाच होता कीं, तुझ्या वेळचा मत्स्य बाहेरूनच केवळ झाकलेला होता. ( त्याच्या खालीं उभे राहणाऱ्याला फक्त तो दिसत होता.) पण माझ्या वेळचा मत्स्य प्रत्यक्ष असा कोठूनही दिसणारा नसून त्याचें प्रतिबिब मात्र पाण्यांत दिसत होतें. हा पण ऐकल्यावर अनेक राजांनीं त्या स्पर्धेत भाग घेतला. परंतु कित्येकांनीं धनुष्य हातीं घेतल्यावर त्यावर दोरी चढवित्तां येईना म्हणून तें तसेंच सोडून दिलें. कित्येकांनीं दोरी धनुष्याच्या टोकापर्यंत ओढली, पण इतक्यांत तें निसटून त्याचा भार छातीवर पडल्यामुळें ते पटकन् खालीं बसले. दुसरे जरासंध, अंबष्ठ, शिशुपाल, भीम, दुर्योधन, कर्ण इत्यादि मोठमोठे पराक्रमी वीर धनुष्याला कशीबशी दोरी लावून उभे राहिले. पण तो मत्स्य कोठें असावा हें त्यांच्या ध्यानांत येईना. अर्जुनानें मात्र मत्स्याचें प्रतिबिंब पाण्यांत पाहून तो मत्स्य कोठें असावा हें ठरविलें आणि सावधपणें बाण सोडला. पण तो मत्स्याचा वेध न करतां त्याला केवळ स्पर्श करून गेला. याप्रमाणें मोठमोठ्या क्षत्रियांचा मानभंग होऊन ते परत गेले असतां भगवान् श्रीकृष्ण

पुढें आले आणि त्यांनीं धनुष्य हातांत घेऊन त्यावर सहजपणें दोरी चढविली व त्या धनुष्यावर बाण चढवून एकदांच त्यांनीं मत्स्याच्या पाण्यांतील प्रतिबिंबाकडे पाहिलें आणि सूर्य अभिजित् नक्षत्रामध्यें स्थिर असतां बाणानें त्या मत्स्याचा वेध करून त्याला खालीं पाडलें."

मल्ल व गदा युद्धांतही श्रीकृष्ण तसेच प्रवीण होते. करुष देशाचा राजा वक्रदंत याला त्यांनी गदायुद्धांतच ठार मारलें आहे. लहान वयांत हत्तीशीं झुंज घेऊन त्याला ठार करणें व चाणूर, शल, तोषल यांच्यासारख्या विख्यात मल्लांना मल्लयुद्धांतच यमसदनांत पाठविणें हें त्यांच्या मल्लयुद्धांतील प्रावीण्याचें केवढें मोठें निदर्शन आहे! त्यांच्या या श्रेष्ठपणामुळें त्या त्या विषयांत ते अनेकांच्या स्पर्धेचा विषय झाले होते. एरवी कर्णाचें सारथ्य करावयास मुळींच सिद्ध नसलेला शल्य केवळ श्रीकृष्णापेक्षांही तूं श्रेष्ठ आहेस असें दुर्योधनानें म्हणतांच कर्णाचें सारथ्य करावयास सिद्ध झाला. तो स्वतःच दुर्योधनाला असें म्हणतो की,

**यन्मां ब्रवीषि गान्धारे मध्ये सैन्यस्य कौरव ।**
**विशिष्टं देवकीपुत्रात् प्रीतिमानस्म्यहं त्वयि ।। ६३**

—(महाभारत, कर्णपर्व अ. ३२)

हे गांधारीपुत्रा, सर्व सैन्याच्या मध्यें तूं मला देवकीपुत्र श्रीकृष्णांपेक्षांही अधिक श्रेष्ठ आहेस असें म्हणतोस, त्या अर्थीं मी तुझ्यावर अत्यंत प्रसन्न आहें."

अर्जुनाच्या सुद्धां अंतःकरणांत श्रीकृष्णांच्या या अपूर्व पराक्रमामुळें तापद नव्हे, पण लोभनीय स्पर्धा होती हें स्वतः श्रीकृष्णांनींच त्याला म्हटलें आहे. अर्जुन ज्या वेळी श्रीकृष्णांना तुम्ही युद्ध न करतां सारथ्य करा असें म्हणूं लागला त्या वेळीं श्रीकृष्णांनीं त्याला असें म्हटलें की,

**उपपन्नमिदं पार्थ यत्स्पर्धसि मया सह ।**
**सारथ्यं ते करिष्यामि कामः सम्पद्यतां तव ।। ३८**

—(महाभारत, उद्योगपर्व अ. ७)

"हे पार्था, तूं माझ्याशीं स्पर्धा करीत आहेस हें योग्यच आहे. मी तुझें सारथ्य अवश्य करीन. तुझी इच्छा सफळ होऊं दे."

एकही असें शस्त्र नाहीं व अस्त्र नाहीं कीं ज्याचें निवारण व प्रतिकार करणें भगवान् श्रीकृष्णांना अशक्य आहे. या विलक्षण पराक्रमाला अनुरूप अशी अतिशय श्रेष्ठ आत्मप्रतीतीही त्यांच्या ठिकाणीं आहे. महाभारतांत ठिकठिकाणीं त्यांच्या या शौर्याच्या व सामर्थ्याच्या आत्मप्रतीतीचीं उदाहरणें विखुरलेलीं आढळतात. "कौरवांच्या राजसभेंत तूं एकटा गेलास तर शत्रूंच्या तावडींत तूं सांपडशील व ते तुला अपाय करतील" असें युधिष्ठिरानें म्हणतांच त्याला उत्तर देतांना श्रीकृष्ण म्हणतात:

**अथ चेत्ते प्रवर्तेत मयि किञ्चिदसाम्प्रतम् ।**
**निर्दहेयं कुरून् सर्वानिति मे धीयते मतिः ॥ ८७**

--(महाभारत, उद्योगपर्व अ. ७२)

"जर ते मला कांहीं अपाय करण्यास धजले तर मग वेगळें युद्ध करावयाचें कांहीं कारणच उरणार नाहीं. सर्व कौरवांना त्यांच्या साहाय्यकांसहित मीच जाळून टाकीन." हीच शंका हस्तिनापुरांत ते गेल्यावर विदुरानें त्यांना बोलून दाखविली असतां ते विदुराला म्हणतात:

**न चापि मयि पर्याप्ताः सहिताः सर्वपार्थिवाः ।**
**क्रुद्धस्य प्रमुखे स्थातुं सिंहस्येवेतरे मृगाः ॥ २१**

--(महाभारत, उद्योगपर्व अ. ९३)

"हे सर्व राजे एकत्र जरी आले तरी ते मला पुरे पडूं शकणार नाहींत. सिंहाच्या समोर क्षुद्र हरिणांचें टोळकें जसें टिकूं शकत नाहीं तसेंच हेही माझ्यासमोर टिकूं शकणार नाहींत. त्यांच्या विलक्षण आत्मप्रत्ययाचें एक उदाहरण भीष्मपर्वांत आहे. (अ. १०७-२८ ते ३१) युद्धाच्या नवव्या दिवशीं पांडव पक्षांतील वीरांचा अगणित संहार झालेला पाहून व कोणीही भीष्मासमोर टिकूं शकत नाहीं असें पाहून खिन्न झालेल्या युधिष्ठिराला श्रीकृष्ण म्हणाले:

"हे पांडवा, मलाच तूं सेनापति म्हणून कां नियुक्त करीत नाहींस? मी भीष्मांशीं युद्ध करतों. तूं म्हटल्यावर मी युद्धांत काय करणार नाहीं? आव्हानपुरःसर सर्व कौरव पहात असतां त्या

पुरुषश्रेष्ठ भीष्माला अर्जुनाची इच्छा नसली तर मी स्वतः ठार मारतों. भीष्माच्या मृत्यूत तुझा जय आहे असें तुला वाटत असेल तर मला सांग. मी द्वंद्वयुद्धांत अगदीं एकटा जाऊन भीष्मांना ठार मारीन. महेंद्राप्रमाणें तळपणारा माझा पराक्रम तूं पहाच. "एका-हून एक महास्त्रांचा प्रयोग करीत भीष्मांना ठार करून मी रथांतून खाली पाडीन."

परशुरामाशीं चोवीस दिवसपर्यंत अहोरात्र युद्ध करणाऱ्या भीष्मांसारख्या सर्वश्रेष्ठ धनुर्धरालासुद्धां द्वंद्वयुद्धांत ठार करणें ही श्रीकृष्णांना एक सामान्य गोष्ट वाटत होती. एकही युद्ध असें नाहीं की ज्यांत श्रीकृष्णांचा पराभव झाला आहे व त्यांनीं समोरच्या शत्रूशी युद्ध चालू असतां त्याला पाठ दाखविली आहे. हें माझें विधान ऐकून कोणाला आश्चर्य वाटेल. कारण की जरासंधाच्या युद्धांत श्रीकृष्ण राजधानी सोडून पळून गेल्याचा मी उल्लेख केला आहे. तसेंच कालयवनालाही त्यांनी पाठ दाखविली आहे. पण त्या वेळचे प्रश्न थोडेसे भिन्न आहेत. सामुदायिक पद्धतीचें युद्ध व द्वंद्वयुद्ध यांत फरक असतो व क्षत्रियाचा खरा पराक्रम द्वंद्वयुद्धांतच कसास लागतो. त्यामुळें व्यक्तिगत शौर्य व पराक्रमाचें निर्णायक असें तेंच युद्ध होय. शिवाय जरासधाच्या अगणित सेनासागराशीं अनेकवार टक्कर देऊन स्वतःचें सैन्य त्याच्यासमोर सागरासमो-रच्या ओहोळासारखे असतांना देखील श्रीकृष्णांनी सतरा वेळां त्याचा पराभव केला हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. राजधानी बदलण्याचें त्यांचें खरें कारण मी विस्तारानें या पूर्वीच्या व्याख्यानांत दिलें आहे. नागरजीवन उद्ध्वस्त होऊं नये हें तें कारण होय. काल-यवनालामुद्धां पळून जाण्याच्या युक्तीनें त्यांनी रणक्षेत्रापासून दूर नेलें त्याचेंही कारण आपण सामुदायिकरीत्या युद्धांत गुंतलों तर पिछाडीवरून चढाई करून जरासंध मथुरा बेचिराख करील असें त्यांना वाटत होतें हेंच होय हें मी मागें दर्शविलेंच आहे. संताजी घोरपड्यासारखे रणमर्द औरंगजेबाच्या तंबूचे सोन्याचे कळस कापून आणण्याइतके समर्थ असतांना सुद्धां अफाट व अगणित सैन्यबळाचा व त्यांनीं होणाऱ्या व्यापक दुष्परिणामांचा विचार

करूनच छत्रपति राजारामाला जिंजीस राजधानी न्यावी लागलेली आहे. व्यक्तिगत शौर्याच्या दृष्टीनें विचार केला तर जरासंधा-सारख्या मल्लयुद्धांत व गदायुद्धांत अत्यंत प्रवीण असलेल्या व्यक्तीला देखील श्रीकृष्णांनीं मल्लयुद्धाचें आव्हान दिलें आहे. भीम, अर्जुन व श्रीकृष्ण जरासंधाकडे गेले असतां श्रीकृष्णांनीं त्याला स्वत:शीं द्वंद्वयुद्ध खेळावयास देखील संधि दिलेली आहे. 'तूं भीमाशीं द्वंद्वयुद्ध कर' असें श्रीकृष्ण त्याला म्हणाले नाहींत. तर त्यानेंच द्वंद्वयुद्धासाठीं भीमाची मागणी केली. महाभारतकार म्हणतात :—

**त्रयाणां केन ते राजन्योद्धुमुत्सहते मनः ।**
**अस्मदन्यतमेनेह सज्जीभवतु को युधि ॥ २**
**एवमुक्तः स नृपतिर्युद्धं वव्रे महाद्युतिः ।**
**जरसन्धस्ततो राजा भीमसेनेन मागधः ॥ ३**

—(महाभारत, सभापर्व अ. २३)

"श्रीकृष्ण जरासंधाला म्हणाले, आम्हां तिघांपैकीं ज्या कोणाशीं तुला द्वंद्व खेळावयाचें असेल त्याचें नांव सांग. तूं म्हणशील तो सज्ज होईल." श्रीकृष्णांचें हें वाक्य ऐकतांच जरासंधानें भीमाची निवड केली."

## श्रीकृष्णांचें तेज

क्षत्रियाच्या या विशेष गुणाचा श्रीकृष्णांच्या ठिकाणीं जसा परिपूर्ण आविष्कार होता तसाच तो इतर गुणांच्याही संबंधांत होता. शौर्य, पराक्रम, व आत्मप्रतीति यांच्यासमवेतच तेज हा जो क्षत्रियाच्या सहज गुणाचा विशेष त्याचेंही भगवान् श्रीकृष्णांच्या ठिकाणीं परिपूर्ण रूप पहावयास मिळतें. तेज या शब्दाचे दोन अर्थ केले जातात. एक अन्याय सहन न करण्याची प्रवृत्ति व दुसरा सभोंवारच्या सर्व व्यक्तींत नक्षत्रमालेंतील सूर्याप्रमाणें असें चमकून उठणें कीं, ज्यामुळें त्या प्रभावासमोर इतरांचा प्रभाव लोपून जावा. पहिल्या अर्थानें घेतलें तर श्रीकृष्णांचें सर्व जीवन हें अन्यायाविरुद्ध

झगडण्यांतच गेलेलें आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं वयाच्या अगदीं लहानग्या अवस्थेपासून अन्यायाचा प्रतिकार करावयास प्रारंभ केलेला आहे. गोकुळांतील कालियाला हांकलून देणें, कंसाचा वध, नरकासुराचें निर्दलिन, भारतीय राजसंघाशीं त्यांनीं दिलेले लढे, हीं सर्व त्याचींच निदर्शनें होत. अन्यायाची त्यांना केवढी विलक्षण चीड असे याची महाभारतांतील त्यांचे कांहीं उद्गार उत्कृष्ट साक्ष देतात.

दुर्योधनानें कपटानें व अन्यायानें द्यूतांत फसवून पांडवांचें राज्य गिळंकृत केल्यानंतर ते ज्या वेळी वनांत गेले त्या वेळीं ती वार्ता ऐकून शाल्वाच्या लढाईतून नुकतेच मोकळे झालेल्या श्रीकृष्णांनीं युधिष्ठिराची भेट घेतली तेव्हां त्यांनी पहिल्या भेटींतच युधिष्ठिरा-समक्ष जे उद्गार काढले ते असे आहेत कीं,

**दुर्योधनस्य कर्णस्य शकुनेश्च दुरात्मनः ।**
**दुःशासनचतुर्थानां भूमिः पास्यति शोणितम् ॥ ५**
**एतान्निहत्य समरे ये च तस्य पदानुगाः ।**
**तांश्च सर्वान् विनिर्जित्य सहितान् सनराधिपान् ॥ ६**
**ततः सर्वेऽभिषिञ्चामो धर्मराजं युधिष्ठिरम् ।**
**निकृत्योपचरन्वध्य एष धर्मः सनातनः ॥ ७**

—(महाभारत, वनपर्व अ. १२)

"दुर्योधन, कर्ण, दुरात्मा शकुनि व दुःशासन यांचें पृथ्वी रक्त प्यायल्यावांचून राहाणार नाहीं. त्यांना व त्यांच्या अनुचरांना ठार मारून आणि त्यांच्या सर्व साहाय्यकर्त्या राजांना जिंकून धर्मराज युधिष्ठिराला आपण सिंहासनावर बसवून अभिषेक करूं. सज्जनाशीं कपटानें विद्रोह करणाऱ्या नीचांना ठार मारणें हाच धर्म आहे."

शेवटीं द्रौपदी ज्या वेळीं आपल्यावर झालेल्या अन्यायांची व स्वतःच्या दुर्दैवाच्या दशावतारांची कहाणी श्रीकृष्णांना सांगूं लागली त्या वेळीं अंतःकरण करपून गेलेले भगवान् तिला म्हणाले :—

**रोदिष्यन्ति स्त्रियो ह्येवं येषां क्रुद्धासि भाविनि ।**
**बीभत्सुशरसंछन्नाञ्छोणितौघपरिप्लुतान् ॥ १२८**
**निहतान् वल्लभान् वीक्ष्य शयानान् वसुधातले ।**
**यत्समर्थं पाण्डवानां तत्करिष्यामि मा शुचः ॥ १२९**

**सत्यं ते प्रतिजानामि राज्ञां राज्ञी भविष्यसि ।**
**पतेद्द्यौर्हिमवाञ्छीर्येत् पृथिवी शकलीभवेत् ॥ १३०**
**शुष्येत्तोयनिधिः कृष्णे न मे मोघं वचो भवेत् ॥ १३१**
–(महाभारत, वनपर्व अ. १२)

"द्रौपदी, आज तूं ज्याप्रमाणें रडते आहेस त्याचप्रमाणें अर्जुनाच्या बाणांनीं तुकडे झालेल्या व रक्ताच्या थारोळ्यांत पडलेल्या आपल्या मृत पतींना पाहून, तू ज्यांच्यावर रागावली आहेस त्यांच्याही स्त्रिया अशाच रडतील. शोक आवर. पांडवांच्या इभ्रतीला योग्य असेंच मी घडविल्याविना कधींही राहणार नाहीं. तुला मी वचन देतों. तूं सम्राज्ञी होशील. कदाचित् हिमालय विरून जाईल, पृथ्वीचे तुकडे उडतील, समुद्र कोरडा होईल, पण माझें वचन कधींही मिथ्या व्हावयाचें नाहीं."

अन्यायानें पांडवांचें राज्य गिळंकृत केल्यानंतर त्या आपल्या अपकृत्याचा पश्चात्ताप होण्याऐवजीं वाटाघाटींचा घोळ घालून पांडवांनाच धर्मोपदेश करावयास निघालेल्या धृतराष्ट्राची भगवान् श्रीकृष्णांना इतकी चीड आली होती कीं, शेवटीं आपला काय निरोप आहे म्हणून संजय जेव्हां त्यांना विचारावयास आला, तेव्हां त्याला उत्तर देतांना (उद्योगपर्व अ. ५९–१८ ते २४) श्रीकृष्ण म्हणतात कीं,

"हे संजया, स्वतःला फार बुद्धिमान् समजणाऱ्या राजा धृतराष्ट्राला, कुरुमुख्य भीष्म व द्रोणाचार्य ऐकत असतां, सर्व वडील मंडळींना आमचा नमस्कार व धाकट्यांना कुशल विचारलें आहे असें सांगून माझा पुढीलप्रमाणें निरोप सांग. त्यांना तूं असें सांग कीं, विविधप्रकारचे जे जे यज्ञ करावयाचे असतील ते ते सर्व उरकून घ्या. ब्राह्मणांना जीं काय दानें व दक्षिणा द्यावयाच्या असतील त्या देऊन टाका. संसारांत आपल्या मुलांसहित व स्त्रियांसहित जो काय आनंद उपभोगावयाचा असेल तो एकदां उपभोगून घ्या. कारण पुन्हां अशी संधि मिळणार नाहीं. संकटाचा वणवा तुमच्यासाठीं असा धगधगून पेटला आहे कीं त्यांत तुमची राख झाल्याविना राहणार

नाहीं. विजयासाठीं राजे युधिष्ठिर त्वरा करीत आहेत. तुम्हांला उसंत मिळणार नाहीं. वस्त्रहरणाच्या वेळी जगांत कोणीही आपल्या अब्रूची पर्वा करणारे नाहीत असें पाहून द्वारकेंत असलेल्या मला एकमात्र आधार समजून 'हे गोविंदा' अशी जी द्रौपदीनें हांक मारली ती माझ्या हृदयांत खोलवर रुतून बसलेली आहे. तिचें तें ऋण माझ्या हृदयांतून कधींही जाणार नाहीं. तेजोमय, दुराधर्ष, गांडीव धनुष्य ज्याच्या हातांत आहे व मी ज्याचा साहाय्यक आहें, त्या सव्यसाची अर्जुनाशीं तुमचें वैर आहे. मी व अर्जुन ह्यांना मृत्यु-जवळ येऊन ठेपल्याखेरीज कोण आव्हान देईल ? महेंद्राचें सुद्धां आमच्यासमोर उभें राहिल्यास आयुष्य संपलें म्हणून समजा."

श्रीकृष्णांच्या अशा तेजस्वी उद्‌गारानी महाभारताच्या उद्योग-पर्वाचीं कितीतरी पृष्ठें तेजाळून उठलेली आहेत. शत्रूचा प्रभाव मुळींच सहन न होणें व आपल्या व्यक्तिप्रभावानें शत्रूचें तेज लोपवून टाकणें ही गोष्ट त्यांच्या ठिकाणी सहज आहे. महाभारतांतील तिसऱ्या दिवशींच्या युद्धांत भीष्मांचा पराक्रम अधिक वाढला व त्यानें पांडवसैनिक थरकांपून उठले असें पाहून सात्यकि पळणाऱ्या सैनिकांना थांबविण्याचा प्रयत्न करूं लागला. शत्रुपक्षाचा तो प्रभाव सहन न होऊन श्रीकृष्ण संतापले. महाभारतकार त्यांच्या तेजस्वी-पणाचें व प्रभावाचें वर्णन करतांना (भीष्मपर्व अ. ५९–८३ ते ९४) असें म्हणतात कीं,—

"पार्थाचें मृदुयुद्ध व भीष्मांचा वाढता प्रभाव पाहून श्रीकृष्णांना ती गोष्ट सहन झाली नाहीं. जवळच असलेल्या सात्यकीला उद्देशून पांडव सैनिकांवर तुटून पडणाऱ्या कौरव योद्ध्यांकडे पहात ते म्हणाले, हे सात्यकि, जे पळाले आहेत त्यांना तर जाऊं देच. पण ज्यांना अजून रण सोडून पळून जावयाचें असेल त्यांनाही खुशाल घरीं जावयास सांग. मी आज भीष्म व द्रोण यांना त्यांच्या गणां-सहित ठार मारतों. मी ठार करून रथांतून फेकून दिलेला भीष्म आज सर्वांच्या दृष्टीस पडेल. कौरवांच्यापैकीं कोणीही नांवाजलेला रथी आज मी जिवंत सोडणार नाहीं. मी माझें चक्र घेऊन या भीष्माला ठार मारतों. त्याच्या पाठोपाठच साऱ्या अनुचरांसह

द्रोणालाही ठार मारून अर्जुनाच्या अंतःकरणाला मी आनंद देईन. एकटा मी आजच कौरवांच्या बाजूचे सर्व प्रमुख वीर व रथी धृत-राष्ट्राच्या शंभर मुलांसह ठार मारून युधिष्ठिराला राज्य देईन. असें बोलून श्रीकृष्णांनी आपलें चक्र हातांत धारण केलें व घोड्यांचे लगाम सोडून रथावरून खाली उडी घेतली. प्रत्येक पावलापावलाला भूमि नमवीत भीष्मांच्या अंगावर ते धांवून जाऊं लागले. संक्रुद्ध झालेला व शत्रूचें प्रमथन करणारा सिंह ज्याप्रमाणें मदांध हत्तीवर तुटून पडावा त्याप्रमाणें श्रीकृष्ण भीष्मांच्या अंगावर धावून जात होते. त्यांच्या अंगावरील बहुमोलाचें पीत वस्त्र त्यांच्या श्यामसुन्दर शरीरावर, सजल मेघावर वीज तळपून उठावी त्याप्रमाणें सुन्दर दिसत होतें. हातांतील सुदर्शन आणि त्या सुदर्शनाखाली असलेला हात हा लांब देंठासहित असलेल्या सहस्रदल कमलाप्रमाणें शोभत होता. नारायणाच्या नाभिसरोवरांतून उत्पन्न झालेलें व माध्यान्हीच्या सूर्याप्रमाणें अत्यत तेजस्वी असें आदिपद्म जसें शोभावें तशीच ती अपूर्व शोभा होती. श्रीकृष्णांच्या क्रोधरूपी सूर्यानें विकसित झालेलें तें सुदर्शनरूपी कमल आपल्या धारारूपी पत्रांनी अत्यंत सुशोभित असून त्यांचा बाहू म्हणजे त्या कमलाचें देंठ व देह हेंच त्याच्या उत्पत्तीचें सरोवर असें वाटत होतें. चक्र उगारून जोरजोरानें गर्जना करणाऱ्या सक्रुद्ध श्रीकृष्णाला पाहून सर्व कौरवांचा विनाशकाळ ओढवला या जाणिवेनें सर्व प्राणिमात्र चीत्कार करून उठले. हातांत चक्र घेऊन श्रीकृष्ण जणूं कीं काय प्रलय करीत आहेत असें दिसत होतें."

श्रीकृष्णांच्या प्रभावाचें असेंच वर्णन नवव्या दिवशींच्या भीष्म-पर्वातील युद्धांतही ( अ. १०७–५४ ते ६० ) आहे. त्या वेळीं तर चक्रही घेण्याचें भान न राहून केवळ चाबूक हातांत घेऊनच श्रीकृष्ण भीष्मावर धांवून गेले. महाभारतकार म्हणतात :–

"माध्याह्नकालीन भास्कराप्रमाणें तेज वाढत चाललेल्या, पांड-वांच्या पक्षाकडील मोठमोठ्या योद्ध्यांना टिपून ठार मारणाऱ्या युगांतकालीन प्रलयाची अवस्था उत्पन्न करणाऱ्या भीष्मांचा

पराक्रम श्रीकृष्णांना सहन झाला नाहीं व त्या योगेश्वर वासुदेवानें अर्जुनाचे घोडे सोडून देऊन सिंहाप्रमाणें गर्जना करीत रथांतून खाली उडी घेतली व केवळ चाबूक हातांत घेऊनच भीष्मांना ठार मारण्याप्रीत्यर्थ तो तेजस्वी युगपुरुष धांवून गेला. त्यांच्या पायांनीं जणू पृथ्वी दुभंग होईल असें वाटत होतें. त्यांचा चेहरा क्रोधानें इतका संतप्त दिसत होता कीं, त्यांच्याकडे पहावत नव्हतें. त्यांचा तो वेग, तें स्वरूप, व तो निश्चय पहातांच कौरव सैन्यांत थरकांप उत्पन्न झाला व 'मेला! भीष्म ठार झाला!' अशी कौरवसैन्यांत एकच आरोळी उठली."

## श्रीकृष्णांचें धैर्य

भगवान् श्रीकृष्णांच्या तेजस्वितेबरोबरच त्यांचें धैर्यही अपूर्व आहे. धैर्य म्हणजे कोणत्याही प्रसंगीं चित्तवृत्ति न डगमगणें अथवा अंतःकरण कधींही विचलित होऊं न देणें. धैर्यशाली पुरुषांच्या कधींही विचलित न होणाऱ्या मनोवृत्तीचें एका कवीनें असें वर्णन केलें आहे कीं,

**चलन्तु गिरयः कामं युगान्तपवनाहताः ।**
**कृच्छ्रेऽपि न चलत्येव धीराणां निश्चलं मनः ॥**

"युगान्तकालीन वाऱ्याच्या झोतानें पर्वत हालूं लागतील, पण धैर्यशाली पुरुषांचें निश्चल अंतःकरण कोणत्याही संकटांत डगमगावयाचें नाहीं." मथुरेच्या छोटया गणराज्यावर सम्राट जरासंधाच्या एकामागून एक झालेल्या सतरा स्वाऱ्यांच्या वेळीं श्रीकृष्णांची धैर्यशीलता व त्यांच्या अंतःकरणाची निश्चलता पूर्णपणें प्रत्ययास आलेली आहे.

त्यांची चित्तवृत्ति किती शांत असे याचें प्रत्यंतर अठराव्या स्वारीच्या वेळीं समोर आघाडीवर कालयवन व पिछाडीवर जरासंध अशा विलक्षण कैचींत सांपडल्यावर, त्यांतून ज्या युक्तीनें त्यांनीं स्वतःस व आपल्या छोटया गणराज्यास वांचविलें त्यावरून पूर्णपणें प्रकट झालेली आहे. श्रीकृष्ण एकाद्या प्रसंगीं डगमगले आहेत असें कोणालाही दाखवून देतां यावयाचें नाहीं. त्यांच्या या निष्कंप अंतःकरणाचें निदर्शन महाभारतांतील स्त्रीपर्वांत मिळतें.

आपलीं शंभर मुलें मारलीं गेल्यामुळें शोकाकुल होऊन व श्रीकृष्णांनीं मनांत आणलें असतें तर आपलीं मुलें निश्चित वांचलीं असतीं अशा कल्पनेनें तोल सुटून गांधारीनें श्रीकृष्णास आजपासून छत्तिसाव्या वर्षी तुझाही कुलक्षय होईल व आज ज्याप्रमाणें माझ्या सुना रडत आहेत तशीच तुझीही अवस्था होईल' असा कडकडून शाप दिला. तो ऐकून ऐकणारांचीं अंतःकरणें करपून गेलीं. पण श्रीकृष्णांच्या अंतःकरणावर त्या शापाचा किंचितही परिणाम झाला नाहीं. ते हांसत हांसत गांधारीला म्हणाले,

**जानेऽहमेतदप्येवं चीर्णं चरसि क्षत्रिये ।**
**दैवादेव विनश्यन्ति वृष्णयो नात्र संशयः ॥ ४८**
**संहर्ता वृष्णिचक्रस्य नान्यो मद्विद्यते शुभे ।**
**अवध्यास्ते नरैरन्यैरपि वा देवदानवैः ॥ ४९**
**परस्परकृतं नाशं यतः प्राप्स्यन्ति यादवाः ॥ ५०**

—(महाभारत, स्त्रीपर्व अ. २५ )

"हे गांधारी, हा शाप देऊन तूं मला कोणतीही नवी आपत्ति सुचविलेली नाहींस. हें होणार आहे हें मला तू शाप देण्याच्या पुष्कळ आधींपासून ठाऊक आहे. जें निश्चित व्हावयाचें आहे व जें पूर्वींच ठरविलेलें आहे त्याचा तूं केवळ अनुवाद केलास. यादव त्यांच्या दैवानुसार निश्चितपणें नष्ट होणार हें ठरलेलें आहे. फार कशाला, देव, दानव वा मनुष्य यांच्यांत यादवांच्या संघाला नष्ट करणारा दुसरा कोणीही नसल्यामुळें आपआपसांत भांडूनच ते नष्ट झाले आहेत असें लोकांना दिसेल. पण तुला खरें सांगू? मी स्वतःच त्यांना नष्ट करणार आहें. कारण माझ्याशिवाय त्यांचा संहार करणारा दुसरा कोणीही नाहीं." तूं मात्र आपला शोक आवर. मेलेल्या, नष्ट झालेल्या, व होऊन गेलेल्या गोष्टींसंबंधीं जो उगाच शोक करतो त्याच्या हातीं शोकाशिवाय दुसरें कांहींही पडत नाहीं. हृदयाच्या निष्कंपतेचें याहून दुसरें श्रेष्ठ उदाहरण सांपडणें शक्य तरी आहे काय ?

## श्रीकृष्णांची सावधता

दाक्ष्य म्हणून भगवद्गीतेंत स्वत: श्रीकृष्णांनींच ज्याचें वर्णन केलेलें आहे तो क्षत्रियांचा अत्यंत श्रेष्ठ गुण म्हणजे अखंड सावधानता. त्याचा श्रीकृष्णाइतका परिपूर्ण आविष्कार दुसरीकडे कोठेंही आढळणार नाहीं. अपार सामर्थ्यामुळें उद्दिष्टपूर्तीवरचें त्यांचें लक्ष कधींही ढळलेलें नाहीं व अशक्य गोष्टी शक्य करून दाखविणें त्यांना शक्य असूनही त्यांची विलक्षण सावधानता कधींही चळली नाहीं. किंबहुना रणमदानें धुंद होऊन अर्जुन एखाद्या वेळीं भान विसरला असेल, पण श्रीकृष्ण ऐन धुमश्चक्रींत सुद्धां कधींही असावध नव्हते. त्यांच्या अखंड सावधानतेच्या या कवचामुळेंच पांडवांचें संरक्षण झालेलें आहे. महाभारतांतील भीष्मपर्वापासून तों स्त्रीपर्वापर्यंतच्या सर्व युद्धांत भगवंतांची ही अखंड सावधानता अर्जुनाचें कवच बनून राहिलेली आहे. शत्रूकडून येणारा प्रत्येक प्रहार कोणत्या योग्यतेचा आहे, अर्जुन कोणत्या प्रहाराचा प्रतिकार करूं शकेल व कोणत्याचा करूं शकणार नाहीं या गोष्टीकडे त्यांचें इतकें सूक्ष्म लक्ष आहे, कीं त्याचा प्रत्यय येतांच मन आश्चर्यानें भरून जातें. प्राग्ज्योतिषपुराचा राजा भगदत्त हा अर्जुनाशीं प्राणपणानें युद्ध करीत असतां अर्जुनाच्या कंठनालाचा नेम धरून वैष्णवास्त्राच्या प्रयोगानें भारलेला अंकुश भगदत्तानें अर्जुनावर टाकला. अंकुशाचें तें तळपतें तेज पहातांच त्या अस्त्रप्रयोगाची श्रीकृष्णांना कल्पना आली व या अस्त्राच्या प्रतिघाताचें अर्जुनांत मुळींच सामर्थ्य नाहीं हें ओळखून श्रीकृष्णांनीं आपल्या देहाचें कवच अर्जुनाभोंवतीं घालून प्रहार स्वत:वर घेतला व अर्जुनाचें संरक्षण केलें. महाभारतकार ( द्रोणपर्वांत (अ. २९-१७ ते १९ ) म्हणतात :

"अर्जुनाच्या बाणप्रहारानें अत्यंत व्यथित झालेल्या भगदत्तानें आपला अंकुश वैष्णवास्त्राचें अभिमंत्रण करून अर्जुनाच्या रोखानें फेंकला. तें अस्त्र सर्वांचा घात करण्याइतकें समर्थ असलेलें पाहून व अर्जुन त्याच्यासमोर टिकूं शकणार नाहीं हें ओळखून श्रीकृष्ण रथावर उठून उभे राहिले व अर्जुनाला झांकून टाकून

त्यांनीं स्वतःच्याच हृदयावर तो प्रहार घेतला. भगवान् श्रीकृष्णांच्या हृदयावर तें अस्त्र येतांच त्याचें सामर्थ्य नष्ट होऊन त्याचें रूपांतर आपादलंबिनी व सुंदर अशा वैजयंती पुष्पमालेंत झालें."

पण श्रीकृष्णांच्या या कृत्यानें अर्जुनाचा आत्माभिमान दुखावला गेला व तो श्रीकृष्णांना संरक्षण दिल्याबद्दलच दूषण देऊन आपलें सामर्थ्य जणूं काय त्यांना माहिती नाहीं अशा आवेगानें सांगूं लागला. श्रीकृष्ण हांसले व अर्जुनाला इतकेंच म्हणाले ( द्रोणपर्व अ. २९–३६ व ३७) कीं,—

"हें अस्त्र इतकें विलक्षण सामर्थ्यवान् आहे कीं त्याला अवध्य असें कांहींही नाहीं. तूं त्याच्यासमोर टिकूं शकला नसतास हें ओळखूनच मी तें अस्त्र व्यर्थ केलें. आतां भगदत्ताला मारणें सोपें आहे. तूं त्याला मारण्यावर आपलें लक्ष केंद्रित कर."

श्रीकृष्णांच्या या सावधतेचे अनेक कसोटीचे प्रसंग अर्जुनाच्या भावनात्मकतेनेंही उद्‌भवलेले आहेत. अभिमन्यूच्या वधानंतर संतापलेल्या अर्जुनानें जयद्रथाच्या वधाची प्रतिज्ञा केली. ती प्रतिज्ञा नुसती जयद्रथाच्या वधाचीच असती तर कांहीं विशेष अडचणीची गोष्ट नव्हती. पण 'उद्यां संध्याकाळच्या आंत मी जयद्रथाला ठार मारीन व न मारलें तर अग्निकाष्ठ भक्षण करीन' अशी ती त्याची प्रतिज्ञा होती. अशा भलत्याच प्रतिज्ञा करून व ज्याच्यासाठीं संग्राम उत्पन्न झालेला आहे तें आपलें महान् उद्दिष्ट दृष्टिआड करून केवळ अतिरिक्त अहंकारापायीं स्वतःच्या जीवितास धोका उत्पन्न करून घेणें व अकारण शत्रूच्या हातीं आपणच आपल्या विनाशाची संधि देणें ही गोष्ट श्रीकृष्णांना मुळींच संमत नव्हती. उद्दिष्टावर लक्ष ठेवणाऱ्या पुरुषाची तें अंतिम उद्दिष्ट पार पाडणें हीच काय ती खरी प्रतिज्ञा. त्यानें भावनेच्या व विकारांच्या आधीन होऊन नसतें संकट स्वतःच उत्पन्न करणें ही वस्तुतः चूकच होय. स्वतःच्या पौरुषाच्या अतिरिक्त अभिमानानें अशी भलती प्रतिज्ञा करून अर्जुनानें आपल्या भोवतीं केवढी नाजूक परिस्थिति उत्पन्न केली होती याची श्रीकृष्णांना पूर्ण कल्पना होती. कारण जो महारथी पार्थ कोणालाही साधा पराभूत करणें सुद्धां अशक्य, त्याचा

विनाश करणेंसुद्धां कौरवांना या प्रतिज्ञेनें सहजशक्य झालें होतें व अर्जुनाचें मरण म्हणजे पांडव पक्षाचेंच मरण होतें. कारण आतां एका दिवसांतच थोडी विशेष व्यवस्था केली कीं कौरवांचें काम सदाचें साधणारें होतें. त्यांनीं केवळ जयद्रथाला संध्याकाळपर्यंत संरक्षण द्यावयाचें व रात्र पडेपर्यंत अर्जुनाच्या तांवडींत त्याला सांपडूं द्यावयाचें नाहीं एवढी दक्षता बाळगली कीं पाशुपतास्त्रा-सारख्या श्रेष्ठ सामर्थ्याचा धनी असलेला अर्जुन, आपण होऊन आत्महत्या करणार होता व ही आपत्ति दुसऱ्या कोणी त्याच्यावर आणली नसून त्यानें ती स्वतःच आपल्यावर ओढवून घेतली होती. कौरवांनीं तसा निश्चय ठरविला. श्रीकृष्ण इतके सावध होते कीं युद्धाच्या प्रारंभ दिवसापासूनच त्यांनीं आपले गुप्त हेर कौरवांच्या सैन्यांत पसरून ठेविले होते. त्यांच्याकडून कौरवांनीं अर्जुनाची ही प्रतिज्ञा ऐकून जयद्रथाला वांचविण्याच्या बाबतींत केंद्रित केलेलें सर्व लक्ष व आंखलेल्या अमोघ योजना श्रीकृष्णांना तात्काळ कळल्या. त्यांना या गोष्टीचा अतिशय राग आला व ते अव्यवस्थित असावधतेविषयीं आणि त्यापायीं सर्वनाशाचा प्रसंग ओढवून घेतल्याविषयीं अर्जुनाला परोपरीनें दोष देऊं लागले. अर्जुनाला उद्देशून ते म्हणाले ( द्रोणपर्व अ. ७५) कीं,

" आपल्या भावांचें किंवा कोणाचेंही मत न घेतां सिंधुराज जयद्रथाला उद्यांच्या उद्यां ठार करण्याची तूं ही जी आपल्याच लहरीनें प्रतिज्ञा केली आहेस ती आत्मघातकी साहस आहे. माझ्याशीं कोणत्याही प्रकारचा विचारविनिमय न करतां येवढा मोठा भार उचलावयास तुला कोणी सांगितलें होतें ? आपण सर्व जगांत हास्यास्पद कसे ठरणार नाहीं याचा तरी तूं विचार केला आहेस काय ? प्रतिज्ञा करण्यापूर्वी मला विचारणें आवश्यक नव्हतें काय? दुर्योधनाच्या शिबिरांत तेथें कांहीं कमीजास्त घडलें तर तें आपणांस ताबडतोब कळावें म्हणून मी कांहीं हेर ठेवलेले आहेत. त्या हेरांनीं येऊन मला जी वार्ता दिली तिच्यावरून तुझी प्रतिज्ञा पार न पडतां तूं उलट प्राणघातक संकटांत सांपडलास आहेस हें स्पष्ट दिसतें. जयद्रथानें द्रोणाचार्यांचा आधार घेतला आहे व सर्वांनीं त्याच्या

संरक्षणाची सर्व प्रकारची सिद्धता करून व्यवस्थित योजना आंखलेली आहे. कर्ण, भूरिश्रवा, अश्वत्थामा, वृषसेन, कृपाचार्य व शल्य हे कौरवांच्याकडचे सहा श्रेष्ठ महारथी आपल्या छातीचा परकोट करून व्यूहाच्या तोंडावर उभे राहून जयद्रथाचें संरक्षण करतील. मोठा शकटव्यूह रचून त्याच्या आंत द्रोणाचार्यांनीं पद्मव्यूहाची रचना केलेली आहे व त्या पद्माच्या केसराच्या जागीं अगदीं पाठीमागच्या भागांत सर्व योद्धयांनीं संरक्षण दिलेला जयद्रथ राहणार आहे. शस्त्रास्त्रें, बल, वीर्य या सर्व दृष्टींनीं हे सहा महारथी कांहीं सामान्य नाहींत. या सहाही महारथ्यांना जिंकल्यावांचून जयद्रथ तुझ्या हातीं लागणें शक्य नाहीं. त्यापैकीं प्रत्येकाच्या पराक्रमाचा विचार कर व असे सहा सामर्थ्यशील लोक एकामागून एक जिंकावयाचे आहेत ही गोष्ट ध्यानांत ठेव."

प्रतिज्ञा न करतां सुद्धां अर्जुन दुसऱ्या दिवशीं जयद्रथाला मारूं शकला असता व त्याचा वध करीत असतां त्याच्या अपकृत्याची त्याला तो जाणीवही देऊं शकला असता. पण त्यानें प्रतिज्ञा करून टाकल्यामुळें आत्मनाशक संकटाचा एक विलक्षण डोंगरच उभा राहिला होता. श्रीकृष्णांनीं अर्जुनाला दोष दिला तरी तो आपल्याच आत्माभिमानांत व पुत्रशोकामुळें उत्पन्न झालेल्या संतापाच्या भावनेंत इतका गर्क होता कीं त्याला संकटाची यथार्थ कल्पना आलीच नाहीं. तो जेव्हां आपल्या सामर्थ्याचें वर्णन करूं लागला तेव्हां त्याच्याशीं अधिक विवाद करण्यांत अर्थ नाहीं असें पाहून व गोष्ट एकदां होऊन गेल्यावर तिच्यांतून मार्ग काढणें येवढें एकच आपलें काम आहे हें ओळखून रात्रभर स्वतः श्रीकृष्ण काळजी करीत व योजना आंखीत बसले. त्यांनीं स्वतःच ती प्रतिज्ञा पार पाडावयाची असें ठरवून आपला सारथी दारुक याला बोलावून घेतलें व सिद्धतेच्या सर्व योजना त्यांनीं दारुकाला नीट समजावून सांगितल्या. अर्जुन निश्चितपणें स्वस्थ झोंपला होता. श्रीकृष्ण मात्र रात्रभर चिंतेनें जागत बसले होते. ते दारुकाला म्हणाले (द्रोणपर्व अ.७९)

"हे दारुका, पुत्रवधामुळें आर्त झालेल्या अर्जुनानें उद्यां जयद्रथाला ठार मारण्याची प्रतिज्ञा केली आहे. ती ऐकून दुर्योधन

जयद्रथाला संरक्षण देणार ही गोष्ट निश्चित आहे. दुर्योधनाचें लक्षावधि सैन्य केवळ जयद्रथाला वांचविण्यावरच उद्यां आपलें सर्व लक्ष केंद्रित करील. आपल्या पराक्रमी पुत्रासहित द्रोणाचार्य आपल्या सर्व सामर्थ्यानिशीं जयद्रथाला संरक्षण देतील व ज्याला द्रोणांनीं संरक्षण दिलें त्याला ठार करावयाचें सामर्थ्य, दैत्य-दानवांचा मद हरण करणाऱ्या महेंद्राच्या ठिकाणीं देखील नाहीं. अर्जुन तेथें काय करणार? हा कुंतीपुत्र अर्जुन उद्यां सूर्य अस्ताला जाण्याच्या आंत जयद्रथाला ठार करूं शकेल असें मलाच आतां केलें पाहिजे. म्हणून उद्यां सकाळीं तूं यथाशास्त्र माझा रथ तयार कर. माझी कौमोदकी गदा, दिव्य शक्ति, माझें चक्र, धनुष्य व बाण व इतर सर्व शस्त्रास्त्रें आपल्या रथावर सुसज्ज स्थितींत ठेव. गरुडाची ध्वजावर स्थापना करून शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प व बलाहक हे माझे घोडे रथाला जुंपून व अंगांत चिलखत चढवून अगदीं सुसज्ज स्थितींत रहा. पांचजन्याचा घोर नाद मी युद्धांत ज्या स्थानावरून करीन ती खूण आहे असें समजून ताबडतोब तूं तेथें आपला रथ घेऊन ये. प्रसंग पडला तर मी स्वतः अर्जुनासाठीं उद्यां युद्ध करून एकाच दिवसांत कौरवसैन्याचा नाश करून अर्जुनाची प्रतिज्ञा पूर्ण झालेली पाहीन. सर्वनाश वांचविण्याचा मला याहून दुसरा मार्ग दिसत नाहीं."

दुसऱ्या दिवशीं घनघोर युद्ध सुरूं झालें. श्रीकृष्णांचें लक्ष केवळ जयद्रथाच्या वधावर लागलें होतें. ते त्यासंबंधीं इतके सावध होते कीं युद्ध करतांना पराक्रमाची स्फूर्ति येऊन अर्जुन जर रेंगाळला तर कृष्ण त्याला सावध करून व वीरांना डावलून अंतर तोडीत होते. द्रोणांच्या युद्धांत अर्जुन पराक्रम प्रकट करण्याच्या मनःस्थितींत येऊन त्यांच्याशीं ठाण मांडून युद्ध करूं लागला तों कृष्णांनीं त्याला सांगितलें (द्रोणपर्व अ. ९१–३० व ३१) कीं,–

"पार्था! पार्था!! हे महाबाहो, वेळ किती चालला आहे याची तुला कांहीं कल्पना आहे का? आजचें आपलें लक्ष्य वेगळें आहे व कार्य पार पाडणें किती दुर्घट आहे याचा विचार कर. द्रोणाशीं युद्ध करण्याचा मोह टाळ. आपण यांना प्रदक्षिणा करून व डावलून

तात्काळ पुढें गेलें पाहिजे. द्रोणाच्या आव्हानाकडे पूर्ण दुर्लक्ष करून श्रीकृष्ण अर्जुनास पुढें घेऊन गेले. मार्गांत यादववीर कृतवर्मा आड आला. श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें कीं, ' रेंगाळूं नकोस. एकच प्रहार असा कर कीं ज्यानें हा विव्हल होईल. हा पुन्हां सांवरत नाहीं तोंच आपण बरेंच अंतर कापूं."

श्रीकृष्णांनीं अंतर कापण्यावर त्या दिवशीं स्वतःचें लक्ष इतकें केंद्रित केलें होतें कीं महाभारतांत त्याचें अत्यंत काव्यमय असें वर्णन केलेलें आहे. अर्जुनानें समोरच्या शत्रूच्या कंठनालाचा वेध घेऊन बाण एक मैल अंतरावर उभ्या असलेल्या शत्रूच्या रोखानें सोडलेला असावयाचा व श्रीकृष्णांनीं मात्र त्या बाणानें शत्रूचें मस्तक धडावेगळें करण्याच्या आंत आपला रथ त्या शत्रूपासून पुढें एक मैल अंतरावर नेलेला असावयाचा!" हें वर्णन काव्यमय आहे हें उघडच आहे. असो.

अशा स्थितींत त्यांच्या रणक्षेत्रावरील विलक्षण सावधतेचा एक प्रसंग महाभारतकारांनीं वर्णन केलेला आहे. जयद्रथाकडे पोहोंचण्याची घाई, अर्जुनाचें संरक्षण करून मार्ग कापावयांत चित्त व्यग्र झालेलें, अशा स्थितींत जी गोष्ट खास अर्जुनाच्याही ध्यानांत आली नाहीं ती श्रीकृष्णांच्या ध्यानांत आली. यावरून त्यांची दृष्टि किती सूक्ष्म व चौफेर असली पाहिजे हें ध्यानांत येतें. अर्जुनाचा प्रिय शिष्य व श्रीकृष्णांचा एक निष्ठावंत अनुचर सात्यकि हा रणक्षेत्रावर थकलेल्या स्थितींत असतांना ताज्या दमाचा कौरवपक्षीय वीर भूरिश्रवा हा त्याला पकडून जमिनीवर पाडतो व खड्ग उपसून त्याच्या मानेवर ठेवावयास हात वर करतो. अशा स्थितींत सात्यकि मरतो असें पाहून रणक्षेत्रावर दृष्टि ठेवणें हें वस्तुतः ज्याचें खरें काम आहे त्या अर्जुनाचेंही तिकडे लक्ष जात नाहीं; पण श्रीकृष्णांचें मात्र त्याच्याकडे लक्ष वेधतें व ते अर्जुनाला म्हणतात ( द्रोणपर्व अ. १४२–५३ व ५४ ) कीं,

"अर्जुना, हा पहा यादवामधील वाघासारखा पराक्रमी सात्यकि रणक्षेत्रावर एकसारखें लढून थकून गेल्यामुळें भूरिश्रव्याच्या

तावडींत प्राणसंकटांत सांपडला आहे. याला वांचविणें तुझें कर्तव्य आहे. अशा स्थितींत तूं रणक्षेत्रावर असतांना तुझा शिष्य सात्यकि अकारण प्राण गमावून बसणें योग्य नाहीं. त्याची मुक्तता होईल असें कांहीं तात्काळ कर." तात्काळ अर्जुन एक अर्धचंद्राकार बाण काढून वरच्यावर भूरिश्रव्याचा हात तोडतो व सात्यकीची मुक्तता करतो.

दिवसभर भीषण युद्ध करूनही जयद्रथ आटोक्यांत येत नाहीं असें पाहून श्रीकृष्णांनी आपल्या दिव्यशक्तीनें रणांगणावर अंधार उत्पन्न करून सर्व कौरव सैनिकांना संध्याकाळ झाल्याच्या भ्रमांत पाडलें व योग्य वेळीं अर्जुनाकडून जयद्रथाचा वध करविला हें तर प्रसिद्धच आहे. मोठमोठ्या योद्धयांशीं अर्जुनाची गांठ घालून त्यांची खोडकी जिरविणाऱ्या श्रीकृष्णांनीं इंद्रानें दिलेली अमोघ शक्ति जोंवर कर्णाच्या आधीन होती तोंवर त्याची व अर्जुनाची गांठच पडूं दिली नाहीं. इतकेंच नव्हे तर शेवटीं घटोत्कचावर कर्णाकडून ती शक्ति टाकवून तिला व्यर्थ घालविल्यावर मगच मोकळेपणानें त्यांनीं अर्जुनाला रणक्षेत्रावर वावरूं दिलें. धृतराष्ट्रानें या संबंधांत संजयाला विचारलेला प्रश्न व त्यानें दिलेलें उत्तर (द्रोणपर्व अ. १८२–१८ ते ३२) पहाण्यासारखें आहे.

"हे संजया, माझा पुत्र दुर्योधन महामूर्ख आहे. तो व त्याचे मंत्री स्वतःला फार शहाणे समजतात. पण अर्जुनाच्या वधाचा एकमात्र उपाय असलेली शक्ति इतक्या दिवस कर्णानें अर्जुनावर टाकूं नये व कोणीही त्याला तसें सुचवूं नये या गोष्टीचें मला मोठें आश्चर्य वाटतें. तूं सुद्धां वेंधळ्याप्रमाणें रणक्षेत्रावर नुसताच वावरत राहिलास त्याऐवजीं ती शक्ति अर्जुनावर टाकण्याचें कर्णाला तूं तरी कां सुचविलें नाहींस ?"

संजय त्यावर उत्तर देतांना म्हणाला कीं, "रोज रात्रीं शिबिरामध्यें एकांतांत बसून मी, दुर्योधन, शकुनि व दुःशासन कर्णाला असें विनवीत होतों कीं उद्यां समरांगणावर सर्व सैन्याला सोडून पांडव सैन्याचा प्राणभूत जो अर्जुन त्याच्यावर तूं चालून जा व आपल्या शक्तीनें त्याला ठार मारून कृतार्थ हो. एकदां अर्जुन मेला कीं

उरलेल्या पांडवांना व पांचालांना आपले दास करणें अगदीं सोपें आहे. अथवा अर्जुन मेला तर कृष्ण आणखी दुसऱ्या कोणाला तरी पुढें करून आपल्याशीं लढा चालवील असें वाटत असेल तर श्रीकृष्णांवरच ही शक्ति टाकून त्याला ठार मार. कृष्ण हा पांडवांचा आधार आहे. तोच त्यांचें बळ असून त्यानेंच त्यांना संरक्षण दिलें आहे. झाडाचें मूळ तोडलें म्हणजे त्याच्या पर्ण-शाखांचा वेगळा नाश करण्याची जशी आवश्यकता नसते त्याचप्रमाणें श्रीकृष्णाला मारल्यावर पांडवांचा वेगळा नाश करण्याची आवश्यकताच न उरता ते आपोआपच नष्ट होतील. याप्रमाणें आम्ही रोज ठरवीत असतांही ऐन युद्धाच्या प्रसंगांत नेमका आम्हांला दुसऱ्याच कोणत्या तरी गोष्टींत गुंतण्याचा प्रसंग येई व ही गोष्ट नेमकी विसरली जात असे. डोळ्यांत तेल घालून श्रीकृष्ण कर्णापासून अर्जुनाचें सदैव संरक्षण करी व कर्णाच्या समोरासमोर अर्जुनाला मुळींच न आणण्याची दक्षता घेई. वेगवेगळ्या दुसऱ्याच योद्धयांना श्रीकृष्णानें नेहमीं कर्णासमोर उभें करून त्याची सदैव वंचना चालविली होती व कर्णाची शक्ति व्यर्थ कशी घालवितां येईल याचा ते सतत विचार करीत होते. अर्जुनाला जो वांचवूं शकतो, त्याला स्वतःचें संरक्षण करणें तर फारच सुलभ होतें. श्रीकृष्णांच्या दक्षतेचा विचार केला तर त्यांना जिंकणारा पुरुष जन्मालाच यावयाचा आहे यांत शंका नाहीं."

ऐन रणक्षेत्रावरील श्रीकृष्णांच्या या विलक्षण सावधगिरीचीं हीं अनेकविध उदाहरणें दाक्ष्य या क्षत्रियांच्या वैशिष्ट्याचीं परिपूर्णता त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत कशी झाली होती याचीं जणुं कांहीं निदर्शनेंच होत. कोणत्याही प्रसंगांत कोणाहीसमोर ते उभे राहिले तरी प्रत्येकाचें अंतरंग अगदीं त्यांतील आंतला कप्पासुद्धां त्यांच्यासमोर उघडला जाऊन आपले भाव संपूर्णपणें व्यक्त करीत असे व प्रत्येक आघातावरील उपाययोजना सिद्धहस्त म्हणूनच त्यांना वश होत असे. सर्व संहार झाल्यावर शोकाकुल झालेल्या राजा धृतराष्ट्राच्या भेटीस्तव म्हणून पांडव गेले असतां श्रीकृष्णही त्यांच्यासमवेत होते. युधिष्ठिरानें राजा धृतराष्ट्राला वंदन केलें.

झाल्या प्रकारांत सर्वस्वी अपराध स्वतःचा व स्वतःच्या पुत्रांचाच असल्यामुळें आणि पांडव सर्वस्वीं निरपराध असल्यामुळें उघडपणें त्यांना कांहीं बोलतां येण्यासारखें नव्हतें. पण पुत्रवधामुळें राजा धृतराष्ट्राचें अंतःकरण जसें शोकानें करपून गेलें होतें तसेंच पांडवांविषयींच्या क्रोधाग्नीनें तें धगधगतही होतें. त्यानें युधिष्ठिराला कसें बसें आलिंगन दिलें व भीम कोठें आहे म्हणून तो विचारूं लागला. त्याच्या नुसत्या स्वरावरून त्याच्या मनांत काय चाललें असेल हें श्रीकृष्णांनीं ओळखलें किंवा त्याच्या मनोवृत्तीच्या सुसूक्ष्म परिचयामुळें पुढें काय होणार आहे या गोष्टीची त्यांना पूर्ण कल्पना होती. धृतराष्ट्र वरून कांहीं दाखवीत नव्हता म्हणून श्रीकृष्णांनाहीं उघडपणें कांहींच बोलतां येण्यासारखें नव्हतें. पण त्यांनीं सर्व प्रकारची दक्षता आगाऊच ठेवली होती. किंबहुना कृष्ण सावधान नसते तर विजेत्या पांडवांना भीमाला गमावून बसून विनाशच ओढवून घ्यावा लागला असता. श्रीकृष्णांच्या अखंड सावधानतेची व दुसऱ्याचें मनोगत सहज ओळखण्याच्या त्यांच्या बुद्धिमत्तेची या उदाहरणांत चांगलीच साक्ष पटते. महाभारतकार (स्त्रीपर्व अ. १३-१४ ते २४) म्हणतात :—

"राजा धृतराष्ट्राचा शोकरूपी वायूनें अधिकच प्रज्वलित केलेला क्रोधरूपी अग्नि भीमसेनरूपी तृणाला जणुं कांहीं जाळूं इच्छीत होता. त्यानें वरून तसें कांहीं न दाखवितां 'भीमा' म्हणून हांक मारली. भीम समोर जाऊं लागला तोंच त्याचें मनोगत ओळखून श्रीकृष्णानें हातानेंच भीमाला बाजूस केलें व त्याची लोखंडी प्रतिमा धृतराष्ट्रासमोर केली. महाबुद्धिवान् श्रीकृष्णांनीं त्याचें हें मनोगत ओळखून त्यावरील उपाययोजना आधींच सिद्ध ठेविली होती. ती लोखंडी प्रतिमा म्हणजे भीमच आहे असें समजून अत्यंत बलवान् राजा धृतराष्ट्रानें आपल्या बाहूंचें बंधन आवळून तिला पिचून टाकलें. एवढें मोठें लोखंड पण त्याचेसुद्धां तुकडे उडाले! धृतराष्ट्राच्याही छातीवर त्या लोखंडी प्रतिमेचा मोठा आघात झाला व तो रक्त ओकूं लागला. त्याचें सारें अंग रक्तानें माखून गेलें. रक्तस्रावामुळें आलेल्या अशक्ततेनें तो घेरी येऊन खालीं कोसळला

तोंच संजयानें त्याला सांवरून धरलें व तो त्याचें सांत्वन करूं लागला. कांहीं वेळानें धृतराष्ट्र सावरला. भीम मेला अशा कल्पनेनें त्याचा राग शांत झाला होता. उगाचच शोकाचें ढोंग करून 'हाय भीमा, हाय भीमा' म्हणून तो आक्रोश करूं लागला असतां पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्णांनीं त्याला असें सांगितलें कीं, 'राजा धृतराष्ट्रा, भीमाविषयीं तुला शोक करण्याचें कांहींच कारण नाहीं. तूं हा भीम मारलेला नाहींस. तूं जें छिन्नविछिन्न केलेंस तो भीम नसून ती भीमाची लोखंडी प्रतिमा होती. तूं क्रोधाच्या तावडींत गेल्याचें मीं केव्हांच ओळखलें होतें व भीम मृत्यूच्या दाढेंत रगडला जाऊं नये म्हणून आयत्या वेळीं मी त्याला बाजूला करून ही त्याची लोखंडी प्रतिमा तुझ्यासमोर केली. आतां तुला शोक करण्याचें कांहीं कारण नाहीं." भगवान् श्रीकृष्णांचें हें वाक्य ऐकून धृतराष्ट्राच्या अंतःकरणाचें किती पाणी झालें असेल!

प्रत्येकाच्या अंतःकरणाच्या कप्प्याचें, त्याच्या मनोवृत्तीचें, गुण-दोषांचें व मर्मस्थानांचें भगवान् श्रीकृष्णांना विलक्षण ज्ञान आहे आणि त्यामुळें त्या विशिष्ट गोष्टींवर प्रहार करून केवढ्याही मोठ्या शत्रूच्या संकटांतून ते आपल्या अनुचरांना तारून नेतात. आचार्य द्रोण हे असे अद्वितीय योद्धे होते कीं, युद्ध करून त्यांना जिंकणें अर्जुनाला तर काय पण खास त्यांचा मृत्यु म्हणूनच निर्माण झालेल्या धृष्टद्युम्नालासुद्धां केवळ अशक्य होऊन बसलें होतें. अशा स्थितींत त्यांना निःशस्त्र करणें हाच एकमात्र मार्ग होता. पण द्रोणाचार्यांना हत्यार खालीं टाकावयास लावणार कोण? त्यांचें अश्वत्थाम्यावर अतोनात प्रेम होतें. ती त्यांच्या अंतःकरणाची अत्यंत नाजूक जागा होती. केवळ अश्वत्थाम्यावरील प्रेमासाठीं ब्राह्मण्याची दिव्य परंपरा सोडून आचार्य द्रोण हे राजप्रेष्य बनले होते. केवळ अश्वत्थाम्यासाठींच कौरवांसारख्या अधार्मिकांचें नेतृत्व त्यांनीं पत्करलें होतें. त्यांच्या अंतःकरणाचा हा नाजूक भाग ओळखून त्यावर प्रहार केला असतां त्यांना शस्त्र खालीं ठेवावयास लावणें सोपें जाईल असें श्रीकृष्णांच्या मनांत आलें. ज्या अश्वत्थाम्या-साठीं आचार्य हवें तें करावयास सिद्ध आहेत तोच मुळांत मेला

असें जर त्यांना कोणी सांगितलें तर ते जीविताविषयीं निराश होऊन आपोआप शस्त्र खालीं ठेवतील व त्यांचा विनाश होईल हें श्रीकृष्णांनीं ओळखलें व त्यांनीं पांडवांना सांगितलें (द्रोणपर्व अ. १९०)कीं, "हातांत धनुष्य असतांना द्रोणाचार्यांना जगांत कोणीही जिंकू शकणार नाहीं. जर त्यांनीं शस्त्र खालीं ठेवलें तरच त्यांचा वध करतां येण्याची शक्यता आहे. या वेळीं तपशिलांतील धर्माधर्म-विवेक बाजूला ठेवून आपल्या पक्षाचा जय कसा होईल या एकाच गोष्टीवर स्वतःचें सारें लक्ष केंद्रित करा. अश्वत्थामा मेला तर मात्र हा युद्ध करणार नाहीं. कोणी तरी त्याला 'अश्वत्थामा मेला' असें जाऊन सांगा. पण कोणाच्या तरी सांगण्यावर द्रोणाचार्यांचा विश्वास बसावा कसा? म्हणून शेवटीं श्रीकृष्णांनीं युधिष्ठिराच्या शब्दावर त्यांचा विश्वास बसेल हें ओळखून त्यांनाच असें सांगितलें कीं "अर्धा दिवस जरी याच पद्धतीनें रागावून द्रोणाचार्य संहार करीत राहिले तर पांडव सेनेपैकीं कोणीही जिवंत राहणार नाहीं हें लक्षांत ठेवून तुम्ही खोटें बोला. सर्वनाश घडवून आणणाऱ्या सत्यापेक्षां जीवितरक्षणार्थ खोटें बोलणें हें अधिक श्रेयस्कर असून बोलणाऱ्यास पाप लागत नाहीं." शेवटीं त्यांनीं युधिष्ठिराकडून ही गोष्ट घडविली व द्रोणाचार्यांचा नाश करविला. हंस-डिंभकांचा, त्यांच्या मनोवृत्तींतील परस्परासक्तीचें नाजूक मर्मस्थान ओळखून त्यांनीं त्यावर प्रहार करून असाच नाश केला. कालयवन व जरासंध यांच्या वीरत्वाच्या अभिमानाचा त्यांनीं त्यांच्याच विनाशासाठीं उपयोग करून घेतला. द्रोणाचार्यांच्या पुत्रमोहाचाच त्यांनीं उपयोग करून घेतला आहे. डोहांत लपलेल्या दुर्योधनाला त्याच्या अभिमानावर डंख मारून त्यांनीं बाहेर आणलें आहे. तात्पर्य, युद्धांतील प्रत्येकाच्या मर्मस्थानाचें त्यांना अचूक ज्ञान आहे. प्रत्येकाच्या गुणदोषांची त्यांना नीट कल्पना असून तिचा ते विलक्षण उपयोग करून घेतात. श्रीकृष्णांच्या या सर्व वैशिष्ट्यांवरून त्यांचें नेतृत्व किती बहुविध गुणांनीं युक्त होतें याची कल्पना येईल. त्यांचीं आणखी कांहीं वैशिष्ट्यें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

# श्रीकृष्णांचें अभिजात नेतृत्व

आतांपर्यंत दिग्दर्शित केलेल्या अनेकविध गुणसमुच्चयाप्रमाणेंच नेतृत्वाचे अनेक गुणविशेष श्रीकृष्णांच्या व्यक्तिमत्त्वांत आढळतात. त्यांचें चरित्र वरवर जरी चाळलें तरी त्यांनीं साधन म्हणून ज्यांना वापरलें अथवा ज्यांचा उपयोग करून घेतला त्या सर्वांचा त्यांच्यावर प्रगाढ विश्वास असलेला आढळून येतो. नेतृत्वांत ही गोष्ट अतिशय आवश्यक असते. व्यक्तिमत्त्वाच्या विशेष प्रभावानें अनुचरांच्या अंतःकरणांत भय, आदर इत्यादि भावना उत्पन्न करणें ही गोष्ट वेगळी व त्यांच्या अंतःकरणांत स्वतःविषयीं प्रेमाचें, भक्तीचें व आत्यंतिक विश्वासाचें स्थान उत्पन्न करणें ही गोष्ट वेगळी. श्रीकृष्णांवरील अनुचरांच्या या विलक्षण विश्वासाची, त्यांचा अनुचरांशीं संबंध उत्पन्न होऊन अगदीं थोडेंच दिवस होत नाहींत तोंच खात्री पटूं लागते. आपण स्वतः सुद्धां आपल्या कल्याणाची जी चिंता वाहूं शकलों नाहीं, ती चिंता आपला नेता वा सहचर आपल्याविषयीं बाळगतो व अत्यंत बिकट प्रसंगीं हाच केवळ आपलें मार्गदर्शन करूं शकतो, ह्यानें केलेलें मार्गदर्शनच केवळ आपल्या हिताचें राहील, दुसरें कोणीही असें मार्गदर्शन करूंच शकत नाहीं हें या विश्वासाचें स्वरूप होय. भगवान् श्रीकृष्णांच्या व पांडवांच्या संबंधाला द्रौपदी-स्वयंवरांत खरा प्रारंभ झाला हें मी मागें दाखविलेंच आहे. तो संबंध प्रस्थापित होऊन कांहीं आठवडेच काय ते झाले असतील; पण अत्यंत महत्त्वाच्या प्रसंगीं श्रीकृष्णांविषयीं इतक्या थोड्या संबंधानंतर सुद्धां हा विश्वास त्यांच्या व त्यांच्या अनुचरांच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला आहे. पांडवांनीं राजा धृतराष्ट्राच्या निमंत्रणानुसार हस्तिनापुराला जावें कीं नाहीं या गोष्टीचा विचार द्रौपदीच्या स्वयंवरानंतर चालू असतां राजा द्रुपदानें श्रीकृष्ण म्हणतील तसें ठरवावें असें सांगितलें. इतकेंच नव्हे तर तो पुढें असेंही म्हणाला कीं,

---

व्याख्यान १२ वें, दि. ८-४-५२

**न तद्ध्यायति कौन्तेयः पाण्डुपुत्रो युधिष्ठिरः ।**
**यथैषां पुरुषव्याघ्रः श्रेयो ध्यायति केशवः ॥ ९**

—(महाभारत आदिपर्व अ. २०७)

" स्वत: पांडुपुत्र युधिष्ठिर आपल्या कल्याणाची जितकी चिंता करीत नसेल तितकी त्यांच्या कल्याणाची चिंता श्रीकृष्ण करतात."

आपल्याला पटो वा न पटो पण केवळ श्रीकृष्ण म्हणतात येवढ्याच कारणास्तव तें आपल्या कल्याणाचें असलेंच पाहिजे व म्हणून प्रसंगीं आपल्या इच्छा व आत्माभिमानाच्या कल्पना बाजूला सारूनही त्यांच्या अनुचरांनीं, इतकेंच नव्हे तर वयानें व सन्मानानें त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ असलेल्या लोकांनींही त्यांचा शब्द ऐकण्याइतका त्यांचा स्वयंसिद्ध प्रभाव आहे.

सुभद्रेला घेऊन अर्जुन रैवतक पर्वतावरून निघून गेला असतां त्यानें आपला मोठा अपमान केला व अब्रू घेतली असें वाटून सर्व यादव सभा व श्रीकृष्णांचे वडील बंधु बलराम सुद्धां अत्यंत संतप्त होऊन गेले होते. यादवांच्या श्रीकृष्णांच्या शब्दावरील विश्वासाची व श्रीकृष्णांच्या त्यांच्यावरील वजनाची कसोटी लागण्याचाच तो प्रसंग होता. सुभद्राहरण ही इतकी नाजूक व हृदयस्पर्शी गोष्ट होती कीं या प्रश्नावर पांडव व यादव यांचें सदाचें द्वंद्व उत्पन्न होऊन प्रत्यक्ष यादवांच्या गणसंघांत सुद्धां त्यामुळें भेद उत्पन्न व्हावा. पण महाभारतकारांनीं त्या प्रकारचें जें वर्णन केलें आहे तें लक्षपूर्वक पाहिलें असतां वर उल्लेखिलेल्या कसोटींत श्रीकृष्ण बावन्नकशीं सोन्याप्रमाणें पूर्णपणें यशस्वी झाले असून विश्वास व प्रभाव या दोन्ही गोष्टी विलक्षण रीतीनें सिद्ध झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. महाभारतकार आदिपर्वांत (अ. २२० व २२१) म्हणतात:—

" सभापालानें सभेंत जमलेल्या यादवांना अर्जुनानें केलेल्या सुभद्राहरणाचें वृत्त सांगतांच ते आत्माभिमानी व मदानें डोळे लाल झालेले यादववीर अर्जुनानें केलेला अपमान सहन न होऊन 'मी मी' करीत आसनावरून उठूं लागले. कोणी म्हणाले, रथ जुंपा, कोणी म्हणूं लागले आमचीं आयुधें आणा, कोणी म्हणूं लागले

उत्कृष्ट धनुष्यें व चिलखतें चढवा, कोणी रथ तात्काळ सज्ज करा म्हणून जोरजोरानें ओरडून सूतांना आज्ञा करूं लागले. कोणाला तर तेवढाही विलंब सहन न होऊन त्यांनीं स्वतःच घोडे आपल्या रथांना जुंपले. त्या वीरांच्या त्या रणोत्सुक घाईचा त्या ठिकाणीं एकच गोंधळ माजून राहिला. अशा स्थितींत कैलासाच्या शिखराप्रमाणें शुभ्र वर्णाचे, उंच, व बलिष्ठ बलराम त्या सर्वांना उद्देशून बोलूं लागले. त्यांच्या गळ्यांत वनमाला होती. उत्कट मदानें ते धुंद होते. आवडतें नीलवस्त्र ते नेसले होते, व अर्जुनानें केलेल्या अपमानाच्या जाणिवेनें ते अत्यंत खवळून गेले होते. त्यांनीं त्या सर्व लोकांना सांगितलें, खुळ्यांनो, उगाचच रागावून व्यर्थ गर्जना कशास्तव करतां? हा जनार्दन श्रीकृष्ण, येवढ्या सगळ्या गोंधळांत सुद्धां अगदीं शांत व स्वस्थ बसलेला आहे. याच्या अंतःकरणाचा भाव समजावून घेतल्यावांचून आपल्या गर्जना व्यर्थ ठरतील. या अत्यंत बुद्धिसंपन्न कृष्णानें या प्रकरणांतील आपलें मनोगत सांगावें व जें याला योग्य वाटत असेल तेंच आपण दक्षतेनें करावें."

बलरामांचें तें भाषण ऐकतांच ती खवळलेली सभा एकदम शांत झाली. सर्व लोक 'फार चांगलें, फार चांगलें' म्हणून बोलूं लागले. उठलेली ती मंडळी पुन्हां आपआपल्या आसनावर बसली. नंतर बलराम श्रीकृष्णांकडे वळले व त्यांना म्हणूं लागले, "हे कृष्णा, चाललेल्या गोंधळाकडे स्वस्थपणें पहात कांहींएक न बोलतां तूं इतका शांत व स्वस्थ कसा बसला आहेस? आम्हीं सर्वांनीं केवळ तुझ्यासाठीं अर्जुनाचा येवढा सत्कार केला. पण तो दुर्बुद्धि कुलाधम त्या सत्काराला मुळींच योग्य नाहीं. ज्या भांड्यांतून जेवावें तेंच भांडें फोडून टाकण्याची निलाजरी वृत्ति, अभिजात व कुलवान् मनुष्य कधींही पत्करणार नाहीं. पूर्वीचा संबंध दृढ करणें, केलेले उपकार आठवणें, हींच कुलवंताचीं लक्षणें आहेत. ज्याला स्वतःचें कल्याण व्हावें असें वाटतें तो मनुष्य आमच्याशीं वागतांना कधींच साहसाचा अवलंब करणार नाहीं. त्यानें आमचा अपमान केला. तुझा अनादर केला. बलात्कारानें त्यानें सुभद्रा पळविली म्हणजे वस्तुतः त्यानें मृत्यूलाच मिठी मारलेली आहे. सापाच्या शेपटीवर पाय दिल्यावर

त्या अपराध्याला साप कधीं जिवंत सोडतो काय? त्यानें माझ्या मस्तकावर पाय दिलेला आहे. मी तो कसा सहन करणार? अर्जुनानें केलेलें हें अतिक्रमण मी कधींही सहन करणार नाहीं. त्याच्या एकटयाच्या या भयंकर अपराधासाठीं मी कौरवकुळाचें बीजसुद्धां शिल्लक ठेवणार नाहीं. एकटाच मी पृथ्वी निःकौरव करीन." याप्रमाणें बलराम गर्जना करूं लागतांच सभेंतील सर्व यादव योद्ध्यांनीं गर्जना करून त्यांच्या म्हणण्यास साथ दिली. श्रीकृष्णांनीं तें सर्व शांतपणें ऐकून घेतलें व नंतर ते बोलूं लागले. ते म्हणाले, "सुभद्रेला नेण्यांत अर्जुनानें या कुळाचा मुळींच अपमान केलेला नाहीं. किंबहुना त्यानें या कृत्यानें तुमचा सन्मानच अधिक वाढविलेला आहे असें माझें मत आहे. स्वयंवरांत स्वतःचा पराक्रम वापरणें अयोग्य आहे असें अर्जुनाचें मत असलें पाहिजे. पैसे घेऊन मुलगी देणें ही गोष्ट यादवांसारख्या निर्लोभी लोकांना मुळींच योग्य नाहीं हेंही अर्जुनानें ओळखलें. कन्येचा विक्रय जगांतील कोणता पुरुष करील व त्या स्वरूपाचा प्रतिग्रह तरी कोणता अभिजात व कुलीन पुरुष पत्करील? सुभद्रेचें स्वतःशीं लग्न व्हावें अशी अर्जुनाची उत्कट इच्छा होती. अशा स्थितींत इतर सर्व मार्गांतील दोष पाहून अर्जुनानें क्षत्रियाला सर्वस्वीं योग्य अशा धर्मानुसार पराक्रमानें सुभद्रेला नेलेलें आहे. माझें असें म्हणणें आहे कीं, यादव व पांडव या दोन्ही कुळांचा विचार केला असतां झालेला संबंध अगदीं योग्य आहे. अर्जुनासारख्या प्रथम श्रेणीच्या क्षत्रियानें आपल्या सुभद्रेला नेणें हेंच खरोखरी तिच्या भाग्याचें लक्षण आहे असें माझें मत आहे. भरतासारख्या विख्यात वंशांत जन्म पावलेल्या, पूर्वज म्हणून शंतनूचें नांव सांगणाऱ्या, कुंतीसारख्या मातेच्या, अर्जुनासारख्या जगद्विख्यात योद्ध्याला आपला संबंधी अथवा आपल्या कुळांतील कन्येचा वर म्हणून कोण पत्करणार नाहीं? उलट त्यासंबंधाचा अभिमान वाटून मुलीनें भाग्य काढलें असेंच कोणीही म्हणेल. अर्जुनासारख्याशीं असा संबंध येण्याची तर उलट कोणीही अभिलाषा बाळगील. आतां युद्धाची जी गोष्ट सगळे लोक बोलत आहेत त्यासंबंधीं मला इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, केवळ भगवान् महादेव सोडून पराक्रमाच्या

भरंवशावर अर्जुनाला युद्धांत कोणी जिंकू शकेल असें मला वाटत नाहीं. उत्कृष्ट घोडयांनीं सुसज्ज असा दिव्य रथ व अर्जुनासारखा शीघ्रास्त्र योद्धा या दोन्ही गोष्टींचा विचार केला तर सामर्थ्यानें त्याला जिंकणें ही मला तरी अशक्य गोष्ट वाटते. जें कल्याणकारक तेंच झालें आहे असें समजून आनंदानें व सामोपचारानें अर्जुनाकडे जावें व त्याला आणि सुभद्रेला थाटांत येथें आणून विवाह करावा असें माझें मत आहे. त्यामुळें हें प्रकरण गंमतीनें निकालांत निघेल व याचा शेवट अत्यंत गोड होईल. त्याच्या ऐवजीं युद्ध उपस्थित केलें व त्यांत एकटया अर्जुनानें पराक्रमानें तुम्हांला जिंकून जर सुभद्रेला नेलें तर तुमचा पराक्रमाचा नक्षा कायमचा उतरेल व मिळविलेली कीर्तिही धुळीला मिळेल हें लक्षांत ठेवा." श्रीकृष्णांचें हें बोलणें ऐकतांच सभेचा रंग पालटला व यादवांनीं त्यांच्या म्हणण्याप्रमाणें अर्जुनाला बोलावणें पाठवून कृष्णाच्या इच्छेप्रमाणें सर्व घडवून आणलें.

पराक्रमाचाच विचार केला तर प्रत्यक्ष सारें जगत् धारण करणाऱ्या शेषाचा अवतार म्हणून ज्याचा महाभारतांत उल्लेख आहे, तो प्रलंब, द्विविद इत्यादि आसुरीशक्तींचा निहंता बलराम हा अर्जुनामुळें पराभूत झाला असता असें वाटत नाही. आणि यादव गणसंघाचे मुख्य श्रीकृष्ण यांच्यापेक्षां अर्जुनाचा पराक्रम अधिक असल्याचा कोठेंही उल्लेख नाही. याच्या उलट अर्जुनापेक्षां शौर्य व सामर्थ्य यांत श्रीकृष्ण अधिकच श्रेष्ठ होते असें सिद्ध करणारे कितीतरी पुरावे आहेत.पण केवळ त्यांच्या इच्छाशक्तीचा प्रभाव व त्यांच्या मार्गदर्शनावरील विश्वास याविना हें प्रकरण इतक्या शांतपणें व सामोपचारानें निश्चितच मिटलें नसतें.

अनेक लोकांनीं सल्ला दिला तरी कृष्णांना विचारल्याविना कोणत्याही गोष्टींना हात घालण्याची पांडवांची वा यादवांची सिद्धता नाहीं. राजसूय यज्ञ करावा अशी युधिष्ठिराच्या अंतःकरणांत इच्छा उत्पन्न झाल्यावर त्यानें आपल्या बंधूंना, सुहृदांना, व मंत्र्यांना त्यासंबंधीं सल्ला विचारला. पण सर्वांनीं होकार भरूनही त्याच्या

अंतःकरणाचें समाधान होईना. शेवटीं या संबंधांत श्रीकृष्णांच्या शब्दाशिवाय निश्चय मुळींच करूं नये असें त्याला वाटूं लागलें. त्याच्या मनःस्थितीचें चित्र रेखाटतांना महाभारतकार म्हणतात (सभापर्व अ. १३–३५ ते ४०) कीं,–

" नीट विचार केल्यावांचून केवळ स्वतःच्याच इच्छेनें येवढा समारंभ करतां येणें शक्य नाहीं असें युधिष्ठिरास वाटूं लागलें व या कार्याचा निश्चय करण्यासाठीं श्रीकृष्णांनाच विचारलें पाहिजे असें त्याच्या मनानें घेतलें. तो सर्वज्ञ आहे व हवें तें त्यालाच करतां येणें शक्य आहे, कसल्याही संकटांतून आपल्याला तोच पार पाडूं शकेल अशी युधिष्ठिराची प्रगाढ निष्ठा होती. म्हणून त्यानें श्रीकृष्णांकडे तात्काळ दूत पाठविला."

युधिष्ठिराच्या आज्ञेप्रमाणें श्रीकृष्ण हस्तिनापुरास आल्यावर त्यांच्याशीं बोलत असतांना सुद्धां युधिष्ठिरानें हाच आपला निश्चय व्यक्त केलेला आहे. तो म्हणतो :

**प्रार्थितो राजसूयो मे न चासौ केवलेप्सया ।**
**प्राप्यते येन तत्ते हि विदितं कृष्ण सर्वशः ॥ ४६**
**यस्मिन् सर्वं संभवति यश्च सर्वत्र पूज्यते ।**
**यश्च सर्वेश्वरो राजा राजसूयं स विन्दति ॥ ४७**
**तं राजसूयं सुहृदः कार्यमाहुः समेत्य मे ।**
**तत्र मे निश्चिततमं तव कृष्ण गिरा भवेत् ॥ ४८**
**केचिद्धि सौहृदादेव न दोषं परिचक्षते ।**
**स्वार्थहेतोस्तथैवान्ये प्रियमेव वदन्त्युत ॥ ४९**
**प्रियमेव परीप्सन्ते केचिदात्मनि यद्धितम् ।**
**एवंप्रायाश्च दृश्यन्ते जनवादाः प्रयोजने ॥ ५०**
**त्वं तु हेतूनतीत्यैतान् कामक्रोधौ व्युदस्य च ।**
**परमं यत्क्षमं लोके यथावद् वक्तुमर्हसि ॥ ५१**

–(महाभारत, सभापर्व अ. १४)

" हे श्रीकृष्णा, राजसूय यज्ञ करण्याची माझी इच्छा आहे. पण केवळ इच्छेनें कोणी हा यज्ञ करूं शकत नाहीं, याचीही तुला नीट

कल्पना आहे. ज्याच्याजवळ सर्वप्रकारची शक्यता आहे, ज्याच्याविषयीं सर्वत्र पूज्यभाव असतो, व जो सम्राट आहे, तोच राजा राजसूय यज्ञ करूं शकतो. माझे सर्व सुहृद मी हा यज्ञ करावा असें मला सांगतात. पण या विषयांतील निश्चय केवळ तुझ्या शब्दांनीं व्हावयाचा आहे. जे मला हा यज्ञ करण्यासाठीं सांगत आहेत त्यांच्या संमतीमागें अनेक भावना असूं शकतात. केवळ माझ्यावरील सौहार्दामुळें मी जें करीन त्यांत दोषच असणार नाहीं अशा समजुतीनें कित्येक लोक मला होकार भरीत असतील. स्वतःच्या स्वार्थासाठींही कित्येक गोड बोलत असतात, तर कित्येकांना जें आपणांस प्रिय आहे तेंच हिताचेंही आहे असें वाटून प्रिय व हित यांमधील भेद ओळखावयास ते सर्वस्वी असमर्थ असतात. लोकसंमतीच्या पाठीमागें अशी विविध प्रकारची पार्श्वभूमि असूं शकत असल्यामुळें माझा गोंधळ उडालेला आहे. या प्रकारच्या कोणत्याही भावनांच्या आहारीं न जातां कामक्रोधादि मनोविकारांच्या अतीत राहून केवळ जें कल्याणाचें आहे तेवढेंच बोलणारा तुझ्यांविना दुसरा कोणीही नाहीं अशी माझी खात्री आहे आणि म्हणूनच मी तुला हें विचारीत आहें."

पुढें तर श्रीकृष्णांनीं हालवून खुंटा बळकट करावा त्याप्रमाणें युधिष्ठिराच्या या निष्ठेची परीक्षाच घेतलेली आहे. जरासंधाला ठार मारावयास्तव व तेंही युक्तीनें मारावयास्तव भीमसेन व अर्जुन यांना माझ्या स्वाधीन कर असें युधिष्ठिरास सांगतांना श्रीकृष्णांनीं बुद्धयाच असा शब्दप्रयोग केलेला आहे कीं,

**यदि मे हृदयं वेत्सि यदि ते प्रत्ययो मयि ।**
**भीमसेनार्जुनौ शीघ्रं न्यासभूतौ प्रयच्छ मे ।। ७**

–( महाभारत सभापर्व अध्याय २० )

"हे राजा, माझें अंतःकरण शुद्ध आहे अशी जर तुझी खात्री असेल, जर माझ्यावर तुझा निश्चित विश्वास असेल तर तुझे हे भीमार्जुन ठेव म्हणून मला दे. मी त्यांना योग्य रीतीनें सांभाळून परत आणीन."

श्रीकृष्णांच्या तोंडून वरील वाक्यें ऐकतांच त्यांच्याविषयीं आपल्याला असलेल्या निष्ठेसंबंधानें ते साशंक आहेत असें पाहून युधिष्ठिरांना अतिशय वाईट वाटलें. ते म्हणाले,

**अच्युताच्युत मा मैवं व्याहरामित्रकर्शन ।**
**पाण्डवानां भवान्नाथो भवन्तं चाश्रिता वयम् ।। ९**
**यथा वदसि गोविन्द सर्वं तदुपपद्यते ।**
**न हि त्वमग्रतस्तेषां येषां लक्ष्मीः पराङ्मुखी ।। १०**
**निहतश्च जरासंधो मोक्षिताश्च महीक्षितः ।**
**राजसूयश्च मे लब्धो निदेशे तव तिष्ठतः ।। ११**
**त्रिभिर्भवद्भिर्हि विना नाहं जीवितुमुत्सहे ।**
**धर्मकामार्थरहितो रोगार्त इव दुःखितः ।। १३**
**एवं प्रज्ञानयबलं क्रियोपायसमन्वितम् ।**
**पुरस्कुर्वीत कार्येषु कृष्णं कार्यार्थसिद्धये ।। १९**

–(महाभारत सभापर्व अ. २०)

"श्रीकृष्णा! श्रीकृष्णा! तूं असें बोलूं नकोस. तूंच पांडवांचा एकमात्र त्राता आहेस. आम्ही केवळ तुझ्यावर अवलंबून असलेले तुझे अनुचर आहोंत. तू जें म्हणालास तेंच झाल्याविना राहणार नाहीं अशी माझी दृढ श्रद्धा आहे. ज्यांना दैवानें वैभव दिलेलेंच नाहीं त्यांचा तू नेता राहणें शक्य नाहीं. तू आमचा अग्रणी आहेस. याचाच अर्थ वैभव व विजयश्री आमची आहे. तुझ्या आज्ञेनुसारच आम्ही वागू. तू ज्या अर्थी ही गोष्ट मनांत आणली आहेस त्या अर्थी जरासंध ठार झाला. त्याच्या बंधनागारांत असलेल्या राजेलोकांची सुटका झाली व राजसूय यज्ञही माझ्या पदरांत पडला असेंच मी समजतों. तू, भीमसेन व अर्जुन यांच्यावांचून मी जिवंत राहणेंच शक्य नाहीं. तुमच्यावांचून धर्म, काम व अर्थ यांनीं रहित व रोगानें आर्त झालेल्या माणसाप्रमाणेंच माझी अवस्था होईल. राजनीतिशास्त्र, बुद्धि, सामर्थ्य, क्रिया व उपाय यांनीं युक्त असलेल्या श्रीकृष्णांनाच कोणींही आपलें कार्य सफल व्हावें अशी इच्छा असली तर नेतृत्व दिलें पाहिजे."

युधिष्ठिराचा श्रीकृष्णांवरील हा केवढा प्रगाढ विश्वास आहे. जन्मभर सत्याचें आचरण करणाऱ्या युधिष्ठिराकडूनसुद्धां प्रत्यक्ष द्रोणाचार्यांशीं श्रीकृष्णांनीं खोटें बोलावयास लाविलें याहून त्यांचा अधिक प्रभाव तो कोणता असावयास पाहिजे! श्रीकृष्ण जेथें पाऊल टाकतील तेथें यश निश्चित मिळेल अशी सर्वांच्या अंतःकरणांत श्रद्धा आहे. 'हातांत शस्त्र न धारण करणाऱ्या मला कशासाठीं तूं पत्करलेंस?' असें श्रीकृष्णांनीं विचारल्यावर अर्जुनानें त्यांना असें स्पष्ट उत्तर दिलें कीं,

**भवांस्तु कीर्तिमाँल्लोके तद्यशस्त्वां गमिष्यति ।**
**यशसां चाहमप्यर्थी तस्मादसि मया वृतः ।। ३६**

– (महाभारत, उद्योगपर्व अ. ७)

"तुम्ही जगांत विख्यातकीर्ति आहांत. यश तुमच्याकडे येणार ही गोष्ट निश्चित आहे. मला यशाची इच्छा आहे म्हणून मी तुम्ही निःशस्त्र असलांत तरी तुम्हांलाच पत्करलें."

ज्याप्रमाणें अनुयायांचा श्रीकृष्णांवर प्रगाढ विश्वास आहे त्याप्रमाणें त्यांचीही आपण म्हणूं तें आपले अनुयायी ऐकतील व कसलाही भेद उत्पन्न न होतां आपण त्यांना वाकवूं व वळवूं शकूं अशी पूर्ण खात्री आहे. अनुयायांचा नेत्यावर लाख विश्वास असला तरी स्वतः नेत्यालाच अनुयायांविषयीं तेवढा विश्वास नसला तर तें नेतृत्व सफळ होऊं शकत नाहीं. श्रीकृष्णांच्या मनांत असा पुसट सुद्धां संशय नाहीं. कौरवांच्या राजसभेंत शिष्टाईप्रीत्यर्थ श्रीकृष्ण गेले असतां त्यांनीं धृतराष्ट्राशीं बोलणें करतांना त्याला असें सांगितलें कीं,–

**त्वय्यधीनः शमो राजन् मयि चैव विशांपते ।**
**पुत्रान् स्थापय कौरव्य स्थापयिष्याम्यहं परान् ।। १३**

–(महाभारत, उद्योगपर्व अ. ९५)

"हे राजा धृतराष्ट्रा, शांतता ही तुझ्या स्वाधीन आहे व माझ्या स्वाधीन आहे. तूं आपल्या मुलांना आवर. मी तुला निश्चित सांगतों कीं मी पांडवांना या परिस्थितींतही आवरूं शकेन."

ज्यांना द्यूतानें लुबाडण्यांत आलें, विष देणें, जिवंत जाळून मारण्याचा प्रयत्न करणें, व शेवटीं तर प्रत्यक्ष धर्मपत्नीची विटंबना करणें, अशीं एकामागून एक, वधदंडच ज्यांना योग्य अशीं अपकृत्यें करणाऱ्या अपराध्यांच्या संबंधांत सुद्धां सर्वतोपरी त्यांचा विध्वंस करण्याचें सामर्थ्य असलेल्या, आपल्या अनुचरांना सारे अपराध गिळून हात आवरावयास लावण्याची व त्यांच्या कंठांत प्रेमानें हात घालावयास लावण्याची शक्ति आपल्या शब्दांत आहे याची श्रीकृष्णांना केवढी निश्चिति वाटत असली पाहिजे हें यांतून चांगलेंच व्यक्त होतें.

जें ज्या वेळीं करावयास पाहिजे तेंच त्यावेळीं श्रीकृष्णांच्या हातून घडलेलें आहे. जणुं कांहीं त्यांना परिस्थितीचीं सारीं गूढें व समोरच्या माणसांच्या अंतःकरणाचा प्रत्येक पापुद्रा ठाऊक आहे. युद्धानंतर गोत्रजांच्या हत्येचा विलक्षण शोक युधिष्ठिराला झाला असतां या शोकावर आपल्या शब्दापेक्षां भीष्मांच्याच शब्दाचा खरा परिणाम होईल हें ओळखून श्रीकृष्णांनीं भीष्मांकडून युधिष्ठिराला उपदेश करविण्यांत आपला हा विशेष प्रकट केलेला आहे. श्रीकृष्ण योग्यतेनें कितीही थोर असले तरी वयानें ते युधिष्ठिरापेक्षां धाकटे, नात्यानें त्यांना श्रेष्ठ मानणारे व प्रत्येक प्रसंगीं वडील म्हणून त्यांना वंदन करणारे असल्यामुळें त्यांच्या युक्तिवादासमोर युधिष्ठिर गप्प बसला तरी खऱ्या अर्थानें त्याच्या अंतःकरणाचें कधींच समाधान होणार नाहीं हें श्रीकृष्णांच्या तात्काळ ध्यानांत आलें. कारण व्यावहारिक दृष्ट्या श्रीकृष्णांकडे पहाण्याची त्यांची भावना वेगळी असण्याचा स्वाभाविकपणेंच संभव होता. युधिष्ठिराचें शोकाकुल अवस्थेंत समाधान करावयास अशी व्यक्ति हवी होती कीं जी युधिष्ठिरांच्या पेक्षां वयानें व नात्यानें वडील आहे, धर्मव्यवहाराच्या विषयांत युधिष्ठिराप्रमाणेंच कसलेही पर्याय वा युक्तिवाद पत्करणें जिला मुळींच आवडत नाहीं, जिच्या ज्ञान व तपस्येविषयीं युधिष्ठिराला संशय असूंच शकत नाहीं व जिनें हा अधर्म आहे असें म्हटल्या-बरोबर युधिष्ठिराला मनापासून तसें मानणें भाग पडेल. याच कारणास्तव श्रीकृष्ण शोकाकुल युधिष्ठिराला स्वतः उपदेश न

करतां पितामह भीष्माकडे घेऊन गेले व त्यांच्याकडून त्यांनीं त्याला उपदेश करविला. भीष्मासमोर आपल्या अंत:करणांतील या भावना ध्वनित करतांना (शांतिपर्व अ. ५४–३४) ते म्हणतात :–

"हे महाराज, आपण वयानें वृद्ध आहांत. सर्व प्रकारचा धार्मिक आचार आपण कांटेकोरपणें करीत आला आहांत. राजधर्म व इतर सर्व प्रकारचे धर्म आपणांस पूर्णपणें ज्ञात आहेत. राजधर्माचें तर आपण पालनच केलेलें आहे. आपल्या जन्मापासून आजपर्यंतचें आपलें संपूर्ण आयुष्य असें गेलेलें आहे कीं, ज्यांत कोणीही दोष वा कलंक पाहिलेला नाहीं. सर्व धर्मांचे महान् ज्ञाते म्हणून सर्व राजे आपणांस ओळखतात. म्हणून पित्यानें पुत्रांस सांगावें त्या नात्यानें आपण युधिष्ठिरास उपदेश करावा. हा जिज्ञासेनें आपणांकडे आला आहे. हा विचारील त्या सर्व प्रश्नांची आपण त्याला यथावत् उत्तरें द्या. ऋषि व देवांची आपण उपासना केलेली आहे." श्रीकृष्णांची ही योजना आंखतांनाची संपूर्ण मन:स्थिति त्यांच्या या उद्गारांत भीष्मांना त्यांनीं जीं विशेषणें लाविलीं आहेत त्यावरून व्यक्त होते. त्यांच्या या वैशिष्ट्याचें आणखी एक गमतीचें निदर्शन महाभारतांत आहे. सर्व सैन्याचा वध करून, दुर्योधनाला ठार मारल्यावर, पहिल्यांदांच राजा धृतराष्ट्राकडे अत्यंत शोकाकुल अवस्थेंत त्याचें समाधान करावयास कोणी जावें असा मोठा प्रश्न उत्पन्न होऊन श्रीकृष्णांनींच तेथें जावें अशी युधिष्ठिरानेंच त्यांना विनंति केली. त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं तें काम पत्करलें. ज्या पद्धतीनें श्रीकृष्ण तेथें गेले व त्यांनी वर्तन केलें तें सूक्ष्मतेनें पाहिलें म्हणजे ही कला त्यांच्या ठिकाणीं किती परिपूर्णावस्थेस गेली होती याची कल्पना येते. महाभारतकार शल्यपर्वांत ( अ. ६३–३३ ) वर्णन करतात :–

"नंतर वेगानें श्रीकृष्ण रथांत बसून हस्तिनापुरास गेले. राजा धृतराष्ट्राकडे आधीं निरोप पाठवून निर्विकार श्रीकृष्ण राजमहालांत गेले. तेथें आपल्या आधींच येऊन बसलेल्या महर्षि व्यासांना त्यांनीं पाहिलें. त्यांनीं जाऊन क्रमानें व्यास, धृतराष्ट्र व गांधारी यांना वंदन केलें व कांहीं एक न बोलतां धृतराष्ट्राचा हात आपल्या हातांत घेऊन डोळ्यांतून घळघळां अश्रुधारा वाहवीत श्रीकृष्ण

जोरजोरानें स्फुंदून रडू लागले. मुहूर्तभर याप्रमाणें रडून झाल्यानंतर त्यांनीं पाण्यानें आपले डोळे स्वच्छ केले व ते राजा धृतराष्ट्राला म्हणाले, "वयानें व अनुभवानें आपण आमच्यापेक्षां वृद्ध आहांत. आपल्याला कोणतीही गोष्ट अज्ञात आहे असें कांहीं नाहीं. काळाचें सर्वभक्षक सामर्थ्य व त्याची कुरुकुळावर झालेली अवकृपा यांचें आपणांस संपूर्णपणें ज्ञान आहेच."

महाभारतकारांनीं 'अदीनात्मा' म्हणजे विकारातीत असें श्रीकृष्णांना विशेषण वापरून धृतराष्ट्राचा हात आपल्या हातांत घेऊन कांहीं एक न बोलतां गळा काढून श्रीकृष्ण रडले व त्यांनीं डोळयांतून अश्रुधारा वाहविल्या याचें जें वर्णन केलें आहे तें केवळ अपूर्व आहे यांत शंका नाहीं. शोक व मोह यांच्या अतीत असलेल्या श्रीकृष्णांना, ठरवून मारलेल्या दुष्टांविषयीं, कोणत्याही प्रकारची अनुकंपा नव्हती व धृतराष्ट्राविषयीं त्यांनीं सद्भाव बाळगावा असें त्याचें कोणतेंही वर्तन वा पूर्वचारित्र्य नव्हतें हें अगदी स्पष्ट आहे. अशा स्थितींत प्रसंगाचें महत्त्व ओळखून शोकसंकुल अंतःकरणाच्या व्यक्तीला पुन्हां पूर्वस्थितीवर कसें आणावें याचा जणूं कांहीं आदर्श श्रीकृष्णांनीं दाखविलेला आहे.

## श्रीकृष्णांची अपूर्व बुद्धिमत्ता

गीतेच्या निर्मात्याच्या बुद्धिमत्तेचें विशेष वर्णन करण्याची कांहीं आवश्यकता आहे असें नाहीं. पण तात्त्विक क्षेत्रांतल्या बुद्धिमत्तेबरोबरच व्यावहारिक क्षेत्रांतही तिनें परिपूर्णता गांठली होती असें आढळून येईल. श्रीकृष्णांनीं न सोडविलेला असा एकही बौद्धिक पेचाचा प्रसंग नाहीं. प्रत्येक धर्मसंकटावर मात करणारीं, त्या संकटांतून मार्गदर्शन करणारीं व तें संकट आणणाऱ्यावरच उलटवून आपल्या पक्षाची सुटका करून घेणारीं अशीं त्या बुद्धिमत्तेचीं वैशिष्ट्यें आहेत. असा एकही बौद्धिक वा धार्मिक निष्ठांचा पेंचप्रसंग नाहीं कीं ज्याच्या निरगांठी त्यांच्या बुद्धिमत्तेसमोर उकलल्याविना राहिल्या आहेत. त्याचीं कांहीं निदर्शनेंच मी येथें देतो.

तत्कालीन क्षत्रियांत युद्धासंबंधीं एक अशी प्रथा होती कीं, ज्याचें बोलावणें प्रथम येईल त्याच्याकडे जावयाचें. कुळाची, अब्रूची व यशाची चाड असलेला प्रत्येक क्षत्रिय ही प्रथा पाळीत असे. केवळ या रूढ संकेतासाठींच द्रुपदानें अभिमन्यूच्या लग्नाच्या वेळीं "वाटाघाटींचा घोळ हवा तितका चालू द्या, पण पहिल्याप्रथम सर्व राजे लोकांना बोलावून घ्या. नाहींतर दुर्योधन त्यांना आपल्या पक्षाला साहाय्य करण्यास्तव बोलावील व तुम्हांला पंचाईत पडेल" अशी पांडवांना स्पष्ट सूचना दिलेली आहे. अशा कांहीं संकेतांच्या खोड्यांत सांपडूनच कौरवांविषयीं स्वतःच्या अंतःकरणांत पूर्णपणें तिरस्कार असतांनासुद्धां नकुलसहदेवांचा मामा मद्रराज शल्य याला कौरवांच्याकडे जावें लागलें. दुर्योधनानें या प्रथेचा उपयोग करून श्रीकृष्णांनाच धर्मसंकटाच्या पेचांत पकडण्याचा प्रयत्न केला होता. श्रीकृष्णांना निमंत्रण द्यावयास तो पांडवांच्या पूर्वी गेला. महाभारतकार या प्रसंगाचें वर्णन करतांना (उद्योगपर्व अ. ७) असें सांगतात कीं, श्रीकृष्ण झोंपले असतां दुर्योधनानें त्यांच्या शयनमंदिरांत प्रवेश केला. तो श्रीकृष्णांच्या डोक्याकडे बसला. मागाहून अर्जुनानें त्या शयनमंदिरांत प्रवेश केला व तो हात जोडून श्रीकृष्णांसमोर उभा राहिला. कृष्ण अशा बेतानें उठले कीं, प्रथम अर्जुनच त्यांच्या दृष्टीस पडला. मागाहून दुर्योधनाकडेही पाहून त्यांनीं त्या दोघांचेंही स्वागत केलें व त्यांच्या येण्याचा हेतु विचारला. त्याबरोबर आपला डाव साधलाच असें वाटून हांसत हांसत दुर्योधन श्रीकृष्णांना म्हणाला, "या संघर्षांत मला साहाय्य करणें हेंच आपलें कर्तव्य आहे. अर्जुनाचें व माझें आपल्याशीं सख्य सारखेंच आहे. नात्यानेंही अर्जुन व मी आपणांस सारखेच आहोंत. मैत्री व संबंध याही दृष्टींनीं आपणास सारखेच असलेल्या आम्हां दोघांपैकीं युद्धांत आपलें साहाय्य मागावयास मात्र मी अर्जुनाच्या पूर्वीं आलेलों आहें हा माझा विशेष आहे. पूर्वींच्या परंपरांना धरून वागणाऱ्या सज्जन लोकांना त्या परंपरा सोडणें इष्ट नाहीं. रूढ परंपरा अशी आहे कीं, जो पहिल्या प्रथम येईल त्याला साहाय्य करावयास्तव जावें. सज्जनांची ही प्रथा आहे. आज सर्व सज्जनांत तुम्ही अग्रगण्य आहांत. जगांतील

सज्जनांना तुम्ही मान्य आहांत. म्हणून सज्जनांच्या चारित्र्यानुरूपच तुम्ही वागलें पाहिजे. म्हणजे तुम्ही अर्जुनाऐवजीं मलाच साहाय्य करावयास्तव आलें पाहिजे." त्याचे ते उद्गार ऐकून श्रीकृष्ण हंसले व त्यांनीं दुर्योधनाचा डाव त्याच्यावरच उलटविला. ते म्हणाले : "तुम्हीं येथें पहिल्याप्रथम आलांत याविषयीं मी मुळींच संशय घेत नाहीं. पण मी पहिल्याप्रथम तुम्हांला पाहिलें नसून अर्जुनाला पाहिलें आहे. दृष्टिप्रामाण्याच्या अनुरोधानें अर्जुनच माझ्याकडे प्रथम आला असें होऊं शकेल. मला इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, तुमच्या प्रथम येण्यामुळें व अर्जुनाला मी प्रथम पाहिलें असल्यामुळें तुम्हां दोघांचाही माझ्यावर सारखाच अधिकार लागूं झालेला आहे. पण हा समान अधिकार वापरतांना रूढ प्रथेच्या अनुसारच प्रथम अर्जुनानें तो वापरला पाहिजे. आधीं धाकटयाचें समाधान करावें अशी प्रथा आहे. अर्जुन तुमच्यापेक्षां धाकटा आहे म्हणून प्रथम त्यानें मागणी करावी. ती प्रथम पुरविली जाईल. नंतर तुमच्या मागणीचा विचार. कारण प्रथा काटेकोरपणेंच पाळली गेली पाहिजे. एका बाजूला मी माझ्याचसारख्या युद्धकुशल अशा नारायण नांवाच्या गोपांचें सैन्य देणार आहें व दुसऱ्या बाजूला मी स्वतः जाईन. मात्र मी शस्त्रसंन्यास घेतलेला असून प्रत्यक्ष युद्ध न करण्याचा निश्चय केलेला आहे. लढणारें सैन्य व न्यस्तशस्त्र मी या दोहोंमधून तुम्हांला निवड करावयाची आहे. मात्र निवडीचा पहिला अधिकार अर्जुनाचा व नंतर तुमचा. अर्जुना, धर्मानेंच तुझा पहिला अधिकार आहे. काय हवें तें माग."

किती युक्तीनें श्रीकृष्णांनीं निर्णयाचा अधिकार अर्जुनाला दिला व दुर्योधनाचा डाव त्याच्यावरच उलटविला आहे! वस्तुतः दुर्योधन सैन्यच मागेल व अर्जुन आपणांसच मागेल असा त्यांचा विश्वास होता. तरीही निर्णयाचा अधिकार शत्रूकडे मळींच न देतां त्यांनीं अर्जुनाकडेच तो दिला व तोही धर्मशास्त्राच्या परिभाषेंत दिला. यावरून सर्व प्रकारची सावधगिरी बाळगण्याचें त्यांचें कौशल्यही उत्कृष्ट रीतीनें व्यक्त होतें.

त्यांच्या या बौद्धिक सामर्थ्यानें दोन वेळां तरी पांडवांचें संरक्षण झालेलें आहे. राजकीय युद्धें नेहमींच दोन प्रकारचीं असतात. एक सर्व लोकांना स्पष्टपणें प्रत्ययास येणारें असें उघड युद्ध असतें तर दुसरें कधींही डोळ्यांना न दिसणारें असें मंत्रयुद्ध असतें. युद्धांत जय मंत्रयुद्धामुळेंच वस्तुतः मिळत असतो. शत्रूच्या मनोवृत्तींचा पूर्णपणें लाभ घेऊन त्यावर आपले सर्व डावपेंच उभारावयाचे व त्यांनीं शत्रूच्या अंतःकरणावर हवा तो परिणाम घडवून आणावयाचा हाही या मंत्रयुद्धाचाच एक भाग आहे. कणिकासारख्या कुटिल राजनीतिज्ञाचा शिष्य राजा धृतराष्ट्र या मंत्रयुद्धांत अतिशय कुशल होता. त्यानें पांडव वनवासांतून परत आल्यावर कौरवांचें व पांडवांचें युद्ध होण्याचा संभव ओळखून युधिष्ठिराचें मनोविज्ञान, त्याची विशिष्ट धार्मिक वृत्ति व त्याची उपजत कारुण्यमूर्ति ध्यानांत घेऊन आपला खास दूत संजय त्याच्याकडे पाठविला व पराक्रमाचा दर्प दाखवून पांडवांचा पराभव करतां येणें मुळींच शक्य नाहीं हें ओळखून युधिष्ठिराच्या केवळ सरळ स्वभावाचा फायदा घेऊन संजयाकरवी त्याच्यावर कूटनीतीचा प्रयोग केला. धृतराष्ट्राचा हा प्रयोग व त्या प्रयोगाचें स्वरूप माझ्या महाभारतावरील व्याख्यानांत धृतराष्ट्राच्या स्वभावचित्रांत मीं उल्लेखिलेलें असल्यामुळें येथें तें पुन्हां उद्धृत करीत नाहीं. संजय युधिष्ठिराला युद्धाचें भडक चित्र रंगवून असें सांगूं लागला कीं "सुखदुःख हें ज्याच्या त्याच्या भाग्यानुसार ज्याला त्याला मिळत असतें. तदनुरूप मनुष्यानें मिळेल तेवढ्यांत संतुष्ट असावें. कमवावयाचें असतें केवळ चारित्र्य! तेवढें तुझ्यासारख्यानें संरक्षण केलें पाहिजे. लोक तुला धार्मिक म्हणतात. ती धार्मिकतेची कीर्ति केवढाही कठिणतम प्रसंग उद्भवला तरी संरक्षण करणें हेंच तुझें काम आहे. कुरु कुलाची धर्मपताका उंच फडकावीत ठेवणें तुझें काम आहे. दुर्योधन आधींच पतित असल्यामुळें तो कसाही वागला तरी तो लाज कोळूनच प्याला आहे. तूं मात्र जन्मभर चांगला वागत आला आहेस. ती कीर्तीच शेवटीं बरोबर येणार. द्वारकेंत भिक्षा मागून पोट भरत असलें तरी तें पत्करावें पण कुलनाशक युद्ध पत्करूं नये. राज्य कोणाजवळ

टिकलें आहे ? धर्मापेक्षां राज्य मोठें नाहीं. लोक तुला काय म्हणतील याचा विचार कर." संजयाच्या या विशिष्ट प्रचाराचा परिणाम अर्जुनावरसुद्धां किती झाला होता हें गीतेच्या पहिल्या अध्यायावरून दिसून येईल. मग युधिष्ठिर तर कोमल मनोवृत्तीचा अर्कच होते. पण श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरासमोरच त्यांना पटेल अशा पद्धतीनें धार्मिक परिभाषेंतच संजयावर अशी बाजू उलटविली कीं त्यानंतर धृतराष्ट्राला पुन्हां धर्मपरिभाषेंत आश्रय शोधण्याचें सामर्थ्यच उरलें नाहीं. सजयाला उत्तर देतांना (उद्योगपर्व अ.२९) प्रथमच श्रीकृष्णांनी युधिष्ठिराला धर्माचा उपदेश करणाऱ्या संजयाच्या शिष्टपणावर म्हणजे पर्यायानें राजा धृतराष्ट्राच्याच धृष्टतेवर जोरकस प्रहार केला. ते म्हणाले कीं, "हे संजया, मोठा धर्माचा उपदेश करावयास तू आलास. पण माझ्यापेक्षां व धर्म-राजापेक्षां तुला धर्म अधिक कळतो काय ? उत्साहानें आपला स्वधर्म पाळावयास निघालेल्या युधिष्ठिरालाच धर्माचा उपदेश करावयास धजणें हें केवढें धारिष्ट्य आहे ! तुला जर सर्व धर्म कळतो तर चातुर्वर्ण्याचाही धर्म तुला कळत असलाच पाहिजे. मग मी तुला असें विचारतों कीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचे धर्म जर तुला कळतात तर कौरवांच्या कडून अज्ञानीपणानें धर्मानुसार वागणाऱ्या आम्हांला तो धर्म टाकून देण्याचा उपदेश करावयास तूं आलासच कसा ? क्षत्रियांचा वेदोदित धर्म, अश्वमेध राजसूयादि यज्ञ करणें हा असून धनुष्य, चिलखत, रथ, चतुरंग सैन्य, व शस्त्रें हीच तो धर्म पाळण्याचीं खरीं साधनें आहेत. त्या आपल्या धर्मानुसार आपल्या पूर्वजांच्या दिव्य परंपरेला अनुसरून युद्धाचें आपलें धार्मिक कर्तव्य पार पाडीत असतांना पांडवांना मरण आलें तरी सुद्धां तें धर्मदृष्ट्या प्रशंसनीयच समजलें जाईल. पण कायरे ? राजांच्या धर्माची तुला ओळख आहे म्हणतोस ! मला सांग युद्ध हा राजाचा धर्म आहे, कां युद्धाला पाठ दाखविणें हा धर्म आहे ? चातुर्वर्ण्याच्या धर्मकर्मानुसार युद्धरूपी धर्माचें आचरण करणाऱ्या पांडवांची तूं प्रशंसा कर किंवा हवें तर निंदा कर, पण ते कोणाच्या प्रशंसेनें वा कोणाच्या निंदेनें आपला धर्ममार्ग मुळींच सोडणार नाहींत हें लक्षांत ठेव. राजांचा

धर्म अप्रमत्त राहून प्रजेचें संरक्षण करणें, दान देणें, यज्ञ करणें व विवाह करून गृहस्थाश्रमधर्माचें उत्तमपणें पालन करणें हाच आहे. या आपल्या धर्मानुसार वागणारा, सर्व वर्णांना त्यांच्या त्यांच्या धर्मानुसार वागावयास भाग पाडणारा, अंतःकरणांत निर्लोभ वृत्ति धारण करून प्रजांच्या विषयीं समभावना अंतःकरणांत बाळगणारा राजा श्रेष्ठ म्हणविला जातो. त्यानें लोभ धारण करूं नये परंतु कर्तव्यही सोडू नये. केवळ बळ हाच नीतीचा दंडक समजून अपहरण करण्याची बुद्धि राजे लोकांत उत्पन्न झाली त्या वेळीं युद्धें उत्पन्न झालीं व त्याची साधनें म्हणूनच चिलखत, शस्त्र व धनुष्य यांची उत्पत्ति झाली. महेंद्रानें मानवतेंतील कंटकांचा (दस्यु) वध करण्यास्तव शस्त्र, चिलखत व धनुष्य यांची निर्मिति केली. दस्यूंच्या वधानें अतिशय मोठ्या पुण्याचा लाभ होतो व ज्यांना दस्यू म्हणावें असे सर्व दोष कौरवांच्या ठिकाणीं उत्कटतेनें वास करतात. अधार्मिक व धर्ममर्यादा न ओळखणाऱ्या दस्यूच्या व कौरवांच्या मध्यें कांहींएक भेद नाहीं. आपल्या पुत्रासहित राजा धृतराष्ट्र धर्मानेंच जें पांडवांचें आहे तें गिळंकृत करून वर तें त्यांना पुन्हां कधींही परत न देतां सदाचें पचवून टाकण्याचीं कारस्थानें करीत आहे. प्राचीन राजधर्माची त्याला पुसटशी सुद्धां ओळख नाही. सारे कौरव त्याच्या या पापकृत्यांत त्याचे साथीदार आहेत. तू म्हणशील कीं दुर्योधन दोषी आहे. धृतराष्ट्राचा दोष काय? पण लोकांना न दिसतां चोरी करणारा व उघडपणें चोरी करणारा हे. दोघेही सारखेच तिरस्करणीय आहेत. धृतराष्ट्र हा स्वतः आड राहून अपहरण करणारा आहे, तर दुर्योधन हा उघड अपहार करणारा आहे. दोघेही सारखेच पापी आहेत. त्यांच्यांत कांहीं भेद नाहीं. अंतःकरणांत लोभ वाढलेला, व तो झांकण्यासाठीं धर्माची ढाल पुढें उभी करणारा राजा धृतराष्ट्र आतां वांचू शकणार नाहीं. जें पांडवांचेंच ठरलेलें आहे, त्याचा अधर्मानें अपहार करून, वर धर्माच्या गोष्टी तुम्ही कितीही सांगितल्या तरी त्या कोण ऐकून घेईल? कौरवांच्या राज्यामध्यें परत जाऊन तूं त्यांनाच धर्माचे उपदेश कर. त्यांना जाऊन सांग की, चालत आलेल्या परमपवित्र

पुरातन धर्मानुसार पांडव आपला राज्यभाग घेण्याप्रीत्यर्थ स्वतःचे प्राणसुद्धां रणदेवतेस समर्पण करतील, पण कोणत्याही परिस्थितींत चोरांना आपले अधिकार पचूं देणार नाहींत. ते सगळे मृत्युपाशांत सांपडलेले आहेत. असेंच भयानक पाप त्यांच्या हातून घडलेलें आहे कीं, त्यांना क्षमा असूं शकत नाहीं. मृत्यूशिवाय त्यांना आतां दुसरा कोणताही दंड नाहीं. पांडवांची प्रिय भार्या, महासती यशस्विनी द्रौपदी, रजस्वला अवस्थेंत भरसभेंत ओढीत आणण्यांत आली असतां तुमच्यांतील भीष्मप्रभृति लोकांनीं त्या गोष्टीची उपेक्षा केलेली आहे हें मी विसरूं शकत नाहीं. कौरवांमधील लहानापासून थोरापर्यंत सर्व लोक या अपकृत्यांत भागीदार आहेत. कोणी जर त्या वेळीं, निदान स्वतः धृतराष्ट्र तरी हें अपकृत्य थांबवावयास पुढें आला असता तरी त्यानें माझें मोठें प्रिय केलें असतें व त्याच्या पुत्रांनाही मृत्युदंडापासून वांचवितां आलें असतें. सासऱ्यांच्या व वडीलधाऱ्या मंडळींच्या सभेंत त्या कुलांगार दुःशासनानें द्रौपदीला फरफरत ओढीत नेलें. ती करुण विलाप करून कोणी आपल्याला संरक्षण देईल काय म्हणून पाहूं लागली असतां एकट्या विदुरावांचून दुसरे कोणीही तिला आधार देऊं शकलें नाहीं. केवळ कार्पण्यामुळें कुरुसभेंतील मोठमोठ्या सामंतांपैकीं प्रत्येकजण गप्प बसला. एकालाही त्या सभेंत बोलण्याचें धैर्य झालें नाहीं. धर्माचा सन्मान राखून केवळ एकट्या विदुरानेंच त्या मूर्खाला सन्मार्गाचा उपदेश केला. संजया, तूं सुद्धां या पापांत साथीदार आहेस. कौरवसभेमध्यें हा अधार्मिक प्रकार चालू असतां तेथें तूं कौरवांविरुद्ध व धर्माच्या सन्मानाप्रीत्यर्थ एक शब्द तरी बोललास काय? त्या वेळीं तुला धर्माची आठवण कोठें आली नाहीं? आणि आज युधिष्ठिरासारख्या धर्ममूर्तीला तूं धर्माचा उपदेश करावयास आलास काय? हें साहस करावयास धजतांना तुला लाज कशी वाटली नाहीं? द्रौपदी खरोखरीच धन्य आहे. अथांग सागरांतून नावेनें स्वतः तरून इतरांसही तारावें त्याप्रमाणें तिनें दुःखसमुद्रांतून स्वतः तरून पांडवांनाही तारलें आहे. त्या वेळीं तिच्या श्वशुरासमक्ष, तो अधम सूतपुत्र कर्ण, त्या महासतीला

काय बोलला तें तुला आठवत नसलें तरी तें माझ्या हृदयावर चांगलेंच कोरलेलें आहे. "हे द्रौपदी, तूं दुर्योधनाची दासी होऊन राहा. तुला आतां दुसरा मार्ग नाहीं. तुझे पति दुसऱ्याचे गुलाम झालेले आहेत. ते आतां पति राहिलेले नाहींत. त्यांचा तुझ्यावर कांहींही अधिकार नाहीं. तू दुसरा पति निवड." संजया, कर्णाचा हा मर्माचा आघात म्हणजे हाडांत खोलवर रुतून बसलेला बाण आहे. अर्जुनाच्या अंतःकरणांत हा बाण एकसारखा सलतो आहे. पार्थ त्याच्या वेदना विसरूं शकत नाहीं. कृष्णाजिनें नेसून पांडव वनांत जावयास निघाले असतां हे षंढ पार नष्ट झाले व दुर्गतीच्या नरकांत सदाचे गेले असें तो नीच दुःशासन म्हणाला. तो दुसराही बाण आमच्या हृदयांत खोलवर रुतून बसला आहे. गांधारांचा तो अधम राजा शकुनि द्यूताच्या वेळीं युधिष्ठिरांना म्हणाला, "काय उरलें आहे तुझ्याजवळ? आतां द्रौपदीला पणाला लाव." संजया, तो तिसराही बाण आमच्या हृदयांत खोलवर रुतून बसला आहे. असल्या वध्य, पापिष्टतम लोकांचें अन्न खाऊन तूं आम्हांला धर्मोपदेश करावयास आलास काय? पण एक लक्षांत ठेव, शहाण्या माणसानें वन व व्याघ्र दोघांचेंही रक्षण करावें. सपुत्रराजा धृतराष्ट्र हें वन आहे, पांडव हे व्याघ्र आहेत. वनावांचून वाघ उघडा पडतो व त्याचा नाश होतो. वनांत वाघ नसला तर कोणीही तें वन तोडू शकतो. म्हणून वनानें व्याघ्राचें संरक्षण करावें व व्याघ्रानें वनाचें संरक्षण करावें हाच उत्कृष्ट मार्ग आहे. पांडव धृतराष्ट्राची सेवा करावयासही सिद्ध आहेत व त्यांच्याशीं युद्ध करावयासही सिद्ध आहेत. राजा धृतराष्ट्राला यापैकीं जें पत्करावयाचें असेल तें त्यानें खुशाल पत्करावें. तू जाऊन त्याला असें सांग कीं, धर्मनिष्ठ पांडव जसे शांततेचे पुरस्कर्ते आहेत, तसेंच ते समर्थ आणि अद्वितीय योद्धेही आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवून पुढचें पाऊल टाका."

भगवान् श्रीकृष्ण जर नसते तर संजयाच्या शिष्टाईच्या जाळ्यांत युधिष्ठिराचें काय झालें असतें तें सांगवत नाहीं. पण श्रीकृष्णांच्या संजयाला व त्याच्या मागोमाग धृतराष्ट्रालाही गार करून टाकणाऱ्या या धर्मपरिभाषेंतीलच जोरकस चपराकीनें धृतराष्ट्राचें तोंड

जें एकदां मिटलें तें सदाचें मिटलें आहे. फार कशाला, यानंतर पुन्हां चुकून सुद्धां धृतराष्ट्रानें धर्मपरिभाषेचा आश्रय घेतला नाहीं. यानंतरच्या प्रत्येक भाषणांत त्यानें आपला पक्ष व आपला मुलगा अधार्मिक आहे अशीच परिभाषा वापरलेली आहे. इतकेंच नव्हे तर पांडवांना उपदेश करण्याची कल्पना सुद्धां पुन्हा त्याच्या मनांत उद्भूत होऊं शकली नाहीं.

भगवान् श्रीकृष्णांच्या या अपूर्व बुद्धिकौशल्यानें पांडवांच्या भोवतीं संरक्षककवच उभारलें नसतें तर स्वतः पांडवसुद्धां वांचले नसते. इतकेंच नव्हे तर स्वतःच स्वतःभोंवतीं उत्पन्न केलेल्या खोड्यांतून सुटका न होतां ते विनाश पावले असते अशी वस्तुस्थिति आहे. कर्णपर्वांत या संबंधाची मोठी अद्भुत गोष्ट आहे. तिचा उल्लेख महाभारतावरील व्याख्यानें या ग्रंथांतील माझ्या अर्जुनावरील व्याख्यानांत मी थोडक्यांत केलेलाही आहे. महायुद्धांत कर्णानें युधिष्ठिराचा पराभव केल्यानंतर ते शिबिरांत आले. ते रणक्षेत्रांत दिसेनात म्हणून अर्जुन व श्रीकृष्ण हेही त्यांचा शोध करीत करीत शिबिरांत आले. त्यांना पहातांच कर्णानें केलेली आपली दुर्दशा कळून अर्जुनानें त्याला ठार मारलें असावें व ती आनंदाची वार्ता सांगावया-साठीं हा या ठिकाणी आला असावा अशा समजुतीनें युधिष्ठिरांनीं त्याची प्रशंसा करावयास प्रारंभ केला. तेव्हां अर्जुनानें त्यांना खरी परिस्थिति समजावून सांगितली. 'अजून मी कर्णाला मारलें नसून आतां जाऊन मारणार आहे' असें त्यानें सांगितलें. पण या वाक्यानें युधिष्ठिरांच्या आत्यंतिक आनंदाच्या भावना आत्यंतिक रागांत परिणत झाल्या व त्यांनीं क्रोधाच्या भरांत अर्जुनाला असें म्हटलें कीं, (कर्णपर्व अ. ६८–२८) "तुझ्यापेक्षां अस्त्र चालविण्यांत जो अधिक कुशल असेल त्याला हें गांडीव धनुष्य देऊन टाक." अर्जुनानें हें ऐकतांच एकदम खड्ग उपसलें व रागानें लाल नेत्र करून तो युधि-ष्ठिराकडे पाहूं लागला. श्रीकृष्णांनीं त्याची ती अवस्था पाहिली व त्याला विचारलें (कर्णपर्व अ. ६९–६, ७) कीं,

" अर्जुना, या शिबिरांत तुला वध्य आहे असें कोणीही दिसत नाहीं; मग कशासाठीं व कोणावर तूं प्रहार करणार आहेस ?

तुला वेड तर लागलें नाहीं? हें भयानक खड्ग तू कशासाठी हातांत घेतलें आहेस ?" अर्जुनानें त्यांना असें सांगितलें कीं, "दुसऱ्याला गांडीव दे असें जो कोणी मला म्हणेल त्याचा शिरच्छेद करावयाचा अशी माझी प्रतिज्ञा आहे. युधिष्ठिरानें तसें म्हटलें असल्यामुळें त्याचा वध केल्याविना मी सत्यप्रतिज्ञ राहणार नाहीं." भगवान् श्रीकृष्णांनीं तें ऐकतांच त्याचा धिक्कार केला (कर्णपर्व अ. ६९) व म्हणाले: "मला आज ही गोष्ट स्पष्टपणें कळली कीं परिणतप्रज्ञ लोकांचा तुला मुळींच सहवास घडलेला नाहीं. तू नुसताच धर्मभीरु नसून महामूर्ख आहेस. महत्त्वाच्या प्रसंगी तुझी बुद्धि पूर्णपणें गोंधळली. धर्माचें खरें रहस्य जाणणारा मनुष्य तुझ्यासारखा कधींही वागणार नाहीं. एक तर अशी भलती प्रतिज्ञा तूं केलीस हाच तुझा मूर्खपणा आहे. शिवाय अशा पद्धतीनें ती पाळण्यांत अधर्म व मूर्खपणा यांचा तूं कळसच करीत आहेस. गुरूंना कसें मारावें याची तुला कल्पना तरी आहे काय ? ज्यांना तुम्ही म्हणावयाचें त्यांना तू म्हणणें व ज्यांचा सन्मान करावयाचा त्यांची तोंडावर निर्भर्त्सना करणें हाच गुरूचा खरा वध होय." अर्जुनानें श्रीकृष्णांच्या मार्गदर्शनानुरूप युधिष्ठिरांची निर्भर्त्सना केली व आपल्या प्रतिज्ञेचें पालन केलें. पण पुन्हां तो आपलें खड्ग उपसून उभाच राहिला. श्रीकृष्णांनीं विचारलें,"तुला वेड तर लागले नाहीं?" त्यावर पार्थ म्हणाला, "युधिष्ठिरांचा जो वध करील त्याचा वध करण्याची माझी दुसरी प्रतिज्ञा आहे. मी पर्यायानें कां होईना पण युधिष्ठिरांचा वध केलेला आहे. त्यामुळें स्वतःचा वध करणें हाच माझ्यासमोर मार्ग उरलेला आहे." भगवान् श्रीकृष्णांना स्वतःच्याचभोंवतीं आत्मनाशाचें कडें अकारण उभारून ठेवणाऱ्या आपल्या मित्राची दया आली. ते म्हणाले, 'वेड्या, अरे जसा युधिष्ठिराचा वध झाला, तसा तूं आपलाही वध करून घे. या तुझ्या पांचभौतिक शरीराकडून पुष्कळच मोठें कार्य सृष्टिदेवतेला करून घ्यावयाचें आहे. त्याचा नाश कशास्तव करतोस ? मी तुला मार्ग सांगतों. "तूं आपल्या तोंडानें आपली स्वतःची प्रशंसा

कर म्हणजे तुझाही वध झाला. स्वतःच्या गुणांची स्वतःच्या तोंडानें प्रशंसा करणें हाच मनुष्याचा खरा वध होय." खरोखरी भगवान् श्रीकृष्णांच्या बुद्धिमत्तेचें कवच होतें म्हणूनच पांडव वांचले आहेत. साऱ्या महाभारताच्या इतिहासांत एकाही प्रसंगाची अशी तटबंदी नाहीं कीं जेथें भगवान् श्रीकृष्णांची तीक्ष्ण व मार्गदर्शक बुद्धि अणुमात्र तरी अडखळलेली आहे.

भगवान् श्रीकृष्णांच्या कार्यकुशलतेंत एक विशेष गोष्ट अशी दिसून येते कीं, एका साध्या कामांत ते अनेक कामें साधून घेतात. कर्तृत्ववान् पुरुषांचें वर्णन करीत असतांना "एका क्रिया द्व्यर्थकरी प्रसिद्धा" एका कामांत दोन कामें साधणें असें करीत असतात. पण भगवान् श्रीकृष्ण हे एकाच कामांत आणखीही किती तरी कामें साधीत असल्याचें दिसून येतें. महाभारतांतील सभापर्वांत राजसूय यज्ञाच्या वेळी श्रीकृष्णांनीं अग्रपूजेच्या निमित्तानें त्यांची अमर्याद निंदा करणाऱ्या व शेवटीं तर त्यांना युद्धासही आव्हान करणाऱ्या चेदिपति शिशुपालाला ठार मारलें आहे. शिशुपालाला ठार मारणें ही वास्तविक दिसावयास अतिशय स्वाभाविक अशी एक सामान्य घटना आहे. एकानें श्रीकृष्णांचा अधिक्षेप केला. त्यांना तो नाहीं नाहीं तें टाकून बोलला व शेवटीं स्वतः होऊन त्यानें त्यांना युद्धाचें आव्हान केले व रागावलेल्या श्रीकृष्णांनीं त्याला ठार मारून टाकलें. एवढेंच वरून दिसावयास या घटनेचें साधें स्वरूप आहे. पण परिणामावरून कृत्याचा विचार व त्याचें मूल्यमापन केलें तर या घटनेची खरी कल्पना येते. एका शिशुपालाला ठार मारण्यांत त्यांनीं पुढील गोष्टी साधल्या आहेत :—

(१) खऱ्या क्षत्रियाप्रमाणें आव्हान स्वीकारून शत्रूला ठार मारण्यांत धर्माचें पालन केलें. (२) द्वारकेवर हवे तसे अत्याचार करणाऱ्या समाजकंटकाला ठार करून सदाचा एक उपद्रव नाहींसा केला. (३) सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे "युधिष्ठिराच्या नव्या साम्राज्य सत्तेचा आम्ही केवळ प्रेमानें स्वीकार केलेला आहे हा केवळ त्याच्यावरच उपकार आहे, वस्तुतः, या नव्या सत्तेजवळ आम्हीं भ्यावें असें तिच्याजवळ फारसें सामर्थ्य नाहीं, अशी समजूत करून

घेतलेल्या राजे लोकांच्या अंतःकरणांत या वधानें नव्या सत्तेचा धाक उत्पन्न करून तिचें आसन दृढमूल केलें. कोणत्याही सत्तेला पहिल्याप्रथम दृढमूल व्हावयास आपल्या सामर्थ्याचा अपूर्व धाक व त्यांतून उत्पन्न होणारा एक प्रकारचा वचकच उपयोगी पडतो. म्हणून प्रत्येक राजनीतिधुरंधर सत्ताधारी ही गोष्ट केल्याविना राहात नाहीं असें जगांतील सत्तासंस्थापकांचा इतिहास सांगतो. शेवटीं समाजधारणा बळाच्या धाकानेंच होत असते. "दण्डस्य हि भयात्सर्वं जगद्भोगाय कल्पते" हा सृष्टीचा अनादि कालापासूनचा सिद्धांत आहे.

भगवान् श्रीकृष्णांच्या अपूर्व बुद्धिमत्तेचें व कार्यकौशल्याचें असेंच दुसरें मोठें उदाहरण द्रोणपर्वांतील घटोत्कचवधाचें आहे. द्रोणपर्वांतील रात्रींच्या युद्धाच्या प्रसंगांत कर्णाच्या शक्तीचें बलिदान म्हणून घटोत्कचाला भगवान् श्रीकृष्णांनीं कर्णावर पाठविलें. त्याच्या राक्षसी सामर्थ्यासमोर दुसऱ्या कोणत्याही शस्त्राचा उपयोग नसल्यामुळें महेंद्रानें दिलेल्या आपल्या शक्तीचा उपयोग करून कर्णानें घटोत्कचाला ठार मारलें पण एका घटोत्कचाला मारविण्यांत श्रीकृष्णांनीं किती कामें साधलीं तें पहाण्यासारखें आहे.

(१) कर्णाची अमोघ शक्ति घटोत्कचावर वाया घालवून अर्जुनाची प्राणभयाची भीति त्यांनीं सदाची नष्ट केली व उलट कर्णासारख्या अत्यंत महत्त्वाच्या शत्रूचा वध सोपा करून ठेविला. ते स्वतःच अर्जुनाला असें म्हणतात (द्रोणपर्व अ. १८०–१२) कीं, "हे अर्जुना, कर्णाची अमोघ शक्ति घटोत्कचावर खर्ची पडल्यामुळें तो आतां युद्धांत जवळजवळ ठार झालाच आहे असें समज. शक्ति हातांत असतांना कार्तिकेयाप्रमाणें सामर्थ्यशील असलेल्या कर्णाला कोण युद्धांत आव्हान देऊं शकेल? " कर्णाचें महत्त्व भारतीय युद्धांत किती होतें हें मी माझ्या महाभारतावरील व्याख्यानें या ग्रंथांत कर्णाचें व्यक्तिचित्र रेखाटतांना सांगितलेंच आहे. एका कर्णाची शक्ति जातांबरोबर कौरवपक्षाचा पराभव व पांडवपक्षाचा जय या दोन्ही गोष्टी निश्चित झालेल्या आहेत.

(२) घटोत्कचाला ठार मारणें भगवान् श्रीकृष्णांना आवश्यकच वाटत होतें. ते स्वतःच म्हणतात (द्रोणपर्व अ. १८१–२७, २८) :

"हा ब्राह्मणद्वेषी, यज्ञाचा द्वेष करणारा, धर्माचा लोप करणारा पापात्मा घटोत्कच मला ठार मारावयाचाच होता. कारण जे जे धर्माचा लोप करणारे आहेत ते ते सर्व मला वध्य आहेत. धर्माच्या स्थापनेसाठीं मी ही प्रतिज्ञा केलेली आहे. म्हणून मी या महेंद्राच्या शक्तीनें बुद्धयाच कर्णाकडून घटोत्कच मारविला." तात्पर्य, धर्मद्वेषी लोकांचा वध करणें हें जें अत्यंत महत्त्वाचें असें त्यांचें अवतारकार्य तें त्यांनीं घटोत्कचाच्या वधानें अंशतः पूर्ण केलें.

(३) जर कर्णानें घटोत्कचास मारलें नसतें तर श्रीकृष्णांना स्वतःलाच त्याला ठार मारावें लागलें असतें. केवळ पांडवांच्या प्रेमासाठींच श्रीकृष्णांनीं त्याला यापूर्वी मारलें नव्हतें. पण अवतार-कृत्याचा आवश्यक भाग म्हणून तें प्रेम बाजूला ठेवूनही त्यांनीं घटोत्कचाचा वध केलाच असता इतकें तें त्यांना स्वतःचें आवश्यक कर्तव्य वाटत होतें. ते म्हणतात (द्रोणपर्व अ. १८१–२४ ते २६) कीं,

"मी युक्तीनें कर्णाकडून या अमोघ शक्तीनें घटोत्कचाला ठार मारविलें. जर या युद्धांत कर्णानें घटोत्कचास मारलें नसतें तर मी स्वतःच त्याला ठार मारलें असतें. केवळ तुमचें प्रिय व्हावें म्हणून मी त्याला आजवर मारलें नव्हतें." पण ज्या पद्धतीनें त्यांनीं घटो-त्कचाला मारलें त्यांत पांडवांचें प्रेम राखलें, स्वतःवरचा लोकापवाद टाळला, वध्य तर मारला पण तो परस्पर मारवून स्वतः अगदीं निर्लेप राहिले. केवढी ही विलक्षण कार्यकुशलता !

भगवान् श्रीकृष्णांच्या विभूतिमत्त्वाच्या आणखी कांहीं अपूर्व वैशिष्ट्यांचा परिचय आपण पुढील व्याख्यानांत करून घेऊं.

# धर्मसाम्राज्याची स्थापना

लौकिक दृष्टीनें पाहिलें तर भीष्म विरागी होते तर श्रीकृष्ण हे संसारी होते. एकदां उच्चारलेल्या प्रतिज्ञेच्या शब्दासाठीं भीष्मांनीं साऱ्या जन्मभर आपल्या जीवितसर्वस्वाचें बलिदान केलें तर भगवान् श्रीकृष्ण विजय पदरांत पाडून घेण्यासाठीं व अन्य कारणास्तव प्रतिज्ञेचें कवच सहजपणें बाजूला करतांना शब्दांचे अर्थ हवेतसे करतांना आढळतात. वयानेंही श्रीकृष्ण भीष्मांचे नातू शोभावेत असे आहेत. असें सगळें असतांनाही श्रीकृष्णांसमोर भीष्म नम्र होतांना आढळतात याचें खरे कारण श्रीकृष्णांच्या अंत:करणाच्या धारणेंत असल्याचें आढळून येईल. श्रीकृष्णाच्या अंत:करणाची ती धारणा काय असेल? परमेश्वरी धारणा हीच ती धारणा होय. त्यांच्या हातून अनंत कर्में घडलीं. पण त्या कर्मांची प्रेरक शक्ति व्यक्तित्वांतून व अस्मितेच्या केवळ समर्यादितेंतून स्फुरलेली नव्हती. म्हणजे काय तें आपण आतां पाहूं.

जगांतील कोणतीही व्यक्ति कर्मावांचून राहूं शकत नाहीं. कांहीं तरी स्पंदन, हालचाल तिला करावीच लागते. व्यक्तीची ही हालचाल दोन प्रकारची असते. कांहीं हालचाली या नैसर्गिक असतात. म्हणजे ती करणें वा न करणें हें व्यक्तीच्या इच्छेवर अवलंबून नसून नैसर्गिक रीत्याच ती व्यक्तीला करावी लागते. श्वासोच्छ्वास करणें ही नैसर्गिक हालचाल होय. आपल्या गरजा पुरविणें हें काम ज्याच्यांतून होईल असें आपोआप घडणारें स्पंदन म्हणजे नैसर्गिक कर्म होय. त्याच्या उलट कांहीं विशिष्ट उद्देश अंत:करणांत धरून अनेक कारणांस्तव मनुष्य आपल्या कर्मेंद्रियांच्या द्वारें विशिष्ट हालचाली करूं लागतो. हें त्याचें ऐच्छिक कर्म होय. विशिष्ट प्रकारचा उद्देश हा आपल्या स्वत:पुरता मर्यादित असूं शकेल किंवा तो त्याहून व्यापक स्वरूपाचा सुद्धां असूं शकेल. मला स्वत:ला विशिष्ट गोष्ट उपभोगाची आहे असें वाटून तो उपभोग घेण्या-

व्याख्यान १५ वें दिनाक ११-४-५२

प्रीत्यर्थ मी हालचाल करूं लागेन अथवा परिस्थितिप्राप्त ती गोष्ट माझ्याकडे चालत आली आहे व तिला न झिडकारतां मी तिच्या केलेल्या उपयोगानें जगास विशिष्ट स्वरूपाचें वळण लागण्याचा संभव आहे म्हणूनही मी ती गोष्ट करीन. त्या ठिकाणीं वरवर दिसावयास दोन्ही क्रिया सारख्याच दिसल्या तरी ऐच्छिक क्रियांच्या पाठीमागें असलेल्या धारणा मात्र परस्परांहून अगदीं वेगवेगळ्या प्रकारच्या आहेत. सामान्यतः मनुष्याची प्रत्येक हालचाल सुखाच्या प्राप्तीप्रीत्यर्थ असते. महाभारतकारांनीं "दुःखादुद्विजते सर्वः सर्वस्य सुखमीप्सितम्" म्हणजे दुःखाचा सर्वांसच कंटाळा असतो व सुख सर्वांसच हवें असतें असें जें म्हटलें आहे तें सर्वस्वी खरें आहे. म्हणून कोणत्याही ऐच्छिक कर्माची प्रवृत्ति ही स्वतःच्या सुखा-प्रीत्यर्थ असतें. पण स्वतःचें सुख म्हणजे तरी काय? चालू असलेली वस्तुस्थिति मनुष्यास नको असते, ती बदलवून तिच्या जागीं नवी वस्तुस्थिति निर्माण करावी अथवा जी आहे तिच्यांत आप-ल्याला इष्ट ती भर घालावी असें मनुष्यास वाटत असतें. हें जोंवर वाटत नाहीं तोंवर कोणत्याही ऐच्छिक कर्माची प्रवृत्तीच होत नाहीं. अंतःकरणास असें वाटूं लागणें म्हणजेच त्याच्या मूळच्या समतेचा भंग होऊन त्या जागीं क्षुब्धता, विषमता, साम्यावस्था नष्ट होणें व त्या जागीं एक प्रकारची खळबळ माजणें हे प्रकार उत्पन्न होतात. अंतःकरणाची समता बिघडल्याखेरीज ऐच्छिक कर्माची प्रवृत्ति होत नाहीं. ती समता सुखाच्या जाणिवेंतून उत्पन्न होते. सामान्यतः सुख हें स्वतःचें वैयक्तिक सुखच समजलें पाहिजे. ज्याचें आपल्या स्वतःच्या अस्मितेवर अथवा अस्तित्वाच्या जाणिवेवर प्रेम नाहीं असा जगांत कोणीही मनुष्य नाहीं. हें जें स्वतःला स्वतःविषयीं वाटणारें प्रेम त्याच्या अनुषंगानेंच मनुष्य स्वतःच्या अस्तित्वाला हव्याशा वाटणाऱ्या अशा सर्व वस्तूंवर माझेपणाची भावना अथवा ममत्व विस्तारीत असतो. आपली अस्मिता व आपलें ममत्व यांच्या विषयींच्या सुखदुःखात्मक भावनेंतून प्रत्येकाच्या अंतःकरणांतील कर्मप्रवृत्तीचा उदय होतो. म्हणजेच वैयक्तिक सुखप्राप्तीच्या व दुःखनिवृत्तीच्या इच्छेनें मनुष्य कर्मप्रवृत्त होतो. हें कर्म सफल झालें

तर त्याला आनंद होतो. सफल न झालें तर त्याला दु:ख वाटतें. कोणी तें सफल होण्याच्या मार्गात विघ्नें आणलीं तर क्रोध येतो. क्रोधाचे सारे विकार मनुष्याच्या स्वत:च्या सुखेच्छेंतून निर्माण होतात. ती इच्छा स्वत:भोंवती घुटमळत राहते. असा हा सामान्यत: कर्माचा व त्याच्या प्रवृत्तीचा क्रम आहे. त्याचा थोडक्यांत तपशील असा देतां येईल कीं, मनुष्यानें मनांत सुखाची अिच्छा बाळगून केलेलें किंवा दु:खाचा संभव टाळण्यासाठी केलेलें जें कर्म तें ऐच्छिक कर्म होय. हें ऐच्छिक कर्म स्वार्थी व स्वार्थनिरपेक्ष असें दोन्ही प्रकारचें असतें. प्रत्येक स्वार्थी कर्म वाईट असतेंच असें नाहीं. फक्त त्याचा जन्म स्वत:च्या वैयक्तिक सुखदु:खभावनेंत झालेला असतो. मोठ्या व विशाल अंत:करणाच्या पुरुषांच्या बाबतीत सुखदु:खभावनेऐवजीं कर्तव्याकर्तव्य असा शब्दप्रयोग करतां येईल. पण कोणतेंही कर्म या दोन प्रकारच्या जाणिवेंतून उत्पन्न होतें. आणि ती जाणीव अथवा भावना व्यक्तित्वाच्या आधारावरच अधिष्ठित असते. या उभय भावनांपैकीं सुखदु:खांच्या जाणिवेंतून उत्पन्न होणारी जी भावना ती ईप्सित कर्माचें फळ पदरांत पडावें व त्यांचा भोक्ता मी असावें अशा वासनेवर अवलंबून असते. कर्तव्याकर्तव्याची भावना ही यापेक्षां अधिक श्रेष्ठ असून त्या ठिकाणी ही भोक्तृत्वाची वासना नसते. पण त्या ठिकाणी स्वत:च्या व्यक्तिगत सुखदु:खाचा हव्यास अथवा भोक्तृत्वाची भावना नसली तरी कर्तृत्वाची एकप्रकारची भावना तरी असतेंच; व ती कर्तृत्वाच्या भावनेची वेल ज्याच्यावर आधारलेली असेल तो स्वत:च्या व्यक्तित्वाच्या जाणिवेचा वृक्ष अंत:करणांत असतोच. हा वृक्ष अत्यंत उदात्त व शुद्ध अशा बीजाचा असला तरी सुद्धां तो व्यक्तित्वाची मर्यादित जाणीव बाळगूनच असतो ही गोष्ट निर्विवाद आहे. विशाल जगत् हें आपलें कार्यक्षेत्र, आपण मात्र त्या कार्यक्षेत्रांत स्वार्थनिरपेक्ष जीवननिष्ठा बाळगणारे असे एक कर्तव्यनिष्ठ साधक व त्या दृष्टीनें आपल्या कर्तव्यापासून अणुमात्रही इतस्तत: न ढळणें हें आपलें परमपवित्र कर्तव्य अशा तऱ्हेची जाणीव अशा अंत:करणांत सदैव जागृत असते. ज्या व्यक्तित्वाला ती धरून राहते तें व्यक्तित्व उदात्त असलें तरी मर्यादित आहे,

अथवा विशुद्ध असलें तरी जीवभावाला धरून आहे. स्वतःच्या या व्यक्तित्वाचें क्षितिज निःस्वार्थ असलें तरी विशिष्ट कर्तव्यभावनेच्या दृष्टीनें कां होईना, पण तें ममतापूर्ण आहे यांत शंका नाहीं. स्वतःच्या या संकुचित व्यक्तित्वाचें विशाल व सर्वव्यापक नित्य तत्त्वांत परिणमन होऊन ज्या ठिकाणचा प्रत्येक होकार हा व्यक्तित्व विश्वरूप झाल्यामुळें विश्वरूप होईल त्या ठिकाणीं जीवानें जीवाच्या मर्यादिततेचें कवच फोडून तो परमेश्वर झाला असें म्हटलें पाहिजे.

भगवान् श्रीकृष्णांचें व्यक्तित्व हें अशा स्वरूपाचें विश्वरूप व्यक्तित्व होतें. त्यामध्यें महान् कार्यप्रीत्यर्थ कर्तृत्व, अहंकार, विकारांचाही साधनें म्हणून वापर व अंगीकार, क्वचित् प्रसंगीं बारीकसारीक, व्यक्तित्वाच्या भावनेवर अवलंबून असलेले भिन्नभिन्न अवस्थांतले सूक्ष्मातिसूक्ष्म आविष्कारही दृष्टोत्पत्तीस येतील अथवा येतात. पण ते सगळे आगंतुक, मुद्दाम होऊन अंगावर पांघरूण घ्यावें पण तें स्वतःहून निराळें असावें अशा स्वरूपाचे आहेत. निःस्वार्थी पण व्यक्तित्वभावनायुक्त कर्त्याच्या धारणेपेक्षां ही धारणा अत्यंत वेगळ्या स्वरूपाची आहे. भीष्म व श्रीकृष्ण यांच्या अंतःकरणाच्या धारणेंत जर कांहीं भिन्नता असेल तर ती या स्वरूपाची आहे. ती नीट आकलन व्हावयास भारतीयांच्या तात्त्विक परिभाषेंत शिरणें थोडेंसें आवश्यक आहे.

पिंडब्रह्मांडाचा उलगडा करीत असतां प्राचीन भारतीयांनीं तो असा केलेला आहे कीं, संपूर्ण ब्रह्मांडाच्या मुळाशीं ज्ञानात्मक चैतन्यतत्त्व असून तें चैतन्य तत्त्वच आपल्या इच्छाशक्तीनें जगद्रूपानें नटलेलें आहे. मानवी शरीरांत असलेलें चैतन्य अथवा जीवभाव हा वस्तुतः त्या विश्वचैतन्याचाच अंश असून त्यानें ही गोष्ट ओळखणें व त्या भावामध्यें आपलें अंतःकरण पूर्णपणें स्थिर करणें हेंच मानवी जीविताचें परमसाध्य होय. यालाच विश्वरूप होणें अथवा विश्वात्मक होणें असें म्हणतात. शांत, समबुद्धीचा, सदा आनंदमय, अशा रीतीचा या धारणेचा जो सर्वश्रेष्ठ पुरुष तो सिद्ध व त्याची ही अखंड धारणा म्हणजेच ब्राह्मी स्थिति होय. ही

परमावधीची स्थिति एकदां प्राप्त झाली म्हणजे त्याला नीतिशास्त्राचे अथवा कार्याकार्याचे नियम घालून देण्याचें कधीच कारण नसतें. ब्राह्मी स्थितीप्रत पोहोंचलेल्या पुरुषास नीतिनियम लावू पहाणें म्हणजे स्वयंप्रकाश सूर्याजवळ अंधकार असेल या कल्पनेनें त्याला दिवटीनें प्रकाश दाखविण्यासारखेंच आहे. तेथें भोक्तेपणाची तर काय, पण कर्तेपणाचीही कल्पना नसते. अशा पुरुषाविषयीं "न तस्य लोमाऽपि मीयते अपि मातृवधेन पितृवधेन वा' मातृहत्या किंवा पितृहत्या झाली तरी त्याचें कूसही वांकडें होत नाही असें म्हटलें आहे. व्यक्तित्व विश्वरूप झाल्यामुळें सुखदु:खभावनेच्या अतीत अशी त्याची ही अवस्था आहे. या निस्सीम निष्काम अवस्थेंत असलेली जी महान् व्यक्ति तिला स्वत:साठी कांहीही मिळवावयाचें नसून अखिल भूतमात्रांच्या हितार्थ सदैव झटणें हें तिच्या सगळ्या स्पंदनाचें अथवा हालचालीचें एकमात्र स्वरूप असतें. स्थितप्रज्ञाची जी साम्यावस्था ती भगवान् श्रीकृष्णांच्या ठिकाणी जन्मत:च सिद्ध असून विश्वाच्या अणूरेणूशीं ते पूर्णपणानें एकात्मभाव असलेले होते. आणि त्यामुळें त्यांचा प्रत्येक उद्गार वा हुकार या विश्वात्मभावांतूनच झालेला आहे. कॉंट व प्लेटोसारख्या पाश्चात्य तत्त्वज्ञांनींही नीति-अनीतीच्या निर्णयाच्या बाबतीत या महान् धारणेलाच महत्त्व दिलेलें आहे. भीष्मांचा अहंभोक्तृत्वभाव पूर्णपणें संपलेला होता. पण भगवान् श्रीकृष्ण भोक्तृत्व व कर्तृत्व या दोन्ही भावांच्या अतीत असे विश्वात्म धारणेचे आहेत. त्यामुळें त्यांच्या प्रत्येक कृत्याला रूढ धर्माधर्माच्या नियमांऐवजीं त्या नियमांनाच त्यांच्यामुळें वस्तुत: अर्थ यावयाचा ही गोष्ट भीष्मांनीं ओळखलेली आहे. शुद्ध व्रताचरणानें जी गोष्ट अंतिम साध्य म्हणून साधावयाची, तीच ज्याचा स्वभाव झाला त्याला धर्माचा, पूर्णतेचा अथवा नियतीच्या अंतिम मूल्यांचा साक्षात् आविष्कार समजून भीष्म वा युधिष्ठिर त्यांच्यासमोर नम्र झाले असल्यास व स्वत: कांटेकोर साधकावस्थेनेंच वागून त्यांच्या प्रसन्नतेची आणि कृपेची अपेक्षा करीत असल्यास त्यांत नवल अथवा अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. श्रीकृष्णांनीं वारंवार आपल्या अवतारकृत्याचें हें

रहस्य स्पष्ट केलेलें आहे व आपल्या विश्वात्मभावाचा नि सर्वभूत-हितपरतेचा वारंवार निर्देश केलेला आहे. त्यांच्या या धारणेचा प्रत्यक्ष त्यांच्या जीवनांतून कसा आविष्कार झाला होता हें आपण पुढें पाहू. पण या धारणेमुळेंच भीष्मादि श्रेष्ठ लोकही त्यांच्यासमोर नम्र झाले ही वस्तुस्थिति आहे.

सुखदु:खातीतता,मानापमानातीतता, निर्ममता, निरहंकारिता या गोष्टी श्रीकृष्णांचे स्वभावसिद्ध आविष्कार आहेत. मानवी जीवनांतील वासनामय पशुत्व व मर्यादित व्यक्तिमत्त्व यांचा निरास करून त्या ठिकाणीं परिपूर्णावस्थेचें देवजीवन उत्पन्न करणें हा श्रीकृष्णांचा जीवनहेतु होय. ह्या देवजीवनाच्या निर्मितीला जो जो मार्ग साहाय्यक असेल तो तो धर्म व त्या निर्मितीला येणारे बाह्य वा आंतर, प्रत्यक्ष वा वैचारिक क्षेत्रांतील अडथळे हाच अधर्म होय. राजसत्तेच्या रूपानें या स्वरूपाचा अधर्म स्थिरपद झाल्यामुळें तो नष्ट करून मानवतेचें देवजीवनांत रूपांतर करण्यास अनुकूल असें वातावरण निर्माण करण्यासाठीं व तें स्थिरपद करण्यासाठी धर्मसाम्राज्याची स्थापना करणें हें श्रीकृष्णांचें आवश्यक कार्य झालें. या कार्यासाठीं त्यांना जो महान् प्रयत्न करावा लागला त्यांतूनच त्यांचें युगपुरुषत्व प्रकट झालेले आहे. युगपुरुष श्रीकृष्णांच्या या महान् कार्याकडे आतां आपण पाहूं.

## युगपुरुषाचें कार्य

आपल्या धर्मस्थापनेच्या वा धर्मसाम्राज्याच्या निर्मितीच्या कार्याचें साधनयंत्र म्हणून श्रीकृष्णांनी ज्यांना हाताशीं धरलें ते पांडव त्यांच्यासमोर कां विनम्र झाले व त्यांनीं श्रीकृष्णांना यंत्र म्हणून आपला वापर कां करूं दिला याचीं कारणें भगवंताच्या या महत्तम विभूतिवैशिष्टयांत आहेत. तीं वैशिष्टयें कोणतीं तें आपण आतांपर्यंत पाहिलें. एकदां पांडवांना हाताशीं धरल्यावर श्रीकृष्णांनीं त्यांना अपार संपत्ति कशी दिली हेंही आपण दहाव्या व्याख्यानांत पाहिलें. श्रीकृष्णांचा समर्थ हात पाठीशीं उभा राहतांच पूर्वीं शत्रूंना चिरडावयास सुलभ वाटणारे पांडव त्यांना आतां इतके बलवान् वाटूं

लागले कीं, त्यांच्यावर स्वारी करून त्यांना मारण्याची कल्पनाही मनांत आणणें मूर्खपणाचें असून त्यांच्या संबंधांत समोपचारानेंच मार्ग काढावा व त्यांच्या राज्याचा वांटा त्यांना देऊन टाकावा असे विचार त्यांना विष देऊन वा जाळून मारण्याची इच्छा करणाऱ्या लोकांच्या मनांत उत्पन्न झाले. केवळ पांडवांच्या पाठीशीं असलेला श्रीकृष्णांचा समर्थ हात हेंच या विलक्षण स्थित्यंतराचें खरें कारण होतें. कौरवांच्या राजसभेंत पांडव प्रकट झाल्याचें कळतांच त्यांच्यावर स्वारी करून त्यांना नष्ट करून टाकण्याची कल्पना ज्या कारणास्तव मूर्खपणाची आहे असें कौरवांच्या राजसभेंतील मंत्री म्हणतात ती कारणें त्यांनीं पुढीलप्रमाणें (महाभारत, आदिपर्व अ. २०५–२० व २६) दिग्दर्शित केलेलीं आहेत:–

"ज्यांच्या पक्षाला बलराम आहे व ज्यांचा मंत्री श्रीकृष्ण आहे, सात्यकि ज्यांच्या पक्षाचा अभिमान वाहतो आहे त्यांना युद्धांत न जिकण्यासारखें काय असू शकतें? यादव अत्यंत बलवान् असून पुष्कळ आहेत. त्यांचा पुढारी श्रीकृष्ण ज्या पक्षास राहील तिकडेच ते सारे जाणार. आणि जिकडे श्रीकृष्ण आहे त्या पक्षाचा विजय नक्कीच ठरलेला आहे." हा सर्व विचार करून नंतरच राजा धृतराष्ट्राकडून पांडवांना सन्मानानें निमंत्रण आलें. श्रीकृष्णांनीं पांडवांना राज्य मिळावयास व तेंही सामोपचारानें आणि सहजतेनें मिळावयास ही सर्वांत उत्कृष्ट संधि आहे हें ओळखलें व आपला असा निर्णय दिला (आदिपर्व, अध्याय २०७–६) कीं, "मला असें वाटतें कीं राजा धृतराष्ट्राचें हें निमंत्रण स्वीकारून आपण हस्तिनापुरास अवश्य जावें." श्रीकृष्णांच्या आदेशानुरूप पांडव श्रीकृष्णासहितच हस्तिनापुरास गेले. स्वार्थी राजा धृतराष्ट्रापुढें दुसरा कोणताच मार्ग नसल्यामुळें त्यानें अर्धे राज्य पांडवांना तोडून द्यावयाचें ठरविलें. श्रीकृष्णांना फाळणीचा हा निर्णय अर्थातच अत्यंत आवडला. कारण कीं त्यामुळें पांडवांचें राज्य स्वतंत्र होणार होतें, व राजा धृतराष्ट्राचें नैतिक नियंत्रण न राहतां त्या स्वतंत्र राज्याचें धर्मसाम्राज्यांत रूपांतर करतां येणें ही अधिक सुलभ गोष्ट होती. स्वतः श्रीकृष्ण पांडवांच्या बरोबर

त्यांची नवी राजधानी जी इंद्रप्रस्थ तेथें गेले व त्यांनीं त्यांची राजधानी वसवून दिली. धृतराष्ट्रानें पांडवांना संपूर्ण उद्ध्वस्त असाच प्रदेश दिला होता. पण त्या उद्ध्वस्त प्रदेशांतून भूमीचें मोजमाप करण्यापासून प्रारंभ करून श्रीकृष्णांनी नव्या राज्याला शोभेशी सुंदर राजधानी निर्माण करून दिली. एकदां राजधानी व्यवस्थित वसल्यावरच श्रीकृष्ण तेथून द्वारकेस निघून गेले. महाभारतकार म्हणतात (आदिपर्व, अ. २०७–२८ ते ३६ व ५१-५२) कीं, "अर्धे राज्य सपादन करून व भगवान् श्रीकृष्णांना पुढें घालून पांडव खांडवप्रस्थांत गेले. महर्षि व्यासांच्याकडूनच एका पवित्र दिवशी शांति करून रचनेसाठी त्यांनी राजधानीची जागा मोजून काढली व राजधानी निर्माण केली. तिच्या भोंवतालीं सुरक्षिततेसाठी पाण्याचे मोठमोठे खंदक निर्माण केले व आकाशाला जाऊन भिडणाऱ्या मोठमोठ्या प्रासादांनी ती अलंकृत केली. त्यांच्याकडे पाहून ते जणू प्रचंड पांढरे मेघ अथवा बर्फाचे डोंगरच आहेत असें वाटत असे. गरुडाच्या दोन पंखासारखींच उत्कृष्ट दारें त्या प्रासादांना होतीं. या नव्या राजधानीचीं गोपुरें दुरून मदार पर्वताप्रमाणें वाटत. मोठमोठे योद्धे व राजधानीच्या सरक्षणार्थ मोठमोठीं अजस्र यंत्रें व विनाशक साधनें तेथें निर्माण करण्यांत आली होतीं. रस्ते अतिशय सुंदर होते. सर्व प्रकारच्या समृद्धींनीं युक्त असेंच तें नवें निर्माण केलेलें नगर होतें. पृथ्वीवरील स्वर्गभूमि वाटावी असें त्या नगराचें सौंदर्य होतें. असें सुंदर नगर वसवून व पांडवांची अनुमति घेऊन बलरामासहित श्रीकृष्ण द्वारकेस निघून गेले."

नवी सत्ता प्रस्थापित झाल्यावर त्या सत्तेला महान् उद्दिष्टास्तव आपलें केवढेंही पाठबळ असलें तरी यादवांच्या सत्तेचे विशेष स्वरूपाचे संबंध जर पांडवांशीं उत्पन्न झाले तर तें पाठबळ अधिक पक्क्या पायाचें होईल याची भगवान् श्रीकृष्णांना कल्पना होती. सुदैवानें तसा संबंध यादव व पांडव यांच्यांत उत्पन्न होण्याची संधीही आली. कांहीं कारणांनीं तृतीय पांडव अर्जुन याला तीर्थयात्रा करण्याचा प्रसंग आला. तीर्थयात्रा करीत अर्जुन प्रभास क्षेत्रावर आला. संबंध आल्यापासूनच भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला आपला

सखा समजत होते. अर्जुन तेथें आल्याचें कळतांच भगवान् श्रीकृष्ण स्वतः होऊन प्रभास क्षेत्रास गेले व त्यांनीं अर्जुनाची भेट घेतली. श्रीकृष्णांनीं आग्रहानें अर्जुनाला तेथून रैवतक पर्वतावर नेलें व तेथें दोन मित्रांनी आनंदानें काळ घालविला. श्रीकृष्णांनीं त्याला द्वारकेंत नेलें. भगवान् श्रीकृष्णांच्या घरीं कांहीं दिवस अर्जुन राहिला. सर्व यादवांनीं भगवंतासाठीं त्याचा मोठा आदरसत्कार केला. कांहीं दिवस याप्रमाणें स्वर्गसुखांत घालविल्यावर एके दिवशीं रैवतक पर्वतावर यादव मंडळीचा एक मोठा उत्सव होता. त्यानिमित्त सर्व यादवांच्याबरोबर अर्जुनही तेथें गेला. श्रीकृष्ण व अर्जुन त्या असंख्य लोकांत विहरत व फिरत असतां एक अशी गोष्ट घडली कीं जिच्यांतून श्रीकृष्णांना पांडव व यादव यांच्यांत अधिक ऋजुतेचा संबंध प्रस्थापित होण्याची शक्यता दिसून आली व त्यांनीं त्या संधीचा पूर्णपणें उपयोग करून घेतला. महाभारतकार म्हणतात (आदिपर्व, अ. २१९–१३ ते २५ व अ. २२०–१ ते १०) कीं, "त्या रैवतक पर्वतावर मोठा उत्सव सुरू असतां व त्यानिमित्त गायनवादनादि कार्यक्रम चालू असतां श्रीकृष्ण व अर्जुन इकडे-तिकडे फिरत होते. फिरतांफिरतां ते सहज स्त्रीसमुदायाजवळून जात असतां तेथें आपल्या सखींमध्यें स्वतःच्या सौंदर्यानें तळपणारी भगवान् श्रीकृष्णांची बहीण सुभद्रा ही अर्जुनाच्या दृष्टीस पडली. तिचें तें अपूर्व लावण्य पाहतांच पार्थाचें चित्त विचलित झालें व टक लावून तो कांहीं वेळ तिच्याकडे पहात राहिला. त्याच्या नुसत्या नेत्रांकडे पहातांच त्याची मनःस्थिति श्रीकृष्णांनीं ओळखली व त्यांच्या अंतःकरणांत विशिष्ट गोष्ट प्रकाशली. नवा संबंध दृढ करावयास हा मार्ग अत्यंत उत्कृष्ट आहे व या संधीचा उपयोग करून घ्यावा असें वाटून ते हंसत हंसत अर्जुनाला म्हणाले, "अरे तूं संसार सोडून सध्यां अरण्यवास व यात्रा पत्करली आहेस ना ? या स्थितींत स्त्रियांनीं तुझें अंतःकरण विचलित करावें व तुझ्याही मनांत हे असे विचार यावेत हें बरें आहे काय ? " अर्जुन स्वाभाविकपणें ओशाळला असेल! पण भगवंतांचा त्याच्या बाबतींतला दृढनिश्चय झाला होता. त्यांनीं पार्थाला सांगितलें, "हिला तूं

ओळखलें नाहींस काय ? ही माझी बहीण आहे, हिचें नांव सुभद्रा. आमच्या वडिलांचें हिच्यावर अत्यंत प्रेम आहे. पण अर्जुना ! तुला जर हिच्याशीं विवाह करण्याची इच्छा असेल तर मी स्वतः होऊन वडिलांना सांगेन." त्यांचें हें बोलणें ऐकतांच वस्तुतः अर्जुन प्रथम किती थिजला असेल ! पण त्या बोलण्यांतील निष्कपट सहानुकंपेचा भाव पाहून अर्जुन श्रीकृष्णांना म्हणाला : "वसुदेवांची कन्या, श्रीकृष्णांची बहीण व इतकें विलक्षण लावण्य असलेली ही कन्या कोणाचें अंतःकरण मोहित करणार नाही ? आपली ही भगिनी जर खरोखरीच राणी म्हणून मला मिळेल तर माझें सर्वांत मोठें कल्याण आपण केलें असें होईल. पण श्रीकृष्णा, ही शक्यता आहे काय ? जर अशी शक्यता असेल तर मी माझ्या अंतःकरणांत आशेला स्थान देतों. हिच्या प्राप्तीचा उपाय कितीही कठिण असला तरी तो मी करीन. मनुष्यानें या बाबतींत जे करणें शक्य असेल तें मी करावयास सिद्ध आहे."

श्रीकृष्णांना ती गोष्ट घडवून आणावयाची असल्यामुळें त्यांना कसल्याही प्रकारचे संशयित मार्ग अवलंबिणें अर्थातच योग्य वाटलें नाहीं. ते अर्जुनाला म्हणाले : "क्षत्रियांनीं करावयाच्या विवाहाचे विविध मार्ग आहेत. त्यापैकी सर्वांत प्रसिद्ध मार्ग म्हटला म्हणजे स्वयंवराचा होय. पण हा स्वयंवराचा मार्ग धोक्याचा आहे. स्त्रियांच्या मनाचा भरंवसा कोणी द्यावा ? त्यांना बहुधा योग्यता व शौर्य यापेक्षांही नुसत्याच रूपाचा देखील मोह पडण्याची शक्यता असते. तूं शूर आहेस, विख्यात धनुर्धर आहेस, पण तरीही सुभद्रा ही शेवटीं स्त्री असल्यामुळें तिच्या चित्ताचा भरंवसा देतांच येईल असें कांहीं सांगतां यावयाचें नाहीं. क्षत्रियासाठीं खात्रीच्या विवाहाचा दुसरा मार्ग आहे व तो म्हणजे अनुरूप कन्येचें हरण करणें हा होय. शूर क्षत्रियांचा हा मार्ग रूढ आहे. मला असें वाटतें कीं, याच मार्गाचा तूं अवलंब करावास. अर्जुना, तूं आपल्या पराक्रमानें सुभद्रा हरण कर. कारण स्वयंवराच्या बाबतींत खात्रीपूर्वक असें कांहीं सांगतां येत नाहीं." स्वतः श्रीकृष्णांनींच

असें सांगितल्यावर ती गोष्ट फारच सुलभ होती. श्रीकृष्णांच्या अनुमतीनें युधिष्ठिरांची या विवाहास संमति मिळविण्यासाठीं इंद्रप्रस्थाला दूत पाठविण्यांत आले. त्यांच्याकडून आवश्यक ती संमति आल्यावर एके दिवशी रैवतक पर्वतावर सुभद्रा गेली असतां श्रीकृष्णांच्या इच्छेनुरूप योद्धयाच्या सर्व परिवेषानें युक्त होऊन व श्रीकृष्णांचाच रथ घेऊन अर्जुनही तिच्या पाठोपाठ रैवतक पर्वतावर गेला व ती देवदर्शन घेऊन परत येत असतां तिच्याबरोबरच्या सर्व संरक्षकांना परास्त करून त्यानें सुभद्रेला रथांत घेतलें व इंद्रप्रस्थाकडे प्रयाण केलें. बरोबरीचे संरक्षक आरडाओरडा करीत यादवांच्या सुधर्मा सभेकडे धांवले व सभापालाला त्यांनीं घडलेलें वृत्त निवेदन केलें. त्यानें भेरी वाजवून यादव वीरांना एकत्र कसें जमविलें, ते कसे खवळून उठले, अर्जुनाच्या वधासाठीं बलराम कसे सिद्ध झाले व शेवटी भगवान् श्रीकृष्णांनी आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावानें अर्जुनाची बाजू सांवरून धरून सर्व दृष्टीनी हा संबंध योग्य व अभिमानास्पद असल्याचें त्यांना कसें पटवून दिलें इत्यादि गोष्टीचा उल्लेख श्रीकृष्णांच्या नेतृत्वाचें विश्लेषण करीत असतां मी सविस्तर केलेला असल्यामुळें त्याचा विस्तार येथें पुन्हां करण्याची आवश्यकता नाहीं.

अर्जुनाला परत बोलावून त्याचा व सुभद्रेचा मोठ्या थाटानें विवाह करण्यांत आला व कित्येक दिवस त्याला तेथें ठेवून घेऊन त्याला व सुभद्रेला सन्मानानें इंद्रप्रस्थाला पाठविण्यांत आलें. या नव्या संबंधानें निर्माण झालेलें नातें रुजावें म्हणून सर्व यादव श्रेष्ठांना व बलरामांना घेऊन स्वत: श्रीकृष्ण इंद्रप्रस्थास गेले व मोठ्या आनंदानें त्यांनीं तेथें कित्येक दिवस घालविले. नव्या संबंधानिमित्त खास बलरामांच्या कडूनच श्रीकृष्णांनीं इतकें आंदण अथवा त्या रूपानें संपत्ति पांडवांच्याकडे पोहोंचविली कीं ती नव्या राज्याच्या उभारणीच्या विविध क्षेत्रांतील योजनांना उपयोगी पडावी. महाभारतकार म्हणतात (आदिपर्व अध्याय २२१–५५ ते ५८) कीं, "लांगलधारी बलरामांनीं लग्नाचें आंदण म्हणून आनंदानें जणूं धनाचा महासागरच अर्जुनाला दिला होता. त्या

धनांत इतकी विविध रत्नें होती कीं, समुद्राप्रमाणें त्याला रत्नाकर म्हणणें शोभून दिसत होतें. वस्त्रें, व प्रावरणें हीं जणू कीं कांहीं त्या वैभवसागरांतील फेंसाळ लाटा होतीं. समुद्रांत ज्याप्रमाणें मोठमोठे जलचर प्राणी असतात तशी त्यांची जागा या धनसागरांत गजेंद्रांनीं घेतलेली होती. पताका हेंच जणू कीं कांहीं तेथील शेवाळ होतें. पांडवांच्याकडे आलेला हा समृद्धीचा ओघ शत्रूंच्या शोकाला कारणीभूत झाला. युधिष्ठिरांनी बलरामांच्या प्रेमासाठीं त्यांनीं दिलेलें आंदण घेतलें व सर्व यादव वीरांचा फार मोठा सन्मान केला.

सुभद्रेच्या या विवाहानें महापराक्रमी यादव व पांडव यांच्यांत श्रीकृष्णांनी विलक्षण ऋजुसंबध प्रस्थापित केला. या संबंधामुळें पांडवांशी वैर म्हणजे पर्यायानें यादवांशीं वैर असें ठरलें व धर्मसाम्राज्य प्रतिष्ठापनेच्या कार्यांत केंद्र म्हणून पांडवांना पुढें करीत असतां या संबंधामुळें रणमस्त यादवांचा कोणत्याही प्रकारें अडथळा येण्याचा संभव न उरतां ती गोष्ट त्यांना उलटी भूषणास्पदच वाटावी असें वातावरण उत्पन्न झालें. पुढें राजसूय यज्ञाप्रीत्यर्थ दिग्विजयासाठीं पांडव निघाले असतां त्यांचें काम तें आपलेंच काम आहे असें समजून त्यांना अडथळा करण्याची व त्या द्वारें आपल्या पराक्रमाचें प्रख्यापन करण्याची कल्पनाही यादवांच्या अंतःकरणांत मुळींच न यावयास श्रीकृष्णांच्या इच्छेबरोबरच सुभद्रेमुळें उत्पन्न झालेला संबंधाचा व आपुलकीचा ऋजु भावही पुष्कळ अंशीं कारणीभूत आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे केवढें मोठें बिकट कार्य श्रीकृष्णांनीं पार पाडलें याची नीट कल्पना येते. यादव व पांडव हीं दोन्ही श्रीकृष्णांचीं धर्मसंस्थापनेच्या कार्यांतील साधनयंत्रें होतीं. पण तीं निर्जीव नसून सजीव होती. त्यामुळें महान् सामर्थ्याबरोबरच आत्माभिमानाच्या त्यांच्या भावनाही तीव्र होत्या. पराक्रमाच्या व आत्माभिमानाच्या भावनेंतून या दोन सामर्थ्यकेंद्रांची परस्परांत टक्कर होण्याची सहज शक्यता होती व तसें झालें असतें तर कार्याच्या उभारणीच्या दृष्टीनें तें अत्यंत अहितकारक ठरलें असतें हें ओळखून दोन्ही सत्ता व सामर्थ्यें पूर्णपणें

परस्परपूरक व संवादी करण्यासाठींच हा विवाह घडविला गेला व तो अत्यंत यशस्वी झाला. सुभद्रेचा विख्यात पुत्र अभिमन्यु होय. तो नेहमीं आजोळी आपले मामा भगवान् श्रीकृष्ण यांच्या जवळच राहात असून श्रीकृष्णांच्या बालमूर्तीसारखा तो सुंदर दिसत असे. प्रेमानें त्याला श्रीकृष्णांनीं सर्व कांही शिकविलें व मोठमोठ्या अतिरथ्यांचा मद जिरविणारा अतिरथी ठरून श्रीकृष्णांच्या कार्यांतच विजेप्रमाणें तळपून तो बलिदान पावला. असो.

## श्रीकृष्णांचें मंत्रयुद्ध

युधिष्ठिर राजसिंहासनावर बसल्यानंतर व त्याचें राज्य पूर्णपणें स्वतंत्र झाल्यानंतर भगवान् श्रीकृष्णांची पांडवांविषयीची अपेक्षा अक्षरशः खरी ठरली. पांडव हे महान् पराक्रमी व महत्त्वाकांक्षी होते. आणि एकदा त्यांचें स्वतंत्र राज्य अस्तित्वांत आल्यानंतर क्षत्रियधर्माप्रमाणें शुद्ध धर्ममार्गानें सम्राट् व्हावें व अश्वमेध–राजसूय यांसारखे मोठमोठे यज्ञ करावे अशी स्वाभाविकपणेंच त्यांच्या अंतःकरणांत इच्छा उत्पन्न झाली. महाभारतांतील वर्णनानुसार अशी इच्छा युधिष्ठिरांच्या अंतःकरणांत नारदांनीं उत्पन्न केली असें आहे. इच्छा नारद उत्पन्न करोत अथवा ती स्वयंभूपणें युधिष्ठिरांच्याच स्वतःच्या अंतःकरणांत उत्पन्न होवो, पण राजसूयाची इच्छा त्यांच्या अंतःकरणांत घर करून बसली ह्यांत कांहीं शंका नाहीं. राजसूय यज्ञाची इच्छा म्हणजेच प्रस्थापित झालेल्या सिंहासनाच्या आधिपत्याखालीं सर्व ज्ञात सिंहासनांनीं यावें अशी इच्छा होय. आणि ती गोष्ट प्रत्यक्षांत आणावयाची म्हणजे सर्व राजसत्तांना जिंकणें अथवा इतर उपायांनीं वश करून घेणें आवश्यक होतें. येवढें प्रचंड सामर्थ्य आपल्याजवळ आहे किंवा नाहीं, असलें तरी त्याचा उपयोग करण्याची ही वेळ आहे किंवा नाहीं व त्याचे परिणाम चांगले होतील किंवा नाहीं या गोष्टींचा केवळ स्वतःच्या बुद्धीनें निर्णय करणें युधिष्ठिरांना योग्य वाटलें नाहीं. त्यांनीं

आपल्या बंधूंचा, मंत्र्यांचा व इतर सुहृदांचा सल्ला घेतला. भीम व अर्जुन यांचा स्थायीभावच क्षत्रियोचित पराक्रमाचा असल्यामुळें त्यांनीं अर्थातच या गोष्टीला जोरानें उचलून धरलें. बाकीच्यांनीही त्यांचीच री ओढली. पण भगवान् श्रीकृष्णांच्या अनुमतीवांचून या एवढ्या मोठ्या गोष्टीस हात घालणें योग्य आहे असें युधिष्ठिरांना वाटेना. म्हणून त्यांनीं त्यांना मुद्दाम बोलावणें पाठविलें व आपली इच्छा त्यांना सांगून त्यांची अनुमति विचारली. जी गोष्ट आपण सुचवावी ती युधिष्ठिराच्याच तोंडून बाहेर पडलेली पाहून श्रीकृष्णांना अत्यंत आनंद झाला. सर्व दुष्ट राजसत्तांची मागें सांगितल्याप्रमाणें जरासंधाच्या नेतृत्वाखाली झालेली एकजूट फोडून टाकण्यास व त्या सर्व राजसत्तांना एकाच धर्मनियंत्रित साम्राज्याखालीं आणण्यास ही संधि फार योग्य आहे असें मनाशीं ठरवून त्यांनीं युधिष्ठिराचा तो संकल्प उचलून धरला. ते म्हणाले : (सभापर्व अ. १४–१ व ६१ ते ७०) "हे महाराज, योग्यतेच्या दृष्टीनें विचार केला तर ज्यानें राजसूय यज्ञ करावा असा राजा तूं आहेस यांत मला काडीइतकीही शंका नाही. पण तुझ्या या संकल्पाच्या मार्गांत एक मोठा अडथळा आहे. (श्रीकृष्णांनीं यानंतर सध्यां जरासंध हा भारतवर्षाचा सम्राट् असून भारतवर्षांतील सर्व मोठ-मोठ्या राजांची त्याच्या नेतृत्वाखाली एकजूट कशी झाली आहे याचें वर्णन केलें. एका कुंतीभोजाशिवाय युधिष्ठिराला दुसरें कोणीही कसें अनुकूल नाहीं हेंही त्यांनी दाखवून दिलें. जरासंधाच्या सामर्थ्याचें वर्णन करीत असतां आपलें व त्याचें असलेलें घोर वैर, व त्यामुळें आपल्याला अखेर राजधानी बदलावी लागल्याचें कारण निवेदन करून तो क्रूरकर्मा जरासंध शंभर राजमस्तकांचा बळी महादेवाला कसा देणार आहे व त्यामुळें तो मानवतेचा कसा शत्रू ठरलेला आहे ही गोष्ट त्यांनीं युधिष्ठिराच्या मनावर बिंबविली. हा विषय पूर्वीं येऊन गेलेला असल्यामुळें येथें मी तो पुन्हां सांगत नाहीं.) ते पुढें म्हणाले कीं, भारतवर्षाच्या सम्राटाला आपल्या परंपरेप्रमाणें स्वभावसिद्ध असे जे गुण लागतात, ते सर्व तुमच्या ठिकाणीं आहेत; पण मला असें निश्चितपणें वाटतें कीं, जोंपर्यंत

जरासंध जिवंत आहे, तोंवर तुम्हांला सम्राट् होतां येणें व राजसूय यज्ञ करणें सर्वथा अशक्य आहे. राजसूय करावयाचा असेल तर जरासंधाचा मृत्यु आवश्यक आहे. इतकेंच नव्हे तर तुम्ही राजसूय यज्ञ करा वा करूं नका; पण मानवतेच्या दृष्टीनेंच जरासंधाचा वध अत्यंत आवश्यक आहे. सिंहानें वनराजांना पकडावें त्याप्रमाणें त्यानें सूर्य-चंद्र वंशांतील ८६ राजांना पकडून आपल्या गिरिव्रज नांवाच्या राजधानीत त्यांना बंदी करून ठेविलें आहे. तो महादेवांना त्या सर्व राजांचा बळी देणार आहे. जर तुम्हांला यज्ञ करावा अशी खरोखरी इच्छा असेल तर त्या बंदींत पडलेल्या राजांना या प्राणसंकटांतून सोडविणें व जरासंधाला ठार मारणें आवश्यक आहे. यावांचून राजसूय ही अशक्य कोटीतील गोष्ट आहे. मला जें वाटतें तें मी आपणांस सांगितलें. यानंतर आपण स्वतः विचार करून काय तें ठरवावें.

जरासंधाचें नांव ऐकतांच युधिष्ठिर मनांत थरकांपले. ते म्हणू लागले कीं, "जर ही गोष्ट इतकी कठीण असेल तर तिचा नाद सोडलेला बरा." पण युधिष्ठिरांचें लक्ष केवळ राजसूयाच्या इष्टानिष्टतेवर केंद्रित झालें होतें तर श्रीकृष्णांचें लक्ष मानवतेच्या महान् मूल्यांच्या संरक्षणावर केंद्रित झालें होतें. त्यांना जरासंधाचा विनाश निश्चितपणें अभिप्रेत होता. त्यांनीं युधिष्ठिरांना असें सांगितलें कीं, पशूप्रमाणें बळी जाण्याऐवजीं युद्धांत जरासंधानें ठार मारलें असतें तरी त्याच्या बंदींतील ते राजे संतुष्ट झाले असते. ते आतां जीविताविषयीं निराश झालेले आहेत. त्यांना कोणत्याही उपायानें जो कोणी प्राणसंकटांतून सोडवील त्याला मोठें पुण्य लाभेल. जरासंध हा स्वतः जर क्रूरकर्मा व अधार्मिक आहे व आपल्या कार्याचें उद्दिष्ट जर भूतदया आणि मूल्यांचें संरक्षण हें आहे, तर त्या महान् उद्दिष्टांवर लक्ष ठेवून उघड युद्धांत जरासंधाला मारणें अशक्य असलें तर मंत्रयुद्धानें अथवा युक्तीनें त्याला ठार मारण्यासही आपण झटलें पाहिजे. जर आपल्या जातीविषयीं आपणाला कांहीं प्रेम असेल तर तिचें बलिदान वांचवावयाचा हा एकच मार्ग आहे. ते सांगतात: (सभापर्व अ. १५, १७ व २०)

"आतां केवळ चौदा राजे जरासंधानें जिंकावयाचे उर्वरित आहेत. एकदां राजांची शंभर ही संख्या पूर्ण झाली की नंतर तो क्रूर नरमेध निश्चित होणार. जो कोणी जरासंघाला ठार मारून या यज्ञांत विघ्न करील, त्याला अत्यंत देदीप्यमान अशी कीर्ति लाभेल आणि तो आपोआपच सम्राट् होईल. जरासंधासारख्या बलवंताशी युद्ध करण्याचा निश्चय म्हणजे स्वतःच्या मृत्यूचाच निश्चय होय असें वाटणें स्वाभाविक आहे. पण मृत्यु हा नक्की केव्हां येणार हें आपण सांगूं शकतों काय ? मृत्यु ही सृष्टींतील एक अनिवार्य पण अकल्पितपणें येणारी घटना आहे. तिला भिऊन वागणें पुरुषाला शोभत नाहीं. युद्ध टाळून कोणी अमर झाल्याचें आम्ही आतांपर्यंत ऐकलें नाहीं. खऱ्या क्षत्रियाचें हें पहिलें कर्तव्य आहे कीं, योग्य राजनीतीचा अवलंब करून आपल्या शत्रूच्या विनाशाचा मार्ग आंखणें. शेवटीं दैव म्हणून कांहीं भाग असतोच. त्याच्या संकेतानुरूप काय व्हावयाचें असेल तें होत असतें. पण राजनीतिकुशल पुरुषाला योग्य आंखणी केल्याचें त्या अपयशांतही समाधान लाभल्याविना राहात नाहीं. व्यवस्थितपणें आंखलेलें कारस्थान व दैव यांची जर जोडगोळी बरोबर जमली तर यश निश्चितपणें पदरांत पडतें. या दोन्ही गोष्टींची संगति बरोबर जमली आहे कीं नाही हेंही प्रत्यक्ष एखादी गोष्ट केल्यावांचून कळणें सर्वस्वीं दुरापास्त असतें. नीट कोणताही विचार न केला व दैवही प्रतिकूल असलें तर अत्यंत मोठा नाश होतो. उभय पक्ष कारस्थानाची उभारणी सारख्याच दक्षतेनें करणारे असले व दोघांनाही इतर गोष्टींची सारखीच अनुकूलता असली तर विजय संशयित राहून उभयपक्षीं तटस्थता स्वीकारली जाते. जरासंधाला मारण्याच्या या कारस्थानांत आपण निश्चितपणें यशस्वी होऊं. कारस्थान करून, त्याच्या सैन्यबळाशीं टक्कर देण्याचा प्रसंग युक्तीनें टाळून, द्वंद्वयुद्धाच्या निमित्तानें त्याला एकट्यालाच आपण गांठू व संपवून टाकूं. त्याच्या मर्मस्थानावर आपल्याला प्रहार करतां येईल. कारण कीं तो अहंकारी व असावध आहे. आपण प्रथम-पासूनच अत्यंत सावध असल्यामुळें आपल्या सर्व योजना आपण

इतक्या गुप्त ठेवूं शकतों कीं त्या कोणालाच कळणार नाहींत. ज्यांचें सैन्य सुव्यवस्थित व सुसज्ज आहे व जे अत्यंत सामर्थ्यसंपन्न आहेत अशा प्रबळ शत्रूशीं उघड युद्ध चुकून सुद्धां करूं नये अशी बुद्धिमान् राजकारणी पुरुषांची नीति आहे, व ती मला सर्वस्वी मान्य आहे. कोणाच्या ध्यानांत न येतां जरासंधावर गुप्तपणेंच प्राणघातक प्रहार करणें हाच त्याला मारण्याचा एकमात्र मार्ग आहे. आपण त्याच्याशी ससैन्य युद्धाचा प्रसंग युक्तीनें टाळू. असे कांही विचार आपल्या मनांत घोळतात हें आपण कोणालाही दिसू देणार नाही आणि गुप्तपणें त्याच्या घरांत प्रवेश करून द्वंद्व-युद्धाच्या निमित्तानें एकटया जरासंधाच्या शरीराशीं गांठ घेऊन आपण त्याला विध्वंसून टाकूं. अखंड वैभवश्री फक्त एकटया परमे-श्वराजवळच असते. मानवी जीवनांत वैभवाचे चढाउतार नेहमींच चालू असतात. जरासंध त्याला अपवाद आहे असें समजावयाचें कारण नाहीं. आपण त्याला ठार मारूं व आपल्या जातीचें संरक्षण करूं अथवा प्राणसंकटांत सांपडलेल्या निरपराध व असहाय राजांच्या बंधमोचनाच्या पुण्यप्रद कार्यांत आपणांस जरासंधाच्या हातून मरण आल्यास आपण स्वर्गास जाऊं. पण कांहींही झालें तरी हें कार्य केलेंच पाहिजे असें माझें मत आहे. मी युक्तीनें सेनापति हंस व डिंभक यांना आधींच ठार मारलें आहे. कंसालाही त्याच्या साथीदारांसह आधींच मी संपविलेलें आहें. उरला केवळ जरासंध. त्याच्या निधनाचा काळ आला आहे असें मला वाटतें. रणांगणावर ससैन्य त्याच्याशीं युद्ध करून त्याला जिंकणें सर्व देवदानव एकत्रित झालें तरी देखील त्यांनाही तें शक्य होणार नाहीं. म्हणून त्याच्याशीं एकटयांत गांठ घेऊन मल्लयुद्ध करून त्याला ठार मारावें. माझ्या ठिकाणीं मुत्सद्दीपणा आहे. भीमाच्या ठिकाणीं बल आहे. अर्जुन आम्हां दोघांचेंही संरक्षण करील. गार्हपत्य, आहवनीय, व दक्षिणाग्नि असे तीन अग्नि मिळून ज्याप्रमाणें यज्ञ पार पाडतात त्याप्रमाणेंच आम्हींही तिघे मिळून हें कार्य संपवूं. आम्ही तिघांनीं एकांतांत जर त्याची गांठ घेतली तर तो तिघांपैकीं एकाशीं तरी द्वंद्व युद्ध करावयास सिद्ध होईल अशी माझी खात्री

आहे. माझ्याशीं व अर्जुनाशीं लढणें त्याला कमीपणाचें वाटेल. कीर्तीच्या लोभाची त्याला हांवही सुटण्याचा संभव आहे. स्वतःच्या श्रेष्ठ बाहुबलाचा त्याला मोठा दर्प आहे. त्यामुळें तो भीमसेनाशीं द्वंद्वयुद्ध करणें मान्य करील व मृत्यु ज्याप्रमाणें जगाचा नाश करतो त्याचप्रमाणें अत्यंत बलवान् भीमसेन द्वंद्वयुद्धांत जरासंधास ठार मारावयास पूर्णपणें समर्थ आहे."

भगवान् श्रीकृष्णांची अपूर्व राजकीय बुद्धिमत्ता त्यांच्या या भाषणांतून व्यक्त झालेली आहे. राजनैतिक कारस्थान करतांना ज्याच्यावर आघात करावयाचा असतो त्याच्या मनःस्थितीचें संपूर्ण ज्ञान अत्यंत आवश्यक असतें; तरच आपलें कारस्थान यशस्वी होतें. नाहीं तर डाव अंगाशीं येण्याचा संभव असतो. श्रीकृष्णांनीं जरासंधाच्या मनःस्थितीचें केलेलें निरीक्षण पूर्णपणें यथार्थ होतें. त्याला ठार मारण्याविना राजसंघ खिळखिळा करणें अशक्य होतें व त्याच्यावर उघड आघात करून उपयोग नव्हता. श्रीकृष्णांनीं केलेला हा बौद्धिक आघात इतका विलक्षण होता कीं स्वपक्षाचें कोणतेंही नुकसान न होतां पूर्ण यश त्यांच्या पदरीं पडलें.

युधिष्ठिराजवळून भीमार्जुनांना मागून घेऊन स्नातक ब्राह्मणांच्या वेषानें गुप्तपणें ते जरासंधाच्या राज्यांत गेले. आडवाटेनें त्यांनीं नगरप्रवेश केला. जरासंधाचे वडील राजे बृहद्रथ यांनीं मांस खाणाऱ्या बैलाला ठार मारून त्याच्या कातडीचे तीन नगारे बनविले होते ते त्यांनीं फोडून टाकले व पुष्पमाळा गळ्यांत घालून राजमार्गांतून फिरत सम्राट् जरासंधाच्या राजभवनांत आले. त्यांनीं जरासंधाची भेट घेतली. त्यानें त्यांचा सत्कार केला. भीमार्जुनांनीं मौन धारण केलें होतें. बोलण्याचें काम श्रीकृष्णांनींच स्वतःकडे घेतलें होतें. त्यांनीं राजाला असें सांगितलें कीं हे माझे मित्र व्रतस्थ असून मध्यरात्रीं ते तुझ्याशीं बोलतील. जरासंधाला त्यांच्या ब्राह्मण्याविषयीं संशय आला. आपल्या हेरांकरवीं नगरांत शिरल्यापासूनच्या त्यांच्या हालचालीची माहिती मिळविल्यावर त्यांनीं आपल्या भेरी फोडून टाकल्याचें कळतांच त्याचा संशय बळकट झाला. मध्यरात्रीं त्यानें त्यांची गांठ घेतली व त्यांचा उपहास करीत

तो त्यांना म्हणाला, तुम्हीं माझ्याशीं खोटें बोललात. तुम्हीं स्नातक व्रतधारी ब्राह्मण नाहीं. कारण स्नातक व्रतधारी ब्राह्मण तुमच्या-सारखें चंदन लावून गळयांत माळा घालीत नसतात. तुम्ही क्षत्रिय आहांत हें स्पष्ट दिसतें. तुमच्या मनगटावरील धनुष्याच्या दोरीचे उमटलेले घट्टेच तुम्ही कोण आहांत हें मला स्पष्टपणें सांगतात. तरी खरें सांगा. क्षत्रिय खोटें बोलत नसतो. येतांना तुम्ही आडवाटेनें आलांत. भेरी फोडून टाकल्यात. राजदंडाचें तुम्हांला मुळींच भय वाटत नाहीं असें दिसतें. तुम्ही आहांत कोण व येथें आलात कशास्तव तें सांगा.

श्रीकृष्णांनीं त्याला असें सांगितलें की, आम्ही स्नातक द्विज आहोंत हे जें तुला सांगितलें तें अक्षरशः खरें आहे. स्नातकव्रती जसे ब्राह्मण असतात, तसेच क्षत्रिय व वैश्यही असतात. त्यांच्यांत कांहीं विशेष नियमही असतात. आम्ही तसे विशेष नियम धारण करणारे क्षत्रिय आहोंत. पुष्प धारण करणाऱ्या लोकांना वैभव मिळतें असें म्हणतात. म्हणून आम्हीं पुष्पमाला धारण केल्या आहेत. क्षत्रियांचें वीर्य त्यांच्या वाचेंत नसून बाहूंत असतें. म्हणून आम्ही मौन धारण केलें. परमेश्वरानेंच क्षत्रियांना बाहुवीर्यशाली केलें आहे. आमचें तें वीर्य तुला बघावयाचें असेल तरें तुला तें लवकरच बघावयास मिळेल. आम्ही आडवाटेनें कां आलों याचें तुला उत्तरच हवें आहे काय? मित्राच्या घरी राजमार्गानें जावें व शत्रूच्या घरीं आडवाटेनें जावें असा संकेत आहे. त्या संकेतानुरूप आम्ही, तूं आमचा शत्रू असल्यामुळें, तुझ्या घरी आडवाटेनें आलों. आम्हीं कांही कामानिमित्त तुझ्या घरीं आलों असल्यामुळें आमचें काम सफळ झाल्याखेरीज आम्हांला तुझ्याकडून सत्कार कसा घेतां येणार ?

जरासंधाला 'तूं आमचा शत्रू आहेस' हें विधान ऐकून नवल वाटलें. तो श्रीकृष्णांना म्हणाला, 'तुमच्याशीं माझें कधीं वैर उत्पन्न झालें व कोणत्या कारणास्तव तें मला आठवत नाही. तुमच्या-वर मी कांहीं अपकार केल्याचें मला आठवत नाहीं. मी जन्मभर क्षात्रधर्माप्रमाणें वागत आलों आहें. माझ्या प्रजेचा मी कधीही द्रोह केलेला नाहीं. अशा स्थितींत तुम्ही माझ्यावर खोटे आरोप

क़रीत आहांत. त्याचें कष्टदायक फळ तुम्हांला भोगावें लागेल."
त्याच्या भाषणांतील ती जरब ऐकून मनांतून क्षुब्ध झालेले श्रीकृष्ण त्याला म्हणाले ( सभापर्व अ. २२—७ ते २६ ) :-

"हे महाबाहो, कुळांत उत्पन्न झालेला कोणीही एक कुलपुरुष कुलाचें हितप्रद कार्य करावयास पुढें येत असतो व आपलें कर्तव्य म्हणून पुढें येणाऱ्या व्यक्तीस जो कुळाचा वैरी तो स्वतःचा वैरी मानूनच पुढें चालावें लागतें. तू आमच्या कुळाचा वैरी असल्यामुळें आमचाही वैरी आहेस. तू आपलें प्रजापालनाचें कार्य पार पाडीत असलेल्या क्षत्रियांना घोर बंदिवासांत घालून त्यांच्या सबंधांत अत्यंत क्रूरकर्म करावयाचें ठरविलें आहेस. निरपराध लोकांच्या विषयीं अशा क्रूरकर्मास प्रवृत्त होणाऱ्या व्यक्तीला निरपराधी म्हणतां येईल काय? राजानें आपल्या बरोबरीच्याच इतर सद्वर्तनी राजांना पकडून त्यांचें बलिदान द्यावयाचा निश्चय करणें सत्कृत्य कसें ठरेल! तू राजांना पकडून यज्ञीय पशूप्रमाणें महादेवाला त्यांचें बलिदान करावयाचें ठरविलें आहेस. तें जर बलिदान धर्मनिष्ठ असलेल्या, धर्माचें यथावत् पालन करणाऱ्या व धर्माचें संरक्षण करावयास पूर्णपणें समर्थ असलेल्या आम्ही होऊं दिलें तर एका भयंकर व सर्वस्वीं निंद्य अशा पापकर्माचे आम्हीही भागीदार होऊं. पाप करशील तूं व लागेल आम्हांला. मनुष्याला पशू म्हणून यज्ञांत बळी देण्याचा प्रकार आम्हीं कधीं पाहिला नाहीं. तूं नरबलि देऊन देवाधिदेव शंकरांना तृप्त करण्याची इच्छा कशी करतोस? तें अधार्मिक व पापमय कृत्य असल्यामुळें तें होऊं न देणें हें आमचें ईप्सित आहे. आपण ज्या जातींत उत्पन्न झालों तिलाच पशु म्हणून ठार मारण्याचा हा क्रूर उपक्रम तुझ्यासारख्या भ्रष्ट बुद्धीच्या व्यक्तीवांचून दुसरा कोण करील? ज्या ज्या अवस्थेंत मनुष्य जें जें कर्म करतो, त्याचें फळ त्याला तसेंच मिळाल्याविना राहात नाहीं. दलितांचें संरक्षण करणें हें आमचें काम आहे. आपल्या जमातीच्या विध्वंसासाठीं तू प्रवृत्त झालेला आहेस. तर जमातीच्या सरक्षणासाठीं तुला ठार मारावयास आम्ही येथें आलों आहोंत. आपल्यापेक्षां जगांत कोणीही अधिक समर्थ नाहीं कीं जो

आपल्या अन्यायास प्रतिबंध करील असें जें तुला वाटतें तें निव्वळ मूर्खपणाचें आहे. ज्याला आपल्या स्वाभिमानाची चाड आहे, असा कोणीही क्षत्रिय उघड युद्ध कधीं टाळणार नाहीं. कारण तोच स्वर्गाचा मार्ग आहे. पण स्वतःच्या सैन्यबळाचा अपार गर्व असलेल्या तुला त्या बिचाऱ्या बंदींतील क्षत्रियांना दुर्गतींत पाठवावयाचें आहे. दुसऱ्या कोणांत बळ नाहीं असा वृथा गर्व तूं करूं नकोस. जगांत तुझ्याइतकेच किंवा तुझ्याहूनही अधिक सरस असे बलवान् क्षत्रिय आहेत. तुझा जो काय गर्व व अहंकार असेल तो आमचें द्वंद्व युद्धाचें आव्हान स्वीकारून प्रकट कर. सैन्यबळाच्या भरंवशावरचा विजय कोणीही मिळवूं शकतो. त्यांत फक्त संख्याबळाचा प्रश्न येतो. स्वतःच्या खऱ्या सामर्थ्याचा नव्हे. तू या राजांना कोणतीही सबब न सांगतां बंदींतून मुक्त करावेस असें आमचें म्हणणें आहे. असें न केल्यास आम्ही तुला ठार मारावयाचा निश्चय केलेला आहे. दंभोद्भव, कार्तवीर्य इत्यादि मोठमोठे राजे केवळ अहंकारानें मेले. तुलाही तसाच स्वतःचा नाश अभिप्रेत आहे असें दिसतें. आम्ही क्षत्रिय आहोंत, इतकेंच नव्हे तर तुझ्याशीं युद्ध करण्याची व तुझा मानभंग करण्याची इच्छा असलेले क्षत्रिय आहोंत. मी यादववंशीय श्रीकृष्ण आहे आणि हे दोन नरवीर पांडव असून मी ह्यांचा मामेभाऊ आहे. मी कृष्ण तुझा शत्रू आहे हें उघडच आहे. आम्हीं तुला युद्धार्थ आव्हान देतों. एकतर सर्व राजे लोकांना सोडून तरी दे किंवा मरावयास सिद्ध तरी हो."

जरासंध म्हणाला, "मी बंदी केलेल्या राजांपैकीं ज्याला मीं युद्धांत जिंकलें नाहीं असा कोणीही नाहीं. ज्यांना मी युद्धांत जिंकलें त्यांच्या जीवनाचा मीच धनी असल्यामुळें त्या पराजित जीवनांचें काय करावयाचें तें माझें मी ठरवीन. दुसऱ्या कोणीही त्यांत लुडबूड करण्याचें कारण नाहीं. मी तुमचें युद्धाचें आव्हान स्वीकारतों. सिद्धता असेल तर आपण ससैन्य युद्ध करू. तुमची इच्छा असल्यास तुम्हां तिघांशीं मी एकटा युद्ध करतों. अथवा एकेकटयाशीं युद्ध करावयासही मी सिद्ध आहें."

श्रीकृष्णांनीं त्याला असें सांगितलें कीं, "आमच्यापैकीं ज्या

कोणाशीं युद्ध करावयाची तुझी इच्छा असेल तो सिद्ध होईल. आमच्यापैकी कोणालाही तू मागून घे." श्रीकृष्णांच्या अटकळी-प्रमाणें जरासंधानें भीमसेनासच द्वंद्वयुद्धासाठीं निवडलें व त्या दोघांचें भीषण मल्लयुद्ध प्रारंभ झालें. चौदा दिवस अहोरात्र तें युद्ध सुरू होतें. चौदाव्या दिवशीं रात्रीं जरासंध थकलेला दिसला. त्याबरोबर श्रीकृष्णांनीं भीमाला म्हटलें, ( सभापर्व अ. २३–३२, ३३ व अ. २४–४) :–

"हे भीमा, शत्रु थकलेल्या अवस्थेंत युद्धांत हातीं पडणें मोठें सद्भाग्याचें लक्षण असतें. त्या अवस्थेंत त्याला जर पीडा केली तर तो प्राणत्याग करतो. हीच वेळ आहे. जरासंध थकलेला आहे. तूं वायुपुत्र आहेस. याच वेळीं तुझें संपूर्ण दैवी बळ खर्च करून तू याला ठार मार." भीमानें त्यांचा तो इषारा ओळखून त्याचवेळीं जरासंधा-वर जोराचें आक्रमण केलें व त्याला खालीं पाडून मधून शिवणीकडून आपल्या हाताचा नेट देऊन चिरून टाकलें व त्याच्या शरीराचीं दोन्ही शकलें आखाड्यांत टाकून दिलीं. भीमसेनाच्या भयानक गर्जना व जरासंधाच्या अंतकालीन किंकाळ्या यांनी सारी राजधानी दणाणून गेली. लोक भयकंपित झाले व गर्भवती स्त्रियांचे गर्भपात सुद्धां झाले. (असा एक चुकीचा समज आहे की, जरासंधाला मारणें भीमाला अशक्य आहे असें वाटून त्यानें श्रीकृष्णांना विचारलें व श्रीकृष्णांनी त्याला समोरची एक झाडाची फांदी मधून चिरून काढून जरासंधाला कसें मारावयाचें त्याचा मार्ग सुचविला. एकदां या पद्धतीनें भीमानें जरासंधाला फाडून टाकून त्याची तीं शकलें समान अंतरावर फेकून दिलीं पण तीं पुन्हां जुळून आलीं. पुन्हां श्रीकृष्णांनीं त्या दोन फांद्या व्यस्त टाकल्या. भीमानें तसेंच पुन्हां केल्यावर मग जरासंध मेला. पण ही गोष्ट महाभारतांत नाहीं. जरासंधाच्या जन्माच्या वेळीं दोन शकलें जन्मास आली व ती जरा नांवाच्या राक्षसीनें सांधल्यावर तो जिवंत झाला या मूळ भारतांतील गोष्टी-वर भागवतानें केलेली ती काव्यमय कल्पना आहे. फांदीचे दोन तुकडे करून श्रीकृष्णांनीं जरासंधास कसें मारावयाचें तें भीमास सुचविलें हें भागवतांत आहे व शकलें पुन्हां जुळलीं म्हणून ती फांदी

पुन्हां त्यांनीं आडवी उभी टाकली ही कीर्तनकारांनीं त्याला आणखी जोडलेली कपोलकल्पित कल्पना आहे. मूळ भारताशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं. असो. )

याप्रमाणें जरासंधाला निकालांत काढल्यावर श्रीकृष्णांनी ८६ राजांना मुक्त केलें. मृत्यूच्या दाढेतून ओढून काढणाऱ्या महापुरुषाविषयीं त्यांच्या अंतःकरणांत कृतज्ञतेचे केवढे विलक्षण भाव उत्पन्न झाले असतील याची कल्पनाच केलेली बरी. युधिष्ठिराचें स्वामित्व त्या राजांनीं कृतज्ञतेनें भारावलेल्या अंतःकरणानेंच मान्य केलें. जरासंधाचें राज्य त्याच्या मुलाकडेच ठेवून त्यांनी एक नवा आदर्श निर्माण केला. त्याला पांडवांची साम्राज्यसत्ता मान्य करावयास सांगून व मगध राष्ट्रांतील प्रजाजनांना आश्वासन देऊन भगवान् श्रीकृष्ण भीमार्जुनासहित हस्तिनापुराकडे परतले. केवळ तत्त्वासाठींच संघर्ष करणाऱ्या, व अपहरण वा निष्कारण वैर यांचे भावही न बाळगणाऱ्या भगवंताविषयी व पांडवांच्या अधिसत्तेविषयीं जरासंधाचा पुत्र सहदेव हा शेवटपर्यंत इतका कृतज्ञ राहिला कीं भारतीय युद्धांत तो पांडवांच्या बाजूनें लढला. एका जरासंधाच्या वधांत ८६ अधिसत्तांचें पाठबळ सहजपणें मिळवून श्रीकृष्णांनीं अधार्मिक राजसत्तांचा संघ फोडून टाकला व तुटलेल्या हारांतील मण्याप्रमाणें एकटचा पडलेल्या या राजसत्तांवर वेळ न गमावितां व पुनश्च त्यांना संघटित होण्याची संधीही न देतां, चार पांडव बंधूना यज्ञाच्या निमित्तानें करावयाच्या दिग्विजयार्थ पाठवून युधिष्ठिराच्या साम्राज्यसत्तेखालीं आणलें. जरासंधाच्या वधामुळें इतका विलक्षण दरारा निर्माण झाला होता कीं, पांडवबंधूच्या नुसत्या आगमनानेंच बहुतेक ठिकाणीं नव्या धर्मसत्तेला मांडलिकत्वाचे करभार मिळाले व युद्धाचा फारसा प्रसंग उद्भवलाच नाहीं. ज्यांनी युद्धें प्रथम प्रारंभ केलीं त्यांनींही काळ ओळखून वेगवेगळचा निमित्तानें नव्या सत्तेला मान्यता दिली. कोणी युधिष्ठिर धर्मनिष्ठ आहे म्हणून आम्हीं त्याची सत्ता मान्य करतों असें सांगितलें, तर कोणी युधिष्ठिर आमचा नातलग असल्यामुळें त्याचा उत्कर्ष हा आमचाच उत्कर्ष आहे असें बोलून युद्धाचा प्रसंग टाळला. कोणीकोणी तर प्रारंभीं

युद्ध करून मागाहून वडिलार्जित स्नेहाचें नातें उकरून काढून नव्या सत्तेला मान्यता दिली. अशीं मोठीं उदाहरणें शिशुपाल, भगदत्त यांचीं होत. भीमसेन शिशुपालावर चालून गेला असतां युद्धाऐवजी शिशुपालानें नातेसंबंध उकरून काढून त्याचें स्वागत केलें व त्याला आपल्या घरी ठेवून घेऊन सत्कार करून परत पाठविलें, तर भगदत्तानें मी महेंद्राचा सखा असून तुझ्यावर प्रसन्न झालों आहें, काय हवें तें मागून घे, अशा प्रौढीच्या थाटांत वरदानाच्या स्वरूपांत अर्जुनाला करभार दिला. युधिष्ठिराला भारताचा सम्राट् म्हणून भगवान् श्रीकृष्णांनी राजसूय यज्ञाच्या निमित्तानें स्वतःच्या पांचजन्य शंखांतून चतुःसमुद्राचें पाणी घेऊन अभिषेक केला. नव्या सत्तेला ती फक्त धर्मनिष्ठ आहे म्हणून आम्ही वश झालों आहोंत, वस्तुतः पराक्रमानें आम्ही त्या सत्तेला मुळीच भीक घालीत नाही" असें भासविणाऱ्या लोकांचा तो दर्प भरसभेंत विरोध करावयास उठलेल्या चेदिराज शिशुपालाला ठार मारून श्रीकृष्णांनीं पार घालविला. सत्ता जशी न्यायी असावी लागते तशीच नवी सत्ता अत्यंत सामर्थ्यसंपन्न आहे असा भावही तिच्याविषयीं उत्पन्न व्हावयास लागतो व त्यासाठीं अशा कांहीं गोष्टींची आवश्यकता असते. त्याविना सत्तेचें सिंहासन कधींही स्थिर होऊं शकत नाहीं. शिशुपालाच्या या वधानें पुष्कळांचें दर्पभंजन झालें व सामर्थ्याचा प्रत्यय येऊन सिंहासन स्थिरपद होण्याची शक्यता उत्पन्न झाली. हें एकछत्री धर्मसाम्राज्य उत्पन्न करून कृतकार्य झाल्याच्या आंतरिक जाणिवेनें संतुष्ट झालेल्या भगवान् श्रीकृष्णांनीं अत्यंत थाटाचा राजसूय यज्ञ घडवून आणला. त्यांनी स्वतःच त्या यज्ञांत पाय धुण्याचें काम पत्करून सर्व सत्तांना कामें करावयास लाविली. सर्व अधिपत्याखालीं आले तरी फाळणीमुळें विलग झालेल्या पण धृतराष्ट्रामुळें सन्मान्य असलेल्या हस्तिनापूरच्या सिंहासनाचें काय करावें हा मोठा प्रश्न होताच. नकुलाला यज्ञाचें निमंत्रण देणाच्या निमित्तानें तेथें पाठविण्यांत आलें. महाभारतकार म्हणतात (सभापर्व अ.३४-१):—

"नकुल हस्तिनापूरला गेला व त्यानें भीष्म आणि धृतराष्ट्र यांना यज्ञाप्रीत्यर्थ बोलाविलें. धृतराष्ट्राच्या वा दुर्योधनाच्या मनांत

कांहींही वाटलें तरी जगत् पादाक्रांत केलेल्या पांडवांच्या प्रभावासमोर आपलें कांहींही चालणार नाही हें ओळखून मुकाटयानें वरून आनंद दाखवीत कौरव राजसूय यज्ञांत आले. कर्ण, शल्य, सोमदत्त, भूरिश्रवा, जयद्रथ, शाल्व, भगदत्त, पौण्ड्रक, कुंतिभोज, विराट, शिशुपाल इत्यादि गाजलेले पराक्रमी लोक युधिष्ठिराच्या पायावर करभार ओतण्यासाठीं त्या यज्ञांत एकत्रित झाले होते. वेगवेगळया लोकांना कामें वांटून देण्यांत आलीं. सम्राट् युधिष्ठिराचा तो यज्ञ अतिशय थाटानें पार पडला. त्या यज्ञसमारंभांत कामें कोणत्या पद्धतीनें वांटून देण्यांत आलीं होती याचें वर्णन करतांना महाभारतकार म्हणतात ( सभापर्व अ. ३५–२ ते १३ ) कीं,

" भक्ष्य व भोज्य यांची व्यवस्था दुःशासनाकडे होती. ब्राह्मणांचा सन्मान अश्वत्थाम्याकडे देण्यांत आला होता. येणाऱ्या राजांचा सन्मान संजयाकडे होता. धर्मकृत्यें नीट चालली आहेत कीं नाहींत हें पहाण्याचें काम भीष्म व द्रोणाचार्य यांच्यावर सोपविण्यांत आलें होतें. येणारीं सुवर्णरत्नें यांची परीक्षा करून तीं ठेवणें व दक्षिणा वांटप आणि दान हें कृपाचार्यांवर सोपविण्यांत आलें होतें. विदुराकडे व्ययाचें काम होतें. आणि राजा दुर्योधनाकडे नजराणे ठेवण्याचें काम होतें. भगवान् श्रीकृष्णांनी पाय धुण्याचें काम स्वतःकडे घेतलें. कुणीहि युधिष्ठिराला क्षुद्र नजराणा अर्पण केला नाहीं. जणूं कीं काय आपल्या राज्यांतील अमोल रत्नांनीं युधिष्ठिराचा धनकोश भरून काढण्याची त्या राजे लोकांत स्पर्धा लागून राहिली होती !

ही नवीन धर्मसाम्राज्य सत्ता स्थापन होणें म्हणजे आपलें जीवितकार्य निदान त्यांतील एक महत्त्वाचा भाग पार पडणेंच होय अशा आंतरिक समाधानानें युधिष्ठिराच्या मस्तकावर पांचजन्यांतून पवित्र जलाचा अभिषेक करतांना श्रीकृष्णांना स्वाभाविकपणेंच आनंद झाला असेल! पण तो त्यांचा आनंद टिकावयाचा नव्हता. त्या कालपुरुषाच्या इच्छारूपी अग्नींत राजसत्तांचें भस्म व्हावें असाच विधिसंकेत होता. त्यामुळें शांततेनें व विशेष विनाश न करतां धर्मसत्तेच्या संस्थापनेचें करण्यांत आलेलें हें कार्य स्थिरपद होऊं शकलें नाहीं. कसें तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

# धर्मराज्याचें स्वरूप

मागच्या व्याख्यानांत युधिष्ठिरानें धर्मसाम्राज्य स्थापन केल्याचा मी उल्लेख केला आहे. पण युधिष्ठिरानें धर्मसाम्राज्य स्थापन केलें म्हणजे काय केलें हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. युधिष्ठिराचें नांव धर्म होतें म्हणून त्याच्या राज्याला धर्मराज्य असें म्हणावयाचें ही केवळ शाब्दिक कोटि होईल. युधिष्ठिरांची योग्यता केवढी थोर होती व धर्म हा त्यांच्या जीवनाचा कसा स्थायीभाव बनून राहिला होता याचा उल्लेख मी युधिष्ठिराचें स्वभावचित्र रेखाटतांना केलाच आहे. राजा या नात्यानेंही युधिष्ठिरांची योग्यता किती थोर होती हेंही आपण पाहिलें आहे. अशा स्थितींत श्रीकृष्णांनीं त्यांच्या करवी जें धर्मराज्य उत्पन्न केलें त्याचें स्वरूप काय होतें हें पहाणें अधिकच उद्बोधक ठरतें. महाभारतांत त्या राज्याचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे :–

**रक्षणाद्धर्मराजस्य सत्यस्य परिपालनात् ।**
**शत्रूणां क्षपणाच्चैव स्वकर्मनिरताः प्रजाः ॥ १**
**बलीनां सम्यगादानाद्धर्मतश्चानुशासनात् ।**
**निकामवर्षी पर्जन्यः स्फीतो जनपदोऽभवत् ॥ २**
**सर्वारम्भाः सुप्रवृत्ता गोरक्षा कर्षणं वणिक् ।**
**विशेषात्सर्वमेवैतत्संजज्ञे राजकर्मणः ॥ ३**
**दस्युभ्यो वञ्चकेभ्यो वा राजन्प्रति परस्परम् ।**
**राजवल्लभतश्चैव नाश्रूयन्त मृषा गिरः ॥ ४**
**अवर्षं चातिवर्षं च व्याधिपावकमूर्च्छनम् ।**
**सर्वमेतत्तदा नासीद्धर्मनित्ये युधिष्ठिरे ॥ ५**
**प्रियं कर्तुमुपस्थातुं बलिकर्म स्वभावजम् ।**
**अभिहर्तुं नृपा जग्मुर्नान्यैः कार्यैः कथंचन ॥ ६**
**धर्म्यैर्धनागमैस्तस्य ववृधे निचयो महान् ।**
**कर्तुं यस्य न शक्येत क्षयो वर्षशतैरपि ॥ ७**

—( महाभारत, सभापर्व अ. ३३ )

---

व्याख्यान १६ वें दिनांक १२–४–५२

" युधिष्ठिरांच्या रक्षणामुळें व शत्रूंना ठार मारल्यामुळें अभ्यंतर व बाह्य संकटांपासून प्रजेची पूर्णपणें सुटका झालेली होती. स्वतः युधिष्ठिर सत्यधर्माचें आचरण करणारे असल्यामुळें व प्रजेंतही सत्यधर्माचें आचरण करण्याची प्रवृत्ति कशी निर्माण होईल याची ते सदोदित काळजी घेत असल्यामुळें आपआपलें कर्तव्य यथावत्पणें पार पाडण्याचें त्यांच्या प्रजेला स्वाभाविक वळणच लागलेलें होतें." रक्षण, भरण, व विनयाधान हें भारतीय राज्ययंत्राचें कार्य असून ऐतिहासिक वाङमयांत तर त्याचा निर्देश असतोच; पण कालिदासा-सारख्या कवींच्या काव्यांतूनही त्याचीं वर्णनें आढळतात.· यांपैकीं (रक्षण म्हणजे शत्रूच्या आक्रमणाच्या आपत्तीपासून अथवा आपल्या राज्यांतीलच गुन्हेगारांच्या आक्रमणापासून प्रजेला संरक्षण देणें होय. ही गोष्ट भौतिक सामर्थ्याशिवाय शक्य नसतें. युधिष्ठिरांचें राज्ययंत्र तसें होतें. भरण म्हणजे प्रजेची उपासमार होऊं न देतां तिचें उपजीवन सुव्यवस्थितपणें चालण्याची सोय उपलब्ध करून देणें व तदनुरूप तें चालविणें होय. धनधान्याची समृद्धि, विपुल उत्पादन, व निःस्वार्थीपणानें करण्यांत येणारें सुव्यवस्थित वांटप या तीन गोष्टींनी ही गोष्ट साधतां येते. उत्कृष्ट भरणात्मक कर्तव्य पार पाडणारें राज्ययंत्र प्रत्येकाच्या योग्यतेनुरूप ज्याला त्याला उपजीवनाचा व्यवसाय मिळवून देणारेंही असलें पाहिजे. युधिष्ठिरांचें राज्ययंत्र तसें होतें. पण एवढ्यानेंच राज्ययंत्राचें, विशेषतः भारतीय राज्ययंत्राचें उत्तरदायित्व संपत नाहीं. तर समाजाच्या आणि राष्ट्रांतील व्यक्तींच्या अंतःकरणांतील सारी क्षुद्रता नष्ट करून उत्कृष्ट शीलचारित्र्यसंपन्नता व निःस्वार्थी कर्तव्यनिष्ठा प्रजेच्या अंतःकरणांत बाणविणें हें सर्वांत महत्त्वाचें असें राज्ययंत्राचें कर्तव्य भारतीय राजनीतिशास्त्रवेत्त्यांनी मानलेलें आहे. राज्ययंत्राला अशी निश्चित स्वरूपाची जीवनदृष्टि असल्या-वांचून व शिक्षणाच्या द्वारें ती प्रत्यक्ष समाजांत उत्पन्न करण्याची योजना व्यवहारांत आणल्यावांचून ती निर्माण होणें शक्य नसते. प्रत्येक व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचा अथवा अस्मितेचा विकास या ठिकाणीं अभिप्रेत असतो. याच्यावांचून केवळ भरणपोषणाच्या

क्षेत्रापुरतेंच आदर्श असणारें राज्ययंत्र हें फार तर केवळ समाजांतील निरुपद्रवी पशुत्वाचेंच संरक्षण करणारें अतएव भारतीयांच्या आदर्शवादाच्याही दृष्टीनें निकृष्ट प्रतीचें ठरतें. युधिष्ठिरांचें राज्ययंत्र हें या दृष्टीनें अत्यंत परिपूर्ण होतें. हें 'सत्यस्य परिपालनात्' या शब्दांनी येथें सुचविलें आहे. या श्लोकाची शब्दरचना अत्यंत मार्मिक आहे. व राज्यशास्त्राच्या परिभाषेनुरूप त्या शब्दरचनेकडे पहाणें आवश्यक आहे.) घ्यावयाचे जे कर ते केवळ ठरलेले, व धर्मशास्त्राला संमत असलेले तेच युधिष्ठिर घेत असत. कधींही करवाढ करण्याचा त्यांच्यावर प्रसंग आला नाहीं. संपूर्ण शासनयंत्र, त्याच्या तत्त्वज्ञ धर्मशास्त्रज्ञांनीं घातलेल्या मर्यादांच्या अनुरूपच कांटेकोरपणानें युधिठिर चालवीत असल्यामुळें पाऊस वेळच्या वेळीं पडत असे व निसर्ग सर्वदा अनुकूल असे. त्यामुळें धनधान्यसमृद्धींनीं फुललेला असाच सदैव त्यांचा राज्यप्रदेश होता. ज्या ज्या नव्या योजना त्यांनीं आंखल्या त्या सर्व प्रजेला व राज्ययंत्राला अत्यंत हितावह व सुखकारकच होत्या. बळाचा धाक व क्रौर्य यांचा कोठेंही संबंध नसे. पशुपालन, शेती व व्यापारविषयक सर्व योजना या अशाच प्रकारच्या होत्या. समाजामध्यें सर्व प्रकारचें चारित्र्य नांदावें व लोकांच्याकडून आदर्श वर्तणूक घडावी असें वाटत असेल तर शासनयंत्राचा सूत्रचालक हा अशा आदर्श चारित्र्याचा परिपूर्ण आविष्कार असावा लागतो. युधिष्ठिर हें स्वत: पुण्यशील असल्यामुळें सहजपणें प्रजेला वळण लागलें. चोरी, फसवेगिरी करणारे लोक, वा राजाच्या खास मर्जींतील नट-विट-गायकादि खुषमस्करे यांच्या तोंडून सुद्धां कधीं खोटें बोलण्याचा प्रकार अथवा खोटा व फसवणुकीचा व्यवहार होत नसे. (या श्लोकांतील विधानांचा तीं नुसतीं वरवर पाहिलीं तर कांहींच अर्थ लागणें शक्य नाहीं. चोर चोरी करीत नसत, व वंचक वंचना करीत नसत याचा अर्थ काय होऊं शकेल ? जे वंचना करणार नाहींत त्यांना वंचक म्हणावयाचें कशास्तव ? व जे चोरी करणार नाहींत त्यांना चोर तरी कशासाठीं संबोधावयाचें ? याचा खरा अर्थ युधिष्ठिरांच्या स्वत:च्या पुण्यशीलतेमुळें परंपरागत गुन्हा करणाऱ्या गुन्हेगार

जातींची सुद्धां गुन्हा करण्याची प्रवृत्ति संपूर्णपणें नष्ट झालेली होती असा आहे. महाभारताचा विख्यात टीकाकार नीलकंठ यानें या श्लोकाचें मर्म पुढीलप्रमाणें व्यक्त केलें असून त्यावरून त्याचा मार्मिकपणा चांगलाच व्यक्त होतो. नीलकंठ म्हणतो : "एते जातितः खलाः अपि न तत्कर्म कुर्वन्ति इत्यर्थः।")

युधिष्ठिर स्वतः पुण्यवान् असल्यामुळें त्याच्या राज्यांत अवर्षण व त्यामुळें पडणारा कोरडा दुष्काळ, तसेंच प्रमाणाबाहेर पाऊस व त्यामुळें पडणारा ओला दुष्काळ, रोगराई, अथवा वीज, अग्नि-प्रलय इत्यादि पंचमहाभूतांच्या प्रकोपापासून उत्पन्न होणाऱ्या कोणत्याही स्वरूपाच्या आपत्ती नव्हत्या. मांडलिक राजे त्यांच्याकडे येत, पण ते केवळ आंतरिक प्रेरणेनें आपआपल्या वांटयाची खंडणी त्यांना देण्यासाठीं, त्यांच्या नेतृत्वाखालीं काम करण्याची संधि मिळावी म्हणून, अथवा त्यांचें प्रिय करण्यास्तवच येत असत. दुसऱ्या कोणत्याही कारणास्तव वा कारस्थान करण्याच्या उद्देशानें येण्याची सहसा प्रवृत्ति नसे. त्यांच्याविषयींचा विलक्षण आदर सर्वत्र होता. (ज्या आदर्श धर्मसाम्राज्याचें वर्णन शंतनूच्या उदाहरणाच्या रूपानें महाभारतावरील व्याख्यानमालेंत करण्यांत आलेलें आहे त्याचेंच प्रात्यक्षिक युधिष्ठिराच्या राज्यांत प्रत्यक्षांत आढळत होतें असें यावरून दिसून येईल.) युधिष्ठिराचा धनकोश अत्यंत समृद्ध होता. राज्ययंत्राचें खरें बळ म्हणजे कोशबळ होय असा अभिप्राय राजनीतिशास्त्रज्ञांनीं वारंवार व्यक्त केलेला आहे. युधिष्ठिराच्या राज्ययंत्राचा धनकोश या दृष्टीनें इतका समृद्ध होता कीं सतत शतावधि वर्षें त्याचा व्यय करूनही तो रिता झाला नसता. पण या एवढया समृद्ध धनकोशांतील एक कपर्दिकही शोषण, अन्याय व फसवणुकीच्या मार्गानें आलेली नव्हती, तर न्याय्य व धर्म्य अशा मार्गांनींच हा धनकोश वाढलेला होता. युधिष्ठिरांच्या राज्याच्या या आदर्श वर्णनावरून भारतीय राज्यसंस्थेचें जें आदर्श स्वरूप महाभारतावरील व्याख्यानमालेच्या प्रारंभीं वर्णन केलें आहे व जें पुन्हां निर्माण करण्यासाठीं भगवान् श्रीकृष्ण यांनीं

बद्धपरिकर झाल्याचा वारंवार उद्घोष केला आहे तेंच युधिष्ठिरांच्या या राज्ययंत्राच्या रूपानें साकारलें होतें असें आढळून येईल. श्रीकृष्णांनीं धर्मसाम्राज्याची प्रतिष्ठापना केली म्हणजे काय केलें याचीही यावरून यथावत् कल्पना येईल.

## राज्ययंत्राचें वैभव

युधिष्ठिरांचा धनकोश समृद्ध होता असें मी वर म्हटलेंच आहे. राजसूय यज्ञाच्या रूपानें झालेल्या मोठ्या समारंभांत युधिष्ठिरांच्या पायाशीं सर्व प्रकारचें वैभव लोळण घेऊं लागलें होतें. त्यांच्या त्या अभूतपूर्व वैभवाचें दुर्योधनानें राजा धृतराष्ट्राजवळ व शकुनीजवळ जें वर्णन केलेलें आहे तें खरोखरी मुळांतून पहाण्यासारखें आहे. उत्तर प्रदेशांतील हिमाचलाच्या पायथ्याशीं असलेल्या राजसत्तांपासून तर लंकेच्या द्वीपांतील अधिसत्तेपर्यंत भारतदेशांतील व क्वचित् त्याच्या बाहेरच्याही अधिसत्तांनीं आपआपलें सारें वैभव नजराण्यांच्या रूपानें युधिष्ठिराच्या पायाशीं आणून ओतलें होतें. त्यांच्या वैभवश्रीच्या झळाळणाऱ्या दीप्तीनें दुर्योधनाचा अंतरात्मा कसा दग्ध झाला होता याचें वर्णन मी मागे केलेंच आहे. तत्कालीन संपूर्ण ज्ञात सत्तांत केवळ दोनच सत्ता अशा होत्या कीं ज्यांनीं युधिष्ठिराला कर देण्याचें कारण पडलें नाहीं. महाभारतकार सभापर्वांत (अ. ५२–४९) म्हणतात:–

"कुंतीपुत्र युधिष्ठिराला फक्त दोनच सत्ता कर देत नव्हत्या. नात्याच्या संबंधामुळें द्रुपदाच्या नेतृत्वाखालीं असलेलें पाञ्चाल राज्य व दुसरें मित्रत्वाच्या संबंधामुळें श्रीकृष्णांच्या नेतृत्वाखालीं असलेलें अंधक आणि वृष्णी यांचें राज्य. अहमहमिकेनें अनर्घ्य रत्नें राजसत्तांनीं युधिष्ठिराच्या पायाशीं आणून ओतावीं व एकवार त्यांनीं आपल्याकडे व आपल्या देणगीकडे केवळ स्नेहमय दृष्टिपात तरी करावा म्हणून अपेक्षा करावी; पण गर्दीच इतकी उसळली होती कीं उत्कट विनय अंगीं मुरलेला असूनही युधिष्ठिरांना त्या नजराण्यांकडे व तो देणाऱ्या व्यक्तींकडे सहज दृष्टिपात करणेंही अशक्य होऊन बसलें. सर्व मूर्धाभिषिक्त व श्रेष्ठ राजे त्यांच्या

वैभवसंपन्न राजसूयांत उपस्थित होते. बाल्हीकानें (हा इराणचा राजा होता) तापलेल्या सुवर्णाचा एक उत्कृष्ट रथ युधिष्ठिरांना नजर केला होता. सुदक्षणानें खास कांबोज देशांतील घोडे त्यांना अर्पण केले. दुधाच्या फेंसाप्रमाणें ते पांढरे शुभ्र होते. त्या घोड्यांचे जडावाचें काम केलेले लगाम सुनीथानें त्यांना समर्पण केले. सम्राट् जरासंधाचा सेनापति शिशुपाल यानें उत्कृष्ट ध्वज त्यांना अर्पण केला. एकलव्यासारख्या पराक्रमी व्यक्तीनेंही सम्राटाला योग्य अशीं पादत्राणें त्यांना दिलीं होतीं. भारतसम्राट् म्हणून त्यांना जो अभिषेक करण्यांत आला तो करावयास नारद, धौम्य, द्वैपायन, व्यास, देवल, असित व परशुरामासारखे महान् वेदवेत्ते उपस्थित झाले होते. सप्तर्षींनीं महेंद्राला करावा असाच त्यांनीं भारतसम्राट् म्हणून युधिष्ठिराला अभिषेक केला. सात्यकीनें त्या वेळीं त्यांच्या डोक्यावर छत्र धारण केलें होतें. भीमसेन व अर्जुन मोर्चेलें वारीत होते. नकुल व सहदेव चौऱ्या ढाळीत होते. अशा स्थितींत जगत्स्रष्टे भगवान् श्रीकृष्ण आपल्या विख्यात पांचजन्य शंखांत चतुःसमुद्रांचें पवित्र पाणी व पवित्र नद्यांचें पाणी घेऊन सर्वांसमक्ष उभे राहिले. महाभारतकार म्हणतातः—

**शङ्खप्रवरमादाय वासुदेवोऽभिषिक्तवान् ।**
**शैक्यं रुक्मसहस्रस्य बहुरत्नविभूषितम् ॥ २७**

——महाभारत, सभापर्व अ. ४९

"अनंतरत्नांचें काम केलेला, जडावाचा व केवळ अमोल असा आपला पांचजन्य शंख उभारून त्यांतील जलानें श्रीकृष्णांनीं युधिष्ठिराला अभिषेक केला व भारताचा सम्राट् म्हणून त्यांचा गौरव केला. अशी ही नवी धर्मसत्ता वैभवाच्या पायावर उभी होती, त्याचप्रमाणें ती सामर्थ्याच्याही पार्श्वभूमीवर उभी होती."

## धर्मसत्तेचें सामर्थ्य

भगवान् श्रीकृष्ण, अर्जुन व भीमसेन हे या सत्तेचे पाठीराखे होते ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे त्या सत्तेच्या सामर्थ्याचें वेगळें वर्णन करण्याची आवश्यकताच उरत नाहीं. सम्राट् युधिष्ठिराला

शस्त्रास्त्रांच्या भरंवशावर जिकतां येणें कसें अशक्य आहे हें सांगतांना (सभापर्व अ. ४८–१५, १६) शकुनि दुर्योधनाला म्हणतोः–

"अर्जुन, श्रीकृष्ण, भीमसेन, नकुल, सहदेव, आपल्या पुत्रांसहित राजा द्रुपद या सर्वांच्यासहित असलेल्या युधिष्ठिराचा विचार केला तर देवांचेंसुद्धां सामर्थ्य त्याला जिकण्याचें नाहीं हें स्पष्ट होईल. हे सगळे महारथ असून अमोघ प्रहार करणारे, अस्त्रविद्येंत संपन्न व युद्धाची हौस असलेले लोक आहेत." विशेषतः चेदिराज शिशुपालाला श्रीकृष्णांनीं ठार मारल्यानंतर तर नव्या सत्तेच्या सामर्थ्याचा धाक सर्वत्रच उत्पन्न झाला होता. शिवाय यादवांच्या सत्तेचें पाठबळ असल्यामुळें भक्कम सामर्थ्याची पार्श्वभूमि या सत्तेला लाभली होती.

## सत्तेचें अस्थैर्य

याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या इच्छेनुरूप धर्मसत्ता प्रस्थापित केली असली तरी ती दृढमूल झालेली नव्हती हें ते स्वतः चांगलें ओळखून होते. पांडवांच्या व श्रीकृष्णांच्या सामर्थ्यानें जिकलेले राजे लोक, निदान त्यांतील जरासंधाच्या पंखाखालीं असलेला राजसमुदाय आपलें सामर्थ्य चालण्यासारखें नाहीं हें ओळखून केवळ दबलेला होता. ते हृदयानें कांहीं शुद्ध झालेले नव्हते. त्यांचे हे संतापाचे भाव अकिंचित्करतेमुळें ते कसे व्यक्त करीत तें शिशुपालाच्या वधानंतरच्या महाभारतांतील वर्णनावरून स्पष्ट होतें. महाभारतकार सभापर्वांत ( अ. ४५–३०, ३१) म्हणतातः–

"गोष्ट बोलण्याच्या मर्यादेच्या पलीकडे गेलेली होती. उगाच वाटेल तें बोललें तर ऐकलें जाणार नाही याचें भगवान् श्रीकृष्णांनीं जणूं कीं काय प्रात्यक्षिकच दिलेलें होतें. श्रीकृष्णांचें तें सामर्थ्यशील व रौद्र भाव धारण केलेलें स्वरूप पहातांच कांही राजे विरोध करावयाचें मनांत असून सुद्धां अक्षरही बोलले नाहींत. कांहीं संतापून जागच्या जागींच जोरजोरानें तळहात एकमेकांवर घासूं लागले. कांहीं संतापून दातओंठ चावूं लागले. पण शिशुपालाचें प्रेत पाहून त्यापलीकडे अधिक कांहीं करण्याचें कोणालाही धैर्य झालें नाहीं."

राजा जरासंध गेल्यामुळें संघ फुटून आपण विघटित झालों व

केवळ श्रीकृष्णांच्या बुद्धिमत्तेनें रक्ताचा एक थेंबही न सांडतां तो मारला गेला या जाणिवेमुळें आंतल्या आंत या राजेलोकांचा संताप धुमसत होता. त्यांचा खरा राग युधिष्ठिरापेक्षांही श्रीकृष्णांवरच होता; व तोही जरासंध मारला गेल्यामुळें जी सामर्थ्यहीनता व विघटितता त्यांना प्राप्त झाली होती त्यामुळें विशेष होता. शिशुपालसुद्धां युधिष्ठिरावर संतापलेला नसून श्रीकृष्णांवरच त्याचा राग झालेला आहे. जरासंधाच्या आकस्मिक वधामुळें त्याला जी अवशता वाटत होती तिच्या जाणिवेंतूनच तो उत्पन्न झालेला आहे. तो श्रीकृष्णांना म्हणतो (सभापर्व अ. ४२–२ ते ५) कीं,

"जरासंधाच्या वधाच्या वेळी श्रीकृष्णानें व त्याच्याच प्रेरणेवरून या भीमार्जुनांनी जें दुष्कृत्य केलें त्याचें समर्थन कोणी तरी करूं शकेल काय? ब्राह्मण म्हणून आडमार्गानें ह्यांनीं जरासंधाच्या सामर्थ्याला भिऊन त्याच्या घरी कपटानें प्रवेश केला. तो बिचारा धर्मात्मा यांचें पूजन करून ब्राह्मण समजून या दुष्टांना जेवणाचा आग्रह करीत होता. पण या कृष्णानें आपली दुरात्मता पूर्णपणें व्यक्त करून कपटानें त्याला ठार मारलें." अर्थातच, उत्तरदायी कोणी नसतां स्त्रिया व मुलांच्यावर असावधपणें स्वारी करून त्यांचीं घरेंदारें जाळून टाकणें, फसवून विवाहित नव वधूंना पळविणें, इत्यादि पातकें सहजपणें करणाऱ्या शिशुपालाच्या तोंडचें हें नीतिप्रवचन म्हणजे सैतानानें केलेला बायबलाचा पाठच आहे ही गोष्ट वेगळी. पण त्यावरून शिशुपालाच्या अंतःकरणांतील भाव उत्तम तऱ्हेनें व्यक्त होतो. शिशुपालाची ही मनोवृत्ति म्हणजे जरासंधाच्या नेतृत्वाखाली एकत्रित झालेल्या राजे लोकांच्या सामुदायिक मनोवृत्तीचा प्रातिनिधिक आविष्कार आहे हें विसरतां येत नाहीं. या दबलेल्या राजसत्तांच्या संतापाचा केव्हां ना केव्हां तरी प्रस्फोट होऊन त्यांतून महायुद्धाची रणदुंदुभि झडेल व संहार उत्पन्न होईल हें राजसूय यज्ञार्थ आलेल्या जाणत्या लोकांना शिशुपालवधाच्या प्रकरणापूर्वींही उघडपणेंच दिसत होतें. यज्ञासाठीं जमलेल्या राजेलोकांकडे पाहून नारद स्वतःच्या मनाशींच जे उद्गार काढीत आहेत ते या दृष्टीनें अत्यंत सूचक आहेत. ते म्हणतात:

अहो बत महद्भूतं स्वयंभूर्यदिदं स्वयम्।
आदास्यति पुनः क्षत्रमेवं बलसमन्वितम्॥ १९

—(महाभारत, सभापर्व अ. ३६)

"ब्रह्मदेवानें या सर्व क्षत्रियांना पुन्हां आपल्या लोकीं घेऊन जाण्याचें ठरविलें आहे असें दिसतें." या उद्गारांतील त्यांचा ध्वनि स्पष्टच आहे. शिशुपालाला सुद्धां एकट्यालाच पांडवांशीं विरोध करावयाचा नसून आपल्या पक्षाच्या राजे लोकांकडून त्या यज्ञांतच उठावणी करावयाची होती असें दिसतें. किंबहुना त्या दृष्टीनें त्यानें प्रयत्नही चालविले होते. आणि ते श्रीकृष्णांच्या पूर्णपणें ध्यानांतही आले होते. या दृष्टीचे शिशुपालाच्या सूचक हालचाली ध्वनित करणारे कांहीं पुरावेच मी येथें देतों:—

दृष्टो युधिष्ठिरो राजा दृष्टो भीमश्च यादृशः।
वासुदेवोऽप्ययं दृष्टः सर्वमेतद्यथातथम्॥ ३०
इत्युक्त्वा शिशुपालस्तानुत्थाय परमासनात्।
निर्ययौ सदसस्तस्मात्सहितो राजभिस्तदा॥ ३१

—(महाभारत, सभापर्व अ. ३७)

तस्मिन्नभ्यर्चिते कृष्णे सुनीथः शत्रुकर्षणः।
अतिताम्रेक्षणः कोपादुवाच मनुजाधिपान्॥ ११
स्थितः सेनापतिर्योऽहं मन्यध्वं किं नु साम्प्रतम्।
युधि तिष्ठाम संनह्य समेतान् वृष्णिपाण्डवान्॥ १२
इति सर्वान् समुत्साह्य राज्ञस्तांश्चेदिपुंगवः।
यज्ञोपघाताय ततः सोऽमंत्रयत राजभिः॥ १३
तत्राहूता गताः सर्वे सुनीथप्रमुखा गणाः।
समदृश्यन्त संक्रुद्धा विवर्णवदनास्तथा॥ १४
युधिष्ठिराभिषेकं च वासुदेवस्य चार्हणम्।
न स्याद्यथा तथा कार्यमेवं सर्वे तदाऽब्रुवन्॥ १५
निष्कर्षान्निश्चयात्सर्वे राजानः क्रोधमूर्च्छिताः।
अब्रुवंस्तत्र राजानो निर्वेदादात्मनिश्चयात्॥ १६
सुहृद्भिर्वार्यमाणानां तेषां हि वपुराबभौ।
आमिषादपकृष्टान्तं सिंहानामिव गर्जताम्॥ १७

**तं बलौघमपर्यन्तं राजसागरमक्षयम् ।**
**कुर्वाणं समयं कृष्णो युद्धाय बुबुधे तदा ॥ १८**

—(महाभारत, सभापर्व अ. ३९)

"हा युधिष्ठिर, भीष्म व कृष्णही मी पाहिलाच आहें. हे सारेच गणंग आहेत असें बोलून शिशुपाल कांहीं राजे लोकांसहित तें सभास्थान सोडून बाहेर निघून गेला. भगवान् श्रीकृष्णांची अग्रपूजा आपल्याला न जुमानतां झाल्याचें पाहून व डोळे रागानें लाल भडक करून सर्व राजे लोकांना उद्देशून तो म्हणाला, 'या वेळीं काय करावें असें तुम्हांला वाटतें तें सांगा. आपला सम्राट् मेला असला तरी त्यानेंच नियुक्त केलेला मी तुमचा सेनापति आहे. आपण सर्व मिळून या यादव व पांडवांशीं आतांच त्यांच्यावर चाल करून युद्ध करावें असें मला वाटतें.' याप्रमाणें त्या राजे लोकांना भडकवून चढाई करून यज्ञांतच विघ्न करावें अशी शिशुपाल त्यांना चिथावणी देऊं लागला व तेही लोक चढाई कशी करावी या संबंधींचा आपसांत विचारविनिमय करूं लागले. जमलेल्या सर्व लोकांचीं तोंडे पांढरीं फटक पडलीं होती. श्रीकृष्णांची अग्रपूजा, इतकेंच नव्हे तर सम्राट् म्हणून होणारा युधिष्ठिराचा अभिषेक काय वाटेल तें झालें तरी मुळींच होऊं देतां कामा नये असा ते लोक निश्चय करीत होते. त्यांचीं अंतःकरणें क्रोधानें व्याप्त झालीं होतीं. युद्ध करावयाचा कृतनिश्चय ते उघडपणें बोलूं लागले होते. या उठावणींतून केवळ आत्मनाशावांचून दुसरें कांहीही निष्पन्न व्हावयाचें नाहीं अशी खात्री असल्यामुळें त्यांचे हितचिंतक त्यांचें निवारण करण्याचा प्रयत्न करीत होते. पण जों जों हा निवारण करण्याचा प्रयत्न होत होता तों तों त्यांचा संताप आणि गर्जना अधिकाधिकच वाढत होत्या. आमिषापासून दूर नेलेल्या सिंहांनीं जशा संतापानें डरकाळ्या फोडाव्या तशाच ते राजेलोक गर्जना करीत होते. त्यांचा तो आवेश, त्या गर्जना, व तो क्रोधित समुदाय पाहून कदाचित युद्ध करावें लागेल हें श्रीकृष्णांनीं ओळखलें."

**असावधपणें शिशुपालानें एकट्या कृष्णांना युद्धासाठीं आव्हान केल्यामुळें व तत्परतेनें तें स्वीकारून तत्काळ श्रीकृष्णांनीं त्याचा**

शिरच्छेद केल्यामुळें पुन्हां राजे लोक नेतृत्वहीन झाले व भयामुळें त्यांचा रणोत्साह जागच्या जागीं थंडावला ही गोष्ट वेगळी. युधिष्ठिराचा अनुनयाचा स्वभाव हेंही त्यांना शांत राहावयास एक प्रकारें निमित्तच मिळालें असें म्हणावयास हरकत नाहीं. तरी पण यज्ञांतच थोडीशी असावधता दाखविल्यास अशा उठावणीचें भय आहे ही गोष्ट ओळखून भगवान् श्रीकृष्णांनीं त्याच्या संरक्षणाचा भार व्यक्तिशः स्वतःकडे घेऊन डोळयांत तेल घालून त्याचें संरक्षण केलें होतें. महाभारतकार म्हणतातः—

**तं नु यज्ञं महाबाहुरासमाप्तेर्जनार्दनः ।**
**ररक्ष भगवान् शौरिः शार्ङ्गचक्रगदाधरः ।। ३९**

—(महाभारत, सभापर्व अ. ४५)

"आजानुबाहु व शार्ङ्गचक्रगदादि आयुधें धारण करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णांनीं त्या यज्ञाचें, तो संपेपर्यंत संरक्षण केलें होतें." आज जरी सामर्थ्याच्या धाकामुळें पराभूत सत्तांचा उठावणीचा विचार जागच्या जागी जिरला असला तरी अशी उठावणी होऊन एखाद्या भीषण महायुद्धाला तोंड द्यावें लागेल व त्याचें पर्यवसान संहारांत होईल अशी शंका स्वतः युधिष्ठिरांना देखील वाटत होती. राजसूय यज्ञ संपल्यावर व्यास त्यांच्या भेटीला गेले असतां युधिष्ठिर त्यांना उद्देशून म्हणतात :—

**अपि चैद्यस्य पतनाच्छन्नमौत्पातिकं महत् । ९**

—(महाभारत, सभापर्व अ. ४६)

"चेदिपति शिशुपालाच्या या मृत्यूमध्यें एखादें भीषण महायुद्ध तर दडलेलें नाहींना ?"

या दबलेल्या संतापांतून, मत्सरांतून, विद्वेषांतून व अभिलाषेच्या प्रवृत्तींतून होणारा प्रहार हा अर्थातच प्रत्यक्षपणें श्रीकृष्णांवर कांहीं व्हावयाचा नव्हता. सत्तेचे निर्माते जरी श्रीकृष्ण असले तरी ते कांहीं तिचें केंद्र नव्हते. प्रत्यक्ष अभिषेक युधिष्ठिराला झालेला असल्यामुळें प्रहार जो व्हावयाचा तो केंद्र म्हणून युधिष्ठिरावरच व्हावयाचा ही गोष्ट उघडच होती. हें ओळखून युधिष्ठिरांनीं

डोळयांत तेल घालून नव्या साम्राज्याचें दक्षपणें संरक्षण करण्याची अत्यंत आवश्यकता होती. तसें युधिष्ठिरांनी करावें व 'निश्चिततेची भावना अंतःकरणांत मुळीच बाळगू नये ' असा त्यांना स्पष्ट इषारा वेदव्यासांनींही दिला होता. 'चेदिपति शिशुपालाच्या मृत्यूंत एखादी भीषण आपत्ति तर दडलेली नाहींना' या युधिष्ठिराच्या प्रश्नाला व्यासांनी जें उत्तर दिलें आहे, त्या उत्तरांतच अधिसत्तेचें केंद्र तू असल्यामुळें प्रहार तुझ्यावर होईल, त्यामुळें डोळयांत तेल घालून सावध रहा असें त्यांनी स्पष्ट शब्दांत सुचविलें आहे. महर्षि व्यास म्हणतात :

**त्वामेकं कारणं कृत्वा कालेन भरतर्षभ ।**
**समेतं पार्थिवं क्षत्रं क्षयं यास्यति भारत ।। १२**
**स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामि कैलासं पर्वतं प्रति ।**
**अप्रमत्तः स्थितो दान्तः पृथिवीं परिपालय ।। १७**

--(महाभारत, सभापर्व ४६)

"तुला एक महत्त्वाचें कारण करून पृथ्वीवरील सर्व क्षत्रिय काळाच्या जबडयांत नाश पावतील. तुझें कल्याण असो. मी कैलास पर्वतावर जात आहें. सर्व इंद्रियें ताब्यांत ठेवून मन मुळींच विकारवश न होऊं देतां अत्यंत सावधपणें राज्याचें संरक्षण कर." या धर्मसाम्राज्याचे निर्माते जे भगवान् श्रीकृष्ण त्यांनीं सुद्धां युधिष्ठिराला त्याचा निरोप घेऊन द्वारकेला जात असतां असाच इषारा दिलेला आहे. महाभारतकार सभापर्वात (अ. ४५-६० ते ६५ ) म्हणतात :—

"नंतर मेघश्यामल श्रीकृष्णांनीं आपलें स्नान व आह्निक आटोपून ब्राह्मणांचे आशीर्वाद घेतले व सर्व सुहृदांचा निरोप घेतला. तोंवर दारुकानें त्यांचा रथ सिद्ध करून दाराशीं आणून उभा केला. श्रीकृष्णांनीं त्या रथाला प्रदक्षिणा घातल्या व रथांत बसून ते द्वारकेकडे जावयास निघाले. त्यांना पोंचविण्यासाठीं म्हणून युधिष्ठिर आपल्या बंधूंसहित पुष्कळ दूरपर्यंत पायींच चालत गेले. श्रीकृष्णांनीं थोडा वेळ आपला रथ उभा केला व युधिष्ठिरांना उद्देशून ते म्हणाले :—

**अप्रमत्तः स्थितो नित्यं प्रजाः पाहि विशांपते ।**
**पर्जन्यमिव भूतानि महाद्रुममिव द्विजाः ।। ६५**

—(महाभारत सभापर्व अ. ४५)

"हे सम्राट, वृक्षराज जसा पक्ष्यांना आश्रय होतो तसें तुम्ही आपल्या प्रजेचें आश्रयस्थान व्हा. पर्जन्य ज्याप्रमाणें प्राणिमात्रांना त्यांचें उपजीवन पुरवितो त्याप्रमाणेंच तुम्हीं त्यांना जीवनाधार होऊन राहा. आपलें राज्य संभाळण्याचें व प्रजापालनाचें कर्तव्य तुम्ही नेहमीं अत्यंत सावध व अप्रमत्त राहून पार पाडा."

श्रेष्ठ मूल्यांची सत्ता उत्पन्न करून व तिच्या केंद्राला सावधतेचा मोलाचा उपदेश करून श्रीकृष्ण परतले. पण व्यास व श्रीकृष्ण यांच्या म्हणण्याचा वास्तविक अर्थ कोमल मनाच्या युधिष्ठिरांच्या मुळींच ध्यानांत आला नाही असें स्पष्टपणें दिसतें. त्यांनीं त्याचा भलताच अर्थ केला व त्याचें पर्यवसान अखेर भारतीय महायुद्ध अपरिहार्य होण्यांत झालें.

श्रीकृष्ण व वेदव्यास यांनीं 'काळ तुला कारण करील' असें युधिष्ठिराला सांगण्यांतील खरा अर्थ 'तुझ्यावर आघात होईल, कारण की तूं नव्या सत्तेचें केंद्र आहेंस' असा होता. पण युधिष्ठिर असें समजले की 'मी कारण होणार' याचा अर्थ लोकांना लागण्यासारख्या माझ्या कांहीं वागणुकीमुळें कलह उत्पन्न होण्याचा संभव आहे. पहिल्या अर्थाकडे जर युधिष्ठिरांचें लक्ष वेधलें असतें तर आपल्याला कोण जाळ्यांत पकडूं इच्छितो याकडे त्यांचें लक्ष वेधून राज्यरक्षण ही गोष्ट ते सर्वांत महत्त्वाची समजले असते. पण त्याऐवजीं त्यांचें मन दुसऱ्या अर्थाकडे वेधल्यामुळें केवळ स्वतःच्या वागणुकींत अधिकाधिक स्नेहार्द्रता आणणें येवढेंच त्यांचें लक्ष्य होऊन बसलें. त्यांनीं व्यास व श्रीकृष्ण यांच्या म्हणण्याचा काय अर्थ घेतला हें त्यांच्या स्वतःच्याच उद्गारांवरून स्पष्ट झालेलें आहे. ते म्हणतात

**ततोऽब्रवीत् सत्यधृतिर्भ्रातॄन् सर्वान् युधिष्ठिरः ।**
**द्वैपायनस्य वचनं तत्रैव समचिन्तयन् ।। २५**

अद्यप्रभृति मर्त्र वः प्रतिज्ञां मे निबोधत ।
त्रयोदश समास्तात को ममाऽर्थोऽस्ति जीवतः ।। २६
न प्रवक्ष्यामि परुषं भ्रातॄनन्यांश्च पार्थिवान् ।
स्थितो निदेशे ज्ञातीनां योक्ष्ये तत्समुदाहरन् ।। २७
एवं मे वर्तमानस्य स्वसुतेष्वितरेषु च ।
भेदो न भविता लोके भेदमूलो हि विग्रहः ।। २८
विग्रहं दूरतो रक्षन् प्रियाण्येव समाचरन् ।
वाच्यतां न गमिष्यामि लोकेषु मनुजर्षभाः ।। २९
भ्रातुर्ज्येष्ठस्य वचनं पाण्डवाः संनिशम्य तत् ।
तमेव समवर्तन्त धर्मराजहिते रताः ।। ३०

—महाभारत सभापर्व अ. ४६

"बंधुजनहो, यापुढें महर्षि व्यासांचा इषारा लक्षांत ठेवून मी एका विशेष पद्धतीनें वागावयाचें ठरविलें आहे. तेरा वर्षपर्यंत संकट टाळण्यासाठीं मला एका विशेष पद्धतीनेंच वागलें पाहिजे. यापुढें मी माझ्या बंधूना अथवा इतर कोणत्याही राजाला कधींही कठोर म्हणून बोलणार नाहीं. सदैव आपल्या ज्ञातीच्या इच्छेनुरूप वागून प्रथम त्यांना सांगून व त्यांची संमति घेऊनच नव्या कोणत्याही योजनेला हात घालीन. जसें आपल्या मुलांशी वागावयाचें असेंच इतर सर्वांशींही मी वर्तन ठेवीन, मी स्वतःच असें वागू लागलों म्हणजे आपसांत कोणतेही अपसमज वा भेद उत्पन्न होणार नाहींत. असे अपसमज उत्पन्न होणें हेंच खरोखरी साऱ्या भांडणाचें मूळ आहे. सर्व प्रकारचें भांडणाचें मूळ दूरच ठेवून जें सर्वांना प्रिय वाटेल असेंच केवळ मी करीन. कोणीही मला नांवें ठेवू शकणार नाहींत असेंच कसोशीनें वागण्याचा मी निश्चय केला आहे. आपल्या ज्येष्ठ भ्रात्याचें हें बोलणें ऐकून त्याच्या इच्छेनुरूप वागण्याचा त्याच्या सर्व बंधूंनीं निश्चय केला." पण युधिष्ठिरांनीं कोणताही निश्चय केला असला तरी काळ कांहीं त्यांची वाट पहाणार नव्हता. श्रीकृष्णांना व व्यासांना 'तुझ्यावर प्रहार होईल' असें 'त्वामेकं कारणं' या शब्दांनीं सुचवून त्या बाबतींत "अप्रमत्त व दान्त राहा"

असें म्हणावयाचें होतें. पण युधिष्ठिरांचें त्या इषाऱ्याच्या उलट वर्तन झालें. युधिष्ठिरांचें तें वर्तन धर्माला धरून झालें असें पुष्कळ विचक्षणांचेंही मत आहे. पण तें बरोबर आहे असें वाटत नाहीं. त्याचीं कारणें सविस्तरपणें महाभारतावरील व्याख्यानमालेंतील युधिष्ठिरांच्या व्यक्तिचित्रणाच्या प्रकरणांत मी उल्लेखिलेलीं आहेत. युधिष्ठिरांनीं राजर्षींच्या कर्तव्याप्रमाणें वागावयास पाहिजे होतें. पण तत्कालीन प्रथेस अनुसरून ते द्यूत खेळावयास गेले. त्यांना आव्हान नाकारणें अशक्य झालें असें मानलें तरी राजर्षि या नात्याचें त्यांचें स्वतःचें कर्तव्य ते पूर्णपणें विसरले असें म्हणण्यावांचून गत्यंतर नाही. नुसत्या व्यक्तिगत धर्माधर्माकिडे लक्ष देण्यानें युधिष्ठिरांचें कर्तव्य संपणारें नव्हतें. युधिष्ठिर हे एक सामान्य व्यक्ति नसून ते राजे, इतकेंच नव्हे तर सम्राट् होते. राजा म्हटल्याबरोबर 'राज्य-रक्षण' हा त्याचा मुख्य धर्म असतो. व्यक्तिजीवनांतील इतर सारे धर्म त्या मुख्य धर्माच्या मानानें गौण ठरतात. आदर्श राजर्षीनें कसें वागावें याचें वर्णन करीत असतां प्रख्यात भारतीय राजनीति-शास्त्रज्ञ कौटिल्य आपल्या अर्थशास्त्रांत असें म्हणतो कीं,–

"अधर्मसंयुक्तं अनर्थसंयुक्तं च व्यवहारं वर्जयेत्।" येथील 'च' हा चकार फार महत्त्वाचा आहे. आदर्श राजर्षीनें अधर्मानें युक्त असा व्यवहार करूं नये हें जसें खरें, त्याचप्रमाणें त्यानें अनर्थ-युक्त व्यवहारही करूं नये. अनर्थयुक्त व्यवहार म्हणजे ज्या व्यवहारानें स्वतःच्या राज्याला धोका उत्पन्न होईल अशी कोणतीही गोष्ट होय. जशी अधर्माची गोष्ट वाईट, तशी व इतकीच राज्याला धोका उत्पन्न करणारी गोष्टही वाईट आहे. हें तोलून शब्द लिहि-णाऱ्या कौटिल्यानें दोन्ही शब्दांचें सामानाधिकरण्य दाखवून स्पष्ट केलें आहे. युधिष्ठिरानें कौरवांशीं केलेला द्यूताचा व्यवहार अधर्म-संयुक्त होता कीं नव्हता यावर केवढेंही वादाचें रण माजवितां येत असलें तरी तो व्यवहार अनर्थसंयुक्त व राज्याला धोका उत्पन्न करणारा होता याविषयीं कोणाचाही मतभेद असूं शकणार नाहीं. असा अनर्थसंयुक्त व्यवहार करण्यांत दक्ष राजर्षीप्रमाणें वर्तन न घडल्याचा दोष युधिष्ठिरांच्या हातून निश्चितपणें झालेला आहे.

त्यांनीं अनर्थसंयुक्त व्यवहार केला याचाच अर्थ ते श्रीकृष्ण व व्यास यांच्या म्हणण्याप्रमाणें 'अप्रमत्त' व 'दान्त' राहिले नाहींत. श्रीकृष्ण द्वारकेंत गेल्यावर मत्सराग्नीनें पेट घेतलेल्या दुर्योधनानें युधिष्ठिरांना द्यूतासाठीं आव्हान दिलें. त्यांतील धोका माहीत असूनही युधिष्ठिर तेथें गेले आणि दुर्दैवानें जरासंधासारख्या प्रबल सम्राटाला आपल्या अपूर्व मंत्रयुद्धानें ठार मारून, राजसंघ फोडून, एकेकाला जिंकून, अपूर्व साहस व पराक्रम यांच्या योगानें भगवान् श्रीकृष्णांनी जें धर्मसाम्राज्य उत्पन्न केलें होतें तें केवळ द्यूताच्या रत्नमय फाशांच्या भरंवशावर गांधारराज शकुनीनें क्षणार्धात नष्ट केलें! इतकेंच नव्हे तर त्या राज्याच्या महान् साम्राज्ञीची वस्त्र फेडून अप्रतिष्ठा करण्याचाही प्रसंग त्यानें आणला. ज्या वेळी भगवान् श्रीकृष्णांना प्रयासानें उभारलेलें हें धर्मसाम्राज्य चुटकीसरसें नाहीसें झाल्याची वार्ता कळली त्या वेळीं तेही आश्चर्यचकित झाले. जर श्रीकृष्णांना ही वार्ता आधी कळती तर त्यांनीं आपलें अपूर्व शक्तिसामर्थ्य खर्च करून काय वाटेल तें झालें असतें तरी युधिष्ठिरांचें हें साम्राज्य कधींही नाहीसें होऊं दिलें नसतें. तशी त्यांच्या मनाची पूर्णपणें सिद्धता होती. ज्या दिवशीं हें वृत्त त्यांना कळलें त्या दिवशीं त्यांना अतिशय दुःख झालें. त्वरित गतीनें वनांत येऊन त्यांनीं युधिष्ठिराची भेट घेतली. चुटकीसरसें हें साम्राज्य नष्ट झाल्याचें पहातांच अत्यंत दुःखी अंतःकरणानें पंचाल देशांतील लोकही युधिष्ठिरांच्या भेटीस्तव वनांत आले असतां श्रीकृष्ण त्या सर्वां-समक्ष विषण्ण अंतःकरणानें युधिष्ठिराला म्हणाले :—

**नैतत्कृच्छ्रमनुप्राप्तो भवान् स्याद्वसुधाधिप ।**
**यद्यहं द्वारकायां स्यां राजन् संनिहितः पुरा ।। १**
**आगच्छेयमहं द्यूतमनाहूतोऽपि कौरवैः ।**
**आम्बिकेयेन दुर्धर्ष राज्ञा दुर्योधनेन च ।। २**
**वारयेयमहं द्यूतं बहून् दोषान् प्रदर्शयन् ।**
**भीष्मद्रोणौ समानाय्य कृपं बाल्हीकमेव च ।। ३**
**वैचित्रवीर्यं राजानमलं द्यूतेन कौरव ।**
**पुत्राणां तव राजेन्द्र त्वन्निमित्तमिति प्रभो ।। ४**

तत्राचक्षमहं दोषान्यैर्भवान्व्यतिरोपितः ।
वीरसेनसुतो यैस्तु राज्यात्प्रभ्रंशितः पुरा ॥ ५
अतर्कितविनाशश्च देवनेन विशांपते ।
सातत्यं च प्रसंगस्य वर्णयेयं यथातथम् ॥ ६
स्त्रियोऽक्षा मृगया पानमेतत्कामसमुत्थितम् ।
दुःखं चतुष्टयं प्रोक्तं यैर्नरो भ्रश्यते श्रियः ॥ ७
तत्र सर्वत्र वक्तव्यं मन्यन्ते शास्त्रकोविदाः ।
विशेषतश्च वक्तव्यं द्यूते पश्यन्ति तद्विदः ॥ ८
एकाह्राद्द्रव्यनाशोऽत्र ध्रुवं व्यसनमेव च ।
अभुक्तनाशश्चार्थानां वाक्पारुष्यं च केवलम् ॥ ९
एतच्चान्यच्च कौरव्य प्रसंगिकटुकोदयम् ।
द्यूते ब्रूयां महाबाहो समासाद्याम्बिकासुतम् ॥ १०
एवमुक्तो यदि मया गृह्णीयाद्वचनं मम ।
अनामयं स्याद्धर्मश्च कुरूणां कुरुवर्धन ॥ ११
न चेत्स मम राजेन्द्र गृह्णीयान्मधुरं वचः ।
पथ्यं च भरतश्रेष्ठ निगृह्णीयां बलेन तम् ॥ १२
अथैनमपनीतेन सुहृदो नाम दुर्हृदः ।
सभासदोनुवर्तेरंस्तांश्च हन्यां दुरोदरान् ॥ १३
असान्निध्यं तु कौरव्य ममानर्तेष्वभूत्तदा ।
येनेदं व्यसनं प्राप्ता भवन्तो द्यूतकारितम् ॥ १४

—महाभारत वनपर्व अ. १३

"हे राजन्, तेव्हां मी द्वारकेंत असतों तरी सुद्धां कोणत्याही परिस्थितींत तुझ्यावर हा प्रसंग येऊं दिला नसता. कौरवांनीं मला द्यूताच्या वेळीं बोलाविलें नसतें तरी सुद्धां मी त्यांच्या त्या द्यूतसभेंत गेलों असतों. राजा धृतराष्ट्र व दुर्योधन यांना द्यूतांतील नानाविध दोष सांगून मी हें द्यूत घडूंच दिलें नसतें. त्या दोघांनीं ऐकलें नसतें तर भीष्म, द्रोण, कृपाचार्य, बाल्हीक या सर्व मान्यवंतांना बरोबर घेऊन त्यांच्यासहित मी धृतराष्ट्राची भेट घेतली असती व द्यूतापासून होणारे अनर्थ त्यांच्या गळीं उतरविले असते. मजासारख्या विख्यात

राजाचा केवळ द्यूताच्या नादानें कल्पनेंतही येणार नाही इतका विनाश कसा झाला, त्याचें राज्य कसें गेलें, स्त्रिया, द्यूत, मृगया व मद्यपान हीं ऐश्वर्यशाली राजालाही पदभ्रष्ट करणारीं भयंकर व्यसनें कशीं आहेत, व त्यांच्या नादीं लागणें कसें अयोग्य आहे, शास्त्र व व्यवहार या दोन्ही दृष्टींनीं शहाण्या माणसानें द्यूताच्या नादीं लागणें कसें चुकीचें आहे, एका दिवसांत कष्टानें मिळविलेल्या महान् ऐश्वर्याचा द्यूतानें नाश कसा होतो, सदाचें भयंकर संकटांत कसें सांपडावें लागतें, व केवळ कठोर वाक्ताडन आणि उग्र वैर याविना पदरांत दुसरें कसें कांहीच पडू शकत नाहीं हें सर्व मी त्याला सांगून द्यूत थांबविलें असतें. आवश्यकतेनुरूप मी मधुरही बोललों असतों व कठोरही बोललों असतों. धृतराष्ट्रानें माझें जर ऐकलें असतें तर सर्व अनर्थ टळला असता. आणि जर त्यानें माझें ऐकलें नसतें तर, हे राजा, मी माझ्या सामर्थ्यानें त्या दुष्टांना पकडून बंधनांत ठेवलें असतें व बळानें तें द्यूत थांबविलें असतें. जर त्या वेळीं कोणीही अडथळा करावयास पुढें सरसावलें असतें तर त्यांना आणि द्यूतकारांना अधार्मिक म्हणून मी तेथल्या तेथेंच ठार मारलें असतें. पण दुर्दैवानें मी तुमच्या येथें तर नव्हतोंच पण द्वारकेंतही नव्हतों. आणि त्यामुळेंच ही आपत्ति तुमच्यावर येऊन कोसळलेली आहे. मी द्वारकेंत परत आल्यावर झालेलें सर्व वृत्त मला सात्यकीनें सांगितलें. तें ऐकून अत्यंत उद्विग्न चित्तानें तुझी भेट घेण्यासाठीं मी तात्काळ येथें निघून आलों." पण श्रीकृष्ण तरी द्वारकेंत नसतां असे दुसरीकडे कोठें अडकले होते कीं ज्यामुळें ते या महत्त्वाच्या प्रसंगीं युधिष्ठिराच्या पाठीशीं उभे राहूं शकले नाहींत? तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

---

# धर्मराज्यावरील संकट

चेदिराज शिशुपालाच्या वधानंतर दबलेली पण धुमसत असलेली जी आंतील संतापाची आग श्रीकृष्ण व इतर तत्कालीन ज्ञात्यांना दृष्टिगोचर होत होती व जिच्या सबंधींचा इषारा युधिष्ठिरांना व्यास व श्रीकृष्णांनी दिला होता, तिची झळ प्रत्यक्ष श्रीकृष्णांना राजसूय यज्ञानंतर तात्काळ लागली. स्वत: श्रीकृष्णांनींच तिचें वर्णन केलेलें आहे. यादवांच्यापैकीच मार्तिकावत भोज या नांवाची एक शाखा असून भगवान् श्रीकृष्णांच्या काळी त्या शाखेचा शाल्व नांवाचा एक पराक्रमी पुरुष प्रमुख होता. त्याचें राज्य हल्लीं सौराष्ट्रांत असलेल्या सालम नांवाच्या बंदराजवळ असे. त्याचें एक विख्यात वाहन असे. तें विमान असावें कीं जलयान असावें याबद्दल संशय आहे. पण तें जलयानच असलें पाहिजे असें दिसतें. इच्छेप्रमाणें जलयान हवें तिकडे नेतां येतें म्हणून शाल्वाच्या वाहनाला 'कामग' असें म्हणत. त्या त्याच्या जलयानाचें नांव सौभ होतें. हा सौभपति शाल्व श्रीकृष्णांप्रमाणेंच शिशुपालाचा नातलग असून तो जरासंधाचा मित्र व श्रीकृष्णांचा वैरी होता. राजसूय यज्ञाहून श्रीकृष्ण द्वारकेला परत जाऊन पोंचण्याच्या आधींच शिशुपालाच्या वधाची वार्ता ऐकून त्यानें द्वारकेवर चढाई केली व पुढें राजसूयाहून परत आल्यावर श्रीकृष्णांना शाल्वानें केलेली द्वारकेची नासधूस पाहून अतिशय संताप आला. त्यांनीं शाल्वाच्या प्रदेशांत जाऊन स्वारी केली व २९ दिवसांच्या भीषण आणि मायिक युद्धांत शेवटीं शाल्वाला ठार मारलें. या अडचणींत श्रीकृष्ण स्वत:च गुंतलेले असल्यामुळें त्यांना युधिष्ठिराच्या द्यूताची वार्ता कळणें अशक्य होऊन बसलें. श्रीकृष्णांनीं स्वत:च या संकटाचें वर्णन पुढीलप्रमाणें (महाभारत वनपर्व अ. १४, २१ व २२) केलें आहे:—

"हे युधिष्ठिरा, मी शाल्वाच्या नगरींत त्याला ठार मारण्याकरितां गेलों होतों. तुला हें माहीतच आहे कीं तो महातेजस्वी, पराक्रमी

---

व्याख्यान १७ वें, दि. १५–४–५२

दमघोषपुत्र शिशुपाल मूर्खासारखा संतापाच्या भरांत हवें तें बोलूं लागल्यामुळें मी त्याला तुमच्या राजसूय यज्ञांत ठार मारलें. तें ऐकून अत्यंत रागावून मी तिकडे असतांना असुरक्षित द्वारकेवर सौभपति शाल्वानें जोराची चढाई केली. आमची सगळीच मंडळी तुमच्या येथें होती. तरी तेथें असलेल्या राजपुत्रांनी त्याच्याशीं जोराचें युद्ध केलें. त्यानें आमच्यापैकीं पुष्कळ लोकांचा वध केला व आगी वगैरे लावून द्वारकेची उपवनशोभा पार जाळून टाकली. तो वारंवार आमच्या लोकांचा अधिक्षेप करून त्यांना म्हणू लागला की, 'तो वृष्णिकुलाधम वसुदेवपुत्र मूर्ख श्रीकृष्ण कोठें आहे? त्याला युद्धाची फार खुमखुमी आहे, त्याचा युद्धदर्प मी हरण करणार आहें. हे यादवहो, तो कोठें आहे तें मला तुम्ही सांगा. मी तेथें जाऊन त्याला ठार मारीन. 'कंस व केशी यांना ठार मारल्यामुळें त्याला मोठा गर्व झालेला आहे. पण मी शस्त्रांची शपथ घेऊन सांगतों कीं त्याला ठार मारल्यावांचून मी रणांगणांतून परतणार नाही. तो पापी, क्षुद्र मनोवृत्तीचा, व महान् विश्वासघातकी आहे. शिशुपालाला त्यानें क्रूरपणानें असावध अवस्थेंत ठार मारलें. तो आपला भाऊ आहे, रणक्षेत्रावर नाहीं, भान विसरलेला आहे, इत्यादि गोष्टींचा सुद्धां त्यानें कांहीएक विचार केला नाहीं. बोला, सांगा कुठें आहे तो! मला त्याच्या रक्ताची तहान लागली आहे.' याप्रमाणें वारंवार तो बोलत होता, आव्हान देत होता व गर्जना करीत होता. पण मी स्वतः तेथें नसल्यामुळें त्याच्या त्या साऱ्या गर्जनांचा तसा कांहींच उपयोग नव्हता. द्वारकेंत परत आल्यावर मला हें सगळें वृत्त कळलें. द्वारकेची उद्ध्वस्तता, त्याचा दिसलेला गर्व, आमचा त्यानें केलेला भयंकर अपमान, विनाकारण माझा केलेला अधिक्षेप व त्याच्या अत्याचारांनीं आमच्या लोकांचा उडालेला थरकांप पाहून मी शाल्वाला ठार मारण्याचा कृतनिश्चय केला व त्याच्या प्रदेशावर ससैन्य स्वारी केली. रणांगणांत पाञ्चजन्य शंख फुंकून मी त्याला युद्धाचें आव्हान दिलें. त्यानेंही माझें आव्हान स्वीकारलें. आम्हां दोघांचें भयंकर युद्ध झालें. शाल्व हा कपटानें

युद्ध करणारा होता. त्याच्याजवळ विलक्षण स्वरूपाच्या मायिक हालचाली करण्याचें सामर्थ्य होतें. त्याच्या त्या सामर्थ्याचा मला त्या युद्धांत प्रत्यय आला. युद्ध चालू असतांना द्वारकेंतील कोणी एक मनुष्य माझ्याकडे आला व रथांत चढून मला म्हणाला, मी उग्रसेनाकडून आलों असून त्याचाच परिचारक आहे. बोलत असतां तो अतिशय विषण्ण झाला होता, व त्याचा कंठ दुःखावेगानें भरून आला होता. त्यानें मला सांगितलें कीं, उग्रसेनांनीं मला बुद्धया आपणांकडे पाठविलें आहे. आपण युद्धांत गुंतले असतां शाल्वानें द्वारकेंत शिरून आपल्या पित्याला ठार मारलें आहे. द्वारकेवर हें मोठें संकट येऊन कोसळलें असल्यामुळें आतां युद्ध करण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. आपण युद्ध थांबवून द्वारकेकडेच या व संकटांत सांपडलेल्या द्वारकेचें संरक्षण करा. हें ऐकतांच मला अतिशय दुःख झालें व काय करावें आणि काय करूं नये हें कांहींच समजेना. मला असें वाटू लागलें कीं ज्या वेळीं मी द्वारका सोडून शाल्वाकडे यावयास निघालों त्या वेळीं बलराम, प्रद्युम्न, सात्यकि, चारुदेष्ण, सांब, इत्यादि योद्धयांवर द्वारका व वसुदेव यांच्या संरक्षणाचा भार सोपवूनच मी निघालों होतों. शाल्वानें त्या सर्वांना ठार मारलें कीं काय ? व हें शक्य असेल काय? या सर्वांच्या विनाशाची कल्पना माझ्या मनांत पुन्हां पुन्हां यावी व दुःखाचे वारंवार उमाळे यावे. तरीही मी तें युद्ध तसेंच चालविलें. इतक्यांत शाल्वाच्या वाहनांत वसुदेव दिसूं लागले. त्यानें माझ्यासमोरच जिवंत स्थितींत वसुदेवांना वरून खालीं ढकलून दिलें. क्षीणपुण्य ययातीचें स्वर्गातून पडतांनाचें रूप असावें तसें वसुदेवांचें स्वरूप त्या वेळीं दिसत होतें. तें पाहून मला भोंवळ येऊं लागली. त्यांचें शिरस्त्राण खालीं गळलें होतें. केस अस्ताव्यस्त उडत होते व एखाद्या निस्तेज ग्रहाप्रमाणें ते दिसत होते. मी इतका थरकांपलों कीं कधीं नाहीं तें त्या दिवशीं माझ्या हातांतून शार्ङ्गधनुष्य खालीं गळून पडलें व डोळ्यासमोर अंधारी येऊन ध्वजस्तंभाला डोकें टेकून प्रेताप्रमाणें निश्चल अवस्थेंत मी पडलों. माझ्या पित्याचे हातपाय पसरून तें पडणें मेलेल्या पक्षासारखें वाटत होतें व वरून खालीं कोसळणाऱ्या त्यांच्या

शरीरावर खालून तीक्ष्णशस्त्रांचा मारा करीत असलेले शाल्वाचे सैनिक माझें अंतःकरण थरकांपवीत होते. त्या भयंकर दृश्यानें मुहूर्तभर मी मूर्च्छित झालों. त्यानंतर समोर पाहिलें तो शत्रु शाल्व व त्याचें वाहन तर दिसेचना, पण माझ्या वृद्ध पित्याचें शरीरही कोठें दिसेना. बराच विचार केल्यावर ती सारी कपटमाया आहे हें माझ्या ध्यानांत आलें व मी सर्व सामर्थ्यानिशीं पुनश्च युद्धास प्रारंभ केला. हातांत मी कालशक्तीचा मूर्तिमंत अवतार असलेलें सुदर्शन चक्र घेतलें व त्याच्या आघातानें शाल्वाचें वाहन समुद्रांत तुकडे तुकडे करून बुडवून टाकलें. पुन्हां मी चक्राचा आघात करून शाल्वाचेही दोन तुकडे केले. शाल्व मारल्यावर त्याच्या सैन्याची धूळदाण उडवावयास कितीसा वेळ लागणार? या भयंकर युद्धांत गुंतल्यामुळें मला द्यूताच्या वेळीं हस्तिनापुरास येतां आलें नाहीं. जर मी येऊं शकलों असतों तर एक तर द्यूत झालें तरी नसतें किंवा दुर्योधनाला तरी मरावें लागलें असतें. पण आतां मी काय करणार? बांध फुटल्यावर वाहून गेलेल्या पाण्याला कोण कसा अडविणार?"

तात्पर्य, राज्यव्यवहार राजनीतीच्या अनुसारच झाले पाहिजेत. ते तसें न केल्यामुळें निर्माण केलेलें धर्मसाम्राज्यही फाशांच्या एकाच डावांत पार नष्ट झालें. जर श्रीकृष्णांची द्यूताच्या वेळी जाऊन दुर्योधनाला ठार मारण्याची सिद्धता होती तर त्यांनीं पांडव वनवासांत असतांनाच दुर्योधनावर चालून जाऊन त्यांचें राज्य त्यांना कां परत मिळवून दिलें नाहीं असा प्रश्न उत्पन्न होईल. पण त्याचें उत्तर स्वतः श्रीकृष्णांनींच दिलेलें आहे. पांडवांच्या वनवासांत श्रीकृष्णांच्या व त्यांच्या भेटी दोनदां झालेल्या आहेत. त्यापैकीं दुसऱ्या भेटीच्या वेळीं सात्यकीनें आपण ससैन्य कौरवांवर हल्ला चढवून अभिमन्यूला राजा म्हणून नियुक्त करावें व हवें तर युधिष्ठिरानें सत्यधर्माचें परिपालन म्हणून आपला वनवास संपवून नंतर पुनश्च येऊन राज्यपद ग्रहण करावें असें सुचविलें. श्रीकृष्णांनीं त्यावर असें उत्तर दिलें (वनपर्व अ. १२०-२३ व २४) कीं:-

"हे सात्यकि, तुझें म्हणणें खरें आहे व आम्ही तें प्रत्यक्षांत आणलेंही असतें. पण युधिष्ठिर हा क्षत्रियश्रेष्ठ असल्यामुळें स्वतःच्या

बाहुबलाच्या भरंवशावर तो जी भूमि जिंकणार नाहीं तिचा तो कधींही स्वीकार करणार नाहीं. केवळ दुसऱ्याच्या भरंवशावर तो राज्य कधीं पत्करावयाचा नाहीं. लहर, भय, लोभ, यांपैकीं कोणत्याही मनोविकाराच्या अधीन होऊन युधिष्ठिर आपला धर्म कधींच सोडणार नाही." अशा स्थितीत सत्यधर्माच्या परिपालना-साठीं वनवास संपेपर्यंत युधिष्ठिरांना हालचाल करणें शक्य नव्हतें व त्यांच्यासाठीं दुसऱ्या कोणी हालचाल करणें त्यांना मान्य होण्यासारखें नव्हतें. म्हणून 'सिद्धस्य गतिः चिन्तनीया' या न्यायानें त्यांनीं वनवास संपेपर्यंत वाट पहाणेंच आवश्यक होतें. वनवास संपतांच श्रीकृष्णांनी मोडलेली घडी पुन्हां त्वरित गतीनें जुळवा-वयास व युधिष्ठिराची धर्मसत्ता प्रस्थापित करावयाच्या खटपटीस प्रारभ केला. अभिमन्यूच्या विवाहाच्या निमित्तानें सर्व राजे लोक पांडवांचा वनवास संपतांच विराटाच्या राजधानींत एकत्र आले होते. (विराटाचा मत्स्यदेश म्हणजे हल्लीचें भरतपूर, नाभा, अलवार, इत्यादि ठिकाणें असलेला प्रदेश होय. अभिमन्यूचें लग्न तेथेंच झालें.) त्या सर्व राजे लोकांसमक्ष श्रीकृष्णांनीं भावी हाल-चालींचा प्रस्ताव मांडला व असें भाषण केलें कीं, ज्यामुळें पांडवांची न्याय्य बाजू व कौरवांचे अन्याय उपस्थित सर्व लोकांच्या मनावर ठसून शिवाय पांडव दिसावयास अल्पसंख्येंत असले तरी त्यांचें सामर्थ्य अत्यंत प्रचंड असून युद्धांत त्यांनाच जय प्राप्त होण्याची शक्यता आहे हें उपस्थित लोकांच्या अंतःकरणावर ठसावें व त्या राजांचें सौहृद्य न्याय्य व बलिष्ठ बाजू म्हणून आपल्याच पक्षाला सहजपणें मिळणें शक्य व्हावें. महाभारताच्या सर्व पर्वांत उद्योगपर्व अत्यंत श्रेष्ठ समजलें जात असून 'भारते सारमुद्योगम्' अशी म्हणच रूढ झालेली आहे. वास्तविक गीता भीष्मपर्वांत असल्यामुळें व ती सर्वश्रेष्ठ असल्यामुळें ती ज्या पर्वांत असेल त्यालाच सर्वश्रेष्ठ समजलें पाहिजे. पण महाभारत हा सांस्कृतिक इतिहास असून त्यांतील प्रतिपाद्यविषय मुख्यतः राजकीय स्वरूपाची क्रांति हाच असल्यामुळें व असल्या प्रकारच्या क्रांतिमय संघर्षांत स्वाभाविकपणेंच मंत्रयुद्धाचें अथवा कारस्थानाच्या युद्धाचें महत्त्व सर्वांत अधिक असल्यामुळें व

श्रीकृष्णांचें अत्यंत यशस्वी व देदीप्यमान मंत्रयुद्ध उद्योगपर्वाच्या प्रकरणांतच दृष्टीस पडत असल्यामुळें त्याला महाभारताच्या इतिहासांत सर्वांत अधिक महत्त्व आहे. श्रीकृष्णांच्या या मंत्रयुद्धाचा प्रारंभ उद्योगपर्वाच्या प्रथमाध्यायापासूनच होतो. उपस्थित राजे लोकांसमोर पांडवांची बाजू मांडतांनाच श्रीकृष्णांनीं ती किती कौशल्यानें मांडली आहे हें वर उल्लेखिलेंच आहे. राजकीय हालचालींसंबंधींचें श्रीकृष्णांचें हें पहिलेंच महत्त्वाचें भाषण असून तें अगदीं प्रथमाध्यायांतच आहे. उपस्थित राजांना श्रीकृष्ण म्हणतात (उद्योगपर्व अ. १–१० ते २५ ) :–

"“आपणां सर्वांस हें माहीतच आहे कीं, गांधार शकुनीनें या युधिष्ठिराला कपटद्यूतांत जिंकून लबाडीनें त्याचें राज्य बळकाविलें इतकेंच नव्हे तर त्यास देशोधडीला लावून वनांतही पाठवून दिलें. वस्तुत: लबाडीनें घेतलेलें आपलें राज्य पांडव स्वत:च्या पराक्रमाच्या भरंवशावर सहज संपादन करूं शकत होते. पण सत्य ही त्यांची जीवननिष्ठा असल्यामुळें कौरव कसेही वंचकतेनें वागले असले तरी आपण मात्र एकदां उच्चारलेला शब्द खरा करावयाचाच या निश्चयानें ते तेरा वर्षे वनवासाचें दु:ख सहन करीत राहिले. त्यांनीं बारा वर्षे कष्टाचा वनवास केला व मानी माणसाला अधिकच दु:खप्रद वाटणारा लाजिरवाणा अज्ञातवासही एक वर्षपर्यंत केला. आतां वस्तुत: त्यांचें राज्य त्यांना परत मिळावयास पाहिजे. दुर्योधन कितीही दुष्ट असला व पांडव कितीही सज्जन असले तरी आपण उभय पक्षांचे संबंधी असल्यामुळें पांडव व दुर्योधन या दोन्ही पक्षांचा विनाश न होऊं देतां जें धर्मशास्त्राला संमत, योग्य व अंतीं यशस्वी होण्यासारखें असेल तेंच केलें पाहिजे. सर्वांत भाग्याची गोष्ट ही आहे कीं, युधिष्ठिर धर्मराज हा अधर्मानें मिळणाऱ्या कोणत्याही गोष्टीची कधींच अभिलाषा करणार नाहीं. देवेंद्राचेंही राज्य अधर्मानें मिळत असेल तर तें युधिष्ठिराला नको आहे व धर्मानें वागून एखादा छोटासा गांवच पदरांत पडत असला तरी तेवढ्यावरच संतुष्ट राहण्याची युधिष्ठिरांच्या अंत:करणाची सिद्धता आहे. पांडवांचें वंशपरंपरागत चालत आलेलें असें पित्याचें

राज्य लबाडीनें धृतराष्ट्रपुत्रांनीं कसें गिळंकृत केलें व त्यांना केवढ्या भीषण संकटाच्या खाईत लोटलें या गोष्टीची आपणां सर्वांस यथावत् कल्पना आहे. रणांगणांत युद्ध करून कौरवांनीं पांडवांना जिकलें असतें तर क्षत्रिय म्हणून त्यांचें कांहीं तरी समर्थन करतां आलें असतें. पण तसें कांहींच घडलेलें नाहीं. केवळ कपट-द्यूतानें जिकणें ही गोष्ट खऱ्या क्षत्रियाला त्याच्या पराक्रमाच्या दृष्टीनें लाजिरवाणी ठरल्यावांचून राहात नाही. तरीही दयाशील युधिष्ठिर आपल्या त्या वंचक नातलगांचेंही कल्याण व्हावें अशीच इच्छा करीत आहे. यावरून त्याच्या अंतःकरणाचा थोरपणाच व्यक्त होत नाहीं काय? सारेंच राज्य त्यांचें असूनही वंशपरंपरागत पित्याच्या राज्यावर युधिष्ठिर पाणी सोडावयासही सिद्ध आहे. पण निदान पांडवांनीं जें स्वतःच्याच पराक्रमानें संपादन केलें तें त्यांचें त्यांना परत मिळावें एवढी त्यांची इच्छा आहे व ती इच्छा अयोग्य आहे असें कोण म्हणू शकेल ? साऱ्या अटी त्यांनीं पूर्ण केल्या असल्यामुळें वस्तुतः कौरवांनीच आपण होऊन त्यांच्याशीं बोलावयास येणें आवश्यक होतें. पण राज्यलोभानें प्रेरित होऊन हवीं तशीं अनन्वित कृत्यें त्यासाठीं करावयास ज्यांना अणुमात्रही दिक्कत वाटू नये अशाच हीन प्रवृत्तीचे कौरव आहेत. लहान-पणापासून हव्यातशा भीषण उपायांनीं पांडवांना ठार मारण्याचे सर्व प्रकारचे प्रयत्न कौरवांनीं केले. तें सर्व कांहीं आपणां सर्वांस पूर्णपणें माहीतच असल्यामुळें पुन्हां मी त्यांचा उल्लेख करण्याचें कारण नाहीं. माणुसकीची हत्या करणारा कौरवांचा लोभीपणा, युधिष्ठिरांची आत्यंतिक धर्मनिष्ठा, व कौरव आणि पांडव या दोघांच्याशीं असणारे आपले संबंध या सर्वांचा नीट विचार करून आपण या संबंधांत कसें वागावें हें ठरवावें. पांडव अत्यंत सत्यनिष्ठ असल्यामुळें केलेल्या प्रतिज्ञेच्या अनुरूप त्यांनीं वनवास भोगलेला आहे. प्रतिपक्षानेंही त्यांच्याशीं याच सत्यनिष्ठेनें वागून आतां त्यांचें राज्य त्यांना परत करावें अशी त्यांची स्वाभाविकपणेंच इच्छा आहे. अशा स्थितींत जर ते तसें न वागले तर न्यायनिष्ठुर व शूर पांडव धृतराष्ट्राच्या सर्व पुत्रांना ठार मारल्याविना राहणार

नाहींत. युद्ध प्रारंभ झालें तर अन्यायी कौरवांचा निःपात करावा म्हणून पांडवांवर प्रेम करणारे आणि न्यायाविषयीं अंतःकरणांत प्रेम असलेले त्यांचे सर्व संबंधी व मित्र, होणाऱ्या युद्धांत पांडवांचे सहायक म्हणून भाग घेतील. कोणाची अशी कल्पना असेल कीं, पांडव थोडे आहेत व त्यामुळें कौरवांवर विजय संपादन करणें त्यांना अशक्य होऊन बसेल; पण त्यांचे सारे नातलग व मित्र त्यांना युद्धांत प्राणपणानें साहाय्य करतील व अशा साहाय्यासहित पांडव युद्धांत उभे ठाकले तर कोणत्याही अर्थानें ते मुळींच कमी भरणार नाहींत. शिवाय दुसरी महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, दुर्योधनाचें काय म्हणणें आहे हें अजून तरी आपणांस कळलेलें नाहीं. त्यामुळें तें कळून घेण्याचीही अत्यंत आवश्यकता आहे. मला असें वाटतें कीं, येथून कोणीतरी अत्यंत धर्मशील, पवित्र, कुलीन व अत्यंत सावध असलेला दूत कौरवांकडे पाठवावा व त्यानें शांततेच्या प्रस्थापनेसाठीं आणि युधिष्ठिराला त्याचें राज्य परत मिळावें म्हणून प्रयत्न करावा."

भगवान् श्रीकृष्णांचें हें भाषण उद्योगपर्वांत त्यांनीं केलेल्या मंत्रयुद्धाच्या हालचालींच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. तेरा वर्षे सत्ता दृढमूल झालेले व ती सत्ता संपादन करण्यासाठीं हवे ते अनीतिकारक प्रयोग करावयास मुळीच दिक्कत वाटत नसलेले लोक प्रतिपक्षी म्हणून त्यांच्यासमोर आहेत, आणि त्यांच्याशीं युद्ध करण्याचा प्रसंग येणार ही गोष्ट ठरल्यासारखीच आहे. ज्यांच्याशीं युद्ध करावयाचें त्यांनीं तेरा वर्षांत आपले संबंध इतके दृढमूल केलेले असणार की, त्यामुळें व इतरही अनेक कारणांनी विद्यमान राजसत्तांचें साहाय्य त्याच लोकांना होणार ही गोष्ट स्पष्ट आहे. अशा स्थितींत तेरा वर्षे समाजाच्या दृष्टिपथांतून बाजूला असलेल्या लोकांना तितकें साहाय्य एकदम मिळणें अर्थातच कठिण जाणार होतें. द्यूतानंतर तात्काळ श्रीकृष्णांच्या साहाय्यानें पांडवांनीं उठावणी केली असती तर ती गोष्ट जितकी सोपी गेली असती तितकी ती त्यांना आतां जाणारी नव्हती. त्या वेळीं भारतांतील सर्व राजसत्तांचें निदान बहुतांश राजसत्तांचें तरी पांडवांना साहाय्य

झालेंच असतें. त्यांच्यावर झालेल्या प्रखर अन्यायाची जाणीव प्रजाजनांच्याही अंतःकरणांत ताजी असल्यामुळें कौरवांचा निःपात करणें त्या वेळीं सोपें होतें. तेव्हां सहायक व सैन्यबळ या दृष्टीनें पांडवांची बाजू अधिक सबळ होती. ते न्यायी असून कौरव अन्यायी आहेत ही सर्वांच्या अंतःकरणांतील जाणीव ताजी होती. पण आतां तेरा वर्षांचा काळ लोटून गेल्यामुळें सामाजिक मनोवृत्तींतून जुन्या अन्यायाच्या जाणिवा पुसट होत चालल्या होत्या. दुर्योधनानें अनेकांना आपल्या बाजूला युक्तीनें वळवून घेतलें होतें. इतकेंच नव्हें तर समाजांत या लोकांच्या पूर्वी वेगळ्या असलेल्या मनोवृत्तींत आतां याच प्रश्नासंबंधीं त्याहून अगदींच वेगळ्या स्वरूपाच्या भावना नांदत होत्या. याचें एक उदाहरण म्हणजे श्रीकृष्णांचे बंधु बलराम यांचेंच आहे.

प्रभासक्षेत्रांत आपल्या वनवासाच्या काळांत तीर्थयात्रा करीत पांडव आले असतांना बलराम त्यांच्यासंबंधी श्रीकृष्णाजवळ काय बोलतात हें पहाण्यासारखें आहे. महाभारतकार म्हणतात (वनपर्व अ. ११९–४, ९, २२) :–

"नंतर अत्यंत शुभ्र वर्णाचे बलराम श्रीकृष्णांना म्हणाले, 'हे कृष्णा, मनुष्यानें धर्मप्रमाणें आचरण केलें तर त्याचें कल्याण होतें व तो अधर्मानें वागला तर त्याचें अकल्याण होतें असें प्रत्यक्षांतही कधीं दिसत नाहीं. युधिष्ठिरासारख्या महात्म्यांनीं जटा धारण करून, अरण्यांत राहून, वल्कलें नेसून दुःख भोगावें याचा दुसरा काय अर्थ समजावयाचा? त्या अधार्मिक दुष्ट दुर्योधनाला मात्र राज्यसिंहासन उपभोगावयास मिळावें यावरून धर्मापेक्षां अधर्म श्रेष्ठ आहे असें जर सामान्य मनुष्य म्हणू लागला तर त्याला दोष देतां येईल असें मला वाटत नाहीं. या दुर्योधनाचें पाप एवढें मोठें आहे कीं, पृथ्वी त्याला गिळून कां टाकीत नाहीं, व जगू कशी देते हेंच मला समजत नाहीं. भीष्म, कृपाचार्य, द्रोण व तो वृद्ध राजा धृतराष्ट्र हे पांडवांना वनवासांत घालवून सुखानें कसे नांदू शकतात याचेंच मला आश्चर्य वाटतें. भरत कुळांतील श्रेष्ठ म्हणून समजण्यांत येणाऱ्या या सर्व पापी वृद्धांचा धिक्कार असो. आपल्या

पत्नीसहित धर्मनिष्ठ युधिष्ठिर जिकला जावा व एकाहून एक पराक्रमी असलेल्या बंधूसहित त्यानें वनांत नांदावें व दुर्योधनानें मात्र वैभवश्रीनें तळपून उठावें अशी घोर गोष्ट होत असतांना पर्वतांसहित पृथ्वी विदीर्ण कशी होत नाहीं ?" बलरामांच्या या उद्‌गारांवरून पांडव वनवासांत गेले त्या वेळीं त्यांच्या अंतःकरणांत कौरवांसंबंधीं कोणत्या भावना होत्या हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट होतें. त्यावर वेगळें भाष्य करण्याची आवश्यकता नाहीं. पण तेच बलराम वनवासाची तेरा वर्षे पूर्ण होतांबरोबर पांडवपक्षीयांच्या सभेंत जे उद्‌गार काढतात त्यांचा विचार केला तर मध्यंतरींच्या काळामुळें त्यांच्या मनोवृत्तींत केवढें स्थित्यंतर घडून आलें याची नीट कल्पना येते. ते म्हणतात (उद्योगपर्व अ. २–११ व १२) :–

"सभेंत जमलेल्या इतर सर्व लोकांना सोडून शकुनीसारख्या अत्यंत प्रबल व धूर्त द्यूतकाराशीं द्यूत खेळण्यासाठीं या युधिष्ठिरानेंच त्याला आव्हान दिलें. यानें शकुनीला आव्हान देऊन बोलविल्यावर त्यानें आपल्या कौशल्यानें युधिष्ठिराचा पराभव केला. खेळांत फांसे आपल्याला एकसारखे प्रतिकूल जात आहेत हें स्पष्टपणें दिसत असतांना सुद्धां यानेंच होऊन द्यूत पुढें चालविलें व त्यांत याला पराभूत व्हावें लागलें यांत शकुनीचा कांहींही अपराध नाहीं. अपराध युधिष्ठिराचाच असल्यामुळें आपल्या चुकीचें प्रायश्चित्त त्यानें भोगलें, त्यांत दुसऱ्यांना अकारण दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्यामुळें दुर्योधनाच्या सभेंत जाऊन धृतराष्ट्राला नम्रपणें वंदन करून सामोपचारानें व अत्यंत मधुर शब्दांनींच दुर्योधनाशीं जें काय बोलणें करावयाचें असेल तें केलें पाहिजे." वनपर्वातील व उद्योगपर्वांतील बलरामाच्या बोलण्यांत केवढा फरक पडला व केवढी परस्परविसंगति निर्माण झाली आहे ! ही विसंगति कोणी निर्माण केली? इतकेंच नव्हे तर दुर्योधनापासून भीष्मापर्यंत सर्वांनाच पापात्मे म्हणून संबोधून पृथ्वीनें त्यांना गिळावें अशी एकदां इच्छा करणाऱ्या बलरामांनाच पांडवपक्षपाती असल्याबद्दल कृष्णांना यावेळीं दूषण द्यावेंसें व स्वतःच्या मनांत दुर्योधनाला साहाय्य करावें असें आहे असेंही उघडपणें बोलावेंसें वाटलें यांतील मर्म काय ? केवळ

कृष्णावर त्यांचें अतिरिक्त प्रेम होतें, म्हणूनच ते दुर्योधनाच्या बाजूनें युद्धांत पडले नाहींत. एरवीं ते दुर्योधनाच्याच बाजूनें युद्धास्तव उभे राहिले असते असें मानावयास जागा आहे. हा विलक्षण फरक कशामुळें घडून आला ? तेरा वर्षांचा दीर्घ कालावधि हेंच त्याचें खरें उत्तर आहे. या तेरा वर्षांत सामान्य मनोवृत्तीत पडलेला हा फ़रक ओळखून भगवान् श्रीकृष्णांनीं पांडवांची बाजू कशी न्याय्य आहे, कौरवांची कशी अन्याय्य आहे व दुर्बल पांडवपक्ष आपल्या साहाय्यामुळें कसा सबल होऊं शकतो या तीनहि गोष्टी जमलेल्या सर्व लोकांच्या मनावर बिंबविण्यासाठी व युद्धाचा प्रसंग उत्पन्न झालाच तर सर्वांनी आपलें साहायक व्हावें असें सामान्य आवाहन आपण केलेंच आहे हेंही सिद्ध करावयासाठीं मुख्यतः हें भाषण केलें आहे. किंबहुना त्यांच्या या भाषणाच्या रूपानें मंत्रयुद्धाच्या घोषणेचें टिपरूंच डंक्यावर पडलें आहे.

यानंतर पांडवांच्याकडून द्रुपद-पुरोहित कौरवांच्या सेनेकडील सर्व भेद काढण्यासाठीं पाठविण्यांत आला. त्याला तात्काळ परत न येतां तेथेंच रेंगाळत रहावयास सांगण्यांत आलें होतें. पण राजा धृतराष्ट्रानें त्याच्या येण्याचा सर्व आशय नीट ओळखून त्याला तेथें मुळींच थांबूं न देतां तात्काळ निरोप दिला, व राजा द्रुपदाचा तो डाव फुकट घालविला. धृतराष्ट्र हा अतिशय चाणाक्ष मुत्सद्दी असल्यामुळें त्यानें युधिष्ठिराच्या मनोवृत्तीचा विचार करून तिच्यावर आघात करून सारें राज्य फुकटांत पदरांत पाडून घेण्यासाठीं संजयाला शिष्टाईप्रीत्यर्थ युधिष्ठिराकडे पाठविलें. पण भगवान् श्रीकृष्णांनीं तो सारा डाव उधळून धृतराष्ट्रावर मात केली. मध्यंतरीं दुर्योधन स्वतः तत्कालीन प्रथेनुरूप श्रीकृष्णांना आपल्या बाजूला वळवून घ्यावयासाठीं बोलावणें करावयास द्वारकेंत गेला असतां दक्षतेनें भगवंतांनीं त्याचा डाव त्याच्यावर उलटवून स्वतःची सुटका करून घेतली. हा वृत्तान्त बारीक सारीक तपशिलासह मागें सांगितलेलाच असल्यामुळें येथें त्याचा नुसता संदर्भासाठीं उल्लेख केला आहे. उद्योगपर्वांतील भगवान् श्रीकृष्णांच्या मंत्रयुद्धाचें सर्वश्रेष्ठ प्रकरण म्हणजे कृष्णशिष्टाईचें प्रकरण होय. कृष्णशिष्टाईचें

हें प्रकरण इतकें महत्त्वाचें आहे कीं, पांडवांना कुरुपांडवांच्या या महायुद्धांत जो विजय मिळाला त्याचें बरेचसें श्रेय या शिष्टाईच्या प्रकरणाला आहे. पण या प्रकरणाविषयीं रूढ समजुती मात्र फार चमत्कारिक असल्यामुळें त्याचें खरें महत्त्व सहसा ध्यानांत येत नाहीं. त्यांतली पहिली समजूत अशी आहे कीं, कुरुपांडवांच्यांत प्रेम नांदावें, सलोखा उत्पन्न व्हावा, व त्यायोगें युद्ध टळावें अशा इच्छेनें भगवान् श्रीकृष्ण शिष्टाई करण्यासाठी दुर्योधनाच्या राजसभेंत गेले व केवळ दुर्योधनाच्या हट्टाग्रहामुळें शिष्टाई सफळ होऊं शकली नाहीं. पण शिष्टाई-प्रकरणाचा एकंदर विचार केला तर कौरवांशीं संधि करणें श्रीकृष्णांना मान्य नव्हतें व संधि होईल असेंही त्यांना वाटत नव्हतें असें दिसून येईल.

## श्रीकृष्णांना संधि अभिप्रेत होता काय ?

भगवान् श्रीकृष्णांची कौरवांच्या संबंधींची भावना काय होती या गोष्टीचे आतांपर्यंतच्या विवेचनांतही जे उल्लेख आलेले आहेत त्यांच्याकडे पाहिलें तर श्रीकृष्णांना संधि होणें ही गोष्ट मुळांतच मान्य नव्हती असें स्पष्ट दिसतें. संधीसाठीं जात असतां युधिष्ठिराशीं व अर्जुनाशीं श्रीकृष्णांनीं जें भाषण केलें आहे त्याकडे लक्ष दिलें तर संधीविषयींची त्यांची काय भावना होती हें अगदीं स्पष्ट दिसतें. युधिष्ठिराशीं बोलतांना (उद्योगपर्व अ. ७३-१४ ते २७) ते म्हणतात:

"अशा शीलचारित्र्यभ्रष्ट लोकांवर तूं अणुमात्रसुद्धां प्रेम करूं नयेस असें माझें मत आहे. ते इतके दुष्ट आहेत की कोणीही त्यांना अधम म्हणून केवळ नैतिक मूल्यांच्या दृष्टीनेंही ठारच मारलें पाहिजे. मग तुझा तर त्यांनीं प्रत्यक्ष अपराधच केला आहे. सर्व लोक पहात असतां हवें तें बोलून त्यांनीं तुझा पाणउतारा केलेला आहे. पांडवांचें येथें कांहींही राहिलेलें नसून त्यांचें नांवनिशाणसुद्धां उरलेलें नाहीं असें ते दुष्ट निर्लज्जपणें वारंवार उद्घोषीत होते. इतकेंच नव्हे तर द्यूत चालू असतां त्या पापी व दुरात्म्या दुःशासनानें देवी द्रौपदीला एखाद्या अनाथासारखें भरसभेंत ओढीत नेलें व तिचे केस धरून फर-फटत ओढीत भीष्मद्रोणांच्या समक्ष तिला 'गाय गाय' म्हणून तो

हवें तसें बोलत होता. तुझे बंधु पराक्रमी असतांनासुद्धां तूंच त्यांचें निवारण केलेंस व केवळ धर्मपाशानें बांधलेले असल्यामुळें त्यांनींही तें ऐकून घेतलें. वाटेल तसें तुला बोलून आज पुन्हां तो लोकांत आपली स्वत:ची शेखी मिरवीत आहे. तुझा कांहीं एक अपराध नसतां तुझी चाललेली ही विटंबना पाहून तेथील तपस्वी लोक व सभासद दुर्योधनाची निंदा करीत होते व आपलें कांहींही चालत नाहीं असें पाहून अश्रुपात करीत होते. कुलीन माणसाची निंदा व्हावी कीं वध व्हावा असा प्रश्न त्याच्यासमोर उभा राहिला तर तो आपला वध मान्य करील. निंदा होणें त्याला कधींही आवडणार नाहीं. निंदा हें एकप्रकारचें कुत्सित जीवन होय. त्यापेक्षां वध सहस्रपटीनें बरा. ज्याचें मूळ तुटून गेलें आहे व कच्च्या आधारावर जो केवळ उभा आहे असा वृक्ष पाडणें जितकें सोपें, तितकेंच सज्जनांचा छळ करणाऱ्या व कुलस्त्रीची विटंबना करावयास धजलेल्या दुर्योधनासारख्या चारित्र्यभ्रष्ट व्यक्तीचा वध करणें अत्यंत सोपें आहे. सर्प ज्याप्रमाणें कोणीही ठार मारावा, त्याचप्रमाणें दुर्जनांचा कोणीही ठेंचून वध करावा. हे राजा, उगाच विचार करीत बसूं नकोस. तात्काळ त्याला ठार मार. शत्रूशीं युद्ध होणार ही गोष्ट अगदीं निश्चित आहे. किंबहुना मला तशीच सारीं चिन्हेंही दिसत आहेत."

यानंतर भीमसेन ज्या वेळीं श्रीकृष्णांना शांततेनें दुर्योधनाशीं वाटाघाटी करण्याविषयीं सांगूं लागला, तेव्हां श्रीकृष्णांनीं त्याची कडक शब्दांत निर्भर्त्सना केली व पूर्वींच्या त्याच्या युद्धगर्जनांची त्याला आठवण करून देऊन षंढ व विकृत बुद्धीचा आणि आयत्या वेळीं दगा देणारा म्हणून त्याला डिवचलें आहे. इतकेंच नव्हे तर भीमाशीं बोलतांना स्वत:ची सुद्धां या धर्मयुद्धांत शस्त्रें घेऊन संहार करण्याची इच्छा त्यांनीं पुढील शब्दांत व्यक्त केली आहे :-

**अहं हि यन्ता बीभत्सोर्भविता संयुगे सति ।**
**धनंजयस्यैष कामो न हि युद्धं न कामये ।। १९**

—(महाभारत, उद्योगपर्व अ. ७७)

"हे भीमा, केवळ या अर्जुनाच्या इच्छेसाठीं म्हणून मला त्याचें सारथ्य करावें लागत आहे. वस्तुतः युद्ध करावयाची माझी इच्छा नाहीं असें मुळींच नाहीं." त्यांच्या अंतःकरणाच्या या भूमिकेचा अर्जुनाला सुद्धां संशय आलेला आहे. त्यामुळें त्यानें त्यांना तसें विचारलेंही. अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर देत असतां श्रीकृष्णांनीं आपली भूमिका यापेक्षांही अधिक स्पष्ट शब्दांत व्यक्त केली आहे. ते अर्जुनाला म्हणतात :–

**दैवं तु न मया शक्यं कर्म कर्तुं कथंचन ।**
**स हि धर्मं च लोकं च त्यक्त्वा चरति दुर्मतिः ॥ ६**
**न हि संतप्यते तेन तथारूपेण कर्मणा ।**
**तथाऽपि बुद्धिं पापिष्ठां वर्धयन्त्यस्य मन्त्रिणः ॥ ७**
**शकुनिः सूतपुत्रश्च भ्राता दुःशासनस्तथा ।**
**स हि त्यागेन राज्यस्य न शमं समुपैष्यति ॥ ८**
**तथा पापस्तु तत्सर्वं न करिष्यति कौरवः ।**
**तस्मिंश्चाक्रियमाणेऽसौ लोके वध्यो भविष्यति ॥ ११**
**यच्चापि परमं दिव्यं यच्चाप्यनुगतं त्वया ।**
**विधानं विहितं पार्थ कथं शर्म भवेत् परैः ॥ १७**
**यत्तु वाचा मया शक्यं कर्मणा वाऽपि पाण्डव ।**
**करिष्ये तदहं पार्थ न त्वाशंसे शमं परैः ॥ १८**

–महाभारत, उद्योगपर्व अ. ७९

"मी दैव कांहीं बदलवूं शकत नाहीं. तुला हें माहीतच आहे कीं, तो दुष्ट धर्म व लोकलज्जा सोडून वर्तन करीत असून त्याला त्याविषयीं किंचित्ही लाज वाटत नाहीं. स्वतःच्या अपकृत्याचा त्याला काडीइतकाही पश्चात्ताप होत नाहीं. शकुनि, सूतपुत्र कर्ण व दुःशासन हे त्याच्या पापी मनोवृत्तीला अधिकच चेतावणी देत असतात. तुमचा वांटा तुम्हांला परत देऊन शांति घडवून आणणें त्याला अशक्य आहे. वधाशिवाय दुसरा कोणताही मार्ग त्याच्या संबंधीं आचरणें फलदायी ठरावयाचें नाहीं. लहानपणापासून ज्यानें तुमच्यावर केवळ अकारण अपकारच केले, तो माझ्या दृष्टीनें

तर वध्य आहेच पण जगाच्याही दृष्टीनें वध्य आहे हें तूं लक्षांत ठेवलें पाहिजेस. तुमच्यापासून मला फोडण्यासाठीं त्यानें शक्य तेवढे सर्व प्रयत्न केले. पण त्याचा दुष्ट अभिप्राय मी पूर्णपणें ओळखत असल्यामुळें त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. शिवाय अर्जुना ! माझ्या जन्माचें दिव्य कारण तुला पूर्णपणें माहीत आहे. पृथ्वीवरचा दुष्ट लोकांचा भार नष्ट करण्यासाठींच जर माझा अवतार झालेला आहे तर या लोकांना मी जगूं देईन कसा ? त्यांना ठार मारल्यावांचून माझें अवतारकृत्य परिपूर्ण होऊं शकत नाहीं. ('द्रिव्यं विधानं' या शब्दाचा नीलकंठानें 'भूभारापहारार्थम् अवतरणम्।' पृथ्वीवरचा भार नष्ट करण्यासाठीच माझा अवतार आहे असें जें म्हटलें आहे तें अक्षरशः बरोबर आहे.) यापेक्षां भगवान् श्रीकृष्णांच्या आणखी कोणत्या स्पष्ट उद्‌गारांची, त्यांना संधि होणें मान्य नव्हतें हें सिद्ध करण्यासाठीं आवश्यकता आहे? श्रीकृष्णांच्या या 'दिव्य विधान' शब्दाला त्यांच्या संबंधीच्या वाङमयांत अनेक प्रकारचे संवादी दाखले मिळूं शकतात. श्रीमत् भागवतामध्यें असे पुष्कळच दाखले आहेत. श्रीकृष्णांना ज्याप्रमाणें संधि होणें मान्य नव्हतें, त्याचप्रमाणें संधि होणें शक्य आहे असेंही त्यांना वाटत नव्हतें. कौरवांच्या कोणत्या अपराधासाठी श्रीकृष्ण त्यांना वध्य समजत होते हेंही पहाण्यासारखें आहे. द्यूतांत कौरवांनीं पांडवांच्या राज्याचा अपहार केला या त्यांच्या घोर अपराधाबद्दल कदाचित् श्रीकृष्णांनीं त्यांना क्षमाही केली असती; पण त्यापेक्षांही त्यांच्या दृष्टीनें कौरवांनीं एक भयंकर अपराध केला होता. तो अपराध म्हणजे द्रौपदीचें केशाकर्षण होय. अनाथ कुलवधूला केंस धरून सभेंत फरफटत ओढलें जात असतां व वारंवार तिच्या शरीराला हिसडे देण्यांत येत असतां, कोणीही आपला संरक्षणकर्ता नाहीं या भावनेनें द्रौपदीनें श्रीकृष्णांना जी आर्त हांक मारली होती, ती त्यांच्या हृदयांत एकसारखी सलत होती. ते स्वतःच संजयाशीं बोलतांना त्याला सांगतात :—

**ऋणमेतत्प्रवृद्धं मे हृदयान्नापसर्पति ।**
**यद् गोविन्देति चुक्रोश कृष्णा मां दूरवासिनम् ॥ २२**

—महाभारत उद्योगपर्व **अ**.५९

"मी दूर द्वारकेंत असतां अब्रू जाण्याच्या प्रसंगीं हे गोविंदा, म्हणून द्रौपदीनें मला जी आर्त हांक मारली ती माझ्या हृदयांतून कधींही जाणार नाहीं. जसजसे दिवस जात आहेत तसतशी ती माझ्या हृदयांत अधिकच सलत्त आहे. त्या हांकेचें माझ्यावर मोठें ऋण आहे." आणि कौरवांच्या हत्त्येवांचून हें ऋण कधींही नष्ट होणारें नव्हतें. श्रीकृष्णांना या कारणास्तव कौरव वध्य वाटत होते. युधिष्ठिर क्षमा करावयास कितीही सिद्ध असले तरी श्रीकृष्ण त्यांना या अपराधाची क्षमा करावयास कधींही सिद्ध नव्हते.

संधि होऊं नये असें तर भगवान् श्रीकृष्णांना वाटत होतेंच; पण कोणत्याही परिस्थितीत संधि होणें शक्य आहे असेंही त्यांना वाटत नव्हतें. किंबहुना तो होऊं शकणार नाही अशीच त्यांची पूर्णपणें निश्चिति होती. श्रीकृष्णांना जो संधि हवा होता त्या संधीचें स्वरूप काय आहे हें नीट पाहिलें म्हणजे त्यांतच संधि अशक्य कां व कसा आहे याचीं सारीं कारणें दडलेलीं आढळतील. श्रीकृष्णांना जो संधि हवा होता तो द्यूताच्या वेळीं जें ठरलें त्याच स्वरूपाचा हवा होता. जें द्यूताच्या वेळीं ठरलें त्याचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे:—

**त्रयोदशे च निर्वृत्ते पुनरेव यथोचितम् ।**
**स्वराज्यं प्रतिपत्तव्यमितरैरथवेतरैः ॥ १४**

—महाभारत, सभापर्व अ. ७६

"बारा वर्षे वनवास व एक वर्षाचा अज्ञातवास संपल्यावर, ज्यांचें जेवढें राज्य असेल तेवढें त्यांनीं घ्यावें." द्यूताच्या वेळची ही अट जर पाहिली तर कौरवांचें मूळचें जें कुरुजांगल प्रांताचें राज्य, त्यांतील द्रौपदीच्या स्वयंवरानंतर धृतराष्ट्रानें त्यांना तोडून दिलेला अर्धा वांटा तर त्यांच्या पदरांत पडावयास हवाच होता; पण त्या-शिवाय युधिष्ठिरानें स्वतःच्या पराक्रमानें जें साम्राज्य मिळविलें होतें, तें त्यांनींच मिळविलें असल्यामुळें व पूर्वार्जिततेचा त्याच्याशीं कांहींच संबंध नसल्यामुळें तें संपूर्णपणें त्यांनाच मिळावयास पाहिजे होतें. शहाजी राजांच्या कर्नाटकांतील राज्याचा अर्धा वाटा पैतृक

संपत्ति म्हणून स्वतःचा सावत्र भाऊ जो व्यंकोजी त्याच्याजवळ मागत असतां स्वराज्याच्या वाट्याच्या संबंधीं त्यानें विचारणा करतांच शिवछत्रपतीनीं त्याला "स्वराज्य स्वसंपादित असल्यामुळें त्यावर तुझा कांहीं हक्क नाहीं असेंच उत्तर दिलें होतें." असो. याचा अर्थ असा होतो की, संधीमुळें विस्तीर्ण साम्राज्य व अर्धा कुरुजांगल प्रांत एवढें पांडवांच्या पदरांत पडणार होतें. ही गोष्ट दुर्योधन कोणत्याही परिस्थितीत मान्य करणें शक्य होतें काय? व तें जर त्याला मान्य करावयाचें असतें तर कपटद्यूताचा एवढा प्रकार त्यानें घडवूनच कशासाठी आणला असता? पांच गांवांवर संतुष्ट होण्याची युधिष्ठिराची लाख सिद्धता असली तरी ती कल्पना श्रीकृष्णांना पूर्णपणें अमान्य होती. श्रीकृष्ण तशी मागणी करावयास मुळीच तयार नव्हते. ते अर्जुनाला म्हणतात :—

**न तु मन्ये स तद्वाच्यो यद्युधिष्ठिरशासनम् ।**
**उक्तं प्रयोजनं यत्तु धर्मराजेन भारत ।। १०**

—(महाभारत, उद्योगपर्व अ. ७९)

"युधिष्ठिरांनीं पांच गांवें मागावींत असें जें म्हटलें आहे तें मला पूर्णपणें अमान्य आहे. कुलनाश न होण्याची त्यांची मनोभावना ओळखूनही त्यांची कल्पना मला अमान्यच आहे. ( या श्लोकांतील शासनं या शब्दावर 'शासनं पंच ग्रामान् देहीति तत् न वक्तव्यः।' ही नीलकंठाची टीप स्पष्टच आहे.) संधि करावयास्तव जाऊन जें बोलणें मी करीन तें 'युष्मदर्थमहापयन्'। (उद्योगपर्व अ.७३–३६) 'तुमच्या वांट्याचें राज्य मुळींच न सोडतां' असें श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरांना स्पष्टपणें सांगितलें असून त्याचाच अनुवाद अर्जुनाशीं बोलतांनाही (उद्योगपर्व अध्याय ७७–१५) पुन्हां केलेला आहे. अशा स्थितींत संधि होणें शक्य आहे असें त्यांना मुळींच वाटत नव्हतें. 'कौरव संधि करावयास कधींही सिद्ध होणार नाहींत' हा भाव त्यांनीं दोनदां स्पष्टपणें व्यक्त केलेला आहे. युधिष्ठिराशीं बोलतांना ते यासंबंधीं म्हणतात :—

**अतिगृद्धाः कृतस्नेहा दीर्घकालं सहोषिताः ।**
**कृतमित्राः कृतबला धार्तराष्ट्राः परंतप ।। ६**

न पर्यायोऽस्ति यत्साम्यं त्वयि कुर्युर्विशांपते ।
बलवत्तां हि मन्यन्ते भीष्मद्रोणकृपादिभिः ॥ ७
यावच्च मार्दवेनैताम् राजन्नुपचरिष्यसि ।
तावदेते हरिष्यन्ति तव राज्यमरिंदम ॥ ८

—महाभारत उद्योगपर्व अ. ७३

"हे राजा, स्वभावतःच अत्यंत लोभी असलेले, परस्परांत स्नेहभाव वाढलेले, दीर्घकाळ एकत्र नांदलेले, आपलें मित्रबळ व सैन्य वाढविलेले असे सारे धृतराष्ट्रपुत्र आहेत. भीष्म, द्रोण व कृपाचार्य असे विख्यात धनुर्धर योद्धे त्यांच्या बाजूला असल्यामुळें आपण अत्यंत बलवान् आहोंत व त्या मानानें पांडव अत्यंत दुर्बळ आहेत असें त्यांना निश्चित वाटतें. कोणताही बलिष्ठ शत्रू दुर्बळांशीं कधींही संधि करीत नाही हा राजनीतिशास्त्राचा ठरलेला नियम आहे. जोंवर तूं त्यांच्याशीं नमतें घेण्याचा प्रयत्न करशील तोंवर ते तुझें राज्य गिळंकृत करावयाचाच प्रयत्न करतील. दया, दीनभाव दाखविणें, धार्मिक दृष्टि सांगणें, वा कुलनाश टाळण्यांत केवढें वैभव प्राप्त होण्याची शक्यता आहे हें सांगत बसणें यांपैकीं कोणत्याही कारणांनीं कौरव तुझी इच्छा सफळ करतील असें तूं मुळीच समजूं नकोस." शिवाय कौरवांच्या पक्षाला जमलेले सर्व राजे हे सम्राट् जरासंधाच्या वधानंतर श्रीकृष्णांचा सूड घ्यावयासच जमले होते व त्यांचीं परस्परांत वैरें इतकीं भडकलेलीं होतीं कीं, त्यामुळें संधि होणें केवळ अशक्य आहे हें श्रीकृष्णांना पूर्णपणें दिसत होतें. संधीला जात असतां श्रीकृष्णांनीं भीमापासून सहदेवापर्यंत सर्वांना युद्धाची उत्तेजना दिलेली आहे. जर श्रीकृष्णांना संधि नको होता व तो होईल असेंही त्यांना वाटत नव्हतें तर मग श्रीकृष्ण स्वतः शिष्टाईप्रीत्यर्थ कौरवांच्या राजसभेंत गेलेच कां ? असा स्वाभाविकपणेंच प्रश्न उत्पन्न होतो. त्याचें उत्तर आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

---

# कृष्णशिष्टाईची भूमिका

भगवान् श्रीकृष्णांना कौरवांशीं संधि करणें मान्य नव्हतें व तो होईल असेंही त्यांना वाटत नव्हतें हें मागच्या व्याख्यानांत आपण पाहिलें आहे. पशुत्व नियंत्रित व हळुहळू मानवतेंतून नष्ट करावयास राज्यसंस्थेची आवश्यकता असते. पण राज्यसंस्थाच जर पशुवृत्तीची बनली तर ती नष्ट करणें हाच एक मार्ग असतो. सत्ताशून्य पशुत्व संस्कारांनी सुधारतां येणें शक्य असतें. कारण तें नियंत्रित होऊं शकतें; पण सत्तात्मक पशुत्व हें नियंत्रित होणें केवळ दुरापास्त असल्यामुळें तें नष्ट करणें हाच एकमात्र मार्ग असतो. श्रीकृष्णांनीं राजसत्तांचा संहार करावयाचा जो निर्णय घेतला होता, त्याचें खरें कारण हें असें आहे. श्रीकृष्णांच्या या कार्याविषयीं सर्व ग्रंथांतून एकवाक्यता आढळून येते. श्रीकृष्णांचा अवतार कां झाला याचें वर्णन करतांना भागवतकार म्हणतात :-

**भूमिर्दृप्तनृपव्याजदैत्यानीकशतायुतैः ।**
**आक्रान्ता भूरिभारेण ब्रह्माणं शरणं ययौ ॥ १७**
**गौर्भूत्वाऽश्रुमुखी खिन्ना क्रन्दन्ती करुणं विभोः ।**
**उपस्थिताऽन्तिके तस्मै व्यसनं स्वमवोचत ॥१८**

—( भागवत दशमस्कंध अध्याय १ )

"हे राजा, या पृथ्वीला गर्विष्ठ राजांच्या रूपानें अवतरलेल्या दैत्यांच्या लक्षावधि सैन्यांनीं जेव्हां हैराण करून सोडलें तेव्हां त्यांचा तो भार तिला असह्य होऊन ती ब्रह्मदेवाला शरण गेली. तिनें गाईचें रूप धारण केलें आणि डोळ्यांत आंसवें आणून दीनवाणीपणानें व दुःखानें रडत ती ब्रह्मदेवाजवळ गेली आणि आपलें गाऱ्हाणें तिनें ब्रह्मदेवास सांगितलें."

श्रीकृष्णावताराच्या या कारणाच्या दिग्दर्शनानंतर अवतार होऊन तो काय कार्य करणार आहे याची स्पष्ट कल्पना सांगतांना

---

व्याख्यान १८ वें दिनांक १६-४-५२

प्रजापति ब्रह्मदेवाच्या तोंडून भागवतकारांनीं पुढील रहस्य वदविलें आहे:—

**पुरैव पुंसाऽवधृतो धराज्वरो भवद्‌भिरंशैर्यदुषूपजन्यताम् ।**
**स यावदुर्व्या भरमीश्वरेश्वरः स्वकालशक्त्या क्षपयंश्चरेद् भुवि ॥ २२**

—(भागवत १० स्कंद अ. १)

"पृथ्वीला जें संकट आलें आहे त्याची त्या आदिपुरुषाला पूर्वींच योग्य कल्पना आलेली असून तो परमेश्वर पृथ्वीचा भार आपल्या कालरूपी शक्तीनें नष्ट करण्यासाठीं पृथ्वीवर अवतार घेऊन तेथें वास्तव्य करणार आहे. तरी तो तेथें असेपर्यंत आपआपल्या अंशानें तुम्हीं यदुकुळांत अवतार घ्या." श्रीकृष्ण ही कालशक्ति होती व तिच्या हातून कुरुपांडव युद्धांत सर्व राजसत्तांचा संहार होणार आहे, हा संकेत देवर्षि नारदांच्या तोंडूनही भागवतकारांनीं पुढीलप्रमाणें वदविला आहे :—

**अथ ते कालरूपस्य क्षपयिष्णोरमुष्य वै ।**
**अक्षौहिणीनां निधनं द्रक्ष्याम्यर्जुनसारथेः ॥ २१**

—(भागवत १० स्कंध अ. ३७)

"नंतर कालरूपी तूं भारतीय युद्धांत अर्जुनाचा सारथी होऊन अनेक अक्षौहिणींचा संहार करशील तोही मी पाहीन." भगवद्‌गीतेंत श्रीकृष्णांनींच स्वतःचें वर्णन करतांना अकराव्या अध्यायांत विश्वरूप दर्शनाच्या वेळीं 'कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धः लोकान् समाहर्तुमिह प्रवृत:' मी लोकांचा अंत घडविणारा, सर्वशक्तिसंपन्न काळ असून लोकांच्या संहारासाठींच प्रवृत्त झालों आहे असें स्पष्ट विधान केलें आहे. तात्पर्य, श्रीकृष्ण ही परमेश्वरी कालशक्ति होती व दुष्ट राजसत्तांचा संहार हेंच तिचें कार्य होतें हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे. त्याच्या प्रकाशांतच त्यांच्या चरित्राचा उलगडा केला पाहिजे. हें एकदां लक्षांत घेतलें म्हणजे कौरवांशीं संधि करणें त्यांना कां मान्य नव्हतें या विषयावर वेगळें विवेचन करण्याची आवश्यकताच उरत नाहीं. तरी पण पुराव्यासाठीं आपण तें केलेलें आहेच. जर संधि होणें त्यांना मान्य नव्हतें व होणारही नव्हता

हें त्यांना निश्चित ठाऊक होतें, तर मग ते कौरवांच्या राजसभेंत गेले कशास्तव?

## कृष्णशिष्टाईचीं कारणें

श्रीकृष्ण स्वतः या शिष्टाईसाठी जे गेले त्याचें पहिलें व महत्त्वाचें कारण म्हणजे युधिष्ठिराचा आग्रह व तोच संघर्षाचा घटनात्मक नेता असल्यामुळें त्याला प्रसन्न राखणें आवश्यक होतें हें होय. संजयाच्या शिष्टाईनंतर युधिष्ठिराच्या अंतःकरणावर इतका विलक्षण परिणाम झाला होता कीं श्रीकृष्णांनी ती शिष्टाई जरी उलटविली तरी काय वाटेल तें करून कुलनाश टळावा असेंच त्यांना वाटूं लागलें होतें. श्रीकृष्ण जर नसते तर सर्वस्वत्याग करून व संन्यास घेऊनही त्यांनी शांति पदरांत पाडन घेतली असती. पण श्रीकृष्णांच्या दडपणामुळें कांही स्वतःचा भाग पदरांत पाडून घ्यावयास ते सिद्ध असले तरी पांच गांवांवरही संतुष्ट राहून व हवी तेवढी नम्रता स्वीकारून संधि करावाच असेंच ते मानीत होते. महायुद्धानंतर सारा जन्म त्यांनीं रडण्यांत व कौरवांची हत्या आपल्या हातून झाली हें मोठें पाप झालें असें मानण्यांत घालविला आहे. ऐन युद्धाच्या वेळीं सुद्धां श्रीकृष्णांना युधिष्ठिरास मेटाकुटीनेंच युद्धास उभें करावें लागलें आहे. संधीच्या पूर्वीं संजय निघून गेल्यानंतर श्रीकृष्णांशीं बोलतांना ते स्वतः आपल्या भावना पुढीलप्रमाणें व्यक्त करतात:—

**तत्र नः प्रथमः कल्पो यद्वयं ते च माधव।**
**प्रशान्ताः शमभूताश्च श्रियं तामश्नुवीमहि ।।४२**
**तत्रैषा परमा काष्ठा रौद्रकर्मक्षयो दया।**
**यद्वयं कौरवान् हत्वा तानि राष्ट्राण्यवाप्नुमः ।।४३**
**ये पुनः स्युरसंबद्धा अनार्याः कृष्ण शत्रवः।**
**तेषामप्यवधः कार्यः किं पुनर्ये स्युरीदृशः ।।४४**
**ज्ञातयश्चैव भूयिष्ठाः सहाया गुरवश्च नः।**
**तेषां वधोऽतिपापीयान् किं नु युद्धेऽस्ति शोभनम् ।।४५**

**पापः क्षत्रियधर्मोऽयं वयं च क्षत्रबन्धवः।**
**स नः स्वधर्मो धर्मो वा वृत्तिरन्या विगर्हिता॥४६**
**शूद्रः करोति शुश्रूषां वैश्या वै पण्यजीविकाः।**
**वयं वधेन जीवामः कपालं ब्राह्मणैर्वृतम्॥४७**
**न च त्यक्तुं तदिच्छामो न चेच्छामः कुलक्षयम्।**
**अत्र या प्रणिपातेन शान्तिः सैव गरीयसी॥६८**

—(महाभारत उद्योगपर्व अ. ७२)

"हें सारें प्रकरण मिटविण्याचे दोन मार्ग आहेत. पहिला मार्ग असा कीं ठरल्याप्रमाणें कौरवांनीं नि आम्हीं अत्यंत शांतपणें व प्रसन्न अंतःकरणानें आपसांत तडजोड करून हा वाद मिटवावा. शांततापूर्वक त्यांनीं आम्हांला आमचा वांटा द्यावा व त्यांनीं आपला वांटा स्वतः उपभोगावा व आम्ही दोघांनीही गुण्यागोविंदानें नांदावें. कोणत्याही प्रयत्नाला यश न येऊन केवळ आत्यंतिक मार्ग म्हणून युद्धाच्या रौद्रकर्माची कांस धरून आम्हीं कौरवांना ठार मारावें हा राज्य मिळविण्याचा दुसरा मार्ग होय. पण इतर कोणताही मार्ग निघण्याची मुळींच शक्यता नाहीं अशीच अवस्था निर्माण झाली तर केवळ या मार्गाचें अवलंबन करावयाचें आहे पण त्या आधीं इतर सर्व मार्ग मुळींच उपयोगी पडूं शकत नाहींत अशी अंतःकरणाची पूर्णपणें निश्चिति झाली पाहिजे. हे श्रीकृष्णा, ज्यांच्याशीं आपला कांहींही संबंध नाहीं अशा दुष्ट शत्रूंना देखील कधीं ठार करूं नये. मग कौरवांची तर गोष्टच वेगळी आहे. कौरव हे आपले नातलग आहेत. सर्व दृष्टींनीं त्यांच्यामुळें आपलें कुळ समृद्ध व्हावयाचें आहे. नात्याच्या दृष्टीनें पाहिलें तर तेच आपले स्वाभाविक साहाय्यक आहेत. शिवाय ते आमचे गुरूही आहेत. अशा लोकांशीं युद्ध करणें आपणांस शोभादायक आहे काय? युद्धांत काय कल्याण व्हावयाचें आहे? त्यांचा वध हें अत्यंत घोर असें पातक होय. किंबहुना, आम्ही ज्या क्षत्रिय कुलांत जन्माला आलों आहोंत त्या आम्हां क्षत्रियांचा हा धर्मच पापमय आहे. वध करणें हा आमचा धर्म होऊन बसला आहे. अन्य वृत्ति आम्हांस अप्रशस्त मानलेली आहे. शूद्र सेवा करून राहतो, वैश्य व्यापार करून

उपजीविका करतो, ब्राह्मणांनीं 'भिक्षां देहि' हें उपजीवनाचें साधन स्वीकारलें आहे आणि आम्हां क्षत्रियांना मात्र दुसऱ्यांचा वध करून आपली उपजीविका करावी लागत आहे! आम्ही राज्यलोभ सोडूं शकत नाहीं. पण कुलक्षयही आम्हांस मुळींच नको. सर्वस्वी शरण जाऊन जरी शांतता नांदत असेल तरी ती पत्करावी. कारण तीच कल्याणकारण गोष्ट आहे."

युधिष्ठिराच्या अंतःकरणाची ही इच्छा ध्यानांत घेऊनच संधीसाठीं जाणें श्रीकृष्णांना भाग पडलें. ते स्वतःच अर्जुनाशीं बोलतांना स्पष्ट शब्दांत हें कारण सांगतात :—

**सर्वथा तु मया कार्यं धर्मराजस्य शासनम् ।**
**विभाव्यं तस्य भूयश्च कर्म पापं दुरात्मनः ॥२१**

—( महाभारत, उद्योगपर्व अ. ७९ )

"हे अर्जुना, काय वाटेल तें असलें तरी युधिष्ठिराच्या आज्ञे-प्रमाणेंच मला वर्तन केलें पाहिजे. त्यांची तशी आज्ञा आहे म्हणून संधीप्रीत्यर्थ जाणें मला आवश्यक आहे."

श्रीकृष्णांनीं शिष्टाईसाठीं जाण्याचें पहिलें कारण याप्रमाणें युधिष्ठिराची उत्कट इच्छा व आज्ञा हें आहे. पण मग असा प्रश्न उत्पन्न होतो कीं त्यांनीं स्वतःच जावयाचें कां ठरविलें ? एकवार द्रुपद-पुरोहित हा कौरवांच्या राजसभेंत जाऊन आलेलाच होता. पुन्हां त्याला अथवा त्याच्यासारख्या दुसऱ्या कोणालाही श्रीकृष्ण सहज पाठवूं शकत होते. त्यांनीं स्वतः जाण्याचा निर्णय घेतला याचें दुसरें कारण लोकापवाद टाळणें हें होतें.

श्रीकृष्णांच्या व्यक्तिप्रभावामुळें त्यांच्या संबंधांत लोकापवादही तापदायक ठरणार होता. श्रीकृष्ण हे उभय पक्षांचे नातलग असल्यामुळें पांडवांप्रमाणेंच कौरवांच्याही राजसभेंत त्यांच्या शब्दाला विशेष मान आहे, एवढेंच नव्हे तर आपल्या सामर्थ्याचा उपयोग करून ते कौरवांना संधि करावयास भाग पाडूं शकतात अशीही पुष्कळांची समजूत होती. त्यांचे बंधु बलराम यांना सुद्धां श्रीकृष्णांनीं अशी कांहीं खटपट केली तर ती यशस्वी होईल असें

वाटत होतें. तेव्हां आपण कांहीं केलें नाहीं असें होऊं नये, उलट आपण सर्व प्रकारचे प्रयत्न करूनही, केवळ कौरवांच्या हटवादामुळेंच यशस्वी होऊं शकलों नाहीं हें त्यांना सिद्ध करावयाचें होतें. श्रीकृष्णांनीं स्वतः शिष्टाईला जाण्याचें हें दुसरें महत्त्वाचें कारण होय. द्रौपदी, विदुर, युधिष्ठिर, इत्यादि अनेक लोकांच्या जवळ श्रीकृष्णांनीं स्वतःच्याच तोंडानें हें कारण सांगितलें आहे. ते म्हणतात :—

**जानाम्येतां महाराज धार्तराष्ट्रस्य पापताम् ।**
**अवाच्यास्तु भविष्यामः सर्वलोके महीक्षिताम् ॥ ८५**
**न जातु गमनं पार्थ भवेत्तत्र निरर्थकम् ।**
**अर्थप्राप्तिः कदाचित् स्यादन्ततो वाऽप्यवाच्यता ॥ ८८**

—(महाभारत, उद्योगपर्व अ. ७२)

"हे महाराज युधिष्ठिर, दुर्योधनाची पापी मनोवृत्ति मला पूर्णपणें परिचित आहे. पण यांनीं प्रयत्न केले नाहींत म्हणून आपल्याला कोणी दोष देऊं नये एवढीच माझी इच्छा आहे. तेवढ्या साठींच मी स्वतः जावयाचें ठरविलें आहे. माझें तेथें जाणें निरर्थक होणार नाहीं. कदाचित शांततेनें सर्व भानगड मिटेलही. पण नच मिटली तर निदान लोक आपल्याला दूषण तरी देऊं शकणार नाहींत."

पुन्हां विदुराला म्हणतांना श्रीकृष्ण सांगतात, " दुर्योधनाची दुष्ट बुद्धि व क्षत्रियांचें परस्परांत असणारें तीव्र वैर यांची मला पूर्ण कल्पना आहे. पण हें सर्व ओळखूनच मी येथें शिष्टाईसाठीं आलों आहे. कोणत्याही चुकीच्या समजुतीनें मी आलों नाहीं. महा-युद्धांत जगाचा मोठा संहार होणार आहे. गळ्याभोंवती पडलेल्या मृत्यूच्या पाशापासून जो कोणी जगाला सोडवील तो खरोखरीच मोठें पुण्य संपादन करील. आपल्या सामर्थ्यानुरूप हें पुण्य संपादन करण्याची खटपट करीत असलेला मनुष्य आपल्या प्रयत्नांत यशस्वी न झाला तरी त्याला तें पुण्य लागल्याशिवाय राहणार नाहीं. अंतःकरणांत शांततेची इच्छा असूनही प्रत्यक्ष त्या दृष्टीनें हालचाल न करणें हेंही चुकीचेंच आहे. हे विदुरा, मी अगदीं निष्कपटपणें

विनाशाच्या कांठावर आलेल्या कौरव व सृंजयांना वांचविण्याचा आणि शांतता प्रस्थापित करण्याचा मनापासून प्रयत्न करणार आहें. वस्तुतः ही भयंकर आपत्ति कौरवांच्या व त्यांतील दुर्योधनादि प्रमुखांच्या स्वतःच्या चुकीमुळें त्यांच्यावर येऊन कोसळत आहे. संकटांत सांपडलेल्या मित्राला वांचविण्याच्या दृष्टीनें जो किंचितही प्रयत्न करीत नाहीं त्याला नृशंस म्हणतात. मी कुरुवशाचा मित्र आहें. त्यामुळें त्यांना वांचविण्याचा प्रयत्न मला केलाच पाहिजे. आपल्या शक्तीप्रमाणें मित्राला दुष्कृत्यापासून बळानेंही बाजूला ओढणें, निदान लोकापवाद टाळण्याच्या तरी उपयोगी पडतें. मी जें कल्याणकारक, व धर्म आणि अर्थ यांना सर्वस्वी धरून असें कुरुसभेंत बोलणार आहें, तें दुर्योधनानें आपल्या अमात्यांसहित ऐकलें पाहिजे. पांडव व कौरव आणि पृथ्वीवरचे सर्व क्षत्रिय यांचें हित व्हावें म्हणून मनुष्यानें जेवढा प्रयत्न करणें योग्य आहे तेवढा सर्व मी करणार आहें. अधार्मिक, मूर्ख, व मनापासून माझें वैर करणाऱ्या लोकांनीं, खवळलेल्या कौरव-पांडवांना आवरण्याचें अंगीं सामर्थ्य असतांना सुद्धां श्रीकृष्णानें त्यांना आवरून धरण्याचा प्रयत्न केला नाहीं असें दूषण मला देऊं नये येवढ्याचसाठीं मी येथें आलों आहें. उभय पक्षांचें काम साधावें म्हणून मी येथें आलों. काम व्हावयाचें नाहीं हें मला माहीत आहे. पण मी प्रयत्नच केला नाहीं हा लोकापवाद टाळण्याची माझी इच्छा आहे."

श्रीकृष्णांची ही इच्छा पूर्णपणें सफळ झाली नाहीं. गांधारीनें यादवांच्या सैन्यबळाचा उपयोग न करून तू हा नाश होऊं दिलास असा श्रीकृष्णावर ठपका दिलाच. उत्तंकानें तर शाप द्यावयासही आपली सिद्धता दाखविली. शेवटी त्यांना स्वतःच्या अवताराचें रहस्य सांगून उत्तंकाचें समाधान करावें लागलें.

केवळ याच दोन कारणांसाठी श्रीकृष्ण कौरवराजसभेंत गेलेले नसून ते जाण्याचें आणखीही महत्त्वाचें असें राजकीय कारण होतें. असें कारण केवळ एकच नसून तीं कारणें अनेक होतीं. श्रीकृष्ण शिष्टाईला जाण्याच्या वेळेपर्यंत कौरव व पांडव या दोन्ही पक्षांकडे सहायक राजे व त्यांचें सैन्य येऊनही पोहोंचलेलें होतें. पांडवांच्या

पक्षाकडे सात अक्षौहिणी व कौरवांच्या पक्षाकडे अकरा अक्षौहिणी सैन्य एकत्रित झालेलें होतें. पांडवांच्या पक्षाकडे जे लोक मिळाले होते त्यांतील बहुतेक पांडवांचे नातलग व अगदीं जवळचे संबंधी होते. त्यांतील कांहीं मनापासून त्यांच्यावर प्रेम करणारे व कांहीं त्यांचा लढा हा न्यायाचा लढा आहे अशा श्रद्धेचे होते. कौरवांच्या बाजूला मात्र त्यांच्याशीं प्रत्यक्ष नात्याचा संबंध नसलेल्याही भारतवर्षांतील बहुतेक सर्व राजसत्ता एकत्रित झालेल्या होत्या. याचें खरें कारण दुर्योधनाचा पक्ष त्यांना न्यायाचा वाटत होता अथवा त्याला साहृय करणें त्यांना कर्तव्य वाटत होतें हें नसून त्या राजे लोकांचें वैर वस्तुत: पांडवांशी नसून तें श्रीकृष्णाशीं होतें. जुलमी राजसत्तेला ठार करण्याचा प्रजेला हक्क आहे हें कंसाच्या वधानें सिद्ध करून जरासंधाच्या वधानें राजसिंहासनाच्या स्वयंभूपणाचें व अनियंत्रिततेचें युग पूर्णपणें संपलें असून त्या ऐवजीं धर्मनियंत्रित सत्तेचें युग उदय पावलें आहे, व राजासुद्धां दण्डनीय असू शकतो हें महान् वैचारिक व व्यावहारिक परिवर्तन श्रीकृष्णांनीं घडविलें होतें व त्यांत स्वयंभू व अनियंत्रित सत्तेच्या पुरस्कर्त्यांना स्वत:चा मृत्यु स्पष्टपणें दिसत होता. त्यामुळें श्रीकृष्णांशीं वैर करणें त्यांना क्रमप्राप्त होतें. जरासंधाच्या वधानंतर ते एकटे व उघडे पडले. श्रीकृष्णांच्याच प्रेरणेनें त्यांच्यापैकीं एकेकटचाला गांठून पांडवांनीं व स्वत: श्रीकृष्णांनींही त्यांचा पराभव केला होता, याची जाणीव त्यांच्या अंत:करणांत सदैव टोंचत होती. श्रीकृष्णांना ठार करावयास कुरुपांडव युद्धाची संधि त्यांना अत्यंत योग्य वाटली. जरासंधाच्या मृत्यूनें मोडलेला संघ दुर्योधनाच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं पुन्हां उभारला व श्रीकृष्णांचें आणि आपलें वैर रणक्षेत्रावर सदाचें संपविण्यासाठीं ते एकत्रित झाले. श्रीकृष्ण शिष्टाईला गेले असतां 'तुम्हीं एकटे येथें येऊन मोठें साहस केलें' असें त्यांना सांगत असतां धृतराष्ट्राचा मंत्री विदुर यानें ही गोष्ट स्पष्ट शब्दांत व्यक्त करून दाखविली आहे. विदुर श्रीकृष्णांना म्हणतो:—

**पर्यस्तेयं पृथिवी कालपक्वा दुर्योधनार्थे पाण्डवान् योद्धुकामा:।**
**समागता: सर्वयोधा: पृथिव्यां राजानश्च क्षितिपालै: समेता: ।। २४**

**सर्वे चैते कृतवैराः पुरस्तात् त्वया राजानो हृतसाराश्च कृष्ण।**
**तवोद्वेगात्संश्रिता धार्तराष्ट्रान् सुसंहता सह कर्णेन वीराः॥ २५**
**त्यक्तात्मानः सह दुर्योधनेन हृष्टा योद्धुं पाण्डवान् सर्वयोधाः।**
**तेषां मध्ये प्रविशेथा यदि त्वं न तन्मतं मम दाशार्ह वीर॥ २६**

--(महाभारत, उद्योगपर्व अ. ९२)

"हे श्रीकृष्णा, मला असें दिसतें कीं सर्व पृथ्वीची मरणघटिका जवळ आलेली आहे. दुर्योधनासाठीं पांडवांशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें पृथ्वीवरील सर्व योद्धे व राजे लोक एकत्रित आलेले आहेत. हे सर्व पूर्वीं तुझें वैर केलेलें व तूं रणांत ज्यांचा रणमद पूर्णपणें जिरविलास असे आहेत. तुझा उद्वेग वाटून व घाबरूनच ते दुर्योधनाचा आश्रय घेऊन व कर्णादिकांचें साहाय्य मिळवून संघटित झालेले आहेत. प्राणपणानें ते या युद्धांत लढतील. तुझे ते खास वैरी असल्यामुळें तूं एकटयानें त्यांच्या समुदायांत प्रवेश करणें योग्य नाहीं.

हें सर्व ओळखूनच श्रीकृष्ण कुरुसभेंत गेले. त्यांच्या जाण्याचीं राजकीय कारणें पुढीलप्रमाणें दिसतातः–

(१) कौरवसभेंत जाऊन श्रीकृष्णांना तेथील भीष्म, द्रोण, कृपाचार्य इत्यादि स्वतःला न्यायी, धार्मिक, व कर्तव्यपरायण समजणाऱ्या लोकांच्या अंतःकरणांत कौरवांच्या बाजूनें परजलें जाणारें त्यांचें खड्ग अन्याय्य पक्षाच्या पाठपुराव्यासाठीच परजलें जात आहे असा स्पष्टभाव निर्माण करून त्यांची युद्धाची उत्साहशक्ति पार नष्ट करून टाकावयाची होती. इतकेंच नव्हे तर त्यांचीं शरीरें जरी कौरवांच्याच बाजूनें लढणार असली तरी पांडव पक्षाला जय मिळावा व आपल्या पक्षाचा पूर्णपणें पराभव होऊन आपणांस मृत्यु यावा अशी धारणा त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न करावयाची होती. राजकीयदृष्टया ही स्वयमेव अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. पक्षाच्या सेनापतींच्या व धुरीणांच्याच अंतःकरणांत आपला पक्ष अन्यायाचा व पापाचा आहे, व शत्रूचा पक्ष मात्र न्यायाचा व धर्माचा आहे, आपणांस मृत्यु यावा व आपल्या पक्षाचा सर्वनाश व्हावा, प्रति-पक्षाचा मात्र पूर्णपणें विजय होऊन त्यानें वैभवानें नांदावें असें वाटू

लागलें तर त्या पक्षाच्या दुर्दैवाचे दशावतार व्हावयास वेळ कितीसा लागणार? असा न्यूनगंड हाच युद्धांतील सर्वांत महत्त्वाचा विजय होय. प्रत्यक्ष युद्धापेक्षांही स्वपक्षाच्या विजयाचें यांतूनच कार्य साधत असतें. अलीकडच्या युद्धांत फ्रान्सवर विजय संपादन करण्यापूर्वी हिटलरनें या मंत्रशक्तीचा कुशलतेनें वापर केला होता व फ्रान्स-वरील त्याच्या विजयास हीच गोष्ट मुख्यत: कारणीभूत झाली हें स्पष्टच आहे.

(२) भगवान् श्रीकृष्णांना कौरवपक्षाचें बलाबलही एकदां स्वत:च्या दृष्टीखालीं घालून जमलेल्या सर्व प्रतिपक्षीय योद्धयांच्या अंत:करणांत पांडवांच्या अद्वितीय सामर्थ्याचा धाक व भय निर्माण करावयाचें होतें. पांडवांच्या बाजूला सात अक्षौहिणी सैन्य व आपल्या बाजूला आकरा अक्षौहिणी सैन्य असल्यामुळें अंतीं विजय आपलाच होणार ही जी धारणा कौरवपक्षीय राजांच्या अंत:-करणांत होती, ती पार नष्ट करून त्याऐवजीं पांडव सबल असून आपलाच पराभव होणार हा न्यूनगंड श्रीकृष्णांना त्यांच्या अंत:-करणांत निर्माण करावयाचा होता. या न्यूनगंडानें पछाडलेलें सैन्य संख्येनें केवढेंही मोठें असलें तरी तें सहज पराभूत होतें.

(३) कौरवांकडील अपार उत्साहशक्ति असलेला, आणि सर्वांत बलिष्ठ योद्धा जो कर्ण त्याचा उत्साह संपवून त्याच्या अंत:करणांत आपल्या पराभवाची आकांक्षा, मृत्यूची इच्छा, व एक प्रकारची टोंचणी त्यांना उत्पन्न करावयाची होती. कर्ण संपला व त्याच्या रणोत्साहावर विरजण पडलें कीं कौरवांचा पक्ष जवळजवळ संपलेलाच होता.

(४) कौरवपक्षीय योद्धयांची आंतरिक स्नेहसूत्रावर आधार-लेली संघटना आहे कीं त्यांच्यांत परस्परांत फूट व मतभेद आहेत हेंही त्यांना पुढील उपयोगाच्या दृष्टीनें अजमावून पहावयाचें होतें.

(५) जो आपल्या दृष्टीनें वध्य असतो, तो जगाच्याही दृष्टीनें किंबहुना त्याच्या पक्षाला साहाय्य करणाऱ्या लोकांच्याही दृष्टीनें वध्य ठरणें आवश्यक असतें. कारण त्यामुळें आपल्या हत्यात्मक कृत्याला महान् नैतिक अधिष्ठान उत्पन्न होत असतें. स्वत:च्या

धारणेच्या दृष्टीनें वध्य ठरलेले कौरव, सर्व जगाच्याही दृष्टिकोनांतून तसेच वध्य व तिरस्कारार्ह ठरणें आवश्यक होतें. दुर्योधनाच्या संबंधीं ही गोष्ट निर्माण करणें हा श्रीकृष्णांच्या स्वतः शिष्टाईला जाण्यांतील सर्वांत महत्त्वाचा राजनैतिक हेतु होता.

आपल्या या विविध राजकीय हेतूंचें स्पष्टीकरण स्वतः भगवान् श्रीकृष्णांनींच जागजागीं केलेलें आहे. युधिष्ठिराला ते म्हणतातः—

**अहं तु सर्वलोकस्य गत्वा छेत्स्यामि संशयम् ।**
**येषामस्ति द्विधाभावो राजन् दुर्योधनं प्रति ॥ २९**
**मध्ये राज्ञामहं तत्र प्रातिपौरुषिकान् गुणान् ।**
**तव संकीर्तयिष्यामि ये च तस्य व्यतिक्रमाः ॥ ३०**
**ब्रुवतस्तत्र मे वाक्यं धर्मार्थसहितं हितम् ।**
**निशम्य पार्थिवाः सर्वे नानाजनपदेश्वराः ॥ ३१**
**त्वयि संप्रतिपत्स्यन्ते धर्मात्मा सत्यवागिति ।**
**तस्मिंश्चाधिगमिष्यन्ति यथा लोभादवर्तत ॥ ३२**
**शमं वै याचमानस्त्वं नाधर्मं तत्र लप्स्यसे ।**
**कुरून् विगर्हयिष्यन्ति धृतराष्ट्रं च पार्थिवाः ॥ ३४**

—— (महाभारत, उद्योगपर्व अ. ७३)

"हे युधिष्ठिरा, मी स्वतः कौरवांच्या सभेंत जाऊन अजूनही ज्यांच्या अंतःकरणांत दुर्योधनाचा पक्ष न्यायाचा आहे व त्यालाही कांहीं बाजू आहे असा वृथा संशय असेल, तो त्यांचा संशय पूर्णपणें नष्ट करणार आहें. त्या ठिकाणीं खऱ्या सत्पुरुषाला योग्य अशा तुमच्या ठिकाणीं असलेल्या सर्व सद्गुणांचें वर्णन करून व त्यांचे दुर्गुण व त्यांनीं तुमच्यावर केलेल्या अन्यायांचा एकामागून एक पाढा वाचणार आहे. धर्म, अर्थ व हितबुद्धि यांना धरून असलेलें माझें भाषण त्या ठिकाणीं जमलेले सारे लोक व वेगवेगळे लोकनेते ऐकतील व तें भाषण ऐकून आपण धर्मात्मे व सत्यवचनी आहांत अशी ज्याप्रमाणें लोकांची निश्चिति पटेल, त्याचप्रमाणें दुर्योधन दुरात्मा असून केवळ राज्यलोभासाठीं वाटेल तीं दुष्कृत्यें करणारा चारित्र्यभ्रष्ट आहे अशीही त्यांची निश्चिति पटेल. सर्व प्रकारची

प्रजा तेथें जमेल. जमलेल्या साऱ्या आबाल-वृद्ध प्रजाजनांसमोर मी त्याची इतकी निर्भर्त्सना करणार आहें कीं, त्यामुळें ते सारे प्रजाजनही मनांतून त्याचा धिक्कार व निर्भर्त्सना करूं लागतील. वारंवार इतके अन्याय होऊनही तुम्ही शांतीचाच पुरस्कार करतां आहांत हें पाहून लोकांच्या श्रद्धेचा तुम्ही विषय व्हाल व कौरवांचे प्रजाजन नुसत्या दुर्योधनादिकांचाच नव्हे, तर धृतराष्ट्राचाही तिरस्कार करून त्याची निंदा करतील. एकदां सर्व लोकांच्या अंत:करणांतून त्याचा असा धिक्कार झाला कीं मग त्याला ठार मारावयास कितीसा वेळ लागणार! मग तो वस्तुत: मेलाच. मग त्याचें शरीर नष्ट करणें ही अतिशय सुलभ गोष्ट आहे. तुमच्या हितसंबंधांना धक्का न लावतां शांतीची खटपट करण्यांत मी तेथील सर्व हालचालीचें सूक्ष्मतेनें निरीक्षण करणार आहें. कौरवांची सिद्धता, त्यांचे व त्यांच्या सहायकांचे परस्परसंबंध व एकंदर अंतर्गत परिस्थिति यांचें संपूर्ण ज्ञान मिळवून मी तुमच्या जयाप्रीत्यर्थ परतेन." अर्जुनाशीं बोलतांना श्रीकृष्ण म्हणतात ( उद्योगपर्व अ. ७९–११, १२ व २१ ):—

"युधिष्ठिराची बाजू इतकी सबळ आहे कीं, ती मी तेथें मांडीत असतां दुर्योधन मी सांगितल्याप्रमाणें करणार नाही तर सर्व लोकांच्या दृष्टीनें तो वध्य ठरेल. जो माझ्या दृष्टीनें वध्य ठरला, तो एकदां जगाच्याही दृष्टीनें वध्य ठरला कीं काम संपलें. ज्याप्रमाणें युधिष्ठिराची आज्ञा पाळणें हें माझें कर्तव्य आहे, त्याचप्रमाणें जगासमोर तो दुरात्मा व पापी आहे हें सिद्ध करणें हेंही माझें कर्तव्य आहे व तेंच मी तेथें जाऊन पार पाडणार आहें." भगवान् श्रीकृष्णांचे हे उद्गार त्यांचे सर्व राजकीय हेतू व्यक्त करावयास पूर्णपणें समर्थ आहेत.

श्रीकृष्ण कौरवांच्या राजनगरींत जात असतां ते केवळ स्वत:च्या ईश्वरी सामर्थ्यावर विश्वासून असावध अवस्थेंत गेले असें सांगण्याचा व समजण्याचाही प्रघात आहे. महाभारताच्या अनुसार तर ही समजूत खोटी आहेच; पण श्रीकृष्णांचें जीवन हें सर्वच धर्मनिष्ठांना प्रबल अधार्मिकावर विजय मिळविण्याच्या कार्यांत प्रत्यक्षच मार्ग-

दर्शक असल्यामुळें उगाच प्रत्येक वेळीं ते आपली ईश्वरी शक्ति प्रकट करण्याचाही संभव नाहीं. साधकांच्या अंत:करणांत आश्वासन निर्माण करावयास आवश्यक म्हणूनच ती शक्ति प्रकट होत असते. उत्तंकाला सांगतांना, मानवी देहांत मी मानवाप्रमाणेंच वागतों, असें स्वत: श्रीकृष्णांनींच स्पष्टपणें म्हटलेलें आहे. मानवतेचे मार्गदर्शक म्हणून त्यांची तीच भूमिका प्रत्यक्षांत उपयोगी पडणार आहे. कुरुराजसभेत जातांना याच भूमिकेनें ते गेले आहेत. अर्थातच कौरवपक्षीयांचें बळ, तेथें एकजुटीनें जमलेले आपले वैरी, त्यांचे आपल्याविषयीं असलेले दुष्ट भाव हें सर्व ध्यानांत घेऊन स्वत:च्या संरक्षणाची कडेकोट सिद्धता करूनच श्रीकृष्ण गेले.

**श्रीकृष्णांची सिद्धता**

राजा धृतराष्ट्राच्या व दुर्योधनाच्या दुरात्मतेची व घातपाती स्वभावाची पूर्णपणें कल्पना असल्यामुळें श्रीकृष्ण सर्व प्रकारची सिद्धता करून गेलेले होते. तत्कालीन प्रत्येक ज्ञात्या व्यक्तीस कौरवांच्या राजसभेंत श्रीकृष्णांनीं जाण्याची कल्पनाच धोक्याची वाटत होती. त्यांनीं स्वत: जाण्याची कल्पना बोलून दाखवितांच युधिष्ठिर त्यांना म्हणाले : ( उद्योगपर्व अ. ७२–८३ व ८४):—

"दुर्योधनाच्या अधीन असलेले जगांतील जवळजवळ सर्व क्षत्रिय सध्यां हस्तिनापुरांत एकत्रित झालेले आहेत. त्यांच्यामध्यें तूं एकट्यानें जाणें मला मुळींच आवडत नाहीं. तुला एकट्याला तेथें जाण्याची प्रेरणा देणें हा तुझा द्रोह होय. हे माधवा, तुझा द्रोह करून मिळणारें द्रव्य, देवपद, अथवा देवांचें राज्य सुद्धां आम्हांला नको. मग सामान्य सुखाची कथाच काय?"

प्रत्यक्ष हस्तिनापुरांत गेल्यावर श्रीकृष्णांचे हितचिंतक विदुर यांना सुद्धां श्रीकृष्णांनीं तेथें येण्याची कल्पना आवडली नाहीं. ते श्रीकृष्णांना म्हणतात ( उद्योगपर्व अ. ९२–२७ ) :–

"दुष्ट अंत:करणाच्या या बहुसंख्याक व संघटित शत्रूंच्यामध्यें तूं एकट्यानें येणें मला मुळींच आवडलें नाहीं. प्रत्येक ज्ञात्याला श्रीकृष्णांना येथें दगा होण्याचा संभव आहे असें वाटत असल्याचें

दिसून येतें." अर्थात श्रीकृष्णांना ही गोष्ट उघडपणेंच दिसत होती. म्हणून ते सर्व सिद्धतेनिशीं निघाले. महाभारतकार म्हणतात (उद्योगपर्व अ. ८३–११ ते २२ ):–

"युधिष्ठिराशीं बोलून जवळच असलेल्या सात्यकीला श्रीकृष्ण म्हणाले: माझा शंख, चक्र, गदा, सर्व प्रकारचीं इतर आयुधें, शक्ति, इत्यादि सर्व रथांत नीट सुव्यवस्थित ठेवा. दुर्योधन, कर्ण, व शकुनि हे सर्व दुष्ट बुद्धीचे लोक आहेत व बलवंतानें सुद्धां दुर्बल शत्रूची उपेक्षा करूं नये असें राजनीतिशास्त्र आहे." श्रीकृष्णांचें हें बोलणें ऐकून त्यांच्या अनुचरांनीं त्यांचा रथ शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज केला. "कालरूपी अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें प्रदीप्त, आकाशांत संचार करणाऱ्या विमानाप्रमाणें वेगवान्, सूर्य व चंद्रासारख्या तेजस्वी चक्रांनीं युक्त, मत्स्य, पशुपक्षी, चंद्र, अर्धचंद्र, विविध प्रकारचीं पुष्पें यांच्या आकृती कोरलेला, हिऱ्यामाणकांचें उत्कृष्ट काम केलेला, मोठा सुन्दर, उत्कृष्ट ध्वजपताका लावलेला कोणीही धर्षण करण्यास अशक्य, वाघाच्या चामड्यानें मढविलेला शत्रूचें यश हरण करणारा, व यादवांचा आनंद वाढविणारा असा तो त्यांचा उत्कृष्ट रथ होता. गरुडध्वज त्याच्यावर उभारण्यांत आला होता. विमानांत बसावें त्याप्रमाणें त्या मेरुशिखराप्रमाणें उंच व मेघगर्जनेप्रमाणें घोष करणाऱ्या रथांत श्रीकृष्ण सात्यकीला बरोबर घेऊन बसले."

श्रीकृष्ण स्वत:ची तर अशी सर्व प्रकारची सिद्धता करून निघालेच, पण त्यांच्याबरोबर संरक्षणार्थ सैन्यही होतें. महाभारतकार म्हणतात : (उद्योगपर्व अ. ८४–१, २)

"श्रीकृष्ण जात असतां त्यांच्याबरोबर खंदे लढवय्ये, महारथी व हातांत शस्त्रें सिद्ध असलेले असे दहा सेनापती होते. शिवाय एकसहस्र पायदळ व एक सहस्र घोडेस्वार होते. खाण्यापिण्याचें भरपूर साहित्य असून विपुल सेवक त्यांनीं बरोबर घेतलेले होते. केवळ येवढेंच करून श्रीकृष्ण थांबले नाहींत. कौरवांना साहाय्य करावयाच्या मिषानें त्यांचा एक सेनापति हार्दिक्य कृतवर्मा हा आपल्या एक अक्षौहिणी सैन्यासह म्हणजे जवळजवळ अडीच लक्ष

सैन्यासह हस्तिनापुरांत आधींच जाऊन बसलेला होता. कुरु-पांडवांच्या युद्धांत तो जरी कौरवांच्या बाजूनें असला तरी यादव व कौरवांचा संघर्ष होण्याचा प्रश्न उपस्थित होतांच श्रीकृष्ण हे यादवगणाचे मुख्य पुढारी असल्यामुळें तो पूर्णपणें त्यांच्याच बाजूचा होता. पुढें शिष्टाईला जातेवेळीं त्याचे यादव सैनिक चहू बाजूनें श्रीकृष्णांचें संरक्षण करीत होते. श्रीकृष्णांना बांधण्याचा राजसभेंत डाव चालू असतां कृतवर्माच हातांत शस्त्र घेऊन त्यांना विरोध करावयास राजसभेचें दार अडवून उभा होता असें वर्णन आहे. याप्रमाणें सैन्याची व सहायकांची सुव्यवस्थित रचना आधीं करूनच श्रीकृष्ण निघाले. त्यांच्या सिद्धतेंत खाद्यपेयादि पदार्थ बरोबर घेतल्याचेंही वर्णन आहे. याचें कारण काय असें कोणाला वाटेल. पण श्रीकृष्ण हे पांडवांचें सर्वस्वी मूळ असल्यामुळें त्यांच्यावर आघात करून त्यांना नष्ट करण्यांत पांडव पक्षाचा सर्वनाश आहे हें ओळखण्याइतके कौरव धूर्त होते, व त्यामुळें शत्रुपक्षाच्या या मुळावर ते कोठून व कसा घातक वार करतील याचा कांहींच नियम नसल्यामुळें सर्व प्रकारची सिद्धता बरोबर घेणें आवश्यक होतें. कूट-राजनीति सांगतांना कणिक म्हणतो:—

मूलमेवादितः छिन्द्यात्परपक्षस्य नित्यशः ।
ततः सहायांस्तत्पक्षान्सर्वांश्च तदनन्तरम् ।। १६
छिन्नमूले ह्यधिष्ठाने सर्वे तज्जीविनो हताः ।
कथं नु शाखास्तिष्ठेरंश्छिन्नमूले वनस्पतौ ।। १७
हन्यादमित्रं सान्त्वेन तथा दानेन वा पुनः ।। २३
तथैव भेददण्डाभ्यां सर्वोपायैः प्रशातयेत् ।। २४
शपथेनाप्यरिं हन्यादर्थदानेन वा पुनः ।
विषेण मायया वापि नोपेक्षेत कथंचन ।। ५३
प्रहरिष्यन्प्रियं ब्रूयात्प्रहरन्नपि भारत ।
प्रहृत्य च कृपायीत शोचेत च रुदेत च ।। ५६

—महाभारत, आदिपर्व अ. १४०

" नेहमीं शत्रुपक्षाच्या मुळांवर आघात करून तेंच प्रथम तोडून टाकावें. मग सहायक व इतर लोकांना ठार मारावें. अधिष्ठानच

छिन्नमूल झाल्यावर त्याच्यावर अवलंबून राहणारे इतर सर्व आपो-आपच मरतात. वृक्षाचें मूळ तुटल्यावर त्याच्या शाखा कधीं जिवंत राहूं शकतात काय? शत्रूला मारतांना तो जर आपल्यापेक्षां प्रबळ असेल तर उघड शस्त्रानेंच त्याला मारलें पाहिजे असें कांही नाहीं. देणगी देण्याच्या मिषानें त्याचा घात करतां येतो. पैसे चारून, त्याच्या परिचारकांना वश करून, विषादिक उपायांनीं त्याला खुशाल मारावें. दान, स्वागताचे देखावे, भेद, दंड, विष, माया, खोटें बोलणें, इत्यादि कोणत्याही उपायांनीं आपल्या शत्रूंना नष्ट करण्याचें उद्दिष्ट साधावें. त्यावर प्रहार करीत असतांही गोड बोलावें, प्रहार करून विनाशाचें काम पूर्णपणें पार पाडल्यावरही दयेचा देखावा करावा. हवें तर शोक करावा. रडावें सुद्धां."

श्रीकृष्ण हे पांडवांचें मूळ होतें म्हणून त्यांच्यावरच आघात केला पाहिजे ही कल्पना श्रीकृष्ण येण्याची नुसती वार्ता कळल्या-पासूनच कौरवांच्या सभेंत चर्चिली जात होती. श्रीकृष्णांच्या येण्यासंबंधांत आपलें काय धोरण ठेवावें याची चर्चा करण्यास्तव कौरवांची एक महत्त्वाची बैठक भरली असतां त्या बैठकींत दुर्योधन आपले भाव पुढीलप्रमाणें (उद्योगपर्व अ.८८–१३ ते १५) व्यक्त करीत आहे. :–

" मी असें ठरविलें आहे कीं, श्रीकृष्ण पांडवांचा सर्वस्वीं आधार असल्यामुळें त्यालाच बंदी करावें. एकदां त्याला बंदी केलें कीं यादव व पांडवच नव्हे तर सर्व पृथ्वीच माझ्या अधीन होईल. उद्यां सकाळींच कृष्ण येथें येणार आहे. कृष्णाच्या ध्यानांत न येतां व आपल्या पक्षाची कोणतीही हानि न होतां त्याला बंदी करण्याचा अथवा त्याच्या घाताचा अन्य कांहीं उपाय असेल तर तो आपण मला सांगा. "

असे उपाय योजण्याच्या संबंधांत कणिकाचा पट्टशिष्य राजा धृतराष्ट्र किती कुशल होता व तो मधुजिव्ह सर्प असून मुळांत त्याला हृदय वगैरे कांहींच कसें नव्हतें याचा उल्लेख मी माझ्या महाभारतावरील व्याख्यानांत धृतराष्ट्राचें स्वभावचित्र रेखाटतांना

केलेलाच आहे. त्यानें श्रीकृष्ण येत आहेत असें पाहून दुर्योधनानें जे बोलून दाखविले ते श्रीकृष्णांच्या विनाशाचे सर्व उपाय त्यांची व्यवस्था करण्याच्या मिषानेंच रचलेले होते. तोंडानें श्रीकृष्णांची भरपूर स्तुति करीत धृतराष्ट्रानें दुर्योधनास या संबंधांत ज्या आज्ञा केल्या व त्यानेंही ज्या पाळल्या त्यांचें शब्दचित्र महाभारतकारांनीं (उद्योगपर्व अ. ८५ व ८६) पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे :–

"हे दुर्योधना, श्रीकृष्णाच्या सन्मानासाठीं त्याच्या मुक्कामावर त्याच्या उतरण्याच्या उत्कृष्ट सोयी करा व त्याला लागणारे सर्व पदार्थ द्या. धृतराष्ट्राचें तें बोलणें ऐकून दुर्योधनानें श्रीकृष्णांच्या वाटेंतील प्रत्येक मुक्कामाच्या जागीं सर्व प्रकारची व्यवस्था केली. रत्नांनीं समन्वित व रमणीय अशा उतरावयाच्या जागा, सभा, उत्कृष्ट आसनें, शेंकडो सेवक, अलंकार, सुदर वस्त्रें, विपुल सुगंधी द्रव्यें, लावण्यवती स्त्रिया, सुदर पक्वान्नें इत्यादि सर्व प्रकारची व्यवस्था सिद्ध होती. श्रीकृष्णांचा पहिला मुक्काम वृकस्थल येथें व्हावयाचा होता. त्या ठिकाणीं तर कौरवांकडून विशेषच व्यवस्था होती. श्रीकृष्ण स्वत: येत आहे असें पाहतांच धृतराष्ट्र विदुराला म्हणाला, "हे विदुरा, एकाच वर्णाचे, बळकट शरीराचे, बाल्हिक देशांत उत्पन्न झालेले, चार चार श्रेष्ठ अश्व एकेकाला जुंपलेले असे सोन्याचे सोळा रथ, श्रीकृष्ण येथें येतांच मी त्याला देईन. नेहमींच ज्यांच्या मस्तकांतून मदाचा वर्षाव होत आहे असे सुंदर दांतांचे व युद्धकुशल आणि ज्यांपैकीं प्रत्येकाला आठ आठ सेवक आहेत, असे आठ हत्ती मी श्रीकृष्णाला देईन. अविद्धयोनि, लावण्यसंपन्न, सुवर्णांच्या दागिन्यांनीं अलंकृत अशा शंभर दासी व तितकेच दास मी श्रीकृष्णांना देईन. अजिन, वस्त्रें इत्यादि तर अगणित देईन. दिवसा व रात्रीं आपल्या विलक्षण तेजानें तळपणारा हा मणि मी कृष्णाला देईन. हें रत्न धारण करण्यास कृष्णच सर्वस्वीं योग्य आहे. एकाच दिवसांत चौदा योजनें जाऊं शकणारें वेगवान घोडे जुंपलेलें माझें खास वाहनही मी कृष्णाला देईन. येणाऱ्या कृष्णाच्या बरोबर जितके लोक व जितकीं वाहनें असतील त्याच्या आठपट अधिक भक्ष्यभोज्यादि पदार्थ श्रीकृष्णाकडे पाठवावे.

अंगावर विविध अलंकार घातलेल्या, लावण्यसंपन्न, अशा सहस्रावधि गणिका श्रीकृष्णांच्या स्वागतार्थ जातील. उद्यां सकाळीं येथें येणाऱ्या श्रीकृष्णाचें दर्शन घ्यावयास सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनीं जावें. दुःशासनाचें भवन हें दुर्योधनाच्या भवनापेक्षां देखील अधिक चांगलें आहे. तें सुशोभित करून अधिकच वैभवसंपन्न करावें. माझ्या व दुर्योधनाच्या अधीन जीं जीं रत्नें आहेत त्यांतील जीं जीं कृष्णाला आवडतील तीं ती सर्व त्याला द्यावी." धृतराष्ट्राच्या या सर्व उभारणींत श्रीकृष्णांना एक तर आपल्याकडे वळवून घ्यावें किंवा गुप्त प्रयोगांनी त्यांना नष्ट करून टाकावें असा दोन्ही प्रकारचा हेतु होता. तो हेतु आपण ओळखला असें विदुरानें त्याला त्याच्या तोंडावरच सांगितलें. तो म्हणाला : (उद्योगपर्व अ. ८७–७ व ८).

"तूं कर्तव्य म्हणून अथवा श्रीकृष्णांना आनंद व्हावा म्हणून हें मुळींच करीत नाहीस हें मी तुला शपथेवर सांगतों. ही सारी माया आहे. हें कपट आहे. तूं वरून केवढेंही जरी लपविलेंस व वेगळेंच सोंग आणलेंस तरी, हे राजा, तुझ्या अंतरीचा गूढ भाव मी पूर्णपणें ओळखला."

आपल्या मुलीसारख्या असलेल्या सुनेला तिच्या पुत्रांसहित जाळून मारावयास व राज्याचे अधिकारी असलेल्या व सर्वस्वीं आपल्या अधीन असलेल्या भावाच्या मुलांना विष द्यावयास ज्याला काडीइतकीही दिक्कत वाटत नाहीं तो पहिल्या प्रतीचा पाताळयंत्री धृतराष्ट्र या सर्व आज्ञा आपल्या शत्रूच्या आधारस्तंभाविषयीं करीत आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे त्यांचें स्वरूप नीटपणें ध्यानांत येतें. प्रबल शत्रूविरुद्ध योजावयाच्या या सर्व उपायांचा कौटिल्यानें अत्यंत विस्तारपूर्वक उल्लेख केलेला आहे. व या पद्धतीनें राजकारणी पुरुषांनीं आपल्या अनेक हितशत्रूंना आजवर नष्टही केलेलें आहे. नागपूरकर भोसल्यांचे सेनापति भास्करराम कोरटकर यांनीं बंगालवर स्वारी करून अलिवर्दीखानाला जेव्हां 'त्राहि भगवन्' करून सोडलें, तेव्हां त्यानें मेजवानीला बोलावूनच विश्वासघातानें त्यांची, त्यांच्या वीस साथीदारांसह हत्या केली

आहे. नाना फडणविसांना त्यांचे हितशत्रु दौलतराव शिंदे यांनीं असेंच कपटानें फसवून बंदी केलें होतें. व बादशहा औरंगजेबानें जसवंतसिंगाचा मुलगा पृथ्वीसिंग याला प्रेमानें बोलावून व विषारी पोषाख देऊनच ठार मारलें. इतिहासांतलीं हीं उदाहरणें लक्षांत घेतलीं म्हणजे राजा धृतराष्ट्राचें हें वर्तन कोणालाही आश्चर्यकारक वाटण्याचें कारण नाही. पण धृतराष्ट्राचा हा डाव तो ज्यांच्यावर करीत होता ते अशा प्रकारच्या कपटनाटकांना पुरेपूर ओळखणारे कुशल होते. त्यांनीं त्याचा तो डाव इतक्या बेमालूमपणें उलटवून धृतराष्ट्राला फशी पाडलें कीं त्यानें जागच्या जागीच हात चोळीत स्वस्थ बसावें. कसें तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

---

कर्णाला तर स्वतःच्या कुकृत्यांचाच इतका पश्चात्ताप होत होता कीं, त्यानें श्रीकृष्णांना स्पष्टपणेंच असें सांगून टाकलें कीं (उद्योगपर्व, १४१-२३ व १४३-४५):-

" हे श्रीकृष्णा, मी जें पांडवांना केवळ दुर्योधनाचें प्रिय व्हावें म्हणून कटु वाक्य बोललों, त्या कुकृत्यानें माझें अंतःकरण जळत आहे. तो धर्मात्मा युधिष्ठिरच ह्या जगाचा शाश्वत राजा होवो. ज्याचा योद्धा धनंजय आहे व ज्याचा नेता श्रीकृष्ण आहे, त्याला साम्राज्य प्राप्त होणें मुळीच अशक्य नाही. स्वतः मी व सारे कौरव-पक्षीय राजे व समग्र क्षत्रिय गांडीवरूपी अग्नींत प्रवेश करून दग्ध होऊं यांत मला मुळींच शंका नाहीं." कौरवपक्षाकडील महत्त्वाचे सेनापतीच शत्रुपक्षाच्या जयाची अशी इच्छा करणारे असल्यावर कौरवांचा पराजय व्हावा व त्यांची बहुसंख्या केवळ पटावरची ठरावी यांत नवल वाटण्याचें कारण नाहीं. कौरव व पांडव यांच्या उभयविध सैन्यांची अंतर्गत स्थिति नीट ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे. श्रीकृष्ण कुरुसभेंतून निघून गेल्यावर युद्ध निश्चित होऊन उभय दलांनीं कुरुक्षेत्राच्या समरांगणांत प्रवेश केला. राजा दुर्योधना-कडे अकरा अक्षौहिणी सैन्य होतें. मोठमोठे विख्यात योद्धे त्याच्या पक्षांत होते. त्यांनी आपल्या व शत्रूच्या सैन्यांतील बलाबलाची नीट कल्पना भीष्माकडून समजावून घेतली व त्यांना प्रथम सेनापति म्हणून नियुक्त केलें. भीष्म, द्रोण, कर्ण व शल्य हे कुरुपक्षाकडील प्रमुख सेनापति होते. पांडवांच्या पक्षाकडे भगवान् श्रीकृष्णांनीं द्रुपद, विराट, सात्यकि, धृष्टकेतु, शिखंडी व सम्राट् जरासंधाचा पुत्र सहदेव हे सहा सेनाप्रणेते नियुक्त करून त्यांच्यावर सेनापति म्हणून धृष्टद्युम्नाला नियुक्त केलें. धृष्टद्युम्नाला सेनापति म्हणून नियुक्त करण्यांत श्रीकृष्णांनी आपलें अपूर्व बुद्धिचातुर्य प्रकट केलें होतें. धृष्टद्युम्न हा द्रौपदीचा सहोदर बंधु होता; व हें महा-युद्ध मुख्यतः द्रौपदीच्या इभ्रतीसाठीच लढलें जात असल्यामुळें कौरवांविषयीं त्याच्या अंतःकरणांत आत्यंतिक द्वेषभाव नांदणें अगदीं स्वाभाविक होतें. त्याला नुसता विजयच अभिप्रेत नसून शत्रपक्षाचा समूळ विनाश अभिप्रेत होता. अल्पसंख्य पक्षाला ज्या

जिद्दीच्या नेतृत्वाची आवश्यकता असते तसेंच धृष्टद्युम्नाचें नेतृत्व असल्यामुळें त्याला बुद्धयाच हें पद देण्यांत आलें होतें. धृष्टद्युम्नाच्याही वर वरिष्ठ अधिकारी म्हणून अर्जुनाला नियुक्त करण्यांत आलें होतें. अर्जुन हा सेनापति–पति होता. पण हें युद्ध निव्वळ शत्रुपक्षाशीं पराक्रमानें लढावयाचें युद्ध नसून आपसांतील युद्ध असल्यामुळें त्यांत मानसिक स्थिरतेचा प्रश्न सर्वांत महत्त्वाचा होता; व त्या दृष्टीनें युद्धाचीं सर्व सूत्रें आत्यंतिक स्थिरबुद्धीच्या व्यक्तीकडेच असणें आवश्यक होतें. म्हणून अर्जुनाचेंही नियंत्रण करण्याचे अधिकार श्रीकृष्णांच्याकडे सोपविले होते. महाभारतकार म्हणतात (उद्योगपर्व अध्याय १५७–१५ व १६) :–

"अर्जुनाचाही नेता त्याच्या सारथ्याचें काम करणारा संकर्षणानुज, महाबुद्धिशाली, श्रीमान् श्रीकृष्ण होता." युद्धें जीं जिंकलीं जात असतात, तीं केवळ सैन्याच्या संख्याबलावर खात्रीनें नव्हे. त्यासाठीं कांहीं महत्त्वाच्या आंतरिक गुणांची आवश्यकता असते. ह्या दृष्टीनें कुरुपांडव सैन्याचें नीट निरीक्षण केलें तर बहुसंख्याक कौरवपक्षांत पराजयाचीं सर्व कारणें जशीं स्पष्टपणें दिसून येतात, तशींच अल्पसंख्य पांडव पक्षांत विजयी होण्याचीं पदचिन्हें स्पष्टपणें आढळून येतात. पांडवांचा पक्ष हा एकतंत्री व संघटित पक्ष आहे हा त्याचा सर्वांत महत्त्वाचा विशेष होय. त्यांच्या पक्षाचें एकमात्र नेतृत्व भगवान् श्रीकृष्णांच्या व्यक्तित्वांत पूर्णपणें समाविष्ट झालेलें आहे. सर्व लोकांची त्यांच्यावर अपरंपार श्रद्धा असून ते म्हणतील त्या दिग्दर्शनानुरूप चालावयाचें हा प्रत्येकाचा निर्धार आहे. त्यांच्याविषयीं कोणाच्याही अंतःकरणांत तिळमात्र मत्सर नसून सर्वांच्या अंतःकरणांत केवळ प्रेम, भक्ति व आत्यंतिक विश्वास आहे. पांडवांच्या पक्षाचा दुसरा महत्त्वाचा गुणविशेष म्हणजे उद्दिष्टाच्या न्याय्यतेबद्दल त्यांची पूर्ण श्रद्धा असून महान् धर्मतत्त्वासाठीं व न्यायाच्या प्रतिष्ठापनेसाठींच आपण झगडतों आहोंत अशी त्यांच्या ठिकाणीं नितांत श्रद्धा आहे. त्यामुळें ध्येयवादाच्या ज्वलंत निष्ठेची बैठक त्यांना लाभलेली आहे. पांडवांच्या पक्षाचा तिसरा महत्त्वाचा गुणविशेष म्हणजे शत्रूविषयीं त्यांच्या अंतःकर-

णांत पूर्णपणें तिरस्कार नांदत असून त्याच्या विनाशाविषयीं तो पक्ष अत्यंत उत्सुक आहे. त्या पक्षाचा एक नेता सात्यकि हा बलरामांनीं कौरवांशीं संधि करावा असें नुसतें सुचविल्याबरोबर संतापून किती कठोर वाक्यें उच्चारतो तें पाहण्यासारखें आहे. तो म्हणतो (उद्योगपर्व अ. ८३) :–

" जसें पुरुषाचें अंतःकरण असतें तशीच वाणी त्याच्या तोंडून बाहेर पडते. जगांत शूर लोक जसे असतात, तसे षंढही असतात व केव्हां केव्हां तर षंढ व बलसंपन्न शूर हे एकाच कुळांत जन्म पावलेलेही आढळतात. एकाच वृक्षाच्या दोन शाखांपैकी एकीला फळें येतात व दुसरीला येत नाहींत. तसेंच हें आहे. हे बलरामा, तूं जी भाषा बोललास तिच्यामुळें मला तुझा राग येत नाहीं. पण जे स्वस्थपणें ही तुझी वटवट ऐकून घेत आहेत त्यांचाच मला खरा राग येतो. धर्मराजाचा थोडाही दोष काढणारा मनुष्य निर्भयपणें या सभेंत बोलू कसा शकतो याचेंच मला आश्यर्य वाटतें. जर पांडवांचें पैतृक धन कौरव त्यांना देणार नाहीत, तर मी माझ्या पाजळलेल्या तीक्ष्ण बाणांनीं त्यांचा मद जिरवून या महात्म्या युधिष्ठिराच्या पायावर त्यांना नमवीन व जर ते नमणार नाहींत तर माझ्या क्रोधाग्नीत ते आपल्या अमात्यासह सपुत्र-पौत्र-बांधव दग्ध होतील. शत्रूजवळ भीक मागणें हें अत्यंत अधर्म्य असून अकीर्तिकारक आहे. दुर्योधन, शकुनि, कर्णादिकांना ठार मारून आम्ही पांडवांना राजसिंहासन प्राप्त करून देऊं. एक तर धृतराष्ट्र पांडवांना त्यांचें राज्य तरी देईल अथवा रणांत मरून शत्रु पृथ्वीवर तरी शयन करतील. दुसरा कोणताही मार्ग आतां यांत नाहीं." सात्यकीचे हे उद्गार वैयक्तिक नसून ते प्रातिनिधिक स्वरूपाचे आहेत. एरवीं तो राजा दुर्योधनाचा खाजगी मित्र होता व रणांगणांतही त्याच्या मित्रत्वाची दुर्योधनानें त्याला आठवण दिल्यावर त्यानें दुर्योधनाशीं प्रेमळपणानें संवाद केल्याचें महाभारतांत हृदयंगम वर्णन आहे. जयद्रथाच्या वधासाठीं अर्जुन कौरव सैन्याची फळी फोडून गेला असतां त्याचा शोध लागेना म्हणून घाबरून युधिष्ठिरानें सात्यकीला त्याच्या मागावर पाठविलें. त्या

वेळीं शत्रुसैन्याची फळी फोडून आंत घुसत असलेल्या सात्यकीला दुर्योधनानें अडविलें व त्यांचा संग्राम झाला. त्या वेळीं दुर्योधनानें त्याला ही आठवण दिली. सात्यकि हंसला व म्हणाला, 'युद्धांत त्याचा काय उपयोग ?' शत्रुपक्षाविषयीं पांडवपक्षांत किती तिरस्कार नांदत होता याचीं आणखीही कित्येक उदाहरणें आहेत. याच्या उलट कौरव पक्ष संख्येनें केवढाही मोठा असला तरी त्यांतील सर्व सेनापति आपला पक्ष अन्याय्य आहे याची खात्री बाळगणारे, शत्रुपक्ष धर्म्य आहे अशी श्रद्धा असलेले व आपण मेलों तरी चिंता नाहीं, पण विजय मात्र शत्रुपक्षालाच मिळावा अशी इच्छा करणारे आहेत. युद्धशास्त्राच्या विवेचनानुसार अशा पक्षाला जय मिळण्याची स्वप्नांत तरी शक्यता आहे काय ? शिवाय त्या पक्षांत नेतृत्वाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या लोकांचींच आपसांत विलक्षण स्वरूपाचीं भाडणें असून कार्यापेक्षांही व्यक्तिवादी अहंकाराचा त्यांच्यावर विलक्षण पगडा बसलेला दिसून येतो. कौरव पक्षाचे महनीय सेनापति भीष्म व कर्ण यांचींच परस्परांत किती विलक्षण भांडणें आहेत हें मी माझ्या 'महाभारतावरील व्याख्यानें' या ग्रंथांत दाखविलेंच आहे. कारणें कोणतींही असोत व कोणीही बरोबर वा कोणीही चूक असो. पण युध्यमान पक्षांपैकीं महत्त्वाचे नेते जर आपआपसांतच भांडत असले तर तें दृश्य सैन्यांतील शिस्तीच्या दृष्टीनेंच किती विलक्षण स्वरूपाचें ठरतें ! योद्धयांच्या सभेंत कर्णासारख्याचा भीष्मांनीं अर्धरथी म्हणून उपहास करणें व भीष्मासारख्या सर्वश्रेष्ठ व्यक्तीला कर्णानें तोंड टाकून बोलणें, भीष्मांनीं त्याला त्याचा वध करणें सोपें आहे असें धमकावणें व 'माझ्या पराक्रमांत सेनापतित्वामुळें ह्या म्हाताऱ्याची कीर्ति होण्याचा संभव आहे म्हणून हा मरेपर्यंत मी हातांत शस्त्र धारण करीत नाहीं व लढणार नाहीं' असें म्हणून कर्णासारख्या महत्त्वाच्या योद्धयानें भीष्मांचें पतन होईपर्यंत रणभूमीकडे ढुंकूनही न पाहणें हे सारे प्रकार काय दर्शवितात ? यांत भीष्म बरोबर असले अथवा कर्ण बरोबर असला तरी इतर अनेक अनुचर योद्धयांना व सैनिकांना कोणतें उदाहरण होतें ? हे कुरुपक्षीय योद्धे साध्या संवादांतसुद्धां

एकमेकांना लागट बोलतांना व ठार मारावयास उठतांना आढळतात याचा अर्थ काय ? अश्वत्थामा व कर्ण हे साध्या संवादांतच एकमेकांचा जीव घ्यावयास उठले व दुर्योधनानें त्यांना कसेंबसें आवरून तात्कालिक संघर्ष टाळला असें वर्णन आहे. कृपाचार्य व कर्ण यांच्या झटापटी तर प्रसिद्धच आहेत आणि या विषयांतील सर्वांत घातक प्रकरण म्हणजे शल्य व कर्ण यांच्या संवादाचें होय. यावरून कौरवांचा पक्ष संख्येनें मोठा असला तरी किती विघटित होता याची कल्पना येते. महाभारतकार भगवान् व्यास यांनीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे की,

**बहवो यत्र नेतारः सर्वे पंडितमानिनः ।**
**सर्वे महत्त्वमिच्छन्ति तद्राष्ट्रमवसीदति ।।**

'ज्या राष्ट्रांत नेतेच पुष्कळ असतात व ते सर्वच स्वतःस शहाणे समजणारे असतात व त्यांपैकीं प्रत्येकजण महत्पदाची अभिलाषा धरणारा असतो तें राष्ट्र लवकरच विनाश पावतें.'

महर्षि व्यासांनीं केलेली राष्ट्रविनाशाची ही मीमांसा कौरवांच्या पक्षाला जशीच्या तशी लागू पडते. दुर्योधनानें जे लोक एकत्र आणले होते ते एकत्र आणतांना त्यांपैकीं प्रत्येकाला त्यानें हव्या त्या उपायानें आपल्या पक्षांत ओढलें होतें. वस्तुतः ते आपणांस अनुकूल आहेत कीं नाहींत याचाही त्यानें कधींच फारसा विचार केलेला नव्हता. आपल्या पक्षाचें बळ वाढविणें म्हणजे युद्धसहायकांची संख्या वाढविणें असें तो गृहीत धरून चालला होता. कांहीं महत्त्वाच्या लोकांना तर त्यानें त्यांच्या मनोवृत्तीचा विचारही न करतां फसवून आपल्याकडे आणलें व येतांना ते धर्मपाशांत सांपडून आले असले तरी त्यांचीं शरीरें केवळ आपल्याकडे आहेत, मन आपल्याकडे नाहीं हें न ओळखून त्यानें सेनापतित्वासारखे महत्त्वाचे अधिकारही त्यांच्याकडे सोंपविले! मद्राधिपति शल्य हें याचें महत्त्वाचें निदर्शन होय. शल्य पांडवांचा मामा. दुर्योधनाविषयीं त्याच्या अंतःकरणांत काडीइतकेंही प्रेम असण्याचा संभव नसून असला तर वस्तुतः रागच असावयाचा. अशा व्यक्तीस वचनांत पकडून दुर्योधनानें फसवून आपल्या बाजूस आणल्यावर

तिचा दुर्योधनावरील राग वाढला असेल कीं कमी झाला असेल ? पण शल्याच्या मनोवृत्तीचा विचारही न करतां दुर्योधनानें त्याला नुसतें आपल्या पक्षांतच आणलें नाहीं, तर त्याला सेनापतित्वाचा अधिकारही त्यानें देऊन टाकला. तात्पर्य, एकंदर विघटना व परस्पर-मत्सर यांनी प्रेरित झालेल्या लोकांची कशीबशी एकत्र उभारलेली फळी हें दुर्योधनाच्या बहुसंख्य सैन्याचें वस्तुतः स्वरूप होतें. ज्वलंत विश्वासाचे अल्पसंख्य पण एकात्मता उत्पन्न झालेले एकनेतृत्व-वादी व एकसंध अथवा एकजीव झालेले मूठभर ध्येयवादी लोक जें करूं शकतात तें विघटित, मत्सरी, आपसांत फूट असणारे व लोभाविष्ट असे असंघटित बहुसंख्याक लोक कधीच करूं शकत नाहींत. कौरव व पांडव यांच्या पक्षांची ही अंतर्गत वस्तुस्थिति नीटपणें ध्यानांत घेतली तर पांडवांच्या विजयाची व कौरवांच्या पराजयाची यथार्थ मीमांसा समजून येते. असंघटित बहुसंख्याक पक्षापेक्षां संघटित अल्पसंख्य पक्ष हाच वस्तुतः बहुसंख्याक असतो. कारण असंघटित व विद्वेषी बहुसंख्य पक्षांत प्रत्येक व्यक्ति एकटी असल्यामुळें ती वस्तुतः निःसाहाय्यच असते. त्याऐवजी संघटित अल्पसंख्य पक्ष केवळ मोजणीच्या दृष्टीनें कितीही अल्पसंख्य भासला तरी ते सारे अल्पसंख्य वस्तुतः एकजीव असल्यामुळें एका व्यक्तीपेक्षां ते अर्थातच बहुसंख्य ठरतात. शिवाय मूलभूत ध्येय-विषयक पावित्र्यामुळें लढण्यांत, मरण्यांत वा मारण्यांत कर्तव्य-पूर्तीचा जो परमोच्च आनंद व त्यामुळें मिळणारा अपार रणो-त्साह पांडवपक्षाच्या ठिकाणीं निसर्गतःच होता. तो कौरवपक्षाला कसा लाभणें शक्य होतें ? ऐन युद्धाच्या क्षणीं झालेल्या एका विलक्षण प्रकारानें तर मूळच्या निरुत्साही लोकांवर आणखीच विलक्षण परिणाम केला. गुरुवंदन करून युद्धारंभीं युधिष्ठिर कुरुसैन्यांतून परतत असतां उभय सैन्यांच्या मध्यभागीं उभे राहून त्यानें अशी घोषणा केली कीं, "आमचा पक्ष न्यायाचा व धर्माचा आहे हें ओळखून जो कोणी अजूनही कौरवांचा पक्ष सोडून आमच्याकडे यावयास सिद्ध असेल त्याचा अंगीकार करावयास आम्ही सिद्ध आहोंत." युधिष्ठिरांची ही घोषणा ऐकतांच राजा

दुर्योधनाचा खास बंधु युयुत्सु हा दुर्योधनाचा पक्ष सोडून पांडवांच्या पक्षाकडे आला. त्याचा कुरुसेनेंतील सर्वसामान्य वातावरणावर केवढा विलक्षण परिणाम झाला असेल ! असो.

प्रत्यक्ष युद्धांत प्रतिपक्षाकडील भीष्मांच्या कर्तव्यनिष्ठेची व विलक्षण रणोत्साहाची श्रीकृष्णांना पूर्णपणें कल्पना होती. मंत्र-युद्धानें विजयाची पूर्ण सिद्धता त्यांनीं करून ठेविली असली तरी तो विजय प्रत्यक्ष पदरांत पडणें हें रणांगणावरील कौशल्यावरच अवलंबून होतें. अठरा दिवसांच्या भीषण महायुद्धांत जवळजवळ चाळीस लक्ष लोकांचा प्रचंड संहार घडवून आणून श्रीकृष्णांनींच अंतिम विजयश्री पांडवांना मिळवून दिली. आसुरी शक्तीवर विजय संपादन करण्यासाठी जीं साधनें भगवान् श्रीकृष्णांना हाताशीं धरावीं लागलीं ती श्रीरामचंद्राप्रमाणें लक्ष्मण, हनुमंता-सारखीं स्वयंपूर्ण नव्हतीं. तर त्यांच्यांत असलेले अनेक अंगभूत दोष मारक ठरण्याचाही संभव होता. भगवंतांचें विभूतिमत्त्व यांत आहे कीं, त्यांनीं या तोटक्या साधनांनींच प्रचंड आसुरी शक्तीवर हंसत हंसत अवघ्या अठरा दिवसांत देदीप्यमान विजय संपादन केला. युद्धाच्या प्रारंभींच त्यांच्या हातांतील धर्मस्थापनेचें अमोघ साधन जो नरोत्तम नर अथवा अर्जुन तो नुसता समोरच्या शत्रुपक्षीय नातलगांना पाहतांच खाजगी नात्यागोत्यांतील प्रेम, वत्सलता, ममता इत्यादि भावनांना वश होऊन व महायुद्धाच्या भयानक परिणामांनीं केवढें अधःपतन होईल याची कल्पना मनांत आणून खचला. त्याच्या अंगाला कंप सुटून हातांतील गांडीव धनुष्य त्यानें टाकून दिलें व कौरवांनीं आपणास ठार मारलें तरी चालेल, पण आपण म्हणून त्यांच्यावर हात उचलणार नाहीं; इहलोकीचें राज्यच काय पण त्रैलोक्याचेंही राज्य मिळालें तरी तें स्वजनांच्या रक्तानें बरबटलेलें व गुरुहत्या करून मिळणारें असल्यास मला तें नको असें म्हणून स्वस्थ बसला. अगदीं आजच्या विशुद्ध आश्रमीय सर्वोदयवाद्यांप्रमाणें अर्जुन युद्धांत मरण पत्करा-वयास तयार होता; पण तें अप्रतिकारक अहिंसकाची भूमिका स्वीकारूनच काय तें होय. पांडवपक्षाकडील हा आधारभूत

सेनापतीच असा हातपाय गाळून स्वस्थ बसल्यावर श्रीकृष्णांना सुद्धां किती विलक्षण वाटलें असल ! त्याचा तो सारा मोह नष्ट करण्यासाठी भगवद्गीतारूपी विश्वोद्धारक तत्त्वज्ञानाचा त्याला उपदेश करून व विश्वरूपदर्शनाच्या द्वारें त्याला प्रत्ययज्ञान करून देऊन भगवान् श्रीकृष्णांना प्रथम त्याच्या बुद्धीवरील मोहाचें हें पटल फाडून टाकावें लागले. अर्जुन युद्धास सिद्ध झाल्यावरही पुढें जो पांडवांनीं विजय संपादन केला त्याचें सर्व श्रेय केवळ भगवान् श्रीकृष्णांचें आहे. अंतिम विजयावर लक्ष केंद्रित करून तो विजय धर्माचा असल्यामुळें 'काट्यानें काटा काढावा' या न्यायानें शत्रूच्या विनाशासाठी जो जो मार्ग आवश्यक असेल तो तो धर्म्य ही रणनीति श्रीकृष्णांनी स्वीकारली व अत्यंत बिकट परिस्थितींत तपशिलावर लक्ष केंद्रित करून हातचा विजय घालविण्यापेक्षां अंतिम तत्त्वविजयावर लक्ष केंद्रित करून आवश्यक असेल तो तपशील त्यांनीं मान्य केला.

कौरव पक्षाचा विजय होणें म्हणजे सदाचेंच अधर्माचें अभ्युत्थान होणें व राजसत्तेला कोणत्याही मूल्यांचें नियंत्रण असूंच न शकणें होतें. ही गोष्ट नष्ट करावयाचा एकच मार्ग होता व तो मार्ग म्हणजे तो पक्ष नष्ट करणें हा होय. जर तो पक्ष साधनशुचितेच्या अथवा धर्माच्या तपशिलाच्या बारीकसारीक गोष्टींचा विचार केल्यानें जगत असेल तर ते सारे तपशील व तीं सर्व साधनें, साधनें म्हणून स्वतंत्र रीतीनें केवढीही शुद्ध असली तरी अधार्मिक व पापमयच ठरतील. ज्यांचा अंतिम परिणाम अधर्ममूल्यांच्या स्थापनेंत होतो त्या गोष्टी शुद्ध असल्या तरी पापमय आहेत, व ज्यांचा अंतिम परिणाम धर्ममूल्यांच्या स्थापनेंत होतो त्या गोष्टी दिसायला पापमय वाटल्या तरी वस्तुतः त्या पुण्यमयच होत. याच नीतीचा अवलंब करून श्रीकृष्णांनीं आपल्या अपूर्व बुद्धिमत्तेनें व अलौकिक सामर्थ्यानें पांडवांना विजय प्राप्त करून दिला.

कुरु-पांडवांच्या त्या महायुद्धाकडे पहाण्याचे प्रत्येकाचे दृष्टिकोन वेगवेगळे होते. कौरवांचा दृष्टिकोन हा केवळ सत्ता बळकाविणारा व नीचतम स्वार्थी होता, तर पांडवही आपल्या अधिकाराप्रीत्यर्थ

झगडत असले तरी स्वतःच्या न्याय्य हक्कांकरतां ते झगडा करीत होते हें ध्यानांत घेतलें म्हणजे पांडवांचाही युद्धाकडे पहाण्याचा दृष्टिकोन वस्तुतः स्वार्थीच होता हें मान्य करणें भागच पडतें. तो त्यांचा स्वार्थ धर्माच्या अविरुद्ध असलेला, न्यायाला धरून असलेला, उदात्त स्वार्थ होता एवढेंच फार तर म्हणतां येईल; पण तो स्वार्थ होता हें निर्विवाद आहे. आजच्या नीतिशास्त्राच्या परिभाषेंतील या उदात्त स्वार्थाचा सुद्धां ज्याच्या अंतःकरणाला तिळमात्र स्पर्श नव्हता अशी व्यक्ति केवळ भगवान् श्रीकृष्ण हीच होती. त्यांना या युद्धांतून स्वतःसाठीं कोणतेंही राज्य निर्माण करावयाचें नव्हतें. पण कोणतेंही स्वार्थमय प्रलोभन मुळींच नसतांनादेखील एवढ्या भीषण संहारकांडाचे खरे प्रेरक मात्र तेच होते. नीतिमूल्यांचें संरक्षण व विश्वकल्याण ह्या दोन उद्दिष्टांसाठी तो भीषण नरमेध श्रीकृष्णांना आवश्यक वाटला. त्यांचें 'स्व' विश्वरूप होऊन गेल्यामुळें त्या महान् ध्येयाच्या पूर्तीसाठीं जे आड्वे आले ते माया, मोह, ममता इत्यादि मानवी मनोविकारांना बाजूला टाकून नष्ट करून टाकणेंच त्यांना आवश्यक वाटत होतें. जिचें शुद्धीकरण अशक्य ती राजसंस्था नष्ट करून टाकणें हेंच आवश्यक ठरतें; म्हणून पुढच्या पुनर्रचनेसाठीं ज्या उपायानें तो विनाश घडवून आणतां येईल तो प्रत्येक उपाय त्यांनीं पत्करला. कांट्यानें कांटा काढून पुन्हां तो कांटाही फेंकून देण्यासारखेंच हें आहे. अंतिम विजयांत धर्म-स्थापना होती. त्यावर लक्ष केंद्रित करून अवघ्या अठरा दिवसांत श्रीकृष्णांनीं तो प्राप्त करून घेतला. भारतीय युद्धाचा संपूर्णपणें विचार केला तर त्या युद्धांतील विजयश्रीचें सर्व श्रेय एकट्या श्रीकृष्णांचें आहे ही गोष्ट मान्य करावीच लागते. या दृष्टीनें श्रीमत् भगवद्गीतेच्या प्रारंभीं करावयाच्या सांप्रदायिक मंगला-चरणांत एका कवीनें घातलेला एक श्लोक अत्यंत अर्थपूर्ण आहे. तो म्हणतो :—

**भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गांधारनीलोत्पला**
**शल्यग्राहवती कृपेण महता कर्णेन वेलाकुला ।**

अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी ।
सोत्तीर्णा खलु पांडवै रणनदी कैवर्तकः केशवः ।।

" भीष्म व द्रोण हे दोन जिचे तट आहेत, जयद्रथ हेंच जिचें जल, शकुनि हेंच जिच्यांतील नील कमल, शल्य हा जिच्यांतील क्रूर जलचर, व कर्ण आणि कृपाचार्य यांनीं जिची मर्यादा आकुल करून टाकलेली आहे, अश्वत्थामा व विकर्ण हे जिच्यांतील घोर मगर होत अशी भयंकर व दुर्योधनरूपी भोंवऱ्यानें युक्त अशी रणनदी केवळ श्रीकृष्णरूपी नावाड्याच्या साहाय्यानें पांडवांना तरतां आली. "

जर भगवान् श्रीकृष्ण नसते तर काय झालें असतें एवढें पाहिलें म्हणजे महायुद्धाच्या यशाचें श्रेय कोणाकडे जातें याची कल्पना येते. युद्धाच्या प्रारंभीच मोहवश झालेल्या अर्जुनाला भगवान् श्रीकृष्ण होते म्हणून गीतोपदेश झाला व तो युद्धासाठीं उभा राहिला. जर श्रीकृष्ण नसते तर महारथी पार्थ कौरवांच्या हातून फुकट मरता व युद्धाचा संभवही उरताना. इतकेंच नव्हे तर संजयाच्या शिष्टाईतच धृतराष्ट्राच्या धर्मदंभाच्या स्वाधीन होऊन युधिष्ठिराच्या इच्छेनुसार पांडव भिक्षा मागत हिंडत राहिले असते! प्रत्यक्ष युद्ध सुरू झाल्यानंतरमुद्धां श्रीकृष्णामुळेंच विजयाचें पारडें पांडवांच्या बाजूला वळतांना दृष्टीस पडतें. केवळ युद्ध सुरू झाल्यानंतरच्या घटनांचा विचार केला तरी सुद्धां ही गोष्ट मनाला पटेल. वानगीदाखल आपण कांहीं उदाहरणेंच पाहूं.

(१) कौरवांचे पहिले विख्यात सेनापति भीष्म हे मृत्युंजय व इच्छामरणी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांना जिंकणें कोणालाही केवळ दुरापास्त होतें. आपल्याशिवाय भीष्मांना कोणीही मारूं शकणार नाहीं हें ओळखून युद्धाच्या तिसऱ्या दिवशीं व नवव्या दिवशीं स्वतः श्रीकृष्ण त्यांच्या अंगावर चालून गेले. पण श्रीकृष्णांनीं स्वतः भीष्मांना मारावें ही गोष्ट पांडवांना मान्य नसल्यामुळें अर्जुनानें विविध प्रकारच्या आणा घालून श्रीकृष्णांना परतविलें. नवव्या दिवशीं रात्रीं शेवटीं श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरास असें सांगितलें कीं, आतां तुम्हीं मलाच सेनापति म्हणून नियुक्त करा. मी आव्हान-

पुरस्सर भीष्मांना युद्धांत ठार मारतों. आपल्यासाठीं श्रीकृष्णांनीं हातांत शस्त्र घेऊन स्वतःची प्रतिज्ञा मोडावी हें युधिष्ठिराला मान्य होईना. म्हणून त्यांनीं श्रीकृष्णांना असें विनविलें कीं, ' तुम्ही आमच्यासाठीं आपली प्रतिज्ञा न मोडतां केवळ आमच्या-बरोबर भीष्मांकडे चला. त्यांनीं महायुद्धाच्या प्रारंभींच मला असें सांगितलें आहे कीं, मी माझ्या मृत्यूचा उपाय तुला सांगेन.' युधिष्ठिराच्या या विनंतीच्या अनुरूप श्रीकृष्णांसहित पांडव भीष्मांच्या शिबिरांत गेले व भीष्मांनी महामनस्कतेनें, इतकेंच नव्हे तर धर्मविजयासाठी आपला शरीरपात होणें आवश्यकच आहे हें ओळखून त्यांनीं स्वतःच्या मृत्यूचा उपायही सांगितला. त्यांनीं पांडवांना असें सांगितलें कीं, पंचाल कुळांतील शिखंडी हा जन्मतः स्त्री असून पुढें योगायोगानें पुरुष झालेला आहे. मी शुद्ध क्षत्रिय असल्यामुळें अशा स्त्रीपूर्व व्यक्तीशीं कधींही युद्ध करणार नाहीं. त्याला तुम्ही उद्यां माझ्या रथासमोर उभे करा. म्हणजे माझें युद्ध करणें बंद होईल व त्यानंतर तुम्हीं माझ्यावर हवे तितके प्रहार करा. हे आघातसुद्धां अर्जुनानेंच केले तरच माझ्या विनाशाची शक्यता आहे. माझी आज्ञा म्हणून अर्जुनानें शिखंडीच्या अडून माझ्यावर आघात करावा व आतां मला संपवावें." भीष्मांची आज्ञा घेऊन पांडव शिबिराकडे परतले असतां या पद्धतीनें स्वतः भीष्मांना मारावें लागणार ही कल्पनाच अर्जुनाला दुःसह वाटूं लागली व गीतेच्या शेवटीं 'नष्टो मोहः' अशी कबुली देणारा पार्थ श्रीकृष्णांना म्हणूं लागला ( भीष्मपर्व अ. १०७–९१ ते ९५ ):–

" हे कुरुवृद्ध भीष्म अत्यंत ज्ञानसंपन्न व बुद्धिमान् असून ते माझे गुरु व पितामह आहेत. या पद्धतीनें मी त्यांच्याशीं कपट-युद्ध कसें करावें? लहानपणीं धुळीनें माखलेल्या अंगानें मी जेव्हां त्यांच्या मांडीवर जाऊन बसावें व 'बाबा' म्हणून त्यांना हांक मारावी त्या वेळीं ते माझी हनुवटी धरून मला म्हणत, वेड्या मी तुझा बाप नसून तुझ्या बापाचा बाप आहे. त्या भीष्मांना मी या पद्धतीनें कसें मारूं? भीष्मांनीं खुशाल माझें सैन्य मारावें. मी

त्यांना मुळींच मारणार नाहीं. माझा जय होवो किंवा वध होवो. भीष्मांवर मी हत्यार चालविणार नाहीं. आयत्या वेळीं अर्जुनाला आलेला हा मोहाचा झटका इतका विलक्षण आहे कीं, श्रीकृष्णांशिवा तो कोणीही दूर करूं शकत नाही. श्रीकृष्ण जर नसते तर अर्जुनाच्या गळ्यांत गळा घालून युधिष्ठिरांनींही हाच मार्ग स्वीकारला असता व कौरव सेनेच्या पहिल्याच सेनापतीच्या प्रभावांत पांडव संपले असते. पण श्रीकृष्णांनीं अर्जुनाला त्याची खरडपट्टी काढूनच मार्गदर्शन केलें. ते म्हणाले (भीष्मपर्व अ. १०६–९६ ते १०२):–

"हे अर्जुना, भीष्मांचा वध करण्याची तूं पूर्वीं प्रतिज्ञा केली आहेस. तू स्वतःला धर्मनिष्ठ क्षत्रिय म्हणवितोस. आतां तुला भ्रष्टप्रतिज्ञ कसें होतां येईल ? तुला भीष्मांना ठार मारावेंच लागेल. मी मारीत नाहीं म्हणून मुळीच चालणार नाहीं. भीष्म हा युद्धदुर्मद क्षत्रिय आहे. त्याला रथांतून खालीं पाड. युद्धांत भीष्मांना मारल्यावांचून तुला विजय प्राप्त होणें कधींही शक्य नाहीं. भीष्मांचा तुझ्या हातून वध होणें ही ठरलेली दैवी घटना आहे. ती आतां तुला टाळतां येणार नाहीं. काळाच्या वासलेल्या जबड्याप्रमाणें भयंकर असलेल्या भीष्मांसमोर वज्रपाणि महेंद्र सुद्धां टिकूं शकणार नाहीं, मग इतर कोणाची कथाच काय ! तूंच केवळ त्यांच्याशीं युद्ध करूं शकशील. स्थिर राहून भीष्मांना ठार मार. धर्माधर्माच्या गोष्टी तूं मला काय सांगतोस? देवेंद्राला उपदेश करतांना महाबुद्धिशाली बृहस्पतीनें असें सांगितलें आहे कीं, आपल्यापेक्षां वृद्ध, सर्व दृष्टींनीं श्रेष्ठ, व सद्‌गुणसंपन्न अशीही व्यक्ति असली तरी, ती जर आततायी व आपला घात करणारी असेल तर तिला अवश्य ठार मारावें. युद्ध करणें, प्रजांचें संरक्षण करणें व यज्ञ करणें हाच क्षत्रियांचा शाश्वत धर्म आहे." या वाक्यांनीं उत्तेजित करून श्रीकृष्णांनीं अर्जुनाकडून भीष्मांना ठार मारविलें. तरीही अर्जुन जर युद्ध करीत नाहीं म्हणाला असता तर स्वतः युद्ध करून भीष्मांना ठार मारण्याची त्यांची पूर्ण सिद्धता होती. भगवान् श्रीकृष्णांचीं साधनें श्रीरामांइतकीं स्वयंपूर्ण नव्हतीं. त्यामुळें

त्यांना प्रत्येक गोष्ट स्वतःच्या अंगावर घेऊनच तिची परिपूर्ति करावी लागे हें जें मीं मागें म्हटलें आहे तें यामुळेंच होय. धुरंधर कौरव सेनापति भीष्म यांच्या वधाचें सर्व श्रेय श्रीकृष्णाकडे येतें तें हें असें.

(२) भीष्मानंतर कौरवांचे धुरंधर सेनापति आचार्य द्रोण हे होत. द्रोण हे पांडवांचे गुरु असल्यामुळें त्यांच्याविषयीं पांडवांच्या व विशेषतः अर्जुनाच्या मनोभावना अत्यंत कोमल आहेत. पंचाल राजपुत्र धृष्टद्युम्न हा द्रोणांचा ठरलेला मृत्यु असूनही शस्त्र हातांत असेपर्यंत त्यांना मारणें धृष्टद्युम्नाला केवळ अशक्य झालेलें आहे. श्रीकृष्णांच्या मंत्रयुद्धाचा प्रयोग गाळला, तर द्रोणांचा वध केवळ अशक्य आहे असें दिसून येईल. कोणीही योद्धा द्रोणांसमोर टिकत नाहीं व शस्त्र हातांत असेपर्यंत द्रोणांचा पराभव करणें कोणालाही शक्य नाहीं, हें ओळखून द्रोणांकरवीं शस्त्रसंन्यास करवावा असा विचार श्रीकृष्णांच्या मनांत आला. पण द्रोण शस्त्रसंन्यास करणार कसे? त्यांचें मर्मस्थान भगवान् श्रीकृष्णांना पूर्णपणें अवगत होतें. पुत्रप्रेमासाठीं द्रोणाचार्य हे ब्राह्मणधर्माचा परित्याग करून राजप्रेष्य बनले होते व दुर्योधनाकडून शस्त्र चालवीत होते हें प्रसिद्धच आहे. ज्या पुत्रासाठीं आचार्य हें सारें करावयास सिद्ध झाले, तो पुत्रच जर एकाएकीं मृत्युमुखीं पडला, तर आचार्य शस्त्रत्याग करतील हें उघड होतें. पुत्र प्रत्यक्ष मृत्युमुखीं पडो अथवा न पडो पण तो मृत्युमुखीं पडल्याचें आचार्यांच्या नुसतें मनांत ठसलें तरी ते शस्त्रसंन्यास करतील हें श्रीकृष्णांनीं ओळखलें व त्यांनीं त्यांच्या त्याच मर्मस्थानावर आघात केला. महाभारतकार म्हणतात (द्रोणपर्व अ. १९०–९ ते १३):—

"पांडव त्रस्त झालेले आहेत व द्रोणांच्या बाणांनीं व्यथित झालेले आहेत हें पाहून बुद्धिशाली व अंतिम विजयावर लक्ष ठेवणाऱ्या श्रीकृष्णांनीं अर्जुनाला असें सांगितलें कीं, हा धनुर्धरश्रेष्ठ द्रोण जोंवर हातांत धनुष्य घेऊन समरांगणांत उभा आहे, तोंवर देवांची सुद्धां त्याला जिंकण्याची शक्ति नाहीं. यानें केवळ शस्त्रसंन्यास केला तरच याचा वध होण्याची शक्यता आहे. म्हणून हे

पांडवहो, धर्माधर्माचा विचार करीत न बसतां जयावरच सारें लक्ष केंद्रित करा व तेंही त्वरित करा. नाहीं तर थोड्याच वेळांत द्रोण सर्वांना यमसदनास पाठविल्याविना राहणार नाहींत. अश्वत्थामा मेला तर हा लढणार नाही असें मला वाटतें. कोणीतरी याला अश्वत्थामा मेला असें या वेळीं जाऊन सांगा. अर्जुनाला श्रीकृष्णांचें तें म्हणणें मुळींच मान्य झालें नाहीं. इतर सर्वांनी मात्र त्याला मान्यता दिली. युधिष्ठिर मोठ्या कष्टानेंच या गोष्टीस सिद्ध झाले."

त्यानंतर भीमानें अश्वत्थामा नांवाचा एक हत्ती मारला व द्रोणाचार्यांना अश्वत्थामा मेल्याचें वृत्त सांगितलें. द्रोणांचा प्रथम त्यावर विश्वास बसेना. ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर हा परम सत्यवचनी असून तो आपल्याशीं कधींही प्रतारणा करणार नाहीं असें वाटून द्रोणाचार्यांनीं त्यालाच विचारलें. युधिष्ठिर कदाचित् या ऐन महत्त्वाच्या वेळीं गडबडतील व द्रोणांचें तर उग्रतेज वाढतच चाललें आहे असें पाहून भगवान् श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरांना म्हटलें (द्रोणपर्व अ. १९०–४६ व ४७):—

"जर केवळ अर्धा दिवस याच पद्धतीनें रागावून द्रोणाचार्य युद्ध करतील तर तुझें संपूर्ण सैन्य नष्ट झाल्याविना राहणार नाहीं. मी तुला खरेंच सांगतों. या द्रोणरूपी मृत्यूपासून सर्वांना वांचविणें हें तुझें कर्तव्य आहे. अशा भयानक प्रसंगी सत्यवचनापेक्षां मिथ्या भाषणच श्रेष्ठ ठरतें. जीवितरक्षणासाठीं खोटें बोलल्यानें खोटें बोलल्याचें पाप मुळींच लागत नाहीं."

पुढें युधिष्ठिराच्या तोंडून अश्वत्थामा मेला हें ऐकून द्रोणाचार्यांनीं शस्त्रत्याग केला व त्यांना धृष्टद्युम्नानें ठार मारलें. केवळ श्रीकृष्णांच्या मंत्रयुद्धानें कौरवांच्या या महापराक्रमी द्वितीय सेनापतीचा अंत घडविलेला आहे. कौरवांचा सर्वश्रेष्ठ तृतीय सेनापति कर्ण हा तर श्रीकृष्णांनीं त्याच्या रथाचें चाक पृथ्वीनें गिळलें असतां खिंडींत गांठूनच ठार मारलेला आहे.

(३) श्रीकृष्णांनीं आपल्या दैवी सामर्थ्यानें पांडवांचें संरक्षण केल्याचीं तर उदाहरणें महाभारतांत जागजागीं आलेलीं आहेत. त्यांचा नुसता उल्लेख केला तरी देखील कल्पना येते.

भगदत्ताच्या वैष्णवास्त्रापासून श्रीकृष्णांनीं आयत्या वेळीं आपली छाती पुढें करून अर्जुनाला वांचविलें आहे. त्यांनीं छातीचा परकोट केला म्हणूनच त्या अमोघ वैष्णवास्त्राचें वैजयंतिमालेंत रूपांतर झालें. एरवीं तें अस्त्र अर्जुनाचा प्राण घेतल्याविना कधींही राहिलें नसतें. आयत्या वेळीं श्रीकृष्ण नसते तर अश्वत्थाम्याच्या नारायणास्त्रापासून पांडवांचें संरक्षण कोणीही करूं शकला नसता. केवळ श्रीकृष्णामुळेंच तें संरक्षण झालेलें आहे. भीमसेनाच्या विलक्षण अहंकारामुळें तर त्या वेळीं सर्वविनाशाचीच वेळ आली होती. केवळ श्रीकृष्णांमुळेंच भीमाला रथांतून खालीं ओढतां आलें व पांडव वांचले. कर्णपर्वांत स्वतःच्या प्रतिज्ञेच्या भोंगळपणामुळेंच अर्जुनानें नुसतें 'गाण्डीव धनुष्य हातांतून टाकून दे' एवढें युधिष्ठिराचें वाक्य ऐकतांच त्याला ठार मारावयाची वेळ आणली होती! ही हत्या अर्जुनाच्या हातून होती तर पांडव संपलेच असते. पण श्रीकृष्णांनीं आपल्या अपूर्व बुद्धिसामर्थ्यानें ती गोष्ट होऊं दिली नाहीं. मांडया मोडून दुर्योधनाला भीमानें मारल्यावर बलराम भीमाला मारावयास उठले. केवळ श्रीकृष्णांमुळेंच त्यांनीं भीमाला जिवंत सोडलें. पुत्रवधानंतरच्या धृतराष्ट्राच्या भेटीच्या वेळीं लोखंडी प्रतिमेऐवजीं जर भीम स्वतः धृतराष्ट्राच्या बाहुपाशांत अडकला असता तर तो केव्हांच यमसदनास गेला असता व एवढा मोठा विजय संपादन करूनही तो साराच्या सारा व्यर्थ ठरला असता. केवळ श्रीकृष्णांच्या सावधतेनें हा अनर्थ टळलेला आहे. अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून पांडवच नव्हे तर त्यांचा वंशांकुर असलेला उत्तरेचा गर्भ केवळ श्रीकृष्णांमुळें वांचलेला आहे. रात्रीं अश्वत्थाम्यानें पांडवांच्या शिबिरांत केलेल्या घोरतम संहारांतून केवळ त्यांच्या दक्षतेमुळें पांडव वांचले. भीष्म, द्रोण, कर्ण इत्यादि महारथ्यांच्या भयानक अस्त्रांपासून केवळ श्रीकृष्णांच्या अधिष्ठानामुळें अर्जुन व त्याचा रथ वांचला. नाहींतर तो संपूर्ण रथ केव्हांच दग्ध झाला असता. तात्पर्य जों जों महायुद्धांतील घटनांचा विचार करूं लागावें तों तों संपूर्ण महायुद्ध केवळ श्रीकृष्णांच्या मुळें पांडवांना जिंकतां आलें ही मनाची खात्री होऊं लागते. म्हणूनच महायुद्धानंतर त्या

युद्धांतील विजयाचें सर्व श्रेय युधिष्ठिरांनीं श्रीकृष्णांच्या चरणीं समर्पण केलें आहे. ते म्हणतात ( शल्यपर्व अ. ६२ व ६३ ) :—

"हे श्रीकृष्णा, द्रोण व कर्ण यांच्या ब्रह्मास्त्राच्या आघाताला तुझ्याविना दुसरा कोण सहन करूं शकेल ! केवळ तुमच्या अद्वितीय सामर्थ्यानेंच अर्जुनानें संसप्तक गणांना जिंकलें. भयंकर संग्रामांतही अर्जुनाला कधींही पाठ दाखविण्याचा जो प्रसंग आला नाहीं तो केवळ तुमच्यामुळेंच होय. अनेक प्रकारच्या उपायांनीं तुम्हीं वेगवेगळीं सामर्थ्यें वंचित वा नष्ट करून आमचें सर्वस्वीं संरक्षण केलेलें आहे. उपप्लव्य नगरांत पूर्वीं महर्षि व्यासांनीं मला असें सांगितलें होतें कीं, जिकडे धर्म असेल तिकडेच कृष्ण असतो व जिकडे कृष्ण असेल तिकडेच जय असतो. त्यांचें तें वचन आज यथार्थपणें माझ्या प्रत्ययास आलें आहे.

"हे गोविंदा, केवळ तुझ्या कृपेमुळें जें मनानें सुद्धां अप्राप्य असें हें निष्कंटक राज्य, सर्व शत्रूंचा विनाश होऊन मला प्राप्त झालें आहे. त्या रोमहर्षण संग्रामांत तूं आम्हांला जें जें साहाय्य केलेंस तें तें सर्व माझ्या दृष्टीसमोर आहे. महाविष्णूनें देवांना संग्रामांत साहाय्य करावें त्याप्रमाणें तूं आम्हांला परोपरीनें साहाय्य करून विजय प्राप्त करून दिलास. सारथ्य करण्याच्या मिषानें तूं जर अर्जुनाचा साहाय्यक नसतास तर कुरुसैन्याचा हा भयंकर समुद्र तरून विजय प्राप्त करून घेणें आम्हांला केवळ अशक्य झालें असतें. भयंकर गदाप्रहार, नानाविध शस्त्रास्त्रांचे आघात, बाणांपेक्षांही अधिक तीक्ष्ण अशा दुर्वचनांचे प्रहार तूं आमच्यासाठीं सहन केलेस. हा अपूर्व विजय म्हणजे केवळ तुझें श्रेय आहे."

धर्मसाम्राज्याच्या महान् सूत्रधाराचे हे उद्गार कोणालाही पटतील असेच आहेत यांत शंका नाहीं. श्रीकृष्णांच्या महनीय विभूतिमत्त्वाचीं अनेक वैशिष्टयें आपण यापूर्वीं पाहिलीं आहेत. पण त्यांची राजकीय बुद्धिमत्ता व राजनैतिक कर्तृत्व केवढें लोकोत्तर होतें याचीं निदर्शनें म्हणजेच त्यांचा आतांपर्यंत वर्णन केलेला इतिहास होय.

कंसाच्या वधापासून तर सम्राट् जरासंधाच्या वधापर्यंत व विराट नगरींत पांडव प्रकट झाल्यापासून तर कुरुक्षेत्राच्या प्रचंड रणमैदानावर जवळजवळ ४० लक्ष क्षत्रियांच्या व सर्व ज्ञात राजसत्तांच्या निःपातापर्यंतचें महाभारतांतील प्रकरण म्हणजे भगवान् श्रीकृष्णांच्या राजकीय बुद्धिमत्तेचा व कर्तृत्वाचा रोमांचकारी इतिहासच होय. गोकुळांतल्या गोपांच्या मेळाव्यांतील अतिसामान्य जीवनांत बांसरी ओठाला लावणाऱ्या कमलदलासारख्या मृदु हातांनी केवळ एकट्याच्या बुद्धिमत्तेच्या व कर्तृत्वशक्तीच्या भरंवशावर साम्राज्येंचीं साम्राज्यें धुळीला मिळवून सहजपणें नवीं साम्राज्यें निर्मिली हें पाहिलें म्हणजे मन आश्चर्यानें थक्क होऊन जातें. जणूं काय साम्राज्य धुळीला मिळविणें वा नवें उत्पन्न करणें हा या विभूतिमत्त्वाच्या सामर्थ्यशाली इच्छाशक्तीचा केवळ एक अतिसामान्य असा खेळच आहे! जें सूत्र महाभारताची ही व्याख्यानमाला प्रारंभ करतांना मी उच्चारिलें होतें तें आतां येथें मी पुन्हा उच्चारितों.

श्रीकृष्णजन्मापूर्वी आर्यराष्ट्राचें नेतृत्व जें ब्राह्मण्य तें पथभ्रष्ट होऊन सत्तेचे दास बनलें व धर्ममूल्यांच्या रक्षणासाठीं शस्त्र हातांत घेण्याऐवजीं सत्तेच्या कृपाप्रसादासाठी शस्त्र सरसावून उभें राहिलें. यांतून मार्ग कसा काढवयाचा? श्रीकृष्णांनीं या आततायी नेतृत्वाचा वध करून मार्ग काढला. भीष्मासारखी चारित्र्यसंपन्न व धर्मनिष्ठ सचिवसंस्था केवळ घटनात्मकतेच्या चौकटीमुळें सत्ताधिपाला नियंत्रित करूं शकली नाहीं. जी चारित्र्यसंपन्नता दुर्जनांच्या संरक्षणास ढाल म्हणून सिद्ध होते ती वंदनीय असली तरी वध्य आहे असें सांगून तिचा वध करून दुर्जनवधाचा मार्ग श्रीकृष्णांनीं मोकळा केला. स्वतःच्या स्वार्थासाठीं हवें तसें अधार्मिकपणानें वागून मृत्यूच्या काळ्या छाया दिसू लागतांच तपशिलांतील धर्ममूल्यांचा स्वसरक्षणासाठीं वापर करणाऱ्या दुर्जनांसाठीं साधनशुचितेचें बंड मोडून काढून साध्यशुचितेचा व अंतिम विजयावर लक्ष केंद्रित करण्याचा मार्ग भावी भारतसंतानांना दाखवून श्रीकृष्णांनीं दुर्जनांचें बंड मोडून काढलें. स्वतःस अनियंत्रित, स्वयंभू व देवाचा अवतार समजणाऱ्या जुलमी व अरेराव राजसत्तांना पालथें पाडून त्यांचीं

राज्यसिंहासनें व साम्राज्यसिंहासनें श्रीकृष्णांनीं धुळीला मिळविलीं व आसुरी राजमुकुटांना ठोकरून धर्मनियंत्रित साम्राज्य प्रत्यक्ष प्रस्थापित केलें. ज्या दिवशीं ही घटना घडून आली त्या दिवशीं त्यांच्या हृदयाला आनंद झाला. धर्ममूर्ति युधिष्ठिराला सिंहासनावर बसवून पुलकित अवस्थेंत भगवंतांनीं स्वतः युधिष्ठिराला अभिषेक केला. महाभारतकार म्हणतात :–

**तत उत्थाय दाशार्हः शंखमादाय पूजितम् ।**
**अभिषिञ्चत्पतिं पृथ्व्याः कुन्तीपुत्रं युधिष्ठिरम् ॥ १५**

–(महाभारत, शांतिपर्व अ. ४०)

"नंतर स्वतः उठून आपल्या पांचजन्य शंखांतील पवित्र जलानें जगताचा एकछत्री सम्राट् म्हणून श्रीकृष्णांनीं युधिष्ठिराला अभिषेक केला." सम्राट् युधिष्ठिराच्या हातून अश्वमेधासारखा महायज्ञ करवून श्रीकृष्ण द्वारकेकडे परतले. त्यांनीं निर्माण केलेल्या धर्म-साम्राज्याची महती इतकी विलक्षण होती कीं, यधिष्ठिरानंतर परीक्षितीच्या वेळीं देखील त्या राज्यांत अधःपतनाच्या बीजाचा प्रवेश झाला नव्हता असें वर्णन आहे. श्रीकृष्णांच्या राजनैतिक महापुरुष म्हणून केलेल्या या कार्यानें त्यांची महनीयता संपते काय? मुळींच नाही. त्यांच्या या कार्यानें ते केवळ एक ऐतिहासिक दृष्टचा महापुरुष किंवा विभूति ठरतील. पण त्यांचें खरें कार्य यापुढेंच आहे. मानव जातीला शाश्वत कल्याणाचा मार्ग दाखविणारे द्रष्टे म्हणून भगवान् श्रीकृष्णांचें जें महत्त्व आहे तें शाश्वत स्वरूपाचें आहे. धर्मसाम्राज्यसंस्थापक श्रीकृष्ण यांचें महत्त्व ऐतिहासिक स्वरूपाचें आहे पण तत्त्वज्ञ श्रीकृष्णांचें महत्त्व त्रिकालाबाधित आहे. त्याचें स्वरूप पाहिल्याविना श्रीकृष्णचरित्राचें हें अवगाहन पूर्ण होणार नाहीं. तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

---

# आमच्यापुढील प्रश्न

आतांपर्यंत भगवान् श्रीकृष्णांचीं विभूतिवैशिष्ट्यें व युगपुरुष या नात्यानें त्यांनीं पार पाडलेलें महत्त्वाचें कार्य यांचें समालोचन केलें आहे. तत्त्वज्ञ म्हणून भगवंतांच्या जीवनसागरांतील अनर्घ्य रत्नांचें तेज पाहिल्याविना आपलें हें समालोचन अपुरें राहील. म्हणून त्या विषयाकडे आतां वळूं.

भगवान् श्रीकृष्णांनीं प्रवर्तित केलेलें तत्त्वज्ञान श्रीमत् भगवद्गीता या नांवानें भारतीय व जागतिक वाङ्मयांत स्थिरपद झालेलें आहे. श्रीमन्महाभारतांत भगवान् श्रीकृष्णांच्या तोंडून वेळोवेळीं वेगवेगळ्या प्रसंगांच्या निमित्तानें अनेक तत्त्वसिद्धांतांचें विवेचन आलेलें आहे. प्रसंगाप्रसंगानें राजनीतीच्या बरोबरच जगाच्या मूलतत्त्वांची व मानवी जीविताच्या ध्येयाचीही त्यांनीं अनेक ठिकाणीं अत्यंत मूलगामी चर्चा केलेली आहे. तत्त्वज्ञ म्हणून त्यांच्या जीवनाकडे दृष्टिक्षेप करतांना त्या सर्वच उद्गारांचा विचार करणें आवश्यक आहे. पण श्रीमत् भगवद्गीतेमध्यें भगवंतांचें सर्व तत्त्वज्ञान आलेलें असून इतरत्र त्यांनी व्यक्त केलेले विचार त्याहून तत्त्वतः भिन्न नसल्यामुळें गीतेचें समालोचन म्हणजेच वस्तुतः तत्त्वज्ञ श्रीकृष्णांच्या भूमिकेचें समालोचन होय. शिवाय पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत आपल्या पूर्ण परमेश्वरी भावावस्थेंत त्याचा आविष्कार केलेला असून तो इतका परिपूर्ण आहे कीं, तसा तो त्यांनाही पुन्हा करतां येणें अशक्य असल्याचें त्यांनीं स्वतःच घोषित केलें आहे. भारतीय युद्धानंतर भगवान् श्रीकृष्ण द्वारकेला जावयास निघाले असतां अर्जुनानें त्यांना असें म्हटलें कीं, आपण मला महायुद्धाच्या प्रारंभीं जें महान् तत्त्वज्ञान सांगितलें होतें तें मी विसरलों. आपण द्वारकेला जाणार आहांत, तरी जाण्यापूर्वीं मला तें तत्त्वज्ञान पुनश्च सांगा. गीतेच्या शेवटीं 'नष्टो मोहः' व 'गतसन्देहः' असें आवर्जून सांगणाऱ्या आपल्या या शिष्याच्या

---

व्याख्यानें २१ व २२ दिनांक १९ व २०-४-५२

विस्मरणाचा तो अद्‌भुत प्रकार पाहून श्रीकृष्णांना रागही आला व खेदही झाला. ते अर्जुनाला म्हणाले कीं,

श्रावितस्त्वं मया गुह्यं ज्ञापितश्च सनातनम् ।
धर्मं स्वरूपिणं पार्थ सर्वलोकांश्च शाश्वतान् ।। ९
अबुद्धया नाग्रहीर्यस्त्वं तन्मे सुमहदप्रियम् ।
न च साऽद्य पुनर्भूयः स्मृतिर्मे संभविष्यति ।। १०
नूनमश्रद्धधानोऽसि दुर्मेधा ह्यसि पांडव ।
स हि धर्मः सुपर्याप्तो ब्रह्मणः पदवेदने ।। ११
न शक्यं तन्मया भूयः तथा वक्तुमशेषतः ।
न च शक्यं पुनर्वक्तुमशेषेण धनंजय ।। १२
परं हि ब्रह्मकथितं योगयुक्तेन तन्मया ।। १३

—(महाभारत आश्वमेधिक पर्व अ. १६)

"हे पार्था, मी तुला सनातन असें गूढ रहस्य ऐकविलें व त्याचा तुला प्रत्ययही आणून दिला. शाश्वत अशा सर्व अवस्था व प्रत्यक्ष स्वरूपतः धर्म यांचा प्रत्यय मी तुला दिला. पण मूर्खपणानें तूं तें सारें विसरलास हें ऐकून मला अत्यंत दुःख झालें. आतां मला पुन्हा ती स्मृति होणें शक्य नाहीं. हे पांडवा, तूं श्रद्धाहीन असून मूर्ख व मंदबुद्धीचाही आहेस. मला आतां पुन्हा तें जसेंचें तसें सांगणें केवळ अशक्य आहे. मी तुला त्या वेळीं जें सांगितलें होतें तें परब्रह्माच्या प्रत्ययासाठीं पूर्णपणें समर्थ होतें. त्या वेळीं अत्यंत योगयुक्त अवस्थेंत मी तुला सर्वश्रेष्ठ ज्ञान दिलें. आतां तें मला सांगतां येणार नाहीं."

महाभारतांतील प्रतिपाद्य असा जो नारायणीय अथवा भागवत धर्म, तो साररूपानें श्रीमत् भगवद्‌गीतेंत सांगितलेला आहे असें महाभारतकारांनीं स्वतःच म्हटलेलें आहे. श्रीमत् भगवद्‌गीतेचें महत्त्व स्वतः भगवान् श्रीकृष्ण व भगवान् व्यास यांनाच किती अनन्यसाधारण वाटतें हें यावरून स्पष्ट होईल. त्यामुळें तत्त्वज्ञ श्रीकृष्णांचा मागोवा गीतेच्या द्वारें घेणें भगवंतांच्या चरणीं योग्य प्रकारें रुजूं होईल यांत शंका नाहीं.

## गीतेची अलौकिकता

गीतेला उपनिषदांच्या क्षीरसागरांतील भगवंतांनीं मंथन करून काढलेलें अमृत असें गीतेच्या माहात्म्यांतच म्हटलेलें असून इतर शास्त्रविस्ताराच्या अभ्यासांत व्यर्थ आयुष्य न वेंचतां केवळ गीतेच्या परिशीलनानें शास्त्रांनीं प्रतिपादन केलेलें मानवी जीविताचें इतिकर्तव्य प्राप्त होऊं शकतें असें निश्चयानें सांगितलें आहे. भारतीय तत्त्वज्ञानाच्या प्रस्थानत्रयींत दशोपनिषदें व बादरायण-प्रणीत ब्रह्मसूत्रें यांच्या बरोबरीनें श्रीगीतेला स्थान आहे. ही प्रस्थानत्रयी म्हणजे वैदिक धर्माच्या तत्त्वज्ञानाचा आधारच होय. श्रीमत् भगवद्गीतेवर आजवर निर्माण झालेलें, होणारें व होणार असलेलें वाङ्मय डोळ्यांसमोर आणलें की, तिच्या महत्तेची कल्पना येते. भगवद्गीतेचें सांगोपांग विवेचन करावयाचें म्हटलें कीं तिच्यासंबंधीं निर्माण झालेल्या सर्व वाङ्मयाचा स्थूल तरी आढावा घेणें अवश्य आहे. असा स्थूल आढावा घेऊं म्हटलें तरी तो किती व कोणत्या योग्यतेच्या लेखकांच्या वाङ्मयाचा घ्यावा लागेल याची मी आपणांस नुसती कल्पना देतों.

श्रीमत् भगवद्गीतेवरील भाष्यांत सर्वांत जुनें भाष्य भगवत्-पूज्यपाद श्रीमदाद्य शंकराचार्यांचें आहे. शांकरभाष्यापूर्वी भगवद्-गीतेवर टीका होत्या असें दाखविणारा पुरावा उपलब्ध आहे. पण तो पुरावासुद्धां मुख्यत: शंकराचार्यांच्या भाष्यांतील वाक्प्रयोगा-वरून निघणारे ध्वनीच होत. श्रीमदाद्य शंकराचार्य हे अलौकिक योग्यतेचे व बुद्धिमत्तेचे पुरुष होऊन गेले असून त्यांच्या लेखनाचें असें अद्वितीय सामर्थ्य आहे कीं, एकदां त्यांनीं एखाद्याचें खंडन केल्यावर तीं तीं मतें प्रतिपादन करणारे ग्रंथसुद्धां फारसे उपलब्ध राहिले नाहींत इतके ते प्रचारांतून गेले. त्यामुळें गीतेवरील उपलब्ध भाष्यांत सर्वांत प्राचीन असें भाष्य श्रीशंकराचार्यांचेंच आहे. हें भाष्य इसवी सनाच्या सहाव्या शतकांत आद्य शंकरा-चार्यांनीं रचलें. गीतेचा प्रतिपाद्य विषय अद्वैत वेदांत व सर्व कर्मत्यागांत मुक्ति हाच कसा आहे, हें आपल्या भाष्यांतून भगवान्

शंकराचार्यांनीं मांडलें आहे. आचार्यांच्या गीताभाष्याचा मुख्य भर ज्ञानकर्मसमुच्चयवादाच्या खंडनावर आहे. त्यावरून त्यांच्या पूर्वीच्या गीतेवरील टीका ज्ञानकर्मसमुच्चयपर होत्या असें दिसतें. आचार्यांनीं ज्ञानकर्मसमुच्चयवादाचें खंडन करून 'ज्ञानदेव तु कैवल्यम्' 'केवळ ज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो' हा आपला सिद्धान्त गीतेच्या द्वारें प्रस्थापित केला.

श्रीमत् शंकराचार्यांनंतर अडीचशें वर्षांनीं एक संप्रदायप्रवर्तक पुरुष भारतीय तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत अवतीर्ण झाला. श्रीमत् रामानुजाचार्य हें त्या पुरुषाचें नांव असून त्यांच्या तत्त्वज्ञानाला विशिष्टाद्वैत असें नांव आहे. आद्य शंकराचार्यांचें सर्वात्मना अद्वैत हें श्रीमत् रामानुजाचार्यांना मान्य नाहीं. ते जीव, जगत् व ईश्वर यांचा विचार करीत असतां ईश्वराला श्रीनिवास, जीवसृष्टीला चिद्विशिष्ट ईश्वर व जगताला अचिद्विशिष्ट ईश्वर असें मानतात. रामानुजाचार्यांनीं श्रीबादरायणाचार्यांच्या ब्रह्मसूत्रावर श्रीभाष्य नांवाचें एक स्वतंत्र भाष्य लिहिलेलें असून त्यांत आपलें सर्व तत्त्वज्ञान मांडलें आहे. श्रीमत् आचार्यांच्या तत्त्वज्ञानाचेंही त्या भाष्यांतीलच लघुसिद्धांत व महासिद्धांत या प्रकरणांतून खंडन करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. आपल्या तत्त्वज्ञानाचें श्रीभाष्याच्या मंगलाचरणांतच त्यांनीं थोडक्यांत पण उत्कृष्टपणें स्वरूप दाखविलें आहे. ते म्हणतात :—

**अखिलभुवनजन्मस्थेमभङ्गादिलीले ।**
**विनतविविधभूतव्रातरक्षैकदीक्षे ॥**
**श्रुतिशिरसि विदीप्ते ब्रह्मणि श्रीनिवासे ।**
**मम भवतु परस्मै शेमुषी भक्तिरूपा ॥**

"सर्व जगताचें केवळ लीलेनेंच उत्पादन, रक्षण व पालन करणारा, आपल्याला नम्र होणाऱ्या सर्व प्राणिमात्रांचें कल्याण करणारा, उपनिषदांनीं प्रतिपादिलेला परब्रह्म जो श्रीनिवास त्याच्या ठिकाणीं माझी बुद्धि भक्तिरूप होऊन राहो."

रामानुजाचार्य परमेश्वराला सगुण मानतात. भक्ति ही मुक्तीचें साधन मानतात व जगताला परमेश्वराच्या अचित् स्वरूपाचा भाग

व जीवाला परमेश्वराच्या चित्स्वरूपाचा अंश मानतात. हें त्यांच्या तत्त्वज्ञानाचें शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाहून असलेलें भिन्नत्व होय. आपलें हें तत्त्वज्ञान व मोक्षाचें साधन म्हणून उपासनेच्या दृष्टीनें भक्तिमार्ग हाच गीतेचा प्रतिपाद्य विषय होय असें रामानुजाचार्यांनीं गीतेवर स्वतंत्र भाष्य लिहून सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

त्यानंतर परमेश्वर व जीव यांच्यांत कोणत्याही प्रकारचें अद्वैत नांदणें सर्वस्वी अशक्य असून जीव हा जीवच व ईश्वर हा ईश्वरच राहणार अशा द्वैतमताचें प्रवर्तन करणारे श्रीमत् मध्वाचार्य यांनीं गीतेवर स्वतंत्र भाष्य लिहून त्या भाष्यांतून जीव व ईश्वर हे सदाचे भिन्न असून ईश्वराची भक्ति हीच अंतिम निष्ठा होय असें प्रतिपादन केलें आहे. त्यानंतर उत्पन्न झालेल्या निंबार्काचार्यांची द्वैताद्वैत संप्रदायाची गीतेवर स्वतंत्र अशी टीका आहे. शुद्धाद्वैत संप्रदायाचे प्रवर्तक श्रीमत् वल्लभाचार्य यांनी आपल्या पुष्टिमार्गाचें गीतेंतूनच प्रतिपादन केलें आहे. भारतीय तत्त्वज्ञानांतील अत्यंत महत्त्वाच्या अशा या पांचही संप्रदायांच्या या भिन्न भिन्न मतप्रणालीचा व गीतेवरील वाङ्मयाचा विचार करणें हें गीतेचें सांगोपांग विवेचन करतांना अत्यावश्यक ठरतें. पण येवढ्यानेंही गीतेवरील महत्त्वाचें वाङ्मय संपतें असें नाहीं. एकेका संप्रदायाकडे पाहिलें तरीही संप्रदायप्रवर्तक आचार्य व त्याच संप्रदायांत उत्पन्न झालेले गीतेचे इतर टीकाकार यांच्याही प्रतिपादनांत परस्परभिन्नता आढळते व तीही महत्त्वाची आहे. याचें मोठें उदाहरण श्रीमधुसूदनसरस्वतींच्या गीतेवरील टीकेचें होय. मधुसूदन सरस्वती हे श्रीशंकराचार्यांच्या संप्रदायाचे असूनही गीतेच्या प्रतिपादनांत त्यांनीं आचार्यांहून वेगळा असा स्वतःचा मौलिक मतभेद व्यक्त केला आहे.

गीतेवर निर्माण झालेलें हें संप्रदायप्रवर्तक वाङ्मय संस्कृत कालखंडांतील म्हणून वेगळें काढल्यावर गीतेचें प्रतिपादन संपतें असें नाहीं. निरनिराळ्या भारतीय प्रांतिक भाषांतून गीतेवर निर्माण झालेलें वाङ्मयही तितकेंच मोलाचें असून स्वतंत्र विचाराचा विषय बनलेलें आहे. मराठींतील गीतेवरील सर्वांत महत्पदास चढ-

केलेली टीका म्हणजे योगिवर्य श्री ज्ञानेश्वरमहाराजांची 'भावार्थ-दीपिका होय. मराठींत तरी भावार्थदीपिका ही गीतेइतक्याच महत्पदास चढलेली असून अनेक साधक तिची आजही पारायणावर पारायणें करून मोक्षाचा सोपान चढत असतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या या भावार्थदीपिकेला वारकरी संप्रदायाचे लोक 'माउली' असें म्हणतात. ती वारकरी संप्रदायाची जननीच होय. 'आचार्यांना वाट पुसत' ज्ञानराजांनी ती लिहिली असली तरी तिच्यांतून ज्ञानराजांचें स्वतंत्र तत्त्वज्ञान व नाथसंप्रदायाचें स्वरूप व्यक्त होतें असा पुष्कळ अभ्यासकांचा अभिप्राय आहे. श्री ज्ञानेश्वरांचें तत्त्व-सिद्धान्ताच्या बाबतीत भगवान् श्रीशंकराचार्यांच्या सिद्धांताहून पूर्णपणें वेगळेंपण आहे असें मानणारा एक पक्ष आहे, तर तसें मुळीच नाही, उलट पूर्ण अभिन्नता आहे असें मानणारा दुसरा एक पक्ष आहे. त्यांच्यांतील वादाशी जरी येथें कांहीं कर्तव्य नसलें तरी एक गोष्ट जी निर्विवादपणें प्रत्ययास येते तिचा उल्लेख मी करतों. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तत्त्वसिद्धांताच्या विषयांत आद्य शंकराचार्यांचें मार्गदर्शन मान्य केलें असलें तरी प्रत्येक श्लोकावरील आचार्यांचें विवरण जसेंच्या तसें उचललेलें नाहीं. कित्येक ठिकाणीं त्यांनीं स्वतःचें मत स्वतंत्रपणें प्रतिपादन केलेलें असून श्लोकांची फोडही स्वतंत्र पद्धतीनेंच केलेली आहे. गीतेचा विचार करतांना तिच्यावरील या भावार्थदीपिकेचा विचार स्वतंत्र भाष्याच्या विचाराइतकाच आवश्यक आहे. महाराष्ट्रांतील महत्त्वाच्या सर्व संतांनीं या ना त्या स्वरूपांत गीतेशीं आपला संबंध प्रस्थापित केलेला आहे. श्री तुकाराममहाराजांनीं गीतेवर लिहिलेली मंत्रार्थदीपिका नुकतीच प्रकाशांत आलेली आहे. मराठींतील प्रसिद्ध कवि श्री वामन पंडित यांनीं गीतेवर लिहिलेला व विस्तारानें ज्ञानेश्वरीपेक्षां किती तरी मोठा असलेला यथार्थदीपिका हा टीकाग्रंथ ज्ञानकर्मसमुच्चयवादाच्या दृष्टीनें स्वतंत्र विचार मांडणारा आहे. वामनांनीं आपला ग्रंथ मराठींत लिहिला म्हणूनच त्याला 'टीका' म्हणावयाचें. तोच ग्रंथ त्यांनीं जर संस्कृतमध्यें लिहिला असता तर त्याला भाष्य हेंच नांव द्यावें लागलें असतें.

इतक्या मोलाचा तो ग्रंथ आहे. वामनाची ही टीका यथार्थदीपिका या नांवानें प्रसिद्ध असून जणू कांहीं ती ज्ञानमार्गी ज्ञानेश्वरांना उत्तर म्हणूनच लिहिली आहे असें वाटतें. मतामतांच्या गलबल्यांतून लोपलेला खरा गीतार्थ मी पुढें मांडतों व सत्यप्रेम हेंच माझ्या प्रवृत्तीचें खरें कारण आहे असें वामनांचें म्हणणें आहे. ते म्हणतात: “परी अजी भगवंतजी। या कलियुगामाजी। जो तो गीतार्थ योजी। मतानुरूप ॥” मराठी कवीच्या गीतेवरील ग्रंथरचनेंत विस्तारानें सर्वांत प्रचड असलेला ग्रंथ म्हणजे दासोपंत गोसाव्यांचा सुप्रसिद्ध ‘गीतार्णव’ होय. दासोपंतांच्या या ग्रंथाची ओळीसंख्या सव्वा लक्ष आहे. गीतेचा विचार करतांना तिच्यावरील या वाङ्मयाचाही विचार आवश्यक ठरतो. इंग्रजी राजवट सुरू झाल्यापासून पाश्चात्य शिक्षणाचा व विद्यांचा भारतांत प्रसार झाला व विद्वान् पंडित पौरस्त्य आणि पाश्चात्य अशा दोन्ही तत्त्वज्ञानांचा, नीतिशास्त्रांचा व समाजशास्त्रांचा तौलनिक पद्धतीनें अभ्यास करूं लागले. त्यांच्यापैकी भारतीय राष्ट्राचें नेतृत्व संपादन केलेल्या लोकोत्तर महापुरुषांनींही भगवद्गीतेवर आपले स्वतंत्र मतप्रतिपादक ग्रंथ लिहिलेले असून त्यांतील कांहीं ग्रंथ शाश्वत मूल्यांचें व भाष्य या संज्ञेस पात्र होण्याइतक्या योग्यतेचे आहेत. गीतेवर वर्तमानकाळांत प्रसिद्ध झालेल्या विवेचनात्मक ग्रंथांत सर्वांत महत्त्वाचा व अलौकिक योग्यतेचा ग्रंथ म्हणजे लोकमान्य टिळकांचें ‘गीतारहस्य’ हा होय. लोकमान्यांनीं या गीतारहस्याच्या प्रारंभीं पाश्चात्य व पौरस्त्य नीतिशास्त्राच्या तत्त्वांची तौलनिक दृष्टीनें मूलगामी चिकित्सा करणारा जो प्रबंध लिहिला आहे तो नव्या भौतिक संस्कृतीच्या विनाशक युगांत हिंदु समाजशास्त्राचा, नीतिशास्त्राचा व तत्त्वज्ञानाचा पाया स्थिर करण्याच्या दृष्टीनें अत्यंत मोलाचा आहे. रहस्यकार लोकमान्यांनीं कर्मयोगाचा सिद्धांत गीतेचें रहस्य म्हणून मांडलेला असून त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वामुळें त्यांना संप्रदायप्रवर्तकाचें स्थान लाभलें आहे. कर्मयोगशास्त्राचेंच प्रतिपादन करणारा लोकमान्यांच्या विचारसरणीचा

अलीकडे प्रसिद्ध झालेला दुसरा ग्रंथ म्हणजे केसरीचे भूतपूर्व संपादक श्री. तात्यासाहेब करदीकर यांचा 'गीतातत्त्वमंजिरी' हा ग्रंथ होय. लोकमान्यांच्या नंतर भारतीय राष्ट्राचें नेतृत्व ज्यांच्या व्यक्तिमत्त्वांत केंद्रित झालें त्या महात्मा गांधींनीं गीतेंतूनच आपल्या अनासक्तियोगाचें प्रतिपादन केलें असून त्यांचे पट्टशिष्य महादेव देसाई यांनीं गांधीजीच्या गीतातत्त्वप्रतिपादनाचें स्वतंत्रपणें विस्तारपूर्वक विवेचन केलेलें आहे. आधुनिक भारतांतील महान् योगींद्र श्री. अरविंद घोष यांचेंही गीतेवरील महत्त्वाचें विवेचन 'Essays on Gita' या नांवानें प्रसिद्ध असून तें अरविंदांच्या स्वतंत्र प्रतिभेचें द्योतक आहे. अखिल मानवतेचें देवजीवनांत रूपान्तर करण्याचा आपला अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत त्यांनीं भगवद्गीतेंतूनच मांडून दाखविलेला आहे. विनोबांचें गीतेसंबंधींचें वाङ्मय, पंडित सातवळेकर यांची गीतेवरील पुरुषार्थ-बोधिनी टीका, डॉ. ॲनी बेझंट व डॉ. राधाकृष्णन् यांनीं केलेलें गीतेचें विश्लेषण, सेनापति बापट यांनीं व्यक्त केलेले गीतेवरील मौलिक विचार, प्रा. कवीश्वर यांचा नवाग्रंथ व मायानंदचैतन्यांचें साम्प्रदायिक गीताविवेचन या सर्व वाङ्मयाचा आढावा घेणें गीतेचा विचार करतांना आवश्यक ठरतें.

केवळ प्रमुख टीकाकार म्हणून मी या नांवांचा उल्लेख केला. याशिवायही त्या त्या मतांचीं समर्थक अशीं पुस्तकें निर्माण झालेलीं असून 'आम्ही कांहीं स्वतंत्र सांगतों आहोंत' अशी ऐट करणारीं पण वस्तुतः तशीं नसणारीं नवीं पुस्तकेंही निर्माण होत आहेत. गीतेविषयींच्या या सर्व भिन्न भिन्न स्वरूपाच्या वाङ्मयावरून भगवद्गीतेचें केवढें अपरंपार महत्त्व आहे हें स्पष्ट झाल्याविना राहात नाहीं. भारतांतील प्रत्येक श्रेष्ठ व्यक्तीनें आपण गीतेचे अनुयायी आहोंत असें सांगण्यांत धन्यता मानलेली असून आपल्या मतप्रणालीना तिच्यांतूनच आधार शोधलेले आहेत. गीतेवरील या सर्व वाङ्मयाची नुसती ओळख करून देणें हा सुद्धां एका स्वतंत्र व्याख्यानमालेचा विषय ठरतो. शिवाय सर्व भारतीय तत्त्व-ज्ञानांचा व अनुभूतीच्या प्रायोगिक शास्त्रांचा गीतेमध्यें संबंध

दृष्टीस पडत असल्यामुळें अध्यात्मशास्त्र, अतींद्रिय प्रत्यक्षाचीं हट-योग, राजयोग इत्यादि साधनें, भक्तियोग, ध्यानयोग, वेदविद्या, यज्ञशास्त्र व कर्मशास्त्र या महत्त्वाच्या शास्त्रांचा विचार गीतेचा विचार करतांना आवश्यक ठरतोच. आपल्या या व्याख्यानमाले-च्या कक्षेत इतका सर्वांगीण विचार करणें शक्य नाहीं. त्यामुळें प्रस्तुत व्याख्यानमालेपुरती या विषयाला मर्यादा घालून घेणें आवश्यक ठरतें. माझी मर्यादा कोणती ?

## माझ्या दृष्टिकोनाची मर्यादा

अथांग पसरलेल्या क्षीरसमुद्रावर दैवगतीनें येणाऱ्या वाटसरूला त्याची व्यापक भव्यता व अगाध गंभीरता ध्यानांत आली तरी त्याला जेवढें हवें असेल तेवढेंच तो त्यांतून घेतो. जलाशय केव-ढाही मोठा असला तरी ज्याला तो संपूर्ण आपल्या पोटांत रिता करतां येईल त्यानेंच केवळ त्याला तोंड लावावें असा जलाशयाचा कधीं आग्रह नसतो. आपल्याला जेवढी तहान असेल तेवढेंच पाणी घ्यावें, उरलेलें असू द्यावें हीच रीत आहे. त्याचप्रमाणें भगवद्गीतेच्या अगाध व गंभीर ज्ञानरूपी जलराशींतून आपली आजची तहान भागण्यापुरतें जेवढें घेतां येईल तेवढ्यापुरताच मी भगवद्गीतेंतील श्रीकृष्णांच्या तत्त्वज्ञानाचा विचार करणार आहें. आज श्रीमद् भगवद्गीता आमचें मार्गदर्शन करूं शकते काय व आमच्यापुढील मूलभूत प्रश्न सोडवूं शकते काय हा माझ्या मतें महत्त्वाचा प्रश्न आहे व त्यावर 'होय' असें माझें उत्तर आहे. तें कसें येवढेंच मी या ठिकाणीं दाखविणार आहें. माझी या विषयाची ही मर्यादा मी हेतुतःच उल्लेखिली आहे.

## आमच्यापुढील प्रश्नाचें स्वरूप

भगवद्गीतेनें आमचें जें मार्गदर्शन करावयाचें व आमच्यापुढील मूलभूत प्रश्न जे सोडवावयाचे त्यांचें स्वरूप तरी काय आहे ? आज आमचें स्वतंत्र राज्य उत्पन्न झालेलें असून गेलीं दीडशें वर्षें या देशांत प्रभुत्वानें नांदत असलेली परकीय राजसत्ता पार भंगून

गेली. ज्या समुद्रांतून ती आली त्याच समुद्रांत ती विलय पावली. अर्थातच स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारतीय राष्ट्राचें पुर्ननिर्माण कसें करावें व येथील समाजजीवनाची पुनर्घटना कोणत्या पद्धतीनें करावी हा प्रश्न आमच्या राष्ट्रीय नेतृत्वासमोर म्हणजेच आमच्या समोर आज उत्कटतेनें उभा राहिलेला आहे.

अधिक सूक्ष्मतेनें विचार केला तर व या पुनर्रचनेच्या प्रश्नासंबंधीं जीं विविध स्वरूपाची मतें व्यक्त करण्यांत येतात त्यांच्याकडे सूक्ष्मतेनें पाहिलें तर असें आढळून येईल की, पाश्चात्य जगांत जागतिक पुनर्घटनेच्या प्रश्नाचें जें हल्लीं मंथन चालू आहे त्याचा एक भाग म्हणूनच आमच्याही राष्ट्रजीवनाच्या पुनर्घटनेचा हा प्रश्न आहे. त्याचें कोणतेंही स्वतंत्र स्वरूप नाही. याचीं कारणें दोन आहेत. त्यांतील पहिलें कारण गेल्या दीडशें वर्षात ज्या पद्धतीनें भारताची वैचारिक भूमिका सिद्ध झाली त्या पद्धतीत दडलेलें आहे, तर दुसरें कारण विसाव्या शतकाच्या सारें विश्व एकरूप करून टाकणाऱ्या घटनेंत दडलेलें आहे. पहिल्या कारणाचें स्वरूप पुढीलप्रमाणें सांगतां येईल :—

सध्यांची आमची राष्ट्रजीवनाची अवस्था मोठी विचित्र आहे. आम्हांला स्वराज्य मिळालें असलें तरी ज्यांना राज्य मिळालें आहे पण ज्यांचें राष्ट्रजीवन अजून सिद्ध व्हावयाचें आहे अशा लोकसंघाच्या दुर्दैवी अवस्थेंत आम्ही सध्यां आहोंत. गेल्या दीडशें वर्षांच्या परकीय राज्यतंत्रानें बुद्धिपुरस्सर या देशांत उभारलेल्या शिक्षणप्रणालीनें, सहस्रावधि वर्षांपासून आमच्यांत जें एकसूत्री, एकसंध, व निष्ठावंत राष्ट्रजीवन होतें तें पार नष्ट करून टाकलें आहे. जुनी निष्ठा व जुनीं मूल्यें भंगून गेलीं आहेत; व त्या जागीं सर्वसामान्य विचारवंतांत कोणतींही नवीं मूल्यें व नव्या निष्ठा उत्पन्न झाल्या नाहींत. दुर्दैवानें एका सुबुद्ध व पद्धतशीरपणें भारतीयांच्या जीवननिष्ठांचा नाश करूं इच्छिणाऱ्या राज्ययंत्राच्या शासनाखालीं अनेक वर्षें या देशाला राहावें लागल्यामुळें पाश्चात्य जगाशीं संसर्ग आल्यावर जुनीं मूल्यें टिकवून त्यांच्या पायावर नवी

उभारणी करतां येणें जसें जपानला शक्य झालें तसें आम्हांस शक्य झालें नाहीं. देशाच्या स्वातंत्र्यांतील व पारतंत्र्यांतील अवस्थांचा हा फरक असतो. सर्वभक्षक पाश्चात्य संस्कृतीची लाट जशी भारतावर, तशीच ती जपानवरही येऊन कोसळली. पण जपानच्या संबंधीं पाश्चात्य लेखकांनीं असा अभिप्राय व्यक्त केलेला आहे कीं Japan has used West but never became Westernised. म्हणजे जपाननें यंत्रयुगात्मक पाश्चात्य संस्कृतीचा उपयोग करून घेतला पण जपान कधींही पाश्चात्याळला नाही. किंबहुना जपानी लोकांनीं आपल्या पितृपूजाप्रधान शितो धर्मावर आधारलेल्या नीतिकल्पना, मूल्यें, राष्ट्रीयत्वाचीं वैशिष्टचें व सांस्कृतिक आचार-विचार हे सर्व प्रयत्नांची पराकाष्ठा करून टिकवून धरले. आजही जपानी स्त्री दारावर गुडघे टेकून आपल्या पतीचें स्वागत करण्यांत धन्यता मानते. पायघोळ झग्याचा पोषाख करण्यांत जपानी लोकांना राष्ट्राभिमान वाटतो व दोन काड्यांमधून भाताचें एकेक शीत तोंडांत घालतांना ती पद्धति रानटी आहे असें मुळींच वाटत नाहीं. साऱ्या जागतिक भाषांत जपानी भाषा कठिणतम असतांनाही प्रयत्नपूर्वक जपानी लोक तीच शिकतात व परवांपर्यंत आपल्या राजाला पृथ्वीवर आलेला देवभूमीचा साक्षात् प्रतिनिधि समजतांना त्यांना मुळींच कमीपणा वाटत नसे. आणि तरीही पाश्चात्य संस्कृतीचें सर्व यंत्रप्रधान सामर्थ्य ते उपयोगांत आणीत होते. इतकेंच नव्हें तर त्या संबंधांत पाश्चात्य राष्ट्रांनाच आपल्या वर्चस्वानें ते प्रसंग-विशेषीं धाकही उत्पन्न करूं शकत होते. स्वतःच्या देशांतच नव्हे तर परदेशांतही आपल्या जीवनमूल्यांच्या संरक्षणाची तेथील जपानी वसाहतींतून ते किती काळजी घेत असत याचें पुरें प्रत्यंतर Where are you going, Japan? या पुस्तकांत पहावयास सांपडतें. त्या पुस्तकाचा अमेरिकन लेखक अमेरिकेंतील जपानी नागरिकां-संबंधीं असें लिहितो कीं, "हे जपानी वसाहतवाले दिवसभर अमेरिकन विद्यापीठांतून शिक्षण घेतात व रात्रींच्या वेळीं आपल्या भाषेचें व संस्कृतीचें खास जपानी शिक्षणतज्ज्ञांनीं चालविलेल्या रात्रीच्या शाळांतून शिक्षण घेतात. त्यांची भाषा जगांतील सर्व

भाषांपेक्षां कठिणतम असतांही आपल्या व्यवहारांत तीच भाषा वापरण्याचा त्यांचा अट्टाहास आहे. इतकेंच नव्हे तर कोणत्याही परिस्थितींत आपले सांस्कृतिक संस्कार तसेच ठेवण्याची त्यांची इतकी तीव्र सिद्धता आहे कीं, तिच्या स्फूर्तींतून केलेल्या प्रयत्नांमुळें इतके दिवस अमेरिकेंत राहून अमेरिकेचें शिक्षण घेऊन व अमेरिकेंतील वैभवशाली जीवनाचा सुखास्वाद घेऊनही त्यांचें स्वतःच्या संस्कृतीविषयींचें प्रेम जसेंच्या तसें टिकलें आहे. त्यांच्या निष्ठा मुळींच भंग पावल्या नाहींत." स्वातंत्र्यामुळें हें जें जपानी लोक करूं शकले तें पारतंत्र्यामुळें भारतीयांना करतां येणें केवळ अशक्य झालें. हिंदुस्थान देशाची शिक्षणप्रणालि परक्या सत्तेनें उत्पन्न केली. तिचा हेतूच या देशांतील जीवननिष्ठा भंगून टाकण्याचा असल्यानें भारताचें अध्यात्म वाईट, संस्कृति रानटी, धर्म टाकाऊ व पूर्वज नादान होते हें तिनें भारतीय मनावर पूर्णपणें बिंबविलें. एखाद्या देशाचा राज्यकारभार सदैव हातांत ठेवून त्या देशाला सदाचे गुलाम ठेवावयाचें असेल तर त्या देशांतील राष्ट्राभिमान, जात्यभिमान, व वंशाभिमान नष्ट करणें आवश्यक असतें. जितांना जेते हे सांस्कृतिक व अध्यात्मिकदृष्टचा श्रेष्ठ वाटूं लागले व आपण आध्यात्मिक दृष्टचा व सांस्कृतिक दृष्टचा सर्वतोपरी हीन आहोंत हें मनांत ठसलें कीं त्या जितांना भविष्यकाळ कधींही असूं शकत नाहीं. अल्पसंख्यांनीं बहुसंख्यांवर राज्य कारण्याचा हाच खरा उपाय आहे.. जस्टिस वुड्राफ म्हणतोः—

It is necessary in particular to deny the alleged spiritual character of Indian Civilisation. It would never do to admit this. For spirituality is honoured of all men and where it exists there are other excellences.
" त्यांतल्या त्यांत भारतीय संस्कृतीच्या आध्यात्मिकतेविषयीं तर अवश्य वाद उत्पन्न करून ती नाकारलीच पाहिजे. कारण जेथें कोठें आध्यात्मिकता दिसून येते तेथें त्या लोकसंघाविषयीं लोकांत विलक्षण आदर नांदतो व जेथें हें श्रेष्ठत्व असतें तेथें इतर श्रेष्ठत्व आपोआपच येतें. पाश्चात्य संशोधकांनीं पद्धतशीरपणें हे प्रयत्न केले. नवें शिक्षण

सर्वस्वीं पाश्चात्य वळणाचें असल्यामुळें व प्रतिष्ठा, मान, आणि पैसा या तिहीची त्याच्याशीं विलक्षण सांगड जुळविण्यांत आली असल्यामुळें साऱ्याच परतंत्र भारतीय पिढीला त्याच्याकडे वळणें क्रमप्राप्त झालें. तपेंचीं तपें हाडाचीं काडें करून शास्त्राध्ययन करावयाचें व त्याचें फळ म्हणून लाचार भिक्षुक वृत्तीचा अंगीकार करून रुपया बारा आण्यासही महाग व्हावयाचें यापेक्षां मॅट्रिक, इंटर, होऊन अथवा शक्य तर बी.ए. होऊन खऱ्या विद्येवांचूनच प्राप्त होणाऱ्या धनामुळें उत्पन्न होणारें सुखी जीवन मिळवून सामाजिक प्रतिष्ठा संपादन करावयाची हा मार्ग कोणासही परवडणाराच होता. सहस्रावधि वर्षें अनुस्यूत असलेला सांस्कृतिक धागा पद्धतशीरपणें तोडून टाकण्याची याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर एका शतकाच्या अवधींतच युरोपच्या जीवननिष्ठांशीं आम्ही एकरूप झालों. त्यांचा दृष्टिकोन आम्ही स्वीकारला. त्यांच्या प्रगति व परागतीच्या व्याख्या या आमच्याही प्रगति व परागतीच्या व्याख्या ठरल्या, व जीवनाच्या आकांक्षा व ध्येयें, सभ्यतेच्या व नीति-अनीतीच्या कल्पना, इतिहास व समाजशास्त्राच्या कल्पना, या सर्वच दृष्टींनीं ते आणि आम्ही अगदी एकरूप होऊन गेलों. भारतीय इतिहासांत जें कांहीं चांगलें असल्याचा पाश्चात्य दाखला देतील तेवढेंच चांगलें असें आम्ही म्हणू लागलों. महर्षि अण्णासाहेब पटवर्धन, लोकमान्य टिळक, अरविंद घोष, श्रीरामकृष्ण परमहंस, विवेकानंद प्रभृतींनीं ही लाट परतविण्याचा प्रयत्न केला. पण काळाच्या तडाख्याला हे समर्थ हातही अपुरे पडले यांत शंकाच नाहीं.

अशा स्थितींत यंत्रयुगानें जगही एकमेकांच्या इतकें जवळ आणलें आहे कीं वैचारिक क्षेत्रांत नसलें तरी व्यावहारिक क्षेत्रांत सारें जग जणूं कांहीं एक कुटुंबच झालें आहे. विमानें व जलयानें यांनीं प्रदेशांतील अंतर संपविलें आहे. मागच्या महायुद्धांत सिंगापूरला राहणारे सेनाधिकारी रोजच्या दुपारच्या जेवणांतील भाजी विमानांतून कलकत्त्याच्या बाजारांत जाऊन घेऊन जात असत. टेलिफोन, टेलिव्हिजन, रेडियो व बिनतारी तारायंत्र यांनी तर दूर अंतर, वियोग इत्यादि सर्व परिभाषांना संपवीतच आणलें आहे. आम्ही पाश्चात्य

जगाशीं जीवनाच्या दृष्टिकोनाच्या रूपानें पद्धतशीरपणें एकरूप होत असतां याही गोष्टीचा आमच्यावर परिणाम झाल्याविना राहिला नाहीं हें दुसरें कारण होय. विसावें शतक हें या दृष्टीनें मोठें आश्चर्यजनक शतक आहे. संपूर्ण जगांतच त्या शतकानें विलक्षण स्वरूपाची वैचारिक क्रांति केलेली आहे. ही वैचारिक क्रांति एखाद्या देशापुरती अथवा एखाद्या लोकसघापुरती मर्यादित नसून ती जागतिक स्वरूपाची आहे व मानवता हाच तिचा पाया आहे. दळणवळणाच्या विलक्षण साधनांनीं सर्व जगांतील सर्व भूप्रदेशांचे परस्पर आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक हितसंबंध एकमेकांत इतके गुंतून पडलेले आहेत कीं, एखाद्या देशापुरता एकटा वा वेगळा असा विचारच आतां करतां येत नाहीं. त्यामुळें आजचा पुनर्रचनात्मक विचार हा एका देशापुरता वा लोकसमूहापुरता मर्यादित असूच शकत नाहीं. जागतिक स्वरूपाचा ध्येयवाद हा विसाव्या शतकांतील ध्येयवादाचा परवलीचा शब्द आहे. येथें कोणताही पुनर्रचनात्मक वा पुनर्घटनात्मक विचार चटकन् आंतरराष्ट्रीय आकार घेईल व विश्वबंधुतेच्या स्वरूपाचा राहील. एकोणविसावें शतक हें राष्ट्रीय विचाराचें शतक होतें तर विसावें शतक हें आंतरराष्ट्रीय व विश्वात्मक वैचारिक धारणेचें शतक आहे. या युगवैशिष्टयाचा परिणाम भारतीय राष्ट्राच्या पुनर्रचनेवर व पुनर्घटनेवर झाल्याविना राहात नाहीं. त्यामुळें आजचे आमचे व्यावहारिक क्षेत्रांतील भेद या दृष्टीनें पूर्णपणें पाश्चात्य स्फूर्तीतून उदय पावले आहेत. हिंदुस्थानापुरताच विचार करावयाचा तर हा देश स्वतंत्र झाला असला तरी त्या स्वतंत्र देशांतील राजकीय धारणा व सामाजिक पुनर्घटनेच्या कल्पना या पाश्चात्य स्फूर्तीतल्या आहेत. स्वतंत्र हिंदुस्थानांत नवराष्ट्रनिर्मिति करण्याच्या आकांक्षा हल्लीं भारतीय नेते बोलून दाखवीत आहेत त्या सर्व आकांक्षा ह्या स्फूर्तीतूनच उगम पावल्या आहेत. त्यांचें वर्गीकरण केलें तर त्यांचे दोन प्रवाह आढळून येतील. त्यांतील एक प्रवाह व्यक्तिस्वातंत्र्यवादावर आधारलेल्या लोकशाहीचा व लोकतंत्रवादाचा आहे, तर दुसरा प्रवाह साम्यवादाचा आहे. विसाव्या शतकाचें, आंतरराष्ट्रीयवादी

दृष्टिकोनाचें वैशिष्टच उदय पावलें नव्हतें तेव्हांही वर दिलेल्या पहिल्या कारणास्तव पाश्चात्य जीवननिष्ठा हीच आमची जीवननिष्ठा होती. एकोणविसाच्या शतकाची युरोपच्या वैचारिकतेची जी राष्ट्रीयता व लोकशाहीचा पुरस्कार ही दोन वैशिष्टचें तींच भारतीय राजनैतिक आंदोलनानेंही आपलें प्राप्तव्य म्हणून स्वीकारलेलीं होतीं. भारतीय स्वातंत्र्याच्या सर्व द्रष्टचांनीं ज्या राष्ट्रीयतेचा पुरस्कार केला तिची कल्पना, जीवनदृष्टिविरहित पाश्चात्य राष्ट्रीयतेचीच होती व राज्यघटनेच्या ज्या स्वरूपाचा हे भारतीय नेते घोष करीत होते तें पाश्चात्य लोकतंत्राचेंच होतें. तात्पर्य, एकोणविसाव्या शतकांत पाश्चात्य देशांत उदय पावलेल्या राष्ट्रवादांतून व लोकतंत्रांतून भारतीयांनीं आपलें राजकीय जीवन उभारलें होतें असें स्पष्ट दिसतें. "आम्हांला स्वातंत्र्य पाहिजे" अशी घोषणा करीत असतां हिंदुस्थानच्या राज्यघटनेचें जें स्वरूप न्यायमूर्ति रानडे यांच्यापासून तर गांधीजींसारख्या अहिंसक लोकनेत्यांपर्यंत सर्व नेत्यांच्या अंतःकरणांत होतें तें पाश्चात्य लोकतंत्रवादाचेंच होतें. आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांनीं स्वतःचें ध्येय म्हणून सांगतांना आपल्या दैनंदिनींत व वक्तव्यांत हिंदुस्थानचें 'प्रजासत्ताक राज्य' असें म्हटलें आहे. दादाभाई नौरोजी, रानडे, गोखले, फेरोजशहा मेथा, सुरेंद्रनाथ बॅनर्जी प्रभृति मवाळाग्रणींच्या काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांतून प्रजासत्ताक राज्याच्या कल्पनेचाच उच्चार केलेला आढळून येईल. प्रसिद्ध पंडित श्यामजी कृष्णवर्मा यांनीं इ. स. १९०७–०८ च्या सुमारास भारतवर्षातील बुद्धिमान् विद्यार्थ्यांकडून हिंदुस्थानची भावी राज्यघटना कशी असावी याविषयीं निबंध मागविले असतां त्यांच्याकडे आलेल्या सर्व निबंधांतून प्रजासत्ताक राज्यपद्धतीचाच पुरस्कार करण्यांत आलेला आहे. मी स्वतः श्यामजींचें दप्तर पाहिल्यावर ही गोष्ट माझ्या ध्यानांत आली. लंडनमधील अभिनव भारतीय क्रांतिकारकांचें तर अमेरिकन पद्धतीचें प्रजासत्ताक व वीर सावरकर हे त्याचे अध्यक्ष हें सुवर्णस्वप्नच होतें. महात्मा गांधी यांनीं Government of the people, by the people, and for the

people, या शब्दांनीं त्यांना अभिप्रेत असलेली राज्यघटना लोकतंत्रवादाची असावी असा स्पष्ट उद्घोषच केलेला होता. तात्पर्य, परतंत्र हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व राजकीय नेत्यांचें ध्येय प्रजासत्ताक राज्यघटना हें होतें. आज तें ध्येय साकारलेलें असून स्वतंत्र हिंदुस्थानचें सार्वभौम प्रजासत्ताक राज्य पं. जवाहरलाल नेहरू यांच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेलें आहे. या ध्येयाची आजची प्रतिनिधि संस्था काँग्रेस ही आहे. इतर राजकीय संस्था धोरणांतील तांत्रिक मतभेदामुळें कांहीं अंशांनीं काँग्रेसपासून दूर राहून स्वतंत्रपणें कार्य करीत असल्या तरी त्याही या लोकतंत्राच्या विचारसरणीचाच अंगीकार करणाऱ्या असल्यामुळें काँग्रेसमध्यें व या संस्थांमध्यें मूलभूत दृष्टिकोनाचा असा कोणताच महत्त्वाचा फरक नाहीं. ह्या लोकतंत्राला अथवा प्रजासत्ताक घटनेला अप्रागतिक, भांडवलशाहीची पुरस्कर्ती, शोषक, स्वार्थी, समाजहितद्रोही अशीं दूषणें ठेवून त्याच्या ऐवजीं श्रमजीवी वर्गाचें समाजनिष्ठ राज्यतंत्र उत्पन्न करूं इच्छिणारा असा दुसरा विचारप्रवाह हिंदुस्थानांत नांदत आहे. कम्युनिस्ट, सोशॅलिस्ट इत्यादि पक्षोपपक्ष हे ह्या प्रवाहांतील होत. ह्या प्रवाहाला मार्क्सवादी असें म्हटलें पाहिजे. पक्षोपपक्ष अनेक असले तरी ते या दोन प्रवाहांतच पडतात. पहिल्या लोकतंत्रवादी प्रवाहाची सर्वांत प्रबल प्रातिनिधिक संस्था काँग्रेस असून दुसऱ्या साम्यवादी प्रवाहाची प्रातिनिधिक संस्था कम्युनिस्ट पक्ष होय. सोशॅलिस्ट पक्षानें नुकत्याच झालेल्या निवडणुकांपूर्वी प्रचारतंत्राच्या साहाय्यानें आपल्या विशेष प्रबलतेचा भ्रम उत्पन्न केला होता; पण नुकत्याच झालेल्या निवडणुकांनी तो पार नष्ट केला आहे. या दोन्ही मूलभूत विचारप्रवाहांच्या सहकार्यांतून किंवा संघर्षांतून स्वतंत्र भारताची नवराष्ट्रनिर्मिति व नवी सामाजिक पुनर्रचना व्हावयाची आहे. हे दोन्ही प्रवाह व त्यांचें उगमस्थान पाश्चात्य केंद्रांतील आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. साम्यवादी प्रवाहाचें उगमस्थान पाश्चात्य मार्क्स, एंजल्स व लेनिनच्या विचारसरणींतून आहे हें इतकें स्पष्ट आहे कीं त्यासंबंधांत वेगळें स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता नाहीं. युरोपखंडांत वैचारिक क्षेत्रांत

मार्क्सवादानें लोकशाहीचा पूर्ण पराजय केलेला आहे. पण तो पराजय मानवता सुखी करण्याच्या ज्या मुद्द्यावर केला त्याच मुद्द्यावरून मार्क्सवादाचे वाभाडे काढून मार्क्सवादाप्रमाणेंच पूर्वीची राष्ट्रनिष्ठ लोकशाही आतां यु.नो.च्या कल्पनेनें जागतिक स्वरूप धारण करूं लागली आहे हें विसाव्या शतकाचें वैशिष्टच होय. मार्क्सवाद जसा विश्वव्यापी आहे, तसाच लोकतंत्रवादही पाश्चात्य जगांत आंतरराष्ट्रीय व विश्वव्यापी स्वरूप धारण करूं लागला आहे. भारताचें आजचें प्रजासत्ताक व काँग्रेस आणि नेहरू यांचा लोकतंत्रवाद यांचें स्वरूप या आंतरराष्ट्रीय व विश्वव्यापी स्वरूप धारण केलेल्या पाश्चात्य लोकतंत्रवादांतूनच निर्माण झालें आहे हें भारतीय सार्वभौम प्रजासत्ताकाचे नेते पं. जवाहरलाल नेहरू यांनीं वारंवार केलेल्या निधर्मी राज्याच्या घोषणेवरून स्पष्टच झालेलें आहे. भारतीय राष्ट्राची पुनर्रचना या दोन युरोपीय विचारप्रवाहांतून व्हावयाची आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे भारताचें स्वतंत्र राज्य निर्माण झालें असलें तरी राष्ट्र अद्याप निर्माण व्हावयाचें आहे असें मी कां म्हणतों याची कल्पना येईल. हिंदुस्थानांत आज प्रभावशाली असणाऱ्या या दोन विचारप्रणालींचें उगमस्थान युरोप असल्यामुळें ह्या दोन्ही विचारप्रवाहांनीं युरोपमध्यें उत्पन्न केलेल्या पुनर्घटनेचें जें फलित आहे त्याहून वेगळें फलित हिंदुस्थानांत मिळूं शकणार नाहीं. युरोपमध्यें या प्रवाहांची निर्मिति कशी झाली व आज त्यांचें पर्यवसान कशांत होत आहे व जगाचें त्यामुळें कल्याण होणार आहे काय याची तपासणी करणें या दृष्टीनें अत्यंत उद्‌बोधक ठरेल.

## युरोपची लोकशाही

फ्रान्स देशांतील राज्यक्रांतीनंतर युरोपमध्यें लोकतंत्राचा व प्रजासत्ताकवादाचा उदय झालेला आहे. त्यापूर्वीं तेथें धर्मसत्ता, वांशिक राजसत्ता, व सरंजामी सरदार यांचे संघर्ष व अत्याचार सर्वत्र चालू होते. युरोपमधील ख्रिश्चन धर्माला तत्त्वज्ञान असें कांहीं नाहीं. केवळ श्रद्धेच्या पायावर त्याची उभारणी झालेली आहे.

त्यामुळें बुद्धीचें व वाढत्या ज्ञानांतून उत्पन्न होणाऱ्या आकांक्षांचें पूर्ण समाधान तो करूं शकत नाहीं. सत्यासत्यनिर्णय करावयास बसलेल्या तत्त्वज्ञानाच्या व विज्ञानाच्या म्हणजेच शास्त्रीयतेच्या विरोधांत केवळ श्रद्धांना टिकवून धरणें त्याला अत्यंत कठिण जातें. अशा स्थितींत त्या टिकवून धरण्याचा एकच मार्ग त्याच्या समोर उरतो. तो म्हणजे धर्माच्या नांवाखालीं शास्त्रीय ज्ञानावर बहिष्कार घालून शास्त्रज्ञांचा व तत्त्वज्ञांचा अनिवार छळ करणें हा होय. युरोपमधील धार्मिक वर्चस्व गाजविणाऱ्या महंतांनीं ही गोष्ट किती क्रूरपणें केली हें कॅथॉलिक–प्रॉटेस्टंटांचे झगडे, प्युरिटनांचे अत्याचार व हिंदुस्थानांतील गोमंतकांतही ख्रिस्ती महंतांनीं केलेले भीषण अत्याचार यावरून स्पष्टच होतें. आपलें वर्चस्व टिकवून धरण्यासाठीं त्यांनीं राजसत्तेशीं संधि केला. सत्तेनें त्यांना संरक्षण दिलें व सत्तेच्या पापाला त्यांनीं धर्माचा आधार पुरविला. फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी वांशिक राजसत्ता व धर्मसत्ता ही याप्रमाणें लोकांवर अत्याचार करीत असतां लोकांच्या अंतःकरणांत दोन्ही संस्थांविषयीं स्वाभाविकपणेंच आत्यंतिक तिरस्कार उत्पन्न झाला होता. आपल्या आवडत्या कुत्र्यांना राजे लोक जें मांस पुरवीत त्याच्या सहस्रांश सुद्धां लोकांच्या पोटांत अन्न पडतें कीं नाहीं या गोष्टीकडे लक्ष देण्याची त्यांना आवश्यकता वाटत नसे. या राज्यसंस्थेला शास्ता वा नियंत्रक असा कोणीच नव्हता. ती पूर्णपणें अनियंत्रित असून स्वतःला स्वयंभू समजत होती. स्वाभाविकपणेंच लोकांना आपल्यासारखेच हातपाय, सुखदुःखाच्या भावना व आकांक्षा असलेल्या व्यक्तींना सदाचे स्वतःचे धनी समजून सदाचे त्यांचे अत्याचार काय म्हणून सहन करावे असें वाटूं लागलें. राज्यसंस्था ही सर्व लोकांनीं सुखी रहावें म्हणून निर्माण केलेली एक प्रकारची व्यवस्था आहे व ती व्यवस्था निर्माण करण्याचा जसा लोकांना अधिकार आहे, त्याचप्रमाणें ती बदलविण्याचाही त्यांना निश्चितपणें अधिकार आहे ही विचारप्रणालि स्वाभाविकपणेंच या काळांत उत्पन्न झाली. धनीपणाचा आपला जन्मजात अधिकार आहे व दास राहण्याचा लोकांचाही जन्मजात धर्म आहे हें प्राचीन

काळच्या भारतीय वेनाप्रमाणेंच युरोपच्या राजसत्ता कशा समजूं लागल्या होत्या हें इंग्लंडचा राजा चार्लस व फ्रान्सचा लुई यांच्या वर्तनावरून स्पष्ट होतें. केवळ जन्मामुळें व्यक्ति व्यक्तीची दास कधींच राहूं शकत नाही, तिचें स्वातंत्र्य पूर्णपणें अबाधित राहिलें पाहिजे अशी विचारसरणी लोकांच्या मधून या काळांत उत्पन्न झाली. जन्मतः सारेच समान असून गुणकर्मानुसार प्रत्येकाच्या विकसनाला वाव असावा असें या विचारसरणीचें सार होतें. वॉल्टेर, रूसो, बेन्थॉम, मिल्ल प्रभृतीनी व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार करून समाजाचें नेतृत्व स्वीकारलें व वांशिक राजसत्ता उलथून पाडण्याची जनमनाची भूमिका याच काळांत सिद्ध केली. फ्रेंच राज्यक्रांतीत सिंहासनाधीश्वर राजाला फासावर चढविण्यांत या विचारक्रांतीची परिणति झाली. राजाला गिलोटीनवर चढविल्यावर स्वातंत्र्य, समता व बंधुता या तत्त्वत्रयीवर नव्या राज्यघटनेची उभारणी झाली. ती राज्यघटना वांशिक नव्हती अथवा कोण्या धर्मगुरूनें तिला आशीर्वाद देण्याचीही आवश्यकता नव्हती. तिचें स्वरूप लोकांचें, लोकांनीं निर्माण केलेलें व लोकांच्या सुखासाठीं असलेलें राज्ययंत्र असें होतें. अर्थात् लोकांना स्वतःचें राज्ययंत्र निवडणुकीच्या मार्गानें स्वतः निवडण्याचा अथवा निर्माण करण्याचा अधिकार होता. निवडलेल्या लोकांना नियमित वर्षांच्या मर्यादेपर्यंतच राज्यकारभार करतां येत असे. पुन्हां निवडणुका होत. वाईट राज्यकारभार केल्यास लोक आपणांस पुन्हां निवडून देणार नाहीत हें उघड दिसत असल्यामुळें निवडून गेलेल्या लोकप्रतिनिधींना जागरूकपणें लोकमताला उत्तरदायी राहून दक्षतेनें राज्यकारभार करावा लागे. प्रत्येक व्यक्ति ही पूर्णपणें स्वतंत्र व जन्मतः समान योग्यतेची असल्यामुळें वरिष्ठ-कनिष्ठतेचा प्रश्न उत्पन्न होण्यासारखा नव्हता. लोहाराला राष्ट्रसूत्रधार होण्याची व चांभाराला राष्ट्रपति होण्याची पूर्णपणें शक्यता होती. हवें त्याला आपल्या इच्छेप्रमाणें शिक्षण घेण्याची, धार्मिक विधिविधानें पाळण्याची किंवा मुळींच न पाळण्याची, व्यक्तिजीवनांत नीति-अनीतीच्या स्वतंत्र कल्पनानुसार वागण्याची पूर्णपणें मोकळीक

होती. समाजहिताला उपद्रवकारक वर्तन नसलें म्हणजे झालें. या लोकशाहीच्या विचारप्रवाहानें फरान्सनंतर प्रत्येक राष्ट्रांतील राज्यसत्तांना धक्का देऊन त्या उलथून पाडल्या व तेथें लोकशाही उत्पन्न झाली. इंग्लंडचे लोक पुराणमताभिमानी असल्यामुळें त्यांनीं नाममात्र राजसत्ता ठेवली; पण ती इतकी नाममात्र कीं राजा हा केवळ शोभेचा विषय झाला. अमेरिकेनें राजाची भानगडच न ठेवतां ठराविक मर्यादेपर्यंतचा अध्यक्ष निवडण्याचीच प्रथा निर्माण केली व या ना त्या स्वरूपांत लोकतंत्रानें पाश्चात्य जगावर संपूर्ण अधिराज्य प्रस्थापित केलें.

युरोपचा दृष्टिकोन हाच आमचाही दृष्टिकोन ठरल्यामुळें अमेरिकन पद्धतीचें प्रजासत्ताक हेंच आमचें ध्येय कसें बनून राहिलें होतें याचें दिग्दर्शन मी मागें केलेंच आहे. ही जी लोकशाही ती अर्थातच त्या वेळीं प्रत्येक राष्ट्रापुरती स्वतंत्र होती. आजच्याप्रमाणें तिची जागतिक स्वरूपाची संघटना उत्पन्न करण्याचा विचार कोणाच्याही मनांत येण्याची त्या वेळीं आवश्यकताच नव्हती. ही जी लोकशाही तीच केवळ अस्तित्वांत आली असती तर ती टिकतीही. पण युरोपमध्यें लोकशाहीच्या उदयाबरोबरच आणखी दोन गोष्टींचा उद्‌भव झाल्यामुळें वांशिक व धार्मिक श्रेष्ठतेच्या शोषणापासून लोकांचें संरक्षण करावयास उत्पन्न झालेली ही लोकशाहीची संस्था जुन्या राजसंस्थेपेक्षांही अधिक शोषक, समाजहितविघातक व भयानक ठरली. त्या दोन गोष्टींपैकीं पहिली गोष्ट म्हणजे यंत्रयुग व दुसरी गोष्ट म्हणजे औद्योगिक क्रांति होय.

## लोकशाहीची भयानकता

लोकशाहींत व्यक्तिस्वातंत्र्य होतें. व्यक्तीच्या उत्पादनावर जसें तिचें पूर्णपणें व सर्व अर्थांनीं स्वामित्व होतें तसेंच उत्पादनाच्या साधनांवरही तें होतें. जन्मजात दासता व तिच्यांतून उत्पन्न होणारे अत्याचार यांना व्यक्तिस्वातंत्र्यवादी लोकशाहीनें आळा घातला होता. पण लोकशाहीच्या मागोमाग यंत्रयुग उदय पावलें. यंत्रांतून मर्यादातीत उत्पादन होऊं लागलें. यंत्रांनीं देशांदेशांतील

अंतर तोडलें व उत्पन्न झालेल्या मालाला दळणवळणाच्या विविध मार्गांनीं दूरदूरच्या जगतांतल्या बाजारपेठा मोकळ्या केल्या. त्याचा परिणाम असा झाला कीं, पूर्वीपेक्षां व्यक्तीची श्रीमंती अनेकपटींनीं वाढूं लागली. अर्थातच समाजांतील सर्व व्यक्तीची नव्हे; तर यंत्राचे धनी असलेल्या फक्त कांहीं थोड्या व्यक्तींची. उत्पादन हें नेहमीं समाजाच्या गरजा पुरविण्यासाठी असतें. लोकसंख्येपेक्षां उत्पादन जर अधिक वाढलें तर त्याचा तर्कशुद्ध परिणाम सर्व लोकांच्या गरजा पूर्णपणें उपशम पावण्यांतच व्हावयास पाहिजे. मी एक समीकरणच आपल्यासमोर मांडतों म्हणजे माझ्या म्हणण्याची यथार्थ कल्पना येईल. समजा कीं, एका गांवांत पन्नास माणसांची वस्ती आहे व त्या गांवांत गाद्यांचा एक कारखाना असून त्या कारखान्यांतून वर्षाला ५०० गाद्यांचें उत्पादन होतें. त्या गांवांतील लोकांची स्थिति काय असेल असें जर कोणी तुम्हांस विचारलें तर त्याचें तर्कशुद्ध उत्तर तुम्ही काय देऊं शकाल? तें तर्कशुद्ध उत्तर इतकेंच राहील कीं, या गांवांत कोणीही मनुष्य जमिनीवर झोपत नसून सारीं माणसें गाद्यांवर झोपतात. पण हें उत्तर तर्कशुद्ध असलें तरी तें वस्तुस्थितीचें निदर्शक निश्चित नाहीं. वस्तुस्थितीचें निदर्शक उत्तर काय असेल? तें उत्तर फार भयंकर आहे. तें उत्तर असें आहे कीं, ५०० गाद्यांचें उत्पादन असलेल्या ५० माणसांच्या या गांवांत केवळ एक मनुष्य गादीवर झोपत असून उरलेलीं ४९ माणसें जमिनीवर झोपतात व थंडीनें कुडकुडून मरतात. ही वस्तु-स्थिति किती भयंकर आहे! मार्क्सनें असें म्हटलें आहे कीं, यंत्रयुगानें झालेल्या औद्योगिक क्रांतीनें जगाचें उत्पादन लोकसंख्येच्या चौपट वाढविलें असलें तर बेकारी मात्र दहापट वाढलेली आहे. मार्क्सच्या काळीं ही अवस्था होती; आतां तर त्यानें दिग्दर्शित केलेलें हें सत्य त्यापेक्षांही कितीतरी पटीनें अधिक दारुण स्वरूपांत खरें ठरत आहे. असें कां झालें? याचें कारण लोकशाहीमधील व्यक्तिस्वातंत्र्य होय. व्यक्ति स्वतंत्र असल्यामुळें तिच्या उत्पादनावर व उत्पादन-साधनांवर त्या व्यक्तीची संपूर्णपणें सत्ता आहे. नैर्बंधिक रीतीनें असलेल्या या स्वत्वाच्या अधिकाराचें संरक्षण करणेंच सरकारला

भाग आहे. यांत्रिक उत्पादनांत उत्पादन अधिक; पण माणसांची गरज कमी अशी अवस्था असते. व्यापारास जगाच्या बाजारपेठा मोकळ्या असल्यामुळें देशांतील लोकांनीं माल न घेण्याचें ठरविलें तर काय होईल याचा विचार करण्याचें कांहीच कारण उरत नाहीं. शिवाय यंत्राचा धनी स्वतःच्या धनलोभास्तव कारखान्यांत काम करणाऱ्या कामकऱ्यांना, अथवा जमीनदार जमिनीत राबणाऱ्या शेतकऱ्यांना शक्य तितकें कमी वेतन देण्याचा प्रयत्न करतो. लोकशाहीच्या स्वातंत्र्यवादांत याला अत्याचार म्हणतां येत नाहीं. याचें कारण कोणत्याही कारखान्याच्या वा जमिनीच्या धन्याकडून तेथील कामकऱ्यांना वा शेतकऱ्यांना जुन्या काळच्या वांशिक गुलामा-प्रमाणें 'तुम्ही काम केलेंच पाहिजे' अशी बलपूर्वक सक्ती कोणीही करीत नाहीं. उलट तो धनी असें म्हणतो की, 'तुमची लाख गरज असली तरी मला तुम्हांला अधिक वेतन द्यावयाचें नाहीं. पण काम करण्याचीही मी तुमच्यावर सक्ती करीत नाहीं. तुम्हांला काम करा-वयाचें असलें तर मी सांगतों येवढ्या वेतनावर तें करावें लागेल. पटत वा परवडत नसेल तर तुम्हीं खुशाल जा. या परिभाषेंत सक्ती, अत्याचारी, वा इच्छेविरुद्ध बळाचा उपयोग कोठें आहे? धन्याला जसे चाकर हवे तितके मिळूं शकतील, तसेंच चाकरालाही धनी हवे तितके मिळू शकतील असें येथें व्यक्तिस्वातंत्र्यवादी समर्थन आहे. पण हें समर्थन तर्कशास्त्राला धरून असलें तरी व्यवहाराच्या मात्र उलट आहे. धन्याला चाकर हवे तितके मिळू शकतात; पण चाकराला मात्र हवे तितके धनी मिळू शकत नाहींत. सगळ्याच उत्पादनसाधनांच्या मालकांची परिभाषा या प्रकारची ठरलेली असल्यामुळें कोठेंही जावें तरी पळसाला पानें तीनच अशी या चाकराची अवस्था होते व पोटाच्या आगीनें लाचार होऊन त्याला नोकरी पत्करावीच लागते. भांडवलशाही व तिचें आर्थिक शोषण तें हेंच होय. येथें गुलामगिरी परिभाषेंत नाहीं; पण ती प्रत्यक्षांत आहे. येथें परिभाषा व्यक्तिस्वातंत्र्यावर पूर्णपणें आधारलेली असल्यामुळें लोकशाहीच्या राज्यतंत्रालाही धन्यांच्याच हिताचें संरक्षण करणें भाग पडतें. न्यायाच्या ठरीव ठशाच्या परिभाषेंत

येथें शेवटीं शोषितांचें आक्रंदन हेंच अन्यायी ठरतें व शोषकांचा मखमली अत्याचार हा मात्र न्यायी ठरत असतो. दळणवळणाच्या साधनांनीं या शोषक भांडवलशहांचे संबंध साऱ्या जगभर विस्तारले असून दूरदूरचे भांडवलशहा हे हितसंबंधांनीं एकरूप होतात व त्यांचा जागतिक स्वरूपाचाच एक वर्ग बनतो. याच्या उलट पीडित कामकऱ्यांचा मात्र तसा वर्ग बनूं शकत नाहीं. पोटापाण्याच्या प्रश्नावर नाडलेले अनेक लोक अशा व्यवस्थेंत शेवटीं नाडले जातात व पैशानें त्यांचीं मतें विकत घेतलीं जातात. त्यामुळें खऱ्या अर्थाचें मतस्वातंत्र्य केवळ तत्त्वज्ञानाच्या व राज्यघटनेच्या पुस्तकांत शिल्लक राहतें; पण प्रत्यक्षांत मात्र हे भांडवलशहा स्वतःचे हितसंबंध सुरक्षित राखणारी राज्यसंस्था, या विकत घेतलेल्या मतांच्या भरंवशावर, आपआपल्या देशांत उत्पन्न करतात. म्हणून अखेर प्रत्यक्षांत अल्पसंख्याकांचेंच बहुसंख्याकांवर राज्य नांदतें. कॉ. लेनिन यानें आजची लोकशाही ही भांडवलशाहीची निर्मिति आहे ( Democracy is the creation of Capitalism ) असें म्हटलें आहे. जोंवर भांडवलशाही शिल्लक आहे तोंवर खऱ्या अर्थाची लोकशाही उत्पन्न होऊंच शकत नाहीं. न्यायाच्या नांवाखालीं चाललेल्या भांडवलशाहीतील या भयंकर शोषणाची धार जुन्या राजेशाहीपेक्षांही अधिक तीव्र स्वरूपाची आहे. सोन्याला येथें भलताच भाव चढून जीवनांत त्याचें मोल प्रत्यक्ष जीवनापेक्षांही अधिक वाढलें आहे. शिक्षणापासून विवाहापर्यंतच्या सर्व संस्था व प्रतिष्ठेच्या, विकसनाच्या व स्वास्थ्याच्या सर्व बाबी भांडवलशाहींत केवळ सुवर्णाच्या मूल्यावर अधिष्ठित आहेत. योग्यतेचें सारें मोजमाप येथें सोन्यानें केलें जाईल. सोनें असलें तर शिक्षण घेतां येईल, मग योग्यता असो वा नसो. सोनें असलें तर चांगल्या मुलीशीं लग्न करतां येईल, मग योग्यता असो वा नसो. सोनें असलें तर जीवनाच्या सर्व क्षेत्रांत संधि व श्रेष्ठता मिळेल, योग्यता असो वा नसो. त्यामुळें बहुजनसमाज शिक्षणादि विकसनाच्या व उपजीवनाच्याही गरजा न पुरण्याच्या अवस्थेला येऊन पोहोंचला

आहे व प्रत्यक्ष जीवन जगणें हें त्याला अशक्य होऊन बसलें आहे. तो जर प्रस्थापित राजसत्तेच्या वा भांडवलशाहीच्या विरुद्ध आवाज काढूं म्हणेल तर राष्ट्रीयत्वाच्या व धर्माच्या नांवाखालीं त्याला भुलवून शांत करण्याचें राजसत्ता व भांडवलशहा हे प्रयत्न करतात. पण वस्तुतः यंत्रयुगानें भांडवलशहांचे हितसंबंध इतके जागतिक स्वरूपाचे झालेले आहेत कीं, एकोणिसाव्या शतकांतील राष्ट्रवादाची परिभाषा, राष्ट्रीय मर्यादांचें उल्लंघन झाल्यामुळें, आर्थिक हितसंबंधापुरती तरी गळून पडल्यासारखी झालेली आहे. शोषकांचें जर वर्गात्मक संघटन जागतिक स्वरूपाचें निर्माण होऊं शकतें तर शोषितांचेंही तसेंच वर्गात्मक संघटन कां निर्माण होऊं नये व त्यांनीं शोषकांना कां उलथून देऊं नये असा विचार स्वाभाविकच शोषितांच्या वर्गात उत्पन्न झाला. विख्यात जर्मन तत्त्वज्ञ हेगेल ह्याचा शिष्य कार्ल मार्क्स हा या विचाराचा उद्घोषक झाला व लोकशाहीची प्रतिक्रिया म्हणून त्यानें साम्यवादाचें तत्त्वज्ञान उत्पन्न केलें.

## लोकशाहीची प्रतिक्रिया म्हणजे साम्यवाद

लोकशाहींतील व्यक्तिस्वातंत्र्याच्या व त्यावर आधारलेल्या शासनसंस्थेच्या घोर परिणामांची प्रतिक्रिया म्हणून उत्पन्न झालेला साम्यवाद हा प्रतिक्रिया म्हणून उत्पन्न झालेला असल्यामुळें तो व्यक्तिऐवजीं समाज हाच विचाराचा आरंभबिंदु मानतो. समाजाचें विकसन व सेवा हें त्याचें उद्दिष्ट आहे. भोंवतालची परिस्थिति आणि तिच्या आघातानें विकास पावणारा समाज जसजसा बदलत जातो तसतसा व्यक्तींत पालट होत असतो. म्हणून समाज-रूपी यंत्राचा एक खिळा याहून व्यक्तीला स्वतंत्र अस्तित्व असें नाहीं. जें आहे तें समाजामुळेंच काय तें आहे असें साम्यवादाचें मत आहे. जगांतील सर्व मानवांची प्रवृत्ति सुखासाठीं असते हें प्रसिद्धच आहे. महाभारतकारांनीं मानवी प्रवृत्तीचें हें मूळ अर्ध्या श्लोकांतच सांगितलें आहे. ते म्हणतातः

**सुखार्थाः सर्व भूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः ॥**

जगांतील सर्व माणसांच्या प्रवृत्ति सुखासाठीं असतात व मानवी जीवितांतील सुखाची ही तहान भागविण्यासाठींच जगांतील सर्व शास्त्रें उत्पन्न झालेलीं आहेत. निरनिराळ्या समाजशास्त्रांचा व राज्यशास्त्रांचा वास्तविक हेतु हाच आहे. पण सुख म्हणजे काय? हा प्रश्न मोठाच चिंतनीय आहे. साम्यवादाला या विषयाचा खोलवर विचार करावयास अवसरही मिळाला नाहीं व गरजही भासली नाहीं. याचें कारण मानवी जीवनाच्या ज्या मूलभूत गरजा व ज्यांच्यावांचून जीवन जगणेंच केवळ अशक्य, त्यांनाच भांडवलशाहीनें धक्का दिल्यामुळें मानवसमाजाचें दुःख हरण करण्यासाठीं लोकशाहीची प्रतिक्रिया म्हणून निर्माण झालेल्या साम्यवादानें जीवनाला आवश्यक अशा सर्व गरजा व उपभोगाच्या वासना यथास्थितपणें पुरविणे व तशी परिस्थिति निर्माण करणें हाच सुखाचा सरळ अर्थ केला. पुष्कळ दिवसांत कांहींच खावयास न मिळाल्यावर कसाबसा पिंजऱ्यांतून सुटका झालेला बुभुक्षित व्याघ्र इतर गोष्टींची चिंता न वाहतां ज्याप्रमाणें एकदम भक्ष्यालाच सुखसर्वस्व समजून त्यावर झडप घालतो, तसेंच साम्यवादाचें देखील झालें. या गरजा व वासना एका व्यक्तीनें पुरविण्याचा व्यक्तिवादाचा प्रश्नच येथें नव्हता. थोड्या व्यक्ति शोषक व बहुसंख्य समाज शोषित व वंचित अशी स्थिति असल्यामुळें येथें विचाराचा आरंभबिंदु व्यक्ति न ठरतां व्यक्तिस्वातंत्र्याची प्रतिक्रिया म्हणून स्वाभाविकपणेंच समाज ठरला. समाजाच्या सर्व गरजा पूर्ण होण्याइतकें उत्पादन जगांत वाढलें असूनही त्या गरजा पूर्ण होत नाहींत याचें कारण एका विशिष्ट वर्गाची दुसऱ्या वर्गावर चाललेली कुरघोडी व या व्यक्तिस्वातंत्र्यवादांतून निर्माण झालेला उत्पादनसाधनांवरील मालकी हक्क हेंच दिसत असल्यामुळें व्यक्तीचें अस्तित्व अमान्य करून उत्पादनसाधनें समाजाच्या मालकीचीं करणें, वर्ग व वर्गविग्रह नष्ट करून त्याऐवजीं एकवर्गात्मक समाजरचना उत्पन्न करणें, व व्यक्तीच्या स्वातंत्र्याऐवजीं तिच्या गरजा व वासना पुरविण्याची हमी घेणें या स्वरूपांत ही विचारप्रणालि प्रकट झाली. शोषण सर्व जगांत चालू असल्यामुळें

व शोषकांची आर्थिक हितसंबंधांतून निर्माण झालेली संघटना जगभर असल्यामुळें या विचारांचें स्वरूपही एखाद्या मर्यादित भूप्रदेशापुरतें न राहतां तें जागतिक व आंतरराष्ट्रीय स्वरूपाचेंच आंखलें गेलें. लोकशाहींतून व्यक्तीला अवास्तव महत्त्व देऊन अल्पसंख्य वर्गाच्या हितसंबंधांचें संरक्षण करण्याची जी योजना करण्यांत आली आहे तिचा परिणाम म्हणूनच शोषक व शोषित हे वर्ग उत्पन्न झाले असें साम्यवादाचें मत आहे. सर्व मानवसमाज एकदां त्याच्या गरजा पूर्ण झाल्या व उत्पादनसाधनें समाजाच्या पूर्ण मालकीचीं झालीं कीं, स्वतःची उन्नति साधून घेऊं शकेल व अशा उन्नत अवस्थेचें शिखर म्हणजे शासनसंस्थाविरहित अवस्था होय असें साम्यवादाचें मत आहे. हल्लींची समाजरचना ही वर्गनिष्ठ असून वर्ग आहेत तोंवर त्यांचा संघर्ष अथवा विग्रह चालू राहणारच; म्हणून खरा सुखाचा मार्ग विग्रहच उत्पन्न होऊं नये म्हणून पूर्ण वर्गहीन समाजरचना उत्पन्न करणें हाच एकमात्र आहे. सर्व उत्पादनसाधनें समुदायाच्या मालकीचीं झालीं व सर्वांच्या गरजा आणि वासना समानतेनें पूर्ण होण्याची शक्यता निर्माण झाली कीं त्या स्थितीचें जें बाह्य दृश्य असेल तें शासनसंस्था-विरहिततेचेंच असेल. समाजांत वर्ग आहेत, त्यांचा विग्रह अनिवार्य आहे म्हणूनच शासनसंस्थेची आवश्यकता आहे. वर्गच संपले म्हणजे वर्गविग्रह असूं शकत नाहीं व विग्रह नसला तर अशा समाजरचनेंत शासनसंस्थेचीही आवश्यकता न उरतां ती संस्था समाजांत विलीन होऊन जाते. अखिल मानव जातीचीं दुःखें नाहींशीं करणें ही साम्यवादाची घोषणा असली तर शासनसंस्था-विरहित स्थिति निर्माण करणें हें त्याचें उद्दिष्ट आहे. यासाठीं आवश्यक गोष्ट जी वर्ग व वर्गविग्रह नष्ट करणें ती साध्य व्हाव-यास प्रथम समाजांत व तेंही एखाद्या राष्ट्रापुरत्या समाजांत नसून जगांतील सर्व मानवसमाजांत एकवर्गात्मक समाजरचना करणें व तिची इतर सर्व वर्गांना नष्ट करणारी शासनसंस्था निर्माण करणें आवश्यक ठरतें. ती एकवर्गात्मक समाजरचना म्हणजेच श्रमजीवी वर्गाची किंवा कामकरी वर्गाची समाजरचना होय व ही शासन-

संस्था म्हणजे कामगार वर्गाच्या नेतृत्वाचें अधिराज्य होय. जगांत क्रांतीमागून क्रांति निर्माण करून कामगार वर्गाचें एकनेतृत्ववादी अधिराज्य उत्पन्न करावयाचें हाच एकवर्गात्मक व त्यांतून वर्ग-विहीन, शासनसंस्थाविरहित, सुखी समाजरचना उत्पन्न करावयाचा एकमात्र मार्ग आहे असें साम्यवाद्यांचें मत आहे. म्हणून मानवते-समोरील पेचप्रसंग सुटण्याचा हाच एकमात्र मार्ग असल्यामुळें जगांत हव्या त्या मार्गांनीं व उपायांनीं इतर सर्व वर्ग मारून टाकून कामगारवर्ग व त्याचें अधिराज्य निर्माण करणें हें आजचें कम्यु-निझम्‌चें ध्येय आहे. व्यक्तिस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य यांतून या एकवर्गात्मक निर्मितीला निश्चित धोका असल्यामुळें या स्वातंत्र्याला साम्यवादांत मुळींच स्थान नाहीं. व्यक्तीचें स्वातंत्र्य साम्यवादांत अभिप्रेत नसून तिच्या गरजा व वासना पुरविण्याचें सुख उत्पन्न करणें हें त्याचें उद्दिष्ट आहे. जें जें या ध्येयास आवश्यक तें तें सारें नैतिक व जें जें त्याला दूरांशानेंही विघातक वा विभिन्न तें तें सारें अनैतिक, प्रतिक्रांतिवादी, प्रतिगामी व म्हणूनच नष्ट करण्याच्या योग्यतेचें, अशी साम्यवादाची नीति-अनीतीची धारणा आहे. त्यामुळें विरोधास जगूं न देणें ही नीति त्यांनीं अवलंबिली आहे. युद्ध, अत्याचार, हिंसा यांचा इतर वर्ग नष्ट करून टाकण्या-साठीं उपयोग करणें ही गोष्ट ते नैतिक समजतात व त्याचा परिणाम कोणत्याही सामान्य मतभेदाला देखील जगूं न देण्यांत झाला आहे. रशियन राज्यघटना व राज्यतंत्र यांच्याकडे दृष्टिक्षेप केला तर साम्यवादी राज्यतंत्रांत व्यक्तिस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य यांची काय अवस्था होते याची कल्पना येईल. अशी एक समजूत आहे कीं, आज रशियामध्यें कामगार वर्गाची पूर्ण सत्ता प्रस्थापित झाली आहे. पण तेथें सत्ता वस्तुतः कामगार वर्गाची नसून ती कम्युनिस्टपक्षाची आहे. " कामगार वर्गाला त्याचें हिताहित कळत नसून तें कम्युनिस्ट पक्षाला कळतें, व कम्युनिस्ट क्रांतिकारक हेच कामगार वर्गाचे हितसंबंध सुरक्षित ठेवून त्यांचें जीवन सुखी करूं शकतात; म्हणून त्यांच्या हातींच सत्ता असली पाहिजे." हें तत्त्व रशियाच्या पहिल्या घटनेंत लेनिननें समाविष्ट केलें व स्टालिननें

निर्माण केलेल्या नव्या घटनेंतही तें मान्य करण्यांत आलें आहे. रशियाच्या नव्या घटनेंतील १२६ व्या परिच्छेदांत असें म्हटलें आहे कीं–

The most active and politically conscious citizens in the ranks of the working classes and other strata of the working people unite in the Communist party of the Soviet Union (the Bolsheviks) which is the vanguard of the working people in their struggle to strengthen and develop the socialist system and which represented the leading core of all organisations of the working people, both public and State.

"कामगार वर्गांत राजकीय दृष्ट्या सर्वांत जागृत व प्रत्यक्ष काम करणारे प्रथम श्रेणीचे कार्यकर्ते हे कम्युनिस्ट पक्षांत अथवा बोल्शेव्हिकांत एकत्र येतात. त्यामुळें कामगार वर्गाचा जागतिक लढा सामर्थ्यशील बनविण्यासाठीं व साम्यवादी पद्धतीचा विकास करण्यासाठीं आवश्यक असे तेच श्रमजीवी वर्गाचे खरे प्रतिनिधि ठरतात. राज्ययंत्रांतील व सार्वजनिक क्षेत्रांतील कामगार वर्गाच्या सर्व संघटनांचें खरें प्रतिनिधित्व यामुळें केवळ कम्युनिस्ट पक्ष अथवा बोल्शेव्हिकच करूं शकतात."

एकदां राज्यतंत्रानेंच हा सिद्धान्त सांगितल्यावर त्याविरुद्ध ब्र काढण्याची कोणाला छातीच होऊं शकत नाहीं. नांव कामगार वर्गाचें पण कामगारवर्गाचें म्हणणें काय आहे, त्याला काय हवें आहे, व त्याचें हिताहित कशांत आहे हें ठरविण्याचा प्रत्यक्ष अधिकार मात्र कम्युनिस्टपक्षाच्या हातांत, ही वस्तुस्थिति रशियन कामगार वर्गावर लादण्यांत आली आहे. याच घटनेच्या १४१ परिच्छेदानुरूप केवळ कम्युनिस्ट पक्षाच्या संघटनांनाच सोव्हियटमध्यें प्रतिनिधित्व देण्यांत आलें आहे. तात्पर्य, रशियांत एका वर्गाचें हें आधिपत्य तो वर्ग कामगार वर्गाचा सर्वांत पुढारलेला विभाग आहे, या विधानानें प्रस्थापित करण्यांत आलें आहे. लोकशाहीच्या राज्यघटनेंत अनेक वर्गांचे पक्षोपपक्ष जसे नांदतात तसे रशियांत नांदूं शकत नाहींत. जेथें भिन्नभिन्न वर्गांना अस्तित्व असतें तेथेंच त्यांच्या मताधिकाराचा, विचारस्वातंत्र्याचा व प्रचारस्वातंत्र्याचा प्रश्न

येतो. पण रशियांत कामगार नांवाचा एकच वर्ग आहे व म्हणून अितर वर्गांच्या अस्तित्वाला, मतस्वातंत्र्याला व विचार स्वातंत्र्याला वाव देण्याचा प्रश्नच उरत नाहीं असें सोव्हियट युनियनचें म्हणणें आहे. वास्तविक हें म्हणणें खोटें आहे. इतकेंच नव्हे तर तें तर्कदुष्टही आहे. अितर वर्ग असोत वा नसोत, पण रशियांत दोन वर्ग निश्चित आहेत हें रशियांत चालू असलेले प्रकारच सांगतात. जर तसें नसतें तर मग कम्युनिस्ट पक्षाला रशियांत पोलादी शिस्तीची, पक्षशुद्धीच्या नांवाखालीं अनेकांना कंठस्नान घालण्याची, हद्दपार करण्याची व घटनेनेंच कम्युनिस्ट पक्षाला सर्वाधिकार देण्याची काय आवश्यकता होती? कम्युनिस्ट पक्ष या एकाच पक्षाचें राजकीय पक्ष म्हणून अस्तित्व रशियन राज्यघटनेनें मान्य केलें असल्यामुळें निवडणुकीपूर्वीं सभा, मुद्रणयंत्र, रेडिओ व इतर प्रचाराचीं साधनें वापरून स्वतःचें धोरण व कार्यक्रम यांचा प्रचार केवळ कम्युनिस्ट पक्षच करूं शकतो व अशा स्थितींत अमका एक-मतानें निवडून आला इत्यादि लोकशाहीचा जो बाह्य देखावा निर्माण केला जातो तो अर्थातच ढोंगाचा ठरतो. अनेक वंशांच्या दडपल्या गेलेल्या अशिक्षित लोकांच्या विकासासाठीं हें सारें करावें लागतें असें रशियन राज्यकर्ते म्हणतात. पण झार, हिटलर किंवा मुसोलिनी हे तरी दुसरें काय म्हणत होते? सर्व वृत्तपत्रें,सार्वजनिक जागा, रेडिओ स्टेशन्स, थिएटर्स, म्युझियम्स, टेलिग्राफ व टेलिफोन सरकारी मालकीचीं आहेत. बरें कम्युनिस्ट पक्षाच्या हातांत खरोखरी सत्ता आहे काय ? हा पक्ष पॉलिटब्यूरो नांवाच्या चौदा माण-सांच्या मंडळाच्या अधीन आहे. तें मंडळ ठरवील तोच कम्युनिस्ट पक्षाचा सभासद असू शकतो. या पॉलिटब्यूरोचा मुख्य स्टालिन आहे. तोच रशियन मंत्रिमंडळाचा अध्यक्ष, रशियाचा संरक्षणमंत्री, लाल सैन्याचा सेनापति, कम्युनिस्ट पक्षाचा मुख्य मंत्री व पक्षाच्या मध्यवर्ती समितीचा व पॉलिटब्यूरोचा नेता आहे. पॉलिटब्यूरो त्याच्या इच्छेनुसारच वागते. या नेतृत्वाविरुद्ध कसलाही आवाज उठवितां येत नाहीं. कामकऱ्यांना संप करण्याची मनाई असून त्यांच्या ट्रेड युनियनस् कार्यक्षमता व शिस्त उत्पन्न करणें येवढेंच

काम करूं शकतात. सरकारच कामकऱ्यांचें असल्यामुळें दुसऱ्या कोणी त्यांचे हितसंबंध संरक्षण करण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. रशियांत सर्व प्रकारचें स्वातंत्र्य अितकें नष्ट करून टाकण्यांत आलें आहे कीं, १९३२ सालच्या खास निर्बंधानें देशांतल्या देशांत सुद्धां परवान्याशिवाय रशियन नागरिकाला प्रवास करतां येत नाहीं. आपल्या घरांतून चोवीस तास बाहेर रहावयाचें असलें तरी त्याला पोलीस चौकींत वर्दी द्यावी लागते. जेथें देशांतल्या देशांत ही संचारबंदी, त्या ठिकाणीं परदेशगमनाचा तर प्रश्न दूरच राहिला. जर हा कायदा मोडला तर त्याला मृत्यु हीच शिक्षा आहे. शासन-संस्थाविरहित सुवर्णयुग उत्पन्न करावयासाठीं हें तात्पुरतें नियंत्रण मान्य केलें पाहिजे असें रशियन सरकारचें म्हणणें आहे. पण ती स्थिति सोळा वर्षांनीं प्राप्त होईल, हें लेनिननें दिलेलें आश्वासन पार खोटें ठरलें आहे. केवळ खाण्यापिण्याच्या सुखाची हमी घेऊन व लोकांचें मूलभूत स्वातंत्र्य पूर्णपणें नष्ट करून, गुलाम म्हणून सर्वांना राबविणारें एकनेतृत्ववादी अधिराज्य हीच आजची तेथील वस्तुस्थिति आहे व तीच सर्वतोपरीं टिकविण्याचा प्रयत्न चालू आहे. हें राज्यतंत्र सर्व कांहीं नियंत्रित करतें. पण या राज्यतंत्राला कोण नियंत्रित करणार? रशियन लोकांजवळ या राज्यतंत्राला नियंत्रित करण्याचें कोणतेंही साधन नाहीं. निवडणुका, कामगारसंघटना, राजकीय वा आर्थिक दडपण यांपैकीं कोणत्याही उपायांनीं त्यांना हें राज्ययंत्र नियंत्रित करतां येत नाहीं. लोकशाहींत गृहीत धरलेलें निवडणुकांचें मतस्वातंत्र्य तेथें नाहीं. पार्लमेंटमध्यें विरोध मुळींच सहन केला जात नाहीं. कोणतेंही प्रचारस्वातंत्र्य नाहीं. रशियन कामगारांच्या व शेतकऱ्यांच्या जीवनावर सरकारचा विलक्षण ताबा आहे. हिंदुस्थानचे नुकतेच तेथें गेलेले प्रतिनिधि श्री. कुमारप्पा हे एकदां सहज एका नागरिकाशीं बोलावयास गेले तों पोलिसानें त्यांना बंदी केली असा त्यांचा अनुभव आहे. इतर पक्ष तर दूरच राहोत, पण खुद्द कम्युनिस्ट पक्षांत देखील प्रामाणिक मतभेद व्यक्त करणें म्हणजे मृत्यूला निमंत्रण देणें आहे. लोकशाहीनें स्वातंत्र्याच्या पुरस्काराच्या नांवाखालीं मानवी जीवनांतील सुखांचा अपहार

केला; तर त्याची प्रतिक्रिया म्हणून निर्माण झालेल्या साम्यवादानें सुखाची हमी घेऊन त्याच्यासाठीं स्वातंत्र्याचें पूर्ण बलिदान मागितलें आहे! हें आहे कामगार नेतृत्वाचें (Dictatorship of the Proletariat) खरें स्वरूप! जगभर हें नेतृत्व प्रस्थापित करावयाचा साम्यवादाचा निर्धार आहे. त्यासाठीं पक्षाच्या धोरणास्तव व ध्येयास्तव व्यक्तीनें संपूर्ण बलिदान केलें पाहिजे व विलीनीकरण केलें पाहिजे हें साम्यवादाचें मूळ सूत्र आहे. जनतेची कामकऱ्यांची वर्गहीन साम्यवादी स्थिति निर्माण करण्यासाठीं कामगार वर्गाचें हें रशियन पद्धतीचें अधिराज्य साऱ्या जगांत साम्यवादाला निर्माण करावयाचें आहे. व तेंही हिंसा, युद्ध व असहिष्णुतेच्या मार्गांनीं निर्माण करावयाचें असा साम्यवादाचा निर्धार आहे. कारण याविना दुसऱ्या कोणत्याच मार्गानें तें निर्माण होऊं शकणार नाहीं अशी त्यांची श्रद्धा आहे. भांडवलशाहीचा पूर्ण नायनाट केल्यावांचून जनता सुखीच होऊं शकत नसल्यामुळें लेनिननें जगांतून तिचा निःपात करून पूर्ण सुखी जीवन निर्माण करण्यासाठीं साम्यवादी लोकांना जो कार्यक्रम दिला तो असा कीं, हिंसा, फसवणूक व अत्याचारांचा अवलंब करून सर्व विरोध मोडून काढावे व भांडवलशाहीरूपी शत्रूचें पूर्ण उच्चाटन व्हावयासाठीं योग्य अशा अल्पसंख्यांचें स्वयंपूर्ण अधिराज्य तात्पुरतें म्हणून उभारावें. एकदां जनता भांडवलशाहीच्या मगरमिठींतून सुटली कीं, हें राज्य आपोआप जनतेंतच विलीन होईल. कारण मग शोषक व शोषित हे वर्गच नसल्यामुळें या राज्याच्या अस्तित्वाचें कारणच उरणार नाहीं. मानव सुखी करण्यासाठीं, आवश्यक त्या भांडवलशाहीच्या उच्चाटनार्थ लेनिननें क्रांतिकारक साम्यवादी अधिराज्यासाठीं, मर्यादातीत सत्तेची अपेक्षा केलेली आहे. कारण बहुसंख्य कामगार वर्गाला गुलामगिरींतून सोडविण्यासाठीं व त्याचें खरें स्थान काय आहे हें त्याला नीट समजाविण्यासाठीं लोकशाहींतील तकलादू मार्ग उपयोगी पडणार नाहींत अशी त्याची धारणा होती. समाजाचें आर्थिक जीवन सुखी व समृद्ध असण्यावरच इतर सारें विकसन अवलंबून असल्यामुळें अथवा इतर जीवन (सांस्कृतिक, कलात्मक

इत्यादि) आर्थिक जीवनाचें प्रतिबिंबच असल्यामुळें त्याची हमी साम्यवादानें घेऊन त्यासाठीं व्यक्तिमात्राकडून सर्व प्रकारच्या बलिदानाची, नियंत्रिततेची व विचार-आचारादि स्वातंत्र्यावर तिलांजलि सोडण्याची अपेक्षा केलेली आहे.

विसावें शतक हें इतकें आश्चर्यजनक आहे कीं भांडवली लोकशाहीनें उत्पन्न केलेलें भयंकर शोषण नष्ट करण्याची साम्यवादानें हमी घेतल्याबरोबर अथवा जगाला नडलेला भाकरीचा प्रश्न सोडविण्याची हमी घेतल्याबरोबर सर्व प्रकारच्या स्वातंत्र्याचें बलिदान देऊनही साम्यवादाचा अंगीकार करावयास तें सिद्ध होत आहे. रशियन साम्यवादाचा वाढता प्रभाव लक्षांत घेतला तर ही गोष्ट ध्यानांत येईल. पोलंड, बल्गेरिया, रुमानिया, हंगेरी, युगोस्लाव्हिया, चीन, तिबेट इत्यादि देश साम्यवादाच्या आहारीं गेले असून ग्रीस, इटली, फ्रान्स, ब्रह्मदेश, इंडोचायना इत्यादि देशांत साम्यवादाचा प्रभाव वाढता आहे. हिंदुस्थानांतही त्याचा प्रभाव किती वाढता आहे हें मागच्या निवडणुकांनीं स्पष्टपणेंच दिग्दर्शित केलें आहे.

साम्यवादाच्या या वाढत्या प्रभावाचें पर्यवसान समीपवर्ती भविष्यांत कशांत होईल? जगभर एकवर्गात्मक नेतृत्वाचें अधिराज्य हिंसात्मक मार्गांनीं उत्पन्न करणें हा आजचा लेनिनप्रेरित व स्टालिनपुरस्कृत कार्यक्रम असल्यामुळें तोंडानें मानवतेच्या गरजा पुरविण्याची परिभाषा बोलत राहून सर्वत्र असंतोष, अत्याचार, रक्तपात व क्रांत्यांचें थैमान माजविणें व जेथें जेथें साम्यवादी सत्ता उत्पन्न होईल त्या प्रत्येक ठिकाणीं, जगभर तशी सत्ता उत्पन्न करावयाचा ध्येयवाद उद्घोषून, व्यक्तिमात्राच्या आचार व विचार-स्वातंत्र्यांचा अपहार करून दंडुकेशाहीचें लष्करी अधिराज्य उत्पन्न करणें यांत त्यांचें पर्यवसान होईल व प्रत्यक्षांत होत आहेही हें रशियाच्या उदाहरणानें आपण पाहिलेंच आहे.

साम्यवादांतील या स्वातंत्र्याच्या गळचेपीविरुद्ध एका काळचे लेनिनच्याबरोबर काम केलेले कर्ते कम्युनिस्टही, उबग येऊन वैचारिक बंड करून उठलेले आहेत हें कॉमरेड मानवेन्द्रनाथ रॉय

यांच्या उदाहरणावरून दिसून येतें. साम्यवाद्यांनीं कांहींही म्हटलें तरी विचारांचा, क्रियांचा व आंदोलनांचा आरंभबिंदु व्यक्ति हाच असतो. म्हणून व्यक्तिसुखाइतकेंच व्यक्तिस्वातंत्र्याचेंही महत्त्व आहे. साम्यवादी संकट हें आजच्या लोकशाही सत्तांच्या मुळा-वरीलच संकट असल्यामुळें या व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार करीत साम्यवादाविरुद्ध लोकशाही सत्ता जागतिक स्वरूपांत संघटित होऊन पुनरुज्जीवनाचा प्रयत्न करीत आहेत. या लोकशाहीच्या पुनरुज्जीवनाचें स्वरूप दोन प्रकारचें आहे. एक तर आहेत त्या लोकशाही सत्तांनीं आपलें अंतर्गत स्वातंत्र्य अबाधित राखून आंतर-राष्ट्रीय स्वरूपाची संघटना उभारणें; अथवा विश्वाचें एकच लोक-शाही पद्धतीचें राज्यतंत्र उभारणें. पहिला प्रकार यूनोच्या रूपानें आज साकारला आहे. दुसरा केवळ वैचारिक कक्षेंतच आहे. पण लोकशाही म्हटली कीं व्यक्तिस्वातंत्र्य व त्यांतून भांडवलशाही येणारच व भांडवलशाही म्हटली कीं मर्यादातीत शोषण व नृशंस पिळवणूक आलीच!

विसाव्या शतकांतील प्रमुख दोन वैचारिक प्रवाहाचें स्वरूप हें असें आहे. यांपैकीं कोणत्याही एका प्रवाहाच्या अंगीकारानें मानवता विनाशाकडेच खेंचली जाईल. हे दोन्ही प्रवाह भौतिक संस्कृतींतून उत्पन्न झालेले आहेत. गेल्या दीडशें वर्षांच्या अल्पकालीन आयुष्यांत भौतिक संस्कृतीनें दोन भीषण महायुद्धें घडविलीं व तिसऱ्या महायुद्धाच्या दारांत आज जग उभें आहे.

वस्तुतः लोकशाहीचा व्यक्तिस्वातंत्र्यवादावर आधारलेला व स्वातंत्र्य, समता, आणि बंधुता या तत्त्वत्रयीचा उद्‌घोष करणारा लोकतंत्रवाद हा एका सामाजिक अत्याचाराला नष्ट करून मानव-जात सुखी करण्यासाठींच निर्माण झालेला होता. मग त्याच्यांतून शोषण व दुःख निर्माण होण्यांत त्याचें पर्यवसान कां व्हावें? लोकशाहीच्या व्यवहाराची ही स्वाभाविक परिणति झाली असें म्हटलें तरी लोकशाहीचा व्यवहारच अशी स्वाभाविक परिणति होण्यासारखा कां व्हावा हा प्रश्न शिल्लक उरतोच. साम्यवादाचें तर त्याहूनही आश्चर्य वाटतें. साम्यवादी हे स्वतःला शास्त्रीय

म्हणवितात, व त्यांनीं आपल्या कल्पनेप्रमाणें विश्व व त्याचें मूलतत्त्व, मानवी जीवन व त्याची परंपरा, यांचा शास्त्रीय स्वरूपाचा उलगडा करून त्यावर आपल्या व्यवहाराची उभारणी केली आहे. म्हणजे एका दृष्टीनें युरोपिअन समाजशास्त्रज्ञांच्या व विचारवंतांच्या परंपरेंत एक पाऊल पुढें टाकलें आहे. त्यांच्या या शास्त्रीय व्यवहाराची परिणतिसुद्धां अत्याचार व रक्तपात यांचें थैमान मानवतेंत घालण्यांत कां व्हावी? मुळांत सुखासाठीं निघालेले हे मार्ग अंतीं अत्यंत दुःख उत्पन्न होण्यांत कां परिणत व्हावेत हा महत्त्वाचा प्रश्न आहे. त्याचें मूळ त्यांच्या पाठीशीं असलेल्या तत्त्वज्ञानाच्या बैठकींत शोधलें तरच तें सांपडूं शकेल, एरवीं नाहीं. साम्यवादी वर्तमान समाजव्यवस्थेला बळानें उलथून पाडूं इच्छितात. त्यांचीं आंदोलनें रक्तपातमय असतात, ते विरोधकांना क्रौर्यपूर्ण पद्धतीचा अवलंब करून दडपतात. हव्या त्या वाममार्गांचा सत्ता बळकाविण्यासाठीं ते उपयोग करून घेतात. व्यक्तिस्वातंत्र्याला, किंवा नीतिधर्म, न्याय इत्यादि गोष्टींना त्यांच्या राज्यतंत्रांत स्थान असूं शकत नाहीं. जन्मापासून मृत्यूपर्यंत व्यक्तीचें जीवन शिस्तीच्या नांवाखालीं ते एका पोलादी चौकटींत अडकवितात, मूलभूत मानवी भावनांना त्यांच्याजवळ काडीचेंही स्थान नाहीं इत्यादि इत्यादि आरोप कम्युनिस्टांवर करण्यांत येतात व ते खरेही आहेत. पण कम्युनिस्टही हे आरोप नाकारीत नाहींत. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, शास्त्रीय दृष्टिकोनांतून त्यांच्याकडे पाहिलें असतां या सर्व गोष्टी आवश्यक व हितप्रदच आहेत व तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें त्या बरोबरच आहेत असें आढळून येईल. त्यामुळें त्यांच्या व्यवहाराची संगति समजण्यासाठीं देखील त्यांच्या तत्त्वज्ञानाकडे पहाणें आवश्यक आहे. लोकतंत्रवादी व कम्युनिस्ट यांच्यांत या संबंधांत महत्त्वाचा फरक असा आहे कीं, उत्पन्न झालेल्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोणाची आपोआप परिणति लोकतंत्रवादांत झाली असून साम्यवाद्यांनीं मात्र स्वतःचें स्वतंत्र व सुव्यवस्थित तत्त्वज्ञान उत्पन्नच केलेलें आहे. त्यामुळें तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें साम्यवाद्यांत जितका सुसंगतपणा आढळतो तितका तो अलीकडच्या

इतर कोणाही राजकीय विचारवंतांत आढळत नाहीं. राजकीय विचारांच्या पाठीमागें विशिष्ट प्रकारच्या सामाजिक नीतिमत्तेच्या कल्पना असतात, व त्या नीतिकल्पनांचें मूळ त्यांच्या पाठीमागच्या तत्त्वज्ञानाच्या पार्श्वभूमींत असतें. म्हणून कोणताही राजकीय विचारप्रवाह कां उत्पन्न झाला हें पहावयास त्याच्या पाठीमागची सामाजिक प्रेरणा व नीतिमत्ता कोणती होती हें पहाणें आवश्यक आहे. आपण व्यक्तिस्वातंत्र्यवादी लोकशाही व साम्यवाद यांच्या पाठीमागच्या सामाजिक व नैतिक प्रेरणांकडे पाहिलें आहे. पण त्या प्रेरणा कां उत्पन्न झाल्या हें पहावयास त्यांच्या पाठीमागच्या तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमि पाहणें आवश्यक ठरतें. त्याशिवाय त्या प्रेरणांची व त्यावर आधारलेल्या राजकीय विचारप्रणालींची संगति नीट लागणार नाहीं. डॉ. पॉल कॅरस या प्रसिद्ध अमेरिकन ग्रंथकारानें आपल्या 'एथिकल प्रॉब्लेम' या ग्रंथांत म्हटलें आहे कीं,

Our proposition is that the leading principle in ethics must be derived from the philosophical view at the back of it. The World conception of a man has and can alone give character to the principle in his ethics. We may act morally like dreamers or somnambulists but our ethics would in that case may be a mere moral instinct without any rational insight into it.

" पिंड-ब्रह्मांडाच्या रचनेसंबंधानें मनुष्याचें जें मत असतें त्याप्रमाणें नीतिशास्त्रांतील मूळ तत्त्वाबद्दलच्या त्याच्या विचारांचा रंग आपोआप पालटत असतो. पिंडब्रह्मांडाच्या रचनेविषयीं निश्चित कल्पना असल्याविना नैतिक प्रश्न उत्पन्नच होत नाहीं. पिंडब्रह्मांडाच्या उलगडयाविनाही आपल्या हातून कदाचित् नैतिक वर्तन घडूं शकेल; पण हें वर्तन झोपेंतल्या व्यापाराप्रमाणें असल्यामुळें त्यास नैतिक न म्हणतां देहधर्मानुसार घडणारी केवळ कायिक चेष्टा असें म्हटलें पाहिजे." या दोन्ही विचारप्रवाहांची तात्त्विक पार्श्वभूमि काय आहे व ती चुकीची आहे कीं बरोबर आहे हें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

# जडवादी दृष्टिकोनाचें स्वरूप

व्यक्तिस्वातंत्र्यवादी लोकशाही व साम्यवादी हे ज्याच्यांतून उत्पन्न झाले तो भौतिकवादी दृष्टिकोन आठराव्या व व एकोणिसाव्या शतकांतील पाश्चात्य विज्ञानशास्त्रानें उत्पन्न केलेला आहे. या शतकांच्या पूर्वी सामान्य नीतिकल्पना व श्रद्धा यांच्यावरच यूरोपचा दृष्टिकोन आधारलेला होता. तो दृष्टिकोन ख्रिश्चन धर्मानें दिलेला होता. आपल्यासमोर पसरलेलें विश्व व आपलें स्वतःचें जीवन यांचें मूलभूत स्वरूप काय असावें, व त्यांचा परस्परसंबंध काय असावा हें उलगडण्याची मनुष्यांत स्वाभाविक प्रवृत्ति आहे. पांच ज्ञानेंद्रियांच्या द्वारें आपला व सृष्टीचा संबंध येतो, व जीवनाच्या सर्व गरजा आपण त्या सृष्टींतून भागवितों. त्या गरजा भागविण्यापुरताच सृष्टीचा उपयोग करावा, आयुष्य आहे तोंवर जगावें व शेवटीं स्वतःचें जीवन संपवून टाकावें ही प्रवृत्ति पशूंत असली तरी ती माणसांत नाहीं. माणसाला स्वतःची स्वतंत्र विचारशक्ति असल्यामुळें पशुवृत्तीच्या शारीरिक गरजा भागल्यानंतर मनुष्य आपल्या भोंवतालीं पसरलेल्या सृष्टीचा व स्वतःच्या जीवनाचा विचार करूं लागतो. मानसशास्त्रज्ञांनीं याच प्रवृत्तीला जिज्ञासा असें नांव दिलेलें असून ती मनुष्यांत अगदीं स्वाभाविक आहे असें म्हटलें आहे. हिला फार तर बौद्धिक भूक म्हणूं. पण ती शरीराच्या भुकेइतकीच तीव्र असते व ती भागविण्यासाठींच सभोंवारच्या सृष्टीचा मनुष्य विचार करूं लागतो. स्वतःच्या जीवनाकडे पाहिल्यानंतर खाण्याचें इंधन मिळून सतत प्रज्वलित असणारा हा जीवनरूपी अग्नि एकाएकीं कां विझून जातो ? अस्तित्वर टिकविण्यासाठीं आपण धडपडत असतां एकाएकी मृत्यूची झडप आपल्यावर कां येते ? मृत्यूचें स्वरूप तरी काय आहे ? कधींतरी आकस्मिक येणारी ही मृत्युरूप अवस्था सोडून दिली तरी जीवनाच्या सर्व व्यापारांत

---

व्याख्यान २३ वें दिनांक २१–४–५२

आपण सदैव अत्यंत जागरूक असतां निद्रेच्या अशा एका अवस्थेंत आपण रोजच्या रोज कसे जात असतों कीं ज्या अवस्थेंत तोंडाला सुगंधी द्रव्य लावलें काय अथवा शेण फांसलें काय, कांहींच ज्ञात होत नाहीं ? आपल्या जीवनाच्या सर्व गरजा पुरविणारी सृष्टि ही तरी काय वस्तु आहे ? तिचा आणि आपला संबंध तरी काय आहे ? सृष्टीचा सर्व जीवनव्यापार चालविणारा कोणीतरी नियंत्रक आहे काय ? असला तर त्याचें स्वरूप काय असेल ? आपला व त्या नियंत्रकाचा कांहीं संबंध आहे काय ? व असला तर त्याचें स्वरूप काय असावें ? इत्यादि अनेक प्रश्न या जिज्ञासा-प्रवृत्तीच्या प्रेरणेंतून विचारशक्ति जागृत असलेला मनुष्य जगाकडे पाहूं लागला कीं त्याच्यासमोर उभे राहतात. या अनंत प्रश्नांच्या उलगडयाच्या प्रयत्नांतूनच जगांतील सर्व तत्त्वज्ञानें, समाजशास्त्रें, नीतिशास्त्रें व जीवनविषयक विविध दृष्टिकोन उत्पन्न झालेले आहेत. आठराव्या शतकापूर्वी केवळ बौद्धिक दृष्टया व तर्कशास्त्र-पद्धतीच्या अनुसार विचार करूनच या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न करण्यांत येत असे. पण ह्या शतकाच्या प्रारंभीं सृष्टीचें गूढ उकलण्याची, प्रत्यक्ष प्रयोगात्मक अशीं कांहीं साधनें उत्पन्न झालीं. तर्कशास्त्राच्या पद्धतीनें या सर्व गूढांच्या उकलाचा प्रयत्न करणाऱ्या लोकांचे दोन वर्ग उत्पन्न झाले होते. त्यांपैकीं एक वर्ग 'जग आहे म्हणून मी आहें' असें मानणारा होता. जीवन हा जगाचाच एक भाग असल्यामुळें व जगाच्या अस्तित्वामुळेंच आपल्या अस्तित्वालाही अर्थ असल्यामुळें जगासंबंधींच्या विचारांतून जे सिद्धांत निष्पन्न होतील तेच आपल्यालाही लागू पडतात अशी या विचारवंतांची धारणा असल्यामुळें त्यांनीं आपल्या तात्त्विक विचारांचा प्रारंभच जगा-पासून केला. पण ज्यांना हा दृष्टिकोन मान्य नसून वस्तुतः आपल्या प्रत्ययास येतें म्हणून जग आहे, तें जसें प्रत्ययास येतें तसेंच आपण त्याचें स्वरूप मानतों, जगाचें ज्ञापकप्रमाण आपण स्वतःच आहोंत व त्यामुळें आधीं आपण स्वतः काय आहों हें निश्चित ठरल्याविना जगाविषयींच्या आपल्या विचाराला कांहींच अर्थ उरत नाहीं, असें मानणारा दुसरा संप्रदाय होता. 'मी आहें म्हणून जग

आहे' असें त्याचें म्हणणें होतें. दृष्टि-सृष्टिवाद हें एक प्रकारें याचें प्रतिबिंब होय असें म्हटलें तरी चालेल. येथें सृष्टि जशी आहे तशी दृष्टि दाखविणार नाहीं, तर दृष्टि असेल तशीच सृष्टि दिसेल. उद्यां जर आजच्या आपल्या नेत्रकिरणांत क्ष किरणांची आश्चर्यजनक शक्ति उत्पन्न झाली तरी आज आपल्याला सृष्टि व मानवी शरीरें जशीं दिसतात त्याहून तीं अगदींच वेगळ्याच स्वरूपाचीं दिसूं लागतील व तशीं तीं सतत कांहीं काळ दिसूं लागलीं तर आपल्या आजच्या सौंदर्याच्या सर्व व्याख्या व त्यावर आधारलेल्या सर्व परिभाषा पार बदलून जातील! तात्पर्य, दृष्टि आहे तशी सृष्टि दिसते, मी आहे म्हणून जग आहे हा विचार ज्यांना मान्य होता त्यांनीं विचाराचा प्रारंभ जगाऐवजीं स्वतःपासून केला व त्यांचा एक स्वतंत्र तात्त्विक संप्रदाय उत्पन्न झाला. हे दोन्ही संप्रदाय बौद्धिक व वैचारिक स्वरूपाचे होते. हिंदुस्थानांतील योग्यांची गोष्ट सोडून दिली तर त्यांच्यापैकीं कोणीही प्रायोगिक स्वरूपाचे नव्हते. मग ते प्लेटो असोत, ॲरिस्टॉटल असोत, सॉक्रेटिस असोत वा कोणीही असोत. पण आठराव्या व एकोणिसाव्या शतकांनीं सृष्टीचें गूढ उकलण्याचीं उपकरणात्मक साधनें मनुष्याच्या हातीं दिलीं व त्या साधनांनीं तो जगाचा उलगडा करण्यासाठीं प्रयोगशाळेंत प्रत्यक्ष प्रयोग करूं लागला. हीं महत्त्वाचीं उपकरणें म्हणजे टेस्ट टय़ूब व दुर्बिण हीं होत. दुर्बिणीच्या साहाय्यानें तो तारकांचें विश्व पाहूं लागला व प्रयोग-शाळांतील उपकरणांनीं जगांतील पदार्थांचें विश्लेषण करून त्यांचें मूळ स्वरूप काय असावें हें पहाण्याचा प्रयोग करूं लागला. या पद्धतीनें उपकरणांच्या साहाय्यानें प्रयोगपूर्वक संशोधन करून मूलतत्त्व शोधून काढणें यालाच हल्लींच्या तात्त्विक परिभाषेंत विज्ञान असें म्हणतात. कोणत्याही तर्कशास्त्राच्या पद्धतीपेक्षां वा बुद्धिवादाच्या भरारीपेक्षां विज्ञानाच्या प्रयोगाच्या दृष्टीनें जें सत्यसंशोधन होईल तें अर्थातच सर्वांत महत्त्वाचें व सर्वांत अधिक विश्वासार्ह; कारण बाकी सारीं अप्रत्यक्ष साधनें अथवा प्रमाणें असून प्रत्यक्ष प्रमाण हें त्या सर्व अप्रत्यक्ष साधनांहून अर्थातच

अधिक बलवान् आहे. स्थूलमानानें सर्वसामान्य माणसाच्या व्यवहारांतही 'चक्षुर्वै सत्यं' हेंच सत्यासत्यनिर्णयाचें सर्वांत प्रबल प्रमाण मानलें जातें व मोठमोठे तत्त्वज्ञही त्यालाच सर्वात प्रबल प्रमाण समजतात. श्रीमदाद्य शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्यावरील भामती नांवाच्या टीकेंत वाचस्पतिमिश्रांनी असें म्हटलें आहे कीं,

"न हि श्रुतिसहस्रमपि घटं पटयितुमीषे ।"

"सहस्रावधि वेद जरी एकत्र आले तरी प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध होणाऱ्या घटाचें ते पटांत रूपांतर करूं शकणार नाहींत." प्रयोगशाळेंतील उपकरणांनी होणारें जगाचें व त्याच्या मूलतत्त्वाचें ज्ञान हें असें प्रत्यक्ष प्रमाणानें होणारें ज्ञान होतें. त्यामुळें ज्ञानाचें एक अत्यंत महत्त्वाचें साधन हातीं आल्याचा आनंद भौतिक शास्त्रज्ञांना झाला. हा आनंद एवढ्यापुरताच मर्यादित असता तर त्यानें जगाचें कांही नुकसान केलें नसतें. पण त्या आनंदाच्या पहिल्या ऊर्मींत या शतकांतील भौतिक शास्त्रज्ञांना आपल्या उपकरणांच्या परिपूर्णतेबद्दल इतका विलक्षण आत्मविश्वास वाटू लागला कीं, 'यापुढें सृष्टींत आपणांस गूढ म्हणून कांहीही असू शकत नाहीं, सर्व कांहीं उपकरणांच्या साहाय्यानें सुस्पष्ट होणारच' असें त्यांना आत्मविश्वासपूर्वक वाटूं लागलें. तेवढ्यानेंही फारसें बिघडलें असतें असें नाहीं. पण जें जें उपकरणांच्या साहाय्यानें सिद्ध होईल तें तें तेवढेंच सत्य व इतर सर्व असत्य अशी जी भौतिक शास्त्रज्ञांची धारणा झाली ती सर्वात विघातक होती. या भौतिक शास्त्रज्ञांनीं जगाचा जो उलगडा केला त्या उलगड्यावरून एक भौतिकवादी दृष्टिकोन उत्पन्न झाला. त्या भौतिकवादी दृष्टिकोनाचा आधार भौतिक शास्त्रज्ञांचें संशोधन हाच होता. भौतिक शास्त्रज्ञांत जितका आग्रहीपणा नसेल तितका तो भौतिकवाद्यांत उत्पन्न झाला व अशा वादानें प्रभावित झालेले भारतांतील पहिल्या पिढीचे विचारवंत तर विलक्षणच तापदायक ठरले. संस्कृतमध्यें एक गमतीचें सुभाषित आहे. तें असें कीं,

रविरपि न दहति तादृक् यादृक् संदहति वालुकानिकरः ।
अन्यस्माल्लब्धपदो नीचः प्रायेण दुःसहो भवति ।।

"प्रत्यक्ष सूर्य जितका तापदायक होत नाहीं तितकी त्याच्यापासून उष्णता उसनी घेऊन ती वापरणारी वाळू अधिक तापदायक ठरते. त्याचप्रमाणें दुसऱ्यापासून वैभव मिळालेले परप्रकाशी लोक हे अधिकच तापदायक ठरतात." भौतिक शास्त्रज्ञांपासून ज्ञान घेऊन त्यावर उभारलेल्या भौतिकवादाचे अभिमानी हे असेच तापदायक ठरले. आज तर अशी अवस्था आहे कीं, विज्ञानाच्या क्षेत्रांतील जडवादाचें अस्तित्वही भौतिक शास्त्रज्ञ नाकारीत आहेत. पण भौतिकवादी मात्र त्यालाच उराशीं कवटाळून आग्रहीपणानें एक प्रकारचा विकृत दृष्टिकोन टिकविण्याचा प्रयत्न करीत आहेत! यामागच्या शतकांतील भौतिकवाद्यांचा दंभ इतका विलक्षण होता कीं, ईश्वरालाच जर स्वतः सिद्ध व्हावयाचें असेल तर त्यानें टेस्ट-ट्यूबमध्यें यावें असें प्रतिपादण्यापर्यंत त्यांची मजल गेली होती! आठराव्या व एकोणिसाव्या शतकांतील हें विज्ञान काय होतें व त्यानें उत्पन्न केलेला जीवनाचा भौतिकवादी दृष्टिकोन तरी काय होता हें पाहणें अत्यंत आवश्यक आहे. कारण व्यक्तिस्वातंत्र्यवादी लोकशाहीचें आधारभूत तत्त्वज्ञान त्यांतूनच निर्माण झालेलें आहे.

## यांत्रिक जडवाद

भौतिक तत्त्वज्ञानालाच जडवाद असें दुसरें नांव आहे. या ठिकाणीं भौतिक शास्त्रज्ञ व भौतिकवादी यांच्यांतील फरक ध्यानांत घेणें आवश्यक आहे. भौतिक शास्त्रज्ञ म्हणजे पदार्थ-विज्ञान, रसायनशास्त्र इत्यादि निसर्ग अथवा सृष्टिशास्त्रांतले संशोधक व भौतिकवादी म्हणजे त्यांच्या संशोधनापासून सर्व सृष्टि जडापासून झाली आहे असा सिद्धांत काढणारे तत्त्वज्ञ व समाज-शास्त्रवेत्ते होत. भौतिक शास्त्रज्ञ हा आग्रही नसतो. कारण त्याच्या संशोधनाचे सिद्धांत जसजसे नव्या नव्या शोधांच्या साधनांमुळें बदलत जातात तसतसा तो बदलतो. सत्य काय आहे तें जसें कळेल तसें लोकांपुढें मांडावयाचें एवढेंच त्याचें काम. भौतिक-

वादी मात्र आग्रही असतो. कारण, एका सिद्ध झालेल्या दृष्टिकोनावर आपलें सर्व समाजशास्त्र व नीतिशास्त्र त्यानें आधारलेलें असल्यामुळें तो तें बदलावयास शक्य तोंवर तयार होत नाहीं. सतराव्या शतकापासून उपकरणांच्या साहाय्यानें सृष्टीचें गूढ उकलण्याचा जो प्रयत्न झाला त्यांत शास्त्रज्ञांना असें आढळून आलें कीं, सर्व सृष्टि नियमबद्ध असून नियमानुसारच तिचा विकास होत आहे. हा विकास व ही नियमबद्धता नैसर्गिक असून कोणाच्या इच्छाशक्तीचा अथवा ईश्वरी शक्तीचा त्यांत कांहीं संबंध नाहीं. कारण सृष्टीची नियमबद्धता व विकसनशीलता उपकरणांच्या साहाय्यानें कळत होती. पण तिची प्रेरक अशी इच्छाशक्ति अथवा ईश्वर हें कांहीं उपकरणांच्या साहाय्यानें कळण्यासारखें नव्हतें. उपकरणावरील नितांत विश्वासामुळें जें त्यांच्या साच्यांत बसू शकत नाहीं तें नाहींच व जें बसूं शकतें तेंच काय तें आहे असा सत्यासत्यनिर्णयाचा त्यांचा दृष्टिकोन होता. सतराव्या, आठराव्या व एकोणिसाव्या शतकांत उत्पन्न झालेल्या जडवादी तत्त्वज्ञांच्या विचारावर न्यूटन, केपलर, गॅलिलिओ, मॅक्सवेल, वॉटरसन इत्यादि शास्त्रज्ञांच्या शोधांची विलक्षण छाप बसलेली होती. सर्व सृष्टीची लांबी, रुंदी, वजन, आकार इत्यादि ठरवून सर्व चराचर नियमबद्ध करून टाकण्याची महत्त्वाकांक्षा त्या काळीं ह्या शास्त्रज्ञांच्या मध्यें उत्पन्न झाली होती. जड सृष्टीचे सिद्धांत सर्वश्रेष्ठ आहेत असें समजून त्या सिद्धांतांत सर्व चराचर घालून त्याला नियमबद्ध ठरविण्याचा ते प्रयत्न करीत होते. सृष्टि हें एक मोठें नियमबद्ध यंत्र असून मानवी जीवन सुद्धां त्यांतीलच एक भाग आहे असें त्यांचें मत होतें. मनुष्याच्या ठिकाणीं भावना, इच्छा इत्यादि दृष्टीस पडत असल्यामुळें इतर सृष्टीहून तो भिन्न आहे असें वाटलें तरी मनुष्याच्या ठिकाणचे हे धर्म जड द्रव्यांच्याच विविध प्रकारच्या मिश्रणापासून किंवा संघटनापासून निर्माण झालेले आहेत असें त्यांचें मत होतें. एखाद्या खोलींत घड्याळ असतें व तेथेंच कपाटें, टेबलें, खुर्च्या इत्यादि निश्चेष्ट वस्तूही असतात. घड्याळाला लंबक आहे. त्याचे मिनिट व सेकंदाचे

कांटे फिरत असतात व त्याचे तासांचे ठोके पडत असतात. म्हणून तें घडचाळ जर स्वतःला अशा कांहीं क्रिया न करणाऱ्या टेबल व खुर्चीसारख्या वस्तूपेक्षां आपण श्रेष्ठ आहोंत असें म्हणूं लागलें तर तें चुकीचें होईल. आंतील उपकरणांच्या विशिष्ट रचनेवर व साहाय्यावर घडचाळाचें स्पंदन जसें अवलंबून असतें त्याचप्रमाणें मानव हेंही एक यंत्र असून विशिष्ट प्रकारच्या आंतील रचनेमुळें त्याच्या ठिकाणी इच्छाशक्ति इत्यादि द्वंद्व उत्पन्न झालेलें दिसतें. त्याचें स्वतंत्र इच्छास्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं. जें जें कांही घडतें तें तें निसर्गाच्या अपरिवर्तनीय अशा नियमाप्रमाणेंच घडतें. निसर्गाच्या कार्यक्रमांत जसा बदल करणें शक्य नाही, तसाच मानवाच्या व्यापारांत देखील बदल करणें शक्य नाहीं. म्हणून कोणी कितीही बलवान् असो, सद्विचारी असो, त्याला मनुष्याच्या निसर्गनियंत्रित भवितव्यांत बदल घडवून आणणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर एखाद्या व्यक्तीचें मरण व उत्पत्ति सुद्धां व एखाद्या साम्राज्याचें उत्पतन व अधःपतन सुद्धां हे लोक निसर्गांतून शोधून काढण्याचा प्रयत्न करीत. विख्यात शास्त्रज्ञ सर जेम्स जीन्स यानें आपल्या The Mysterious Universe' या ग्रंथांत या शास्त्रज्ञांचें व जीवनाविषयीं त्यांनीं निर्माण केलेल्या दृष्टिकोनाचें अतिशय सुन्दर वर्णन केलें आहे. तो म्हणतो:—

Out of this resulted a movement to interpret the whole material universe as a machine, a movement which steadily gained force until its culmination in the latter half of the nineteenth century.

It was then that Helmholtz declared that "the final aim of all natural science is to revolve itself into mechanics." And Lord Kelvin confessed that he could understand nothing of which he could not make a mechanical model.

It was felt that only greater efforts were needed, and the whole of inanimate nature would at last stand revealed as a perfectly acting machine. All this had an obvious

bearing on the interpretation of human life. Science appeared to favour a vast mechanistic view which saw the whole material world as a vast machine. By contrast, the idealistic view attempted to regard the world as the creation of thought and so, as consisting of thought.

Until early in the nineteenth century it was still compatible with scientific knowledge to regard life as something standing entirely apart from inanimate nature. Then came the discovery that living cells were formed of precisely the same chemical atoms as non-living matter, and so were presumably governed by the same natural laws. This led to the question why the particular atoms of which our bodies and brains were formed should be exempt from the laws of causation. It began to be not only conjuctured, but even fiercely maintained, that life itself must, in the last resort, be proved to be purely mechanical in its nature. The mind of a Newton, a Bach or a Michelangels, it was said, differed only in complexity from a printing press, a whistle or a steam-saw; their whole function was to respond exactly to the stimuli they received from without. Because such a creed left no room for the operation of choice and free will. It removed all basis for morality. Paul did not choose to be different from saul. He could not help being different. He was affected by a different set of external stimuli.

" न्यूटन व गॅलिलिओच्या या सिद्धान्तामुळें संपूर्ण भौतिक जग हें एक यंत्र आहे असें सिद्ध करण्याची चळवळच निघाली व एकोणिसाव्या शतकाच्या अर्ध्यापर्यंत ती अतिशय जोरांत होती. त्याच वेळीं हेमहॉझनें (Helmholtz) असें घोषित केलें कीं, भौतिक शास्त्राचें अंतिम पर्यवसान यंत्रवादांत होईल व लॉर्ड केल्व्हिननें अशी मान्यता दिली कीं ज्याचें तो यांत्रिक वस्तूंतून दर्शन घेऊं शकत नाहीं त्याला तो ओळखूंही शकत नाहीं. असें वाटूं लागलें कीं, फक्त अधिक प्रयत्नांचीच काय ती आवश्यकता आहे. ते

प्रयत्न केले तर संपूर्ण विश्व हें एक प्रकारें कार्यकारी यंत्रच आहे असें आढळून येईल. शास्त्रज्ञांच्या या दृष्टिकोनानें प्रभावित झालेले भौतिकवादी मनुष्यजीवनाचा विचार करावयास पुढें सरसावले व त्यांच्या त्या विचारमंथनांतून सतराव्या व अठराव्या शतकांत यांत्रिक जडवादी तत्त्वज्ञान उत्पन्न झालें. अर्थातच त्याची प्रतिक्रिया म्हणून कल्पनावादी तत्त्वज्ञानांचाही जन्म झाला. पण शास्त्र व विज्ञान यांत्रिक जडवादाच्या विचारसरणीलाच पाठिंबा देत होतें. संपूर्ण विश्व हें एक मोठें यंत्र आहे हेंच तें विज्ञान सिद्ध करीत चाललें होतें. याच्या उलट प्रतिक्रिया म्हणून कल्पनावादी तत्त्वज्ञानानें जग हें बुद्धिपासून उत्पन्न झालें असून तें कल्पनेचें प्रतिबिंब आहे हें तत्त्व पुढें मांडलें.

"एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभिक अवस्थेपर्यंत विज्ञान कांहींही म्हणत असलें तरी मानवी जीवन हें जड निसर्गापेक्षां वेगळें आहे, ही समजूत तत्त्वज्ञानांत टिकून राहिली होती. पण पुढें विज्ञानांत अधिक संशोधन होऊन असें दिसून आलें कीं, जड परमाणूंपासूनच चेतनसंघात उत्पन्न झालेले दिसतात. अर्थातच निसर्गाचे नियम त्यांनाही लागतात. मग जे विशिष्ट परमाणू शरीर व मेंदू तयार करतात, त्यांनाच फक्त निसर्गाच्या कार्यकारणपरंपरेच्या नियमां-तून वेगळें ढकलण्याची काय आवश्यकता आहे ? शास्त्रज्ञ केवळ असा संभव व्यक्त करून थांबले नाहींत तर स्वतंत्रपणें जीवनाचा कोणताही विचार न करतां ते आकसानें असें प्रतिपादन करूं लागले कीं, जीवन हें केवळ एक यंत्रच आहे. इतकेंच नव्हे तर विश्वरूपी यंत्राचा जसा कार्यकारणभाव आहे तसाच मिश्रणांचा व विशिष्ट संघातानें विशिष्ट परिणाम उत्पन्न होण्याचा कार्यकारणभाव येथेंही लागू पडतो. न्यूटनचें मन अथवा तत्सम मोठ्या शास्त्रज्ञाचें बुद्धिवैभव हें फक्त छापखान्याच्या यंत्रापासून अथवा वाफेच्या एंजिनपासून केवळ मिश्रण व संघात येवढ्याच दृष्टीनें भिन्न आहे. बाकी त्यांच्यांत कांहींही भिन्नता नाहीं. या दृष्टिकोनानें इच्छा-स्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, स्वयंपूर्ण कर्तृत्व इत्यादि मानवी जीवनाचीं वैशिष्ट्यें पार उडवून लावलीं व त्यामुळें नीतीच्या पायाला

जोरकस धक्का दिला. अनें बपासून वेगळें रहावयाचें कीं नाहीं अथवा गुणांनीं वेगळें व मोठें व्हावयाचें कीं नाहीं हें ठरविण्याचा त्याला कांहींच अधिकार नव्हता वा स्वातंत्र्यही नव्हतें. अ बपेक्षां वेगळा आहे, गुणवान् आहे अथवा पुण्यवान् आहे याचा खरा अर्थ इतकाच होता कीं, अचीं घटक परमाणू द्रव्यें बपेक्षां वेगळीं आहेत. यांत अचा सद्‌गुणही नाहीं अथवा बचा दुर्गुणही नाहीं."

किती भयंकर होता हा यांत्रिक जडवाद! त्यानें परलोक उडवून देऊन पापपुण्याच्या कल्पना नष्ट केल्या, मानवाचें इच्छास्वातंत्र्यच नष्ट करून सत्कर्म व असत्कर्म, नीति आणि अनीति यांचें जग पार धुडकावून लावलें आणि मानवी जीवनालाच यांत्रिक स्वरूप देऊन भावनांचें व संवेदनांचें जग पार दूर सारलें. जीवनाचा हेतु जन्मभर केवळ सुखानें जगणें व अनिर्बंध व्यक्तिस्वातंत्र्यवाद हे त्यांतूनच निर्माण झाले. कॉंट, हेगेल या कल्पनावाद्यांनीं या जडवादाला उत्तर देऊन त्यांतून नीतिमूल्यांच्या संरक्षणाचा प्रयत्न केला. पण तो टिकाऊ ठरला नाहीं. कारण त्याला प्रत्यक्ष प्रयोगांवर आधारलेल्या विज्ञानाचाच कडवा विरोध होता. सर जेम्स जीन्स म्हणतो :

Each extention of the law of causation, and each success of the mechanical interpretation of nature made the belief in free-will more difficult. For if all nature obeyed the law of causation, why should life be exempt?

"कार्यकारणभावाचा नियम व निसर्गाची जडवादी यांत्रिक उपपत्ति जों जों विस्तार पावूं लागली व यशस्वी होऊं लागली तों तों इच्छास्वातंत्र्यावर विश्वास ठेवणें अशक्य होऊं लागलें. जर सर्वच निसर्ग कार्यकारणसंबंधाच्या नियमानें बांधलेला आहे तर जीवन तरी त्याला अपवाद कां असावें?" सतराव्या, अठराव्या व एकोणिसाव्या शतकांतील विज्ञान व त्यांतून उत्पन्न झालेला जडवादी दृष्टिकोन हें मन, जडवस्तू, काळ, आकाश इत्यादि वस्तू आपापल्या ठरलेल्या ठिकाणीं राहणारे असे स्थिर पदार्थ आहेत या कल्पनेभोंवतीं पिंगा घालतें. केवळ व्यक्तिगत सुखाचा दृष्टिकोन वाढावयास या दृष्टिकोनानें साहाय्य केलें. कार्यकारणभावात्मक

विश्वांतील अथवा या विश्वरूपी प्रचंड यंत्रांतील मनुष्य प्राण्यासुद्धां सर्व वस्तू यंत्रात्मक आहेत हें एकदां मनांत पूर्णपणें ठसलें म्हणजे त्यांचा परस्परसंबंध केवळ उपयुक्ततावादावर आधारलेला व म्हणूनच वरवरचा व केवळ तकलादू स्वरूपाचा असा राहतो. त्यांत कोणत्याही प्रकारची आंतरिक एकात्मता व सहानुकंपा राहूं शकत नाहीं. व्यक्तींव्यक्तींतील संबंधाचेंही असेंच आहे. या जडवादी दृष्टिकोनांतून जीवनाकडे पाहण्याची जी दृष्टि उत्पन्न झाली ती केवळ येवढ्याचपुरती होती कीं, प्रत्येक जीवन हें स्वतंत्र असून केवळ उपयुक्ततेच्या दृष्टीनें एका व्यक्तीचा दुसऱ्या व्यक्तीशीं संबंध येणें अपरिहार्य असल्यामुळें तेवढ्यापुरताच व्यक्तीव्यक्तींनीं परस्परांशीं संबंध आणावयाचा, याहून त्या संबंधाला कोणत्याही आंतरिक आकर्षणाचें स्वरूप असू शकत नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्यवाद व त्यांतून उत्पन्न झालेली नि केवळ उपयुक्ततावादावर आधारलेली लोकशाहीची घटना ही या स्वरूपाच्या जडवादी दृष्टिकोनांतून उत्पन्न झालेली आहे. एकोणिसाव्या शतकांत या व्यक्तिस्वातंत्र्य-वादाला अथवा विज्ञानजन्य यांत्रिक जडवादाला औद्योगिक क्रांतीचें व यांत्रिक उत्पादनसाधनांचें साहचर्य मिळाल्यावर त्याचे घातूक परिणाम सर्व जगभर दिसूं लागले. लोकशाहीला आधारभूत असा हा जड व्यक्तिस्वातंत्र्यवादी दृष्टिकोन असें मानूं लागला होता कीं, जगापासून व जगांतील इतर पदार्थांपासून आपलें मन अनियंत्रित, स्वतंत्र, आपलें शरीर स्वतंत्र, आपल्या वैयक्तिक अनुभवाचें जग निराळें, आपल्या खाजगी नीतीचें जगही सर्वथा स्वतंत्र आहे. आपला व बाह्य जगाचा अर्थाअर्थी कोणताही संबंध नसल्यामुळें बाह्य विश्वाशीं व त्यांतील मनुष्यासुद्धां सर्व प्राणिमात्राशीं आप-ल्याला काय कर्तव्य आहे ? कोणाचीही दिक्कत न बाळगतां प्राप्त परिस्थितीचा पूर्ण लाभ घेऊन आपला हवा तितका स्वार्थ साधणें ही जी व्यक्तिस्वातंत्र्यवादांतून उत्पन्न झालेल्या भांडवलशहांची नीति बनली ती यामुळेंच ; व तिचे घोर परिणाम म्हणून जीवनकलह, स्पर्धा, वर्गविरोध, द्वेष व महायुद्धें उत्पन्न झाली. व्यक्तिस्वातंत्र्या-बरोबर व्यक्तिविकसनाच्यासाठीं आवश्यक तो चैतन्यवादी दृष्टिकोन

उत्पन्नच न झाल्यामुळें व्यक्तींतील पशुत्व नष्ट करण्याचें कोणतेंही साधन उत्पन्न होऊं शकलें नाहीं व या पशुत्वामुळें व्यक्तीचा स्वार्थ हीच सर्व गोष्टींची प्रेरक शक्ति ठरली. नीती-अनीतीच्या कल्पनासुद्धां या स्वार्थावरच आधारलेल्या असल्यामुळें नीति ही उपयुक्ततेवर अवलंबून राहिली व व्यवहारांतून ती नष्ट झाली. बेंथॅम व मिल या नीतितत्त्ववेत्त्यांनी उपयुक्ततावादांतून नीतीचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला पण तो मुळांतच तर्कदुष्ट ठरला तो यामुळेंच होय. उपयुक्ततावादाच्या दृष्टिकोनांतून पुष्कळांचें पुष्कळ सुख ज्यांतून साधेल त्यालाच नीति म्हणावें असा दृष्टिकोन त्यांनीं दिला; पण एकदा जडवाद स्वीकारला व व्यक्तिस्वातंत्र्य मान्य केलें कीं जीवन संपावयाचें आहे हें जर निश्चित आहे, तर पुष्कळांच्या पुष्कळ सुखासाठीं एका व्यक्तीनें स्वतःच्या सुखाचा काय म्हणून होम करावयाचा व बलिदान तरी काय म्हणून करावयाचें या प्रश्नाला या दोन्ही नीतितत्त्ववेत्त्यांना उत्तर देतां येत नाहीं. मानवप्राणी स्वभावतः स्वार्थी आहे हें त्यांना विसरतां येत नाहीं व मूळच्या उदार प्रवृत्तीमुळें दुसऱ्याच्या सुखासाठीं स्वतः खपण्याची इच्छा तर त्यांना टाकतां येत नाहीं. अशा स्थितींत स्वार्थ व परार्थ यांची या दोघांनाही कधींच संगति न लावतां येऊन त्यांच्या प्रतिपादनांत विलक्षण विसंगति निर्माण झाली आहे. असो.

मुळांत स्वातंत्र्य, समता व बंधुता या उदात्त तत्त्वांच्या उद्-घोषानें जगाचें भलें करावयास निघालेली लोकशाही व तिच्यांतील व्यक्तिस्वातंत्र्यवाद शेवटीं भांडवलशाहींत परिणत होऊन ती जगाचा निःपात करणारी ठरली, ती तिच्या या जडवादी तात्त्विक पार्श्वभूमीमुळें होय.

जुनी लोकशाही अथवा खरें म्हटले तर तिचा बुरखा पांघरलेली भांडवलशाही उलथून पाडावयास प्रवृत्त झालेल्या साम्यवादानें तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत लोकशाहीच्याही पुढें पाऊल टाकलेलें आहे. साम्यवाद्यांचा द्रष्टा कार्ल मार्क्स हा स्वतः जडवादी असल्यामुळें जड सृष्टीपासून जीवसृष्टि व जीवसृष्टीपासून मानवसृष्टि निर्माण

झाली हें जडवाद्यांचें मत त्याला मान्य आहे; पण जडसृष्टीला अथवा निसर्गाला जे नियम लागू आहेत तेच तिच्यांतून उत्तरोत्तर विकास पावलेल्या जीवनाला लावावे हा यांत्रिक जडवाद्यांचा सिद्धान्त त्याला मान्य नाहीं. सृष्टीच्या विकासावस्थेंत अशी एक मर्यादा येते कीं ती उल्लंघन केल्याबरोबर नवीनच गुणरूपांनीं युक्त अशी अवस्था प्रकट होते, व त्या अवस्थेचे गुणविशेष ती ज्यापासून निर्माण झाली त्या कारणाच्या गुणविशेषांवरून पहात बसणें म्हणजे चुकीच्या मार्गानें जाऊन विकृत सिद्धांत प्रस्थापित करणें होय असें मार्क्सचें म्हणणें आहे. कारणांचे सर्व गुणविशेष कार्यांत सांपडतातच असें नाहीं. ऊन, पाणी, जमीन इत्यादि पदार्थांच्या साहाय्यानें वाढलेल्या आंब्याच्या वा केळीच्या झाडाला जीं फळें लागतात त्यांत त्यांच्या कारणापेक्षां सर्वस्वीं वेगळेच गुण-विशेष आढळून येतात. मनुष्याचा मेंदू हा जड द्रव्याचाच बन-लेला आहे. पण मेंदूचें पृथक्करण केल्यावर जीं द्रव्यें आढळतील त्या द्रव्यांच्या राशीकडे पाहून त्याला मेंदू म्हणतां यावयाचें नाहीं व त्या द्रव्यांच्या भिन्नभिन्न गुणांचें एकत्रीकरण केलें तरी त्याला मेंदूच्या गुणधर्माला प्रकटवितांही येणार नाहीं. यांत्रिक जडवादांत अभिनव गुणांच्या आविष्काराला वाव मिळत नाहीं व त्यामुळें इच्छास्वातंत्र्य आणि समाजाचा विकास या कल्पना त्यांना गाळाव्या लागतात. मार्क्सचें असें म्हणणें आहे कीं, प्रयोगसिद्ध शास्त्रीय ज्ञानाच्या अथवा विज्ञानाच्या अगदींच प्रारंभींच्या अवस्थेंतील हा जडवाद असल्यामुळें ईश्वर व धर्मकल्पनेच्या विरोधाचें आत्यंतिक टोंक त्यानें गांठलें व त्यांतूनच हे दोष निर्माण झाले. यंत्राप्रमाणें अविकासी व ठरीव ठशाचें कार्य करीत राहणाऱ्या या जडवादाची उपपत्ति ही अशी आहे. हैड्रोजनचे दोन कण ऑक्सिजनच्या एका कणाशीं संयोग पावल्यावर उत्पन्न झालेलें पाणी या दोन वायूंपेक्षां भिन्न गुणांचेंच असत नाहीं काय? कारण व कार्य यांच्या गुणविशेषामध्यें होणाऱ्या क्रांतीला यांत्रिक जडवादांत स्थान नसल्यामुळें तो सृष्टींतील घडामोडींचें स्पष्टीकरण करावयास असमर्थ ठरला असून मानव समाजाच्या विकसनाचा मार्ग शोधून

काढण्यासाठीं आवश्यक असणारी ज्ञानदृष्टि त्याला कधींच प्राप्त झाली नाहीं असा त्यानें अभिप्राय व्यक्त केला आहे.

अशी ज्ञानदृष्टि साम्यवाद्यांना प्राप्त झाली असें त्यांचें मत आहे. त्या ज्ञानदृष्टींतून निष्पन्न झालेल्या शास्त्रीय तत्त्वज्ञानांवर आधारलेल्या साम्यवादी व्यवहाराचें भयानक स्वरूप आपण मागच्या व्याख्यानांत पाहिलेंच आहे. त्यावरून या दिव्य (!) ज्ञानदृष्टीच्या शास्त्रीय (!) तत्त्वज्ञानांतही तशाच त्रुटि असल्या पाहिजेत हें अनुमान निघतें. त्या त्रुटि काय आहेत व तें तत्त्वज्ञान तरी काय आहे तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

---

# साम्यवादाची मीमांसा

कम्युनिस्ट हे यांत्रिक जडवाद्यांप्रमाणेंच भौतिकवादी आहेत. त्यांनींही आपल्या वादाच्या पाठीमागें तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमि उत्पन्न केलेली आहे. जगांतील सर्व तत्त्वज्ञानांत कम्युनिझमचें स्थान अग्रगण्य आहे. प्लेटो व ॲरिस्टॉटल या विख्यात ग्रीक तत्त्वज्ञांनंतर युरोपच्या गेल्या दोन अडीच हजार वर्षांत समाजशास्त्राच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें कम्युनिझमचा द्रष्टा कार्ल मार्क्स यानें जितकी नावीन्यपूर्ण व महत्त्वाची भर घातलेली आहे तितकी दुसऱ्या कोणीही घातलेली नाहीं. पण मार्क्सवाद्यांचें हें तत्त्वज्ञान एकोणिसाव्या शतकांतल्या विज्ञानाच्या संशोधनावर आधारलेलें असून त्यांची विज्ञाननिष्ठा टिकून न राहिल्यामुळें, विज्ञान जरी विसाव्या शतकांत बदललें असलें तरी साम्यवादाचें तत्त्वज्ञान तदनुरूप न बदलल्यामुळें, त्याच्या भोंवतालची पोलादी चौकट जशीच्या तशी कायम राहून त्याला एकप्रकारचें आग्रही, अशास्त्रीय, व बुरसटलेलें स्वरूप आलेलें आहे. सृष्टीचा उलगडा करीत असतां तो उलगडा ज्या साधनांनीं करावयाचा तें साधन भौतिक वाद्यांप्रमाणेंच कम्युनिस्टांचेंही प्रयोगशाळा व उपकरणें हेंच आहे. मार्क्सवाद प्रवाही आहे असें कम्युनिस्ट म्हणतात पण तें खोटें आहे. मार्क्सवाद हा मुळींच प्रवाही नसून तो एक प्रकारचा पोलादी चौकटीचा व ठरीव ठशाचा ( Dogma ) झालेला आहे. प्रयोगशाळेवर बेसुमार भर ठेवून विज्ञान हेंच सत्यासत्यनिर्णयाचें एकमेव महत्त्वाचें साधन आहे असें मार्क्सवादी मानतात. कम्युनिस्टांच्या पद्धतींत त्यांचे तीन महत्त्वाचे ऋषि मानले जातात. मार्क्स, एंजल्स व लेनिन हे ते तीन ऋषि होत. त्यांपैकीं मार्क्स हा आद्यप्रवर्तक म्हणून सर्वमान्य असला तरी मार्क्सच्या सूत्रांचें विवेचन वेगवेगळ्या लोकांनीं वेगवेगळ्या पद्धतीचें केल्यामुळें मार्क्सच्या अनुयायांतच मेनशेविक व बोल्शेविक

---

व्याख्यान २४ व २५ वें, दि. २२ व २३–४–१९५२

असे दोन संप्रदाय उत्पन्न झाले. त्यापैकी लेनिन हा बोल्शेविकांचा नेता होय. अधिकृत कम्युनिझममध्यें नुसता मार्क्सच्या नांवापेक्षां लेनिननें केलेलें मार्क्सच्या म्हणण्याचें स्पष्टीकरण हें खरें महत्त्वाचें समजलें जातें; व लेनिनच्याही म्हणण्याचें स्पष्टीकरण स्वत: आजचा कम्युनिस्ट जगाचा नेता स्टालिन जें देईल तेंच खरें महत्त्वाचें समजलें जातें. सृष्टीचा उलगडा करून तिचें तत्त्वसंशोधन करण्याच्या बाबतीत स्टालिन असें म्हणतो की:–

"Marxist philosophical materialism holds that the world and its laws are fully knowable, that our knowledge of the laws of nature, tested by experiment and practice, is authentic knowledge having the validity of objective truth, and that there are no things in the world which are unknowable, but only things which are still not known but which will be disclosed and made known by the efforts of science and practice."

(J. Stalin Dialectical & Historical Materialism Page 12)

"मार्क्सचें जडवादी तत्त्वज्ञान असें मानतें की जग व त्याचे नियम हे निश्चितपणें ज्ञानाच्या कक्षेंत येणारे विषय आहेत. प्रयोग व प्रयत्नसातत्य यांनीं निसर्गाच्या नियमांचें आपणांस होणारें ज्ञान सापेक्ष सत्य असून तें निश्चित विश्वासार्ह आहे. जगांत अज्ञेय अशी कांहीं वस्तूच राहूं शकत नाहीं. फक्त अजून आपणांस समजावयाच्या अशा वस्तू असूं शकतात. पण विज्ञानाच्या प्रयोगा-वरून व सतत प्रयत्नांनीं त्या निश्चितपणें आपल्याला उलगडूं शकतील व समजूं शकतील." स्वत: एंजल्सचा प्रयोगशाळांवर नितांत विश्वास होता. त्याच्या मतें मनुष्याचा अनुभव आणि शास्त्रीय प्रयोग म्हणजेच प्रयोगशाळांतील उपकरणांचे प्रयोग यांना अज्ञेय असें कांहीं राहूं शकत नाहीं. हाच सिद्धांत लेनिननें सुद्धां आपल्या 'Materialism and Empirio Criticism' या ग्रंथांत मान्य केलेला आहे. तत्त्वज्ञान हें व्यवहाराच्या क्षेत्रांत लावून दाखवावयाचें हा कम्युनिस्टांचा बाणा असल्यामुळें आपला हाच प्रामाण्यवाद सामा-जिक क्षेत्रांतही कम्युनिस्ट लावून दाखवितात. स्टालिन म्हणतो:

Further, if the world is knowable and our knowledge of the laws of development of nature is authentic knowledge, having the validity of objective truth, it follows that social life, the development of society is also knowable, and that the data of science regarding the laws of development of society are authentic data having the validity of objective truths.

Hence the party of the proletariat should not guide itself in its practical activity by casual motives, but by the laws of development of society, and by practical deductions from this law.

Hence socialism is converted from a dream of a better future for humanity into Science.

(J. Stalin Dialectical & Historical Materilasim P. 14–15)

"जर जग हें ज्ञानगम्य व निसर्गनियमांचें आपलें ज्ञान हें विश्वासार्ह ज्ञान आहे, तर त्यापासून सामाजिक जीवनासंबंधींही असा सिद्धांत बांधतां येणें योग्य होईल कीं, समाजजीवनाचा विकास कसा झाला ही गोष्ट ज्ञानगम्य असून समाजाच्या विकसनाच्या नियमांचें शास्त्ररूपी साधनानें ज्ञान होऊं शकतें व तें विश्वासार्हही आहे. (हा सिद्धांत म्हणजे कम्युनिझमचा कणाच होय. त्यांनीं जी अितिहासप्रक्रिया उभारली व समाजाच्या प्रगतीचे सिद्धांत मांडले व त्यावरून आजच्या इतिकर्तव्याचें आपल्या अनुयायांना जें दिग्दर्शन केलें त्यांचें सारें सूत्र येथें आहे. म्हणून स्टालिन म्हणतो : )

" यास्तव श्रमजीवी वर्गाचा पक्ष जो कम्युनिस्ट पक्ष त्यानें आपलें आजचें कर्तव्य कोणत्याही इतर हेतूंच्या प्रेरणानुसार न आंखतां समाजविकसनाचे जे नियम ( म्हणजे कम्युनिस्ट शास्त्रज्ञांनीं काढलेले नियम ; मग इतरांच्या मतें ते बरोबर असोत वा नसोत.) व त्यांच्यांतून निघणारे आजच्या कर्तव्याच्या संबंधीचे जे सिद्धांत ( म्हणजे वारंवार क्रांत्या, रक्तपात घडविणें इत्यादि इत्यादि. ) ते त्यांतूनच आंखले पाहिजेत. म्हणून साम्यवाद हा स्वप्नाळू ध्येयवादांतून प्रत्यक्ष शास्त्रांत परिणत झालेला आहे."

## प्रामाण्यवादाचें परीक्षण

कम्युनिस्टांचा हा प्रयोगशाळांवरील भरंवसा आजच्या शास्त्रीय जगांत तरी चुकीचा ठरतो. प्रयोगशाळेंत दिसणारें निसर्गाचें स्वरूप हें किती अस्थिर असतें, किती तुटपुंजे असतें व किती बेभरंवशाचें असतें, हें विसाव्या शतकांतील शास्त्रज्ञांना आतां पूर्णपणें कळून चुकलें आहे. भौतिक शास्त्रज्ञ व भौतिकवादी यांच्यांतील भेद मी मागच्या व्याख्यानांत सांगितलेलाच आहे. साम्यवादी हे भौतिक शास्त्रज्ञ नसून ते भौतिकवादी असल्यामुळें त्यांच्यांत आग्रहीपणा, इतकेंच नव्हे तर, इस्लामच्या अंध अनुयायांसारखा सत्यद्रोह व शास्त्रद्रोहही उत्पन्न झालेला आहे. प्रयोगशाळांतील उपकरणांत जगांतील सारीं गूढें उकलण्याचें सामर्थ्य आहे हा एकोणिसाव्या शतकांतील दंभ विसाव्या शतकांत पार गळून पडलेला आहे. एकोणिसाव्या शतकांत दुर्बिणीना अज्ञात असा खगोल राहूं शकत नाहीं असा शास्त्रज्ञांना विश्वास होता. आतां विसाव्या शतकांत (खगोल शास्त्राचे) ॲस्ट्रॉनॉमीचे शास्त्रज्ञ असें उघडपणें मान्य करूं लागले आहेत कीं अनंत विश्वगोलांतील केवळ एका अतिक्षुद्र मर्यादित भागाचेंच तेवढें आपणांस ज्ञान होतें. खगोलांत असें कितीतरी गूढ आहे कीं, जेथपर्यंत आपली ज्ञानशक्ति पोहोंचूंच शकत नाहीं. खगोल शास्त्राची गोष्ट सोडून दिली तरी इतर निसर्गाचें तरी काय आढळतें ? मध्यंतरीं भारताचे एक केंद्रमंत्री श्री. काकासाहेब गाडगीळ हे पुण्याहून रेल्वेनें प्रवास करीत असतां त्यांच्यावर चोरट्यांनीं हल्ला केला. त्या चोरट्यांचा माग काढण्यासाठीं पोलीस अधिकाऱ्यांनीं, विशेषतः गुप्तचर विभागाच्या अधिकाऱ्यांनीं, कुत्र्याची योजना केलेली होती. कुत्रीं अपराध्याचा माग काढूं शकतात हें सत्य अनेकवार सिद्ध झालेलें असून स्कॉटलंड यार्डसारख्या महत्त्वाच्या गुप्तचर संस्थांकडून त्यांचे प्रयोग होतात. कुत्रीं हा अपराध्यांचा माग कसा काढीत असतील? कुत्रीं हा माग मनुष्याच्या वासावरून काढतात. याचाच अर्थ असा नाहीं का कीं, मनुष्य जेथें

कोठें उभा असेल तेथें त्याच्या शरीराच्या गंधाचे परमाणू विखुरलेले असतात व कोणत्याही कारणास्तव ते नष्ट होऊं शकत नाहींत ! आजच्या प्रयोगशाळांत हे गंधपरमाणु अनुभविण्याचें साधन नाहीं. मग त्यांचें अस्तित्व मानावयाचें कीं न मानावयाचें? स्टालिन असें म्हणतो की, उपकरणें व प्रयोगं यांना अज्ञेय वस्तू राहूंच शकत नाही. पण उपकरणें व प्रयोग यांची प्रत्यक्ष कास कांहीं स्टालिन धरीत नाही. ती कास जे प्रत्यक्ष धरतात त्यांचे या संबंधीचे अनुभव सर्वात अधिक महत्त्वाचे आहेत. सृष्टीच्या गूढासंबंधीं ते काय म्हणतात? आजचे शास्त्रज्ञ परमाणूच्या अंतःकरणाचा प्रत्यक्ष ठाव घेऊनही सृष्टीचें गूढ उकलण्याऐवजीं तें अधिकच गूढ होत चाललें आहे असें म्हणूं लागले आहेत. वनस्पतींना सुद्धां जीव असतो व त्यांनाही सुखदुःखांचे अनुभव असतात असें म्हणणारे, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष प्रयोगांनीं तें सिद्ध करणारे सर जगदीशचंद्र बोस हे आपल्या ‘Plant autographs and their reveletions’ या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत अशी कबुली देतात कीं, “In this vision of truth, the final mystery of things will by no means be lessened but greatly deepened” सत्यसंशोधनाच्या या सर्व वैज्ञानिक शोधांनीं सृष्टीचें गूढ उकलण्याऐवजीं तें अधिकच गुतागुतीचें बनत चाललें आहे.” एखाद्या राष्ट्राच्या, हेतुपूर्वक एखाद्या सिद्धांताचा प्रचार करणाऱ्या सूत्रधारापेक्षां, प्रयोगशाळा हेंच स्वतःचें जीवन मानून त्यांत सर्वस्व ओतणाऱ्या एखाद्या क्रियाशील संशोधकाचे हे उद्‌गार सर्वांत अधिक महत्त्वाचे मानले पाहिजेत. ध्वनिशास्त्रांतील श्रुति सर्वच्या सर्व अनुभवास आणून देणारें यंत्र अजून उपलब्ध व्हावयाचें आहे म्हणून त्या नाहींत असें म्हणण्याची सोय आहे काय? ‘दोन साम्यवाद’ या पुस्तकांत विख्यात भारतीय विचारवंत गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध यांनीं प्रयोगशाळांच्या तुटपुंजेपणाचें एक फारच गमतीचें उदाहरण दिलें आहे. ते म्हणतात :—

“शास्त्रज्ञांचाच अनुभव असा आहे कीं, हजारों गोष्टींत त्या (प्रयोगशाळा) अद्‌भुत चमत्कार करीत असल्या तरी कोट्यवधि

गोष्टींत त्या केवळ अजाण व असमर्थ ठरत आहेत. जन्मल्यापासून मनुष्यास जे जे रोग होत असतात, त्याचें शमन झालें तरी त्यांचे जिवंत संस्कार मानवी रक्तांत राहतात. ही गोष्ट डॉ. कुन्हे यांच्या चिकित्सापद्धतीनें सिद्ध केली आहे. त्या पद्धतीप्रमाणें स्नान, ( Tub Bath ) नियमितपणें योग्य काल केलें असतांना जन्मल्यापासून झालेले सर्व रोग अगदी त्याच क्रमानें म्हणजे प्रारंभीं देवी आल्या असल्यास देवी, त्यापुढें डोळे आले असतील तर डोळे येणें, नंतर विषम झाला असेल तर विषम पुन्हां प्रकट होऊन त्यांचें निर्मूलन होतें व शरीर शुद्ध होतें." ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. मनुष्याचें नुसतें रक्त घेऊन त्यावरून त्यांत कोणतीं रोगबीजें असावींत हें आजची कोणतीही प्रयोगशाळा सांगू शकत नाहीं. पण या प्रत्यक्ष अनुभवावरून ती रोगबीजें रक्तांत नव्हतींच असेंही म्हणतां येत नाहीं. (दोन साम्यवाद पृष्ठ ६२ व ६३)

तात्पर्य, प्रयोगशाळा व उपकरणें हींच सृष्टीच्या मूलतत्त्वाच्या सत्यासत्यनिर्णयाच्या ज्ञानाची कसोटी आहे असें मानणें व केवळ त्यांच्या भरंवशावर होणारें ज्ञान सत्य मानणें अत्यंत चुकीचें आहे. प्रयोगशाळांतून उत्पन्न होणारें ज्ञान किती बेभरंवशाचें असतें व त्यामुळें त्याच्यावर आधारलेलें समाजशास्त्र व जीवनाच्या उलगडयाचें शास्त्र कसें चुकीचें ठरण्याचा संभव असतो हें सतराव्या, अठराव्या, एकोणिसाव्या व आजच्या विसाव्याही शतकांतील विज्ञानाच्या बदलत्या सिद्धांतावरून सुद्धां पूर्णपणें स्पष्ट होण्यासारखें आहे. Law of Causation व Law of gravity यावरून उत्पन्न झालेल्या यांत्रिक जडवादाला नुसती क्वांटम थिअरी उत्पन्न होतांच धक्का मिळाला. हें शास्त्रीय सत्य सर जेम्स जीन्स यांनीं फार सुन्दर रीतीनें विशद केलें आहे. जडद्रव्य हेंच सर्वस्व आहे असें मागचें शतक सांगत होतें, तर शक्ति हेंच सर्वस्व आहे हें इलेक्ट्रॉन्सच्या सिद्धांतावरून आजचें विज्ञान सांगूं लागलें आहे. एकविसाव्या शतकांतलें विज्ञान हें विसाव्या शतकांतल्या शक्तिकल्पनेवर स्थिरावेलच असें कोणीही सांगू शकत नाहीं. म्हणूनच प्रयोगशाळा

व उपकरणें हें बेभरंवशाचें कूळ असून त्यावर एखादें तत्त्वज्ञान आधारणें व तें जसेंच्या तसें समाजशास्त्राला लागू करणें अत्यंत चुकीचें आहे. मग विज्ञानानुसार बदलण्याची तरी त्या समाजशास्त्रानें आपली पूर्ण सिद्धता ठेविली पाहिजे. पण विज्ञान इतकें झपाट्यानें बदलतें, कीं तितकें झपाट्यानें समाजशास्त्र बदलूं लागलें तर सगळाच गोंधळ उडेल. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत जसें आपल्याला अजून कांही समजावयाचें आहे अशी स्टालिन कबुली देतो तशी समाजशास्त्राच्या विकासाच्या नियमांच्या, जीवनाच्या कोड्याच्या व इतिहासप्रक्रियेच्या बाबतीत मात्र तो देत नाहीं. हा अप्रामाणिकपणाच नव्हे काय? याला शास्त्रीयता कसें म्हणतां येईल? व एखाद्या पक्षाला या केवळ पूर्ण न उलगडलेल्या विकास-नियमांच्या चौकटींतून शिस्तीच्या नांवाखालीं अत्याचार करावयास लावणें हें आग्रहीपणाचेंच अथवा हटवादाचेंच प्रतीक नव्हे काय? एक मधली पायरीच सोडून दिल्यावर साम्यवाद्यांची स्वप्नांतून शास्त्रांत परिणति झाली हेंही एक केवळ स्वप्नच ठरत नाहीं काय? तात्पर्य, हा केवळ प्रचार ठरतो. कित्येक साम्यवाद्यांचें असें म्हणणें आहे कीं, नुसत्या प्रयोगशाळांवर आमचा भरंवसा नसून निसर्ग व प्रयोग ही आमची कसोटी आहे. पण प्रयोगशाळा सोडून दिल्यावर निसर्गाचा प्रत्यय दुसऱ्या कोणत्या साधनांनीं कम्युनिस्ट घेतात? केवळ इंद्रियजन्य अनुभव याबांचून दुसरा कोणताही या बाबतींत कांस धरण्यासारखा प्रकार उरत नाहीं. इंद्रियें व प्रयोगशाळा यांच्या द्वारा प्रतीत होणारें सत्य अनुभवावर तासून खरें वा खोटें ठरवावें असें म्हणावयाचें असेल तर हा अनुभव तरी घेतो कोण व कोणत्या साधनांनीं? जिवाचें स्वतंत्र अस्तित्व कम्युनिस्ट मानीत नाहींत. मनाचेंही स्वतंत्र अस्तित्व व सामर्थ्य ते मान्य करीत नाहींत. मग या अनुभवाचें साधन काय? योगाशास्त्रासारखीं अतींद्रिय शास्त्रें व त्यांतून येणारे प्रत्यय हें सत्यासत्य-निर्णयाचें शास्त्र असूं शकतें. पण तें शास्त्र कम्युनिस्टांना मान्य आहे काय? तसें तर मुळींच नाहीं. अशा स्थितींत अनुभव या शब्दाला कांहींही अर्थ उरत नाहीं. अतींद्रिय शास्त्राला व योग-

प्रत्यक्षाला खोटें ठरविण्याचेंही त्यांच्याजवळ कांहीं साधन आहे असेंही मुळींच नाहीं. केवळ हटवाद हें एकच त्याचें कारण आहे. जीवन हें इतकें विशाल आहे व त्याच्या अनुभवाचीं साधनेंही इतकीं विविध आहेत कीं त्या सर्वांचा वापर करण्याची मनाची सिद्धता प्रामाणिक सत्यासत्यनिर्णयासाठीं अत्यंत आवश्यक आहे. कोणत्याही एका विशिष्ट साधनावर आत्यंतिक भर देऊन बाकीचीं सारीं खोटीं आहेत असा अट्टाहास धरणें म्हणजे स्वत:साठी ज्ञानाची एक बाजू सदाची बंद करणें होय; व तीच गोष्ट केल्यानें साम्यवाद्यांचा प्रामाण्यवाद हा चुकीचा व हटवादी ठरलेला आहे.

या प्रामाण्यवादांतील साधनांनीं जगाचें मूलतत्त्व शोधन करून त्याविषयींचे जे सिद्धांत त्यांनीं बसविले आहेत तेही आजच्या विसाव्या शतकांतील विज्ञानासमोर टिकणारे नाहींत. अर्थातच त्यावर आधारलेल्या समाजशास्त्राच्या सिद्धांताची तशीच अवस्था होणार हें उघडच आहे. त्यांच्या तत्त्वज्ञानाचें एक वैशिष्टय असें आहे कीं, यांत्रिक जडवाद्यांप्रमाणें नुसतें तत्त्वज्ञानच त्यांनीं उभारलें नाहीं तर स्वतंत्र ज्ञानप्रक्रियाही त्यांनीं उभारली. त्यांच्या या तत्त्वज्ञानाला मटेरियालिझम् म्हटलें तरी तें ज्ञानप्रक्रियेसहित असल्यामुळें त्याला डायलेक्टिल मटेरियालिझम् असें म्हणतात. डायलेक्टिकल ही त्याची ज्ञानप्रक्रिया आहे. प्रथम आपण त्यांच्या तत्त्वज्ञानाकडे व त्यांतून निघणाऱ्या सामाजिक सिद्धांताकडे पाहूं व नंतर त्यांच्या या डायलेक्टिक्स ज्ञानप्रक्रियेकडे वळूं म्हणजे आपणास जगाला सुखी करावयास निघालेला साम्यवाद जगाचा शत्रु बनण्यांत कां परिणत झाला याची यथार्थ कल्पना येईल. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतील साम्यवाद्यांचे सिद्धांत त्यांचा आजचा द्रष्टा स्टालिन याच्याच शब्दांत पहाणें उचित ठरेल. कारण या त्यांच्या तत्त्वज्ञानावर अनेक विश्लेषण करणारे ग्रंथ उत्पन्न झाले असले तरी त्यांचें अधिकृत मत म्हणजे स्टालिनचेच उद्‌गार होत. त्यामुळें त्या उद्‌गारांना एक विशेष प्रकारचें महत्त्व आहे. स्टालिन म्हणतो :

(i) Marx's philosophical materialism holds that the world is by its very nature material, that the multifold phenomena of the world constitute different forms of

matter in motion, that interconnection and interdependence of phenomena, as established by the dialectical method, are a law of the development of moving matter, and that the world develops in accordance with the laws of movement of matter and stands in no need of a "universal spirit".

(ii) " That matter is primary, since it is the source of sensations, ideas, consciousness, and that consciousness is secondary, derivative, since it is a reflection of matter, a reflection of being; that thought is a product of matter which in its development has reached a high degree of perfection, namely, of the brain, and the brain is the organ of thought; and that therefore one cannot seperate thought from matter without committing a grave error."

(iii) Concerning the question of matter and thought Marx says:

It is impossible to seperate thought from matter that thinks. Matter is the subject of all changes.

Describing marxist philosophical materialism Lenin says:

Materialism in general recognizes objectively real being (matter) as independent of consciousness, sensation, experience. Consciousness is only the reflection of being, at best an approximately true (adequate, perfectely exact) reflection of it. (Lenin Materialism and Empririo criticism Eng. P. 377 & 378).

And further,

Matter is that which acting upon our sense-organs, produces sensation; matter is the objective reality given to us in sensation..Matter, nature, being, the physical–is primary and spirit, consciousness, sensation the physical–is secondary (Ibid. 145-146).

The world picture is a picture of how matter moves and of how matter thinks. (Ibid. P. 367)

"The brain is the organ of thought." (Ibid. P. 152)

" सृष्टीचें मूलतत्त्व जडद्रव्य हें आहे. सर्व दृष्टिगोचर होणारी सृष्टि म्हणजे वस्तुतः अखंड गतिमान् अशा जडद्रव्याच्या गतींतूनच उत्पन्न झालेली असून ती गति विरोधविकासाच्या प्रक्रियेप्रमाणें एकमेकांशीं संबद्ध, एकमेकांवर अवलंबून असलेली व विरोधांतून विकसन होणारी आहे. संपूर्ण जग जडद्रव्याच्या गतीच्या या विरोधविकासी नियमाप्रमाणेंच उत्पन्न झालेलें असून त्याच्या उत्पत्तीसाठीं कोणतेंही विश्वचैतन्य मानण्याची आवश्यकता नाहीं. विश्वाचें मूलतत्त्व हें गतिस्वरूप जडद्रव्य आहे. जगामध्यें जड-भाग तेवढा मूलभूत असून गति हा त्याचा स्वभाव आहे. या जडद्रव्यांतूनच संवेदना, भावना व जाणीव अथवा संवित् उत्पन्न होत असल्यामुळें संवित् अथवा जाणीव हें जडांतून उत्पन्न झालेलें असें द्वितीय श्रेणींतील तत्त्व होय व तें जडद्रव्याचेंच प्रतिबिंब होय. मनुष्यशरीरांतील ही जाणीव व मन हें जडांतूनच उत्पन्न झालेलें असून तें जडाला सोडून केव्हांही राहूं शकत नाहीं. फार तर जाणीव हें पूर्णावस्थेला गेलेल्या अथवा अत्यंत विकसित जडद्रव्याचें प्रतिबिंब म्हणतां येईल. हें विकसित जडद्रव्य म्हणजेच मेंदू होय व मेंदू हेंच विचारांचें अथवा जाणिवेचें साधन आहे. मेंदूशिवाय जाणीव अथवा ज्ञानशक्ति आढळत नाहीं, असूं शकत नाहीं. सुख-दुःखाच्या भावना मेंदूशिवाय कधींही प्रकट होऊं शकत नाहींत. म्हणून मेंदूचा ज्ञानशक्ति अथवा जाणीव हा एक गुणधर्म आहे असेंच म्हटलें पाहिजे. मेंदूंत जडद्रव्याशिवाय दुसरें कांहींही आढळत नाहीं. म्हणून जाणीव, मानवी संवित् अथवा जीवदशा हा जडाचाच एक धर्म होय असें म्हटलें पाहिजे. कार्ल मार्क्सनें असें म्हटलें आहे कीं, आपली ज्ञानशक्ति अथवा विचारशक्ति ही कितीही वेगळेपणानें भासमान झाली तरी वस्तुतः ती जडद्रव्या-पासूनच–ज्याला मेंदू म्हणतात त्या जडद्रव्यापासूनच–उत्पन्न झालेली आहे. यावरून हेंच सिद्ध होतें कीं, ज्ञानशक्तींतून जडद्रव्य उत्पन्न

झालें नसून जडद्रव्यांतूनच उत्पन्न झालेली ज्ञानशक्ति अथवा जाणीव हें जडद्रव्याचें सर्वोत्तम उत्पादन होय. जडद्रव्यापासून जाणीव वेगळी करणें अत्यंत अशक्य आहे. सर्व प्रकारच्या भिन्नतेनें प्रत्ययास येणाऱ्या या वस्तुजाताचें मूलकारण जडद्रव्यच होय. मार्क्सचा अभिप्राय स्पष्ट करतांना लेनिन म्हणतो कीं, "जडद्रव्य हें आपल्या इंद्रियांवर आघात करून संवेदना उत्पन्न करतें. जडद्रव्याच्या सापेक्षतेनेंच संवेदनेचें सत्य भासमान होतें. म्हणून जडद्रव्य हेंच मूलतत्त्व असून चैतन्य, जाणीव, भावना, संवेदना हे सर्व त्याचे गुणधर्म अथवा दुय्यम श्रेणींतील होत. संपूर्ण जग म्हणजे जडद्रव्याची गति कशी आहे व त्यांतून विचार कसा उत्पन्न होतो याचें जणूं कांहीं छायाचित्रच होय. विचार व्यक्त होण्याचें अथवा जाणीव अभिव्यक्त होण्याचें मेंदूशिवाय दुसरें कोणतेंच साधन नाहीं."

या तत्त्वज्ञानाच्या भूमिकेवरून साम्यवादानें समाजजीवनाचें कोडें उलगडण्याचा प्रयत्न करून त्यासंबंधींचें कांहीं महत्त्वाचे समाजशास्त्रीय सिद्धान्त सांगितले आहेत. ते असे कीं :–

Further, if nature, being, the material world, is primary, and consciousness, thought is secondary, derivative; if the material world represents objective reality existing independently of the consciousness of men, while consciousness is a reflection of this objective reality, it follows that the material life of society, its being, is also primary, and its spiritual life secondary, derivative, and that the material life of society is an objective reality existing independently of the will of men, while the spiritual life of society is a reflection of this objective reality, a reflection of being."

(D. & H. Materialism P. 15)

Hence the source of formation of the spiritual life of society, the origin of social ideas, social theories, political views and political institutions, should not be sought for

in the ideas, theories, views and political institutions themselves; but in the conditions of the material life of society, in social being, of which these ideas, theories, views, etc. are the reflection.

In this connection Marx says, "It is not the consciousness of men that determines their being, but, on the contrary, their social being that determines their conciousness."
(Karl Marx Selected Works P. 300 V. I.)

Hence, in order not to err in policy, in order not to find itself in the position of idle dreamers, the party of the proletariat must not base its activities on abstract "principles of human reason," but on the concrete conditions of the material life of society, as the determining force of social development; not on the good wishes of 'great men' but on the real needs of development of the material life of society. (J. Stalin D & H Materialism P. 16)

" ज्या अर्थी जडद्रव्य हें मूलभूत असून जाणीव, विचार इत्यादि त्यांतून उत्पन्न झालेले आहेत व माणसाच्या ज्ञानशक्तीच्या विरहित स्वतंत्रपणें भौतिक जगाचें अस्तित्व प्रत्ययास येत असून त्या अस्तित्वाच्या सापेक्षतेनेंच जाणिवेचें जग भासमान होतें, त्याअर्थी समाजजीवनासंबंधानें सुद्धां हेंच म्हणतां येईल की, समाजाचें भौतिक जीवन हेंच मूलभूत असून त्याचें सांस्कृतिक अथवा वैचारिक जीवन हें त्यांतून उत्पन्न झालेलें दुय्यम व त्या जीवनाचें प्रतिबिंबभूत होय. समाजाचें सांस्कृतिक जीवन घडविण्यास त्याच्या कल्पना, समाजशास्त्रें, राजनैतिक विचारप्रवाह, राजकीय संस्था इत्यादिकांचें मूळ दुसऱ्या कोठेंही शोधणें व्यर्थ असून तें केवळ त्याच्या भौतिक जीवनांतच शोधलें पाहिजे. कारण समाजजीवनांतील सर्व कल्पना, शास्त्रें, मतमतांतरें, इत्यादि या भौतिक जीवनाचींच प्रतिबिंबें अथवा प्रतिच्छाया होत."

तत्त्वज्ञानांतून निर्माण झालेल्या या समाजजीवनाकडे पहाण्याच्या दृष्टिकोनांतूनच साम्यवाद्यांची इतिहासप्रक्रिया उभी

राहिलेली आहे. हें मूलभूत तत्त्वज्ञान बरोबर असेल तर त्या साऱ्या समाजशास्त्रीय सिद्धान्तांची व इतिहास–प्रक्रियांची सत्यता जशी आपोआपच ठरणारी आहे, त्याचप्रमाणें तें तत्त्वज्ञानच जर मुळांत वैज्ञानिक सिद्धान्तांना धरून नसेल तर ती समाजशास्त्रीय प्रक्रिया व इतिहासप्रक्रिया म्हणजे एक थोतांडच ठरेल हेंही निर्विवादच आहे. मार्क्सवाद्यांचें असें आग्रहाचें म्हणणें आहे कीं, त्यांचें हें तत्त्वज्ञान आजच्या विज्ञानाच्या दृष्टीनें ठरणारें शास्त्रीय सत्य आहे येवढेंच नसून तेंच केवळ एकमात्र सत्य आहे व बाकीचें सारें मिथ्या आहे. हा आग्रहीपणा बरोबर आहे काय ? तें आपण थोडक्यांत पाहूं.

## विज्ञानानें साम्यवादाला थप्पड दिली

आज स्टालीन सांगत असलेलें तत्त्वज्ञान एकोणिसाव्या शतकांतील, विशेषत: त्या शतकाच्या पूर्वार्धातील विज्ञानावर आधारलेलें तत्त्वज्ञान आहे. एकोणिसाव्या शतकांतील या विज्ञानावर त्या वेळींच उत्पन्न झालेल्या कार्ल मार्क्सनें आपलें तत्त्वज्ञान आधारणें काळाच्या दृष्टीनें ठीक असलें तरी विसाव्या शतकांतील आजच्या विज्ञानानें एकोणिसाव्या शतकांतील विज्ञानाच्या पुढें पाऊल टाकून एकोणिसाव्या शतकांतील विज्ञानाला मागें टाकलें आहे. मार्क्सवाद्यांच्या प्रयोगसाधनांतूनच निघालेल्या विज्ञानाचा आतां असा सिद्धांत आहे कीं, जगांत मॅटर अथवा जडद्रव्य या नांवाची कोणतीही वस्तूच नसून शक्तीचें जडांत व जडाचें शक्तींत रूपांतर करतां येतें. अशा स्थितींत मूलभूत जडद्रव्य म्हणून उरलेंच कोठें ? जोंवर इलेक्ट्रॉन्स्‌चा शोध लागला नव्हता, तोंवर जडद्रव्याच्या या परिभाषेला कांहीं अर्थ होता. विसाव्या शतकांतील शास्त्रज्ञांच्या मतें जगांतील सर्व हालचालींना आधारभूत ही गतिस्वरूप विद्युत्परमाणूंची संख्या आहे. विज्ञानाच्या शोधाची आजची अंतिम सीमा जी अिलेक्ट्रॉन्स अथवा गतिस्वरूप परमाणू तिच्याकडे पाहिलें तर अर्वाचीन शास्त्रज्ञ जडवस्तु म्हणून कांहीं नाहींच अशा सिद्धांतावर आलेले आहेत. मनुष्याच्या बुद्धीस

जवळजवळ अगम्य अशा कल्पनातीत वेगानें फिरणाऱ्या या गति-स्वरूप विद्युत्परमाणूंचे संघ म्हणजेच पदार्थमात्रांचें वास्तविक स्वरूप होय. •या प्रचंड गतीमुळें तिला आधारभूत असलेलें अव-काशाचें तत्त्व अखंड आंदोलन पावतें. पण त्याचें तें आंदोलन प्रायोगिक उपकरणांच्या कक्षेंत येणारें नसून अनुमानगम्यच आहे. प्रत्यक्ष ज्ञान असें केवळ स्थूल आंदोलनाचेंच होऊं शकतें. एका मूलद्रव्यांत ठराविक वेळांत घडलेल्या आंदोलनांच्या निरनिराळ्या संख्या म्हणजे प्रकाश व ध्वनि हीं तत्त्वें होत. ध्वनि म्हणजेच प्रकाश व प्रकाश म्हणजेच ध्वनि. व्यक्त सृष्टींत जड अशी कांहींही वस्तु नसून सर्वत्र अनंत, अपरिमित गति असून मनुष्याचें शरीर, मानवी अिंद्रियें व मेंदू हे त्या अखंड गतीचेच अभिन्न भाग आहेत. काल, क्रम आणि ती गति यांच्या परस्परप्रमाणावरून सृष्टींतील पदार्थांचा वेगवेगळेपणा भासतो. येथपर्यंत अर्वाचीन शास्त्रज्ञांची मजल गेलेली आहे. अशा स्थितींत जडद्रव्याच्या कल्पनेचा पुरस्कार व तोही हट्टाग्रहाचा पुरस्कार विलक्षणच ठरत नाहीं काय? केवळ जडवादानें आजच्या शास्त्रीय जगांत सृष्टीचें गूढ उकलण्याचा प्रयत्न अशास्त्रीय ठरणारा आहे. सृष्टीच्या मुळाशीं असलेल्या चित् शक्तीला ('Living matter') 'सचेतन जडता' (!) या परस्पर-विरोधी संज्ञेनें संबोधण्याचा आग्रह कित्येक लोक करतात. पण एडिं-ग्टन, जीन्स, बर्कसन अित्यादि चेतनवादी शास्त्रज्ञ पुढें येत असून जडाचे परमाणू फोडून त्यांतून शक्ति निर्माण करतां येते व शक्तीचें जडपरिमाणूंत रूपांतर करतां येतें हें ते सिद्ध करूं लागले आहेत.

आतांच्या शास्त्रज्ञांच्या विचाराचा प्रारंभबिंदु जडांतून चेतन कसें निर्माण होतें हा उरलेला नसून चेतनांतून जड कसें निर्माण होतें हा आहे. भौतिक शास्त्रज्ञ त्याचें उत्तर आज स्पष्ट देऊं शकत नसले तरी तत्त्वज्ञ मात्र त्याचें उत्तर स्पष्ट देऊं लागले आहेत. योगींद्र अरविंद घोष यांच्या जयंतीनिमित्त त्यांच्या शिष्यांनीं 'जयंती' नांवाचा एक अंक काढला होता. त्या अंकांतील यासंबंधींचा एक उतारा प. पू. ज. स. करंदीकर यांनीं गीतातत्त्वमंजरींत उद्धृत केला आहे तो या दृष्टीनें अत्यंत मार्गदर्शक आहे. तो उतारा असा असा:—

Spirit has become matter by crystalisation, self-limitation and exclusive concentration. A movement of Involution has made spirit terminate into matter. A return journey–Evolution–would make matter culminate in spirit.

"चैतन्यच संघातामुळें, मर्यादिततेमुळें, व आत्यंतिक केंद्रिततेमुळें जड बनलें. हा एक प्रकारें चैतन्यानें खालच्या अवस्थेंत येण्याचा प्रकार झाला. विकसनाच्या पद्धतीनें जडाचें चैतन्यांत पुन्हां रूपांतर होईल." आधुनिक शास्त्रज्ञ व विशेषत: पदार्थविज्ञानशास्त्र कोणत्या सिद्धांतापर्यंत येऊन ठेपलें आहे याचें विवेचन करतांना सर जेम्स जीन्स आपल्या 'दि मिस्टीरियस युनिव्हर्स' या पुस्तकांत म्हणतो :–

The tendency of modern physics is to resolve the whole material universe into waves, and nothing but waves. These waves are of two kinds: bottled up waves which we call radiation or light. If annihilation of matter occurs, the process is merely that of unbottling imprisoned wave energy and setting it free to travel through space. These concepts reduce the whole universe to a world of light, potential or existent, so that the whole story of its creation can be told with perfect accuracy and completeness in the six words " God said, let there be light". (P. 77–78)

In this vision of truth the final mystery of things will, by no means be lessened but greatly deepened.

(Preface, Plant Autographs & Their Revelation.
Dr. J. C. Bose).

तात्पर्य, जडद्रव्याऐवजीं जगाची नुसती गतिमयता मानणाऱ्या आजच्या काळांत साम्यवादाच्या जडवादाला स्थान नाहीं. विद्युत्कणासारख्या सूक्ष्म वस्तूंत देखील इच्छा असली पाहिजे अशी अर्वाचीन शास्त्रज्ञांस शंका येत आहे. हें लक्षांत घेतलें म्हणजे जड द्रव्य हेंच मूळ व चेतन ही त्याची प्रतिच्छाया हा साम्यवाद्यांचा आग्रह केवळ हटवादीपणाचा (Dogmatic) ठरतो.

स्टालिननें पुढें जें मानवी संवित्‌चें वर्णन केलें आहे तें तर शास्त्रीय जगतांत विलक्षण आग्रहीपणाचेंच द्योतक आहे. मनुष्यजीवन ही एक स्वतंत्र गोष्ट असून अजून शास्त्रज्ञांनाही अचेतनांत सचेतनत्व कसें उत्पन्न झालें याचें उत्तर मुळींच देतां येत नाहीं. संपूर्ण जग हें एका दृष्टीनें अखंड गतिसागराचा भाग आहे असें मानलें तरी जीवाची जाणीव अथवा मनुष्याची अस्मिता जगाचें ज्ञान करून घेतें; आपण जगापेक्षां वेगळे आहोंत हें ओळखतें, इतकेंच नव्हे तर मला अमकें उपभोगावयास मिळालें पाहिजे व मी अमकी गोष्ट घडवून आणीनच असा आग्रह धरतें हें सर्वांच्या प्रत्ययास येतें. नुसतें सारें जडद्रव्य आहे असें म्हणून तिच्या या वेगळेपणाचें रहस्य कोणासही उलगडतां येत नाहीं. उलट वस्तुस्थिति अशी आहे कीं, खास कम्युनिस्टांना सुद्धां या अस्मितेची, इतकेंच नव्हे तर तिच्या अभिनिविष्टतेची चांगलीच प्रतीति आहे. स्वतःच्या अस्मितेच्या भरंवशावरच जगाविषयीं, समाजाविषयीं वेगवेगळ्या कल्पना केल्या जातात. हें आपलें अस्तित्वच नाकारावयाचें व त्याच्या भरंवशावर जगाचा उलगडा करावयाचा हा एक अद्‌भुतच प्रकार आहे! भगवान्‌ शंकराचार्यांनीं आपल्या वेदान्तकेसरी नांवाच्या ग्रंथांत या प्रवृत्तीचें व विसंगतीचें अतिशय सुन्दर वर्णन केलें आहे. आचार्य म्हणतात :—

**"देहस्त्रीपुत्रपौत्रानुचरहयवृषास्तोषहेतुर्ममेत्थम् ।**
**सर्वे स्वायुर्नयन्ति प्रथितमलममीमांसमीमांसयेह ॥**
**एते जीवन्ति येन व्यवहृतिपटवः येन सौभाग्यभाजः ।**
**तं प्राणाधीशमंतर्गतममृतममुं नैव मीमांसयन्ति ॥**

"देह, स्त्री, पुत्र व जगांतील यच्चयावत्‌ भोग्य पदार्थ यांची मीमांसा करावयास बसलेले जड दृष्टीचे लोक स्वतःचें अस्तित्व ज्याच्यावर अवलंबून आहे त्या प्राणाधीश्वर अंतरात्म्याला मात्र विचाराच्या कक्षेंत सुद्धां येऊं देत नाहींत असें म्हणतात ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे." मार्क्सवादी तर आचार्यांनीं निर्देशिलेल्या लोकांच्याही एक पाऊल पुढेंच गेले आहेत. ते

स्वतःचेंच अस्तित्व नाकारावयास सिद्ध झाले आहेत ! मेंदू-शिवाय जाणीव होऊं शकत नाहीं म्हणजे समजूं शकत नाहीं म्हणून जाणीव अथवा ज्ञानशक्तीला फक्त मेंदूचा गुणधर्म समजण्याऐवजीं सर्वत्र अखंड भरून राहिलेल्या स्वतंत्र अस्तित्वात्मक जाणिवेचें ज्ञान करून घेण्याचें उपकरण उपलब्ध नसणें हेंही ती न समजण्याचें कारण असूं शकतें हें ओळखावयास हवें. गायनशास्त्रांतील श्रुति सर्वच्या सर्व पेटीसारख्या वाद्यांतून व्यक्त होऊं शकत नाहींत म्हणून त्या श्रुतीच नाहींत असें म्हणणें वेडेपणाचें नाहीं काय ? मागें एक कुत्र्याच्या घ्राणेंद्रियाच्या प्रत्ययास येणाऱ्या वासाचें उदाहरण दिलेंच आहे.

इलेक्ट्रॉन्समध्यें प्रेरक इच्छाशक्ति असल्याचें शास्त्रज्ञ अनुमानाच्या क्षितिजावर पहात असतां ती इच्छाशक्ति हा फक्त मेंदूचा गुणधर्म आहे असें उद्‌घोषिणें तर फारच गमतीचें होईल! आजच्या विज्ञानावर आपला तात्त्विक दृष्टिकोन उभारणारे तत्त्वज्ञ हे जर चालू शतकाचे यथार्थतेनेंच साम्यवादापेक्षां अधिक प्रातिनिधिक स्वरूपाचे विचार व्यक्त करतात हें गृहीत धरलें तर ते काय म्हणतात हें लक्षांत घेणें मोठें बोधप्रद होईल. वुईल ड्यूरँड आपल्या मॅन्शन्स ऑफ फिलासॉफी या ग्रंथांत म्हणतो :—

It was the energy of living substance that specialised and moulded organs, nerves and brains. Now we can think because we have brains but once life made the brain by trying to think. It is this desire which creates organ after organ and slowly moulds the body in the image of the will."

"शरीरांत इंद्रियें, स्नायू व मेंदू हे जीवात्म्याच्या चैतन्यशक्तीनें उत्पन्न केलेले आहेत. आज आम्ही विचार करतों कारण कीं, आम्हांला मेंदू आहे; पण मुळांत जीवशक्तीनेंच मेंदू स्वतःच्या विचारासाठीं उत्पन्न केला. इच्छाशक्तीस अनुसरूनच प्रथम इंद्रियें व नंतर शरीराचा सांगाडा तयार झालेला आहे." खास जाणत्या मार्क्सवाद्यांनीं सुद्धां मनुष्याच्या शरीरांतील या जीव-

भावांचा प्रश्न आपणांस समाधानकारक रीतीनें सोडवितां आला नाही असें म्हटलेलें आहे. 'दि मार्क्सिस्ट फिलॉसफी अ‍ॅण्ड सायन्सेस' या ग्रंथात हॉल्डेन असें म्हणतो कीं,

It is at present an unanswerable question because we have not got the necessary data; for that reason Engels left it alone for a few sentences. The additional knowledge of the last fifty years does not yet allow us even to pose the question in its proper form.

हें जर खरें आहे तर मग जीव हा जडाचाच परिणाम आहे या हट्टाग्रहांत तात्पर्य काय ? आजच्या विज्ञानाच्या या अवस्थेंत साम्यवादी तत्त्वज्ञान हें मागासलेलें, हटवादी व आग्रही स्वरूपाचें ठरतें व त्यावरून अशी शंका येऊं लागते कीं, विज्ञानाच्या प्राथमिक संशोधनांतून तें तत्त्वज्ञान निघालेलें नसून तें कृत्रिम असलें पाहिजे. श्री. अप्रबुद्ध यांनीं आपल्या ग्रंथांत 'हें घडविलेलें तत्त्वज्ञान आहे' असें जें म्हटलें आहे व मार्क्सवादावरील विशेषत: नाझी पंथाच्या टीकावाङ्मयांत मार्क्सच्या ज्यूपणांत त्याच्या तत्त्वज्ञानाच्या निर्मितीचें जें मूळ शोधण्यांत आलें आहे तें खरें असावें असें वाटूं लागतें. ह्या विज्ञाननिष्ठेपासून म्हणजेच मार्क्सवाद्यांच्या लाडक्या शब्दांत सांगावयाचें तर 'शास्त्रीयते'पासून दूर असलेल्या तत्त्वज्ञानाच्या भरंवशावर उत्पादनसाधनांच्या सामाजिक, भौतिक अवस्थेंत संस्कृतीचें मूळ पहाणारा मार्क्सवाद्यांचा समाजशास्त्रीय सिद्धांत खोटा व ठोकळेबाज आपोआपच ठरतो. इतर अनेक गोष्टींप्रमाणेंच त्यालाही महत्त्व आहे हें वेगळें; पण तोच एकमात्र सिद्धांत समजून प्रत्येक गोष्टीचें मूळ उत्पादन-साधनांत शोधीत बसणें हें बुद्धीचें अध:पतनच होय व रानटी गुलामगिरीची अवस्था, सरंजामशाही, भांडवलशाही इत्यादि पांच अवस्थांच्या त्यांच्या इतिहासप्रक्रियेचा हाच कृत्रिम व शास्त्रीय जगापासून दूर असलेला खोटा कणा आहे. आजच्या विज्ञानाप्रमाणेंच पाहिलें तरी व कम्युनिस्टांच्याच शास्त्रज्ञांच्या उद्गारांकडे पाहिलें तरी त्यांनीं जीवाचा स्वतंत्रपणें विचार

करावयास हवा होता. किंबहुना भावजगताचें अस्तित्व, जीवाचें अस्तित्व व म्हणून त्याच्या स्वतंत्र विचाराची आवश्यकता आजच्या भौतिक शास्त्रज्ञांनाही मान्य करावीच लागते. मार्क्स-वाद्यांनीं या विचाराला आपल्या तत्त्वज्ञानांत मुळींच स्थान न दिल्यामुळें ते जगाचे द्रोही होण्यांत त्याचें पर्यवसान झालें आहे.

त्यांच्या तत्त्वज्ञानाची ही अवस्था पाहिल्यावर त्यांच्या डाय-लेक्टिक्सकडे वळणें क्रमप्राप्त आहे. अखंड रक्तपात व क्रांतीचें आणि मानवी जीवन उद्ध्वस्त करून टाकण्याच्या आपल्या प्रवृत्तींचें समर्थन साम्यवादी या डायलेक्टिक्सच्या ज्ञानप्रक्रियेनें करीत असतात. तिचें स्वरूप काय तें पहाणें उद्बोधक ठरेल व त्यावरूनच त्यांच्या रक्तपाती, आसुरी व अत्याचारप्रधान मनो-भूमिकेची खरी बैठक कळून येईल.

## साम्यवाद्यांची ज्ञानप्रक्रिया

डायलेक्टिक्सचें मराठी भाषांतर विरोधविकासवाद या शब्दानें करण्यांत येतें. ग्रीक लोकांच्यामध्यें सत्यनिर्णयाची एक विशेष पद्धति असे. तिला वादविवाद-पद्धति असें म्हणतां येईल. ग्रीक लोकांच्या सभांमधून मुख्य वक्त्यानें एक सिद्धान्त सांगितल्यावर दुसरे कित्येक लोक त्या सिद्धान्तावरच आक्षेप घेऊन तो खोडून काढण्याचा प्रयत्न करीत व या विवादात्मक परस्परविरोधांतून शेवटीं सत्यनिर्णय होत असे. या पद्धतीला ग्रीक भाषेंत 'डायलेगो' (Dialego) असें म्हणत व त्याचा मूळ अर्थ परस्परवादविवाद असा आहे. त्यावरून वस्तुतत्त्वाच्या ज्ञानाची एक प्रक्रिया हेगेल नांवाच्या कल्पनावादी जर्मन पंडितानें शोधून काढली. मार्क्स हा हेगेलचा शिष्य होता. या शिष्यानें हेगेलचें कल्पनावादी तत्त्वज्ञान स्वीकारलें नाहीं. पण त्याची ज्ञानग्रहणाची पद्धति मात्र स्वीकारली. मार्क्सच्या या पद्धतीचा विशेष असा आहे कीं, त्याच्या मताप्रमाणें जगाचें मूलभूत द्रव्य जें गतिरूप जड द्रव्य त्याच्या त्या गतीला त्यानें प्रक्रिया लावून दाखविली. ती अशी:—एक मूलभूत स्थिति (Thesis) असते. त्या स्थितीला विरोध करणारी

दुसरी अवस्था (Antithesis) तिच्यांतूनच उत्पन्न होते. त्यांचें द्वंद्व कांहीं वेळ चालून त्या द्वंद्वांतून एक नवी प्रक्रिया (Synthesis) जन्म पावते. अर्थात् ही प्रक्रिया मूळ गोष्टीचा विरोध व नाश करून जशी उत्पन्न झालेली आहे तशीच ती मूळ स्थितीपेक्षां विकसनात्मक आहे हेंही निर्विवादच आहे. ही नवी प्रक्रियासुद्धां तिच्यांतून विरोधात्मक अवस्था निर्माण होऊन पुन्हां नष्ट होते. याला ध्वंस (Negation) असें म्हणतात. या ध्वंसाचा पुन्हां ध्वंस होतो (Negation of Negation) व त्यांतून पुन्हां कांहीं तरी वेगळें नवें उत्पन्न होतें. डायलेक्टिक्सच्या प्रक्रियेचें थोडक्यांत असें स्वरूप आहे. कोणतीही अवस्था टिकाऊ नाहीं. प्रत्येक अवस्थेचा विकास झाल्यावांचून राहात नाहीं. हा विकास विरोधाशिवाय होत नाहीं. व विरोध जसा विकासाला जन्म देतो त्याचप्रमाणें त्याचा विशेष हा आहे कीं तो पहिल्या अवस्थेच्या विनाशांतूनच दुसऱ्या विकासाच्या अवस्थेला जन्म देत असतो. डायलेक्टिक्सचे अथवा विरोधविकासवादाचे हे महत्त्वाचे सिद्धांत होत.

स्टालिन म्हणतो :

This dialectical method of thought, later extended to the phenomena of nature, developed into the dialectical method of apprehending nature, which regards the phenomena of nature as being in constant movement and undergoing constant change, and the development of nature as the result of the development of the contradictions in nature, as the result of the inter-action of opposed forces in nature.

The dialectical method therefore holds that no phenomenon in nature can be understood if taken by itself, isolated from surrounding phenomena, in as much as any phenomenon in any realm of nature may become meaningless to us if it is not considered in connection with the surrounding conditions.

The dialectical method therefore requires that phenomena should be considered not only from the standpoint

of their interconnection and interdependence, but also from the standpoint of their movement, their change, their development, their coming into being and going out of being.

The dialectical method therefore holds that the process of development should be understood not as movement in a circle, not as a simple repetition of what has already occurred, but as an onward and upward movement, as a transition from an old qualitative state to a new qualitative state, as a development from the simple to the complex, from the lower to the higher.

Dialectics holds that internal contradictions are inherent in all things and phenomena of nature, for they all have their negative and positive sides, a past and a future, something dying away and something developing; and that the struggle between these opposites, the struggle between the old and the new, between that which is dying away and that which is being born, between that which is disappearing and that which is developing, constitutes the internal content of the process of development, the internal content of the transformation of quantitative changes into qualitative changes.

The dialectical method therefore holds that the process of development from the lower to the higher takes place not as a harmonious unfolding of phenomena, but as a disclosure of the contradictions inherent in things and phenomena, as a " struggle" of opposite tendencies which operate on the basis of these contradictions.

"In its proper meaning" Lenin says "dialectics is the study of contradiction within the very essence of things."

(Lenin Philosophical Note-books Page 268.)

" Development is the 'struggle' of opposites"

(Lenin collected works P. 801.)

"ही विचाराची विरोधविकासी पद्धति प्रथम निसर्गाच्या उलगड्यासाठीं वापरण्यांत आली व निसर्गाचा उलगडा करून दाखविणाऱ्या विरोधविकासी प्रक्रियेंत ती पुढे परिणत झाली. तिचा निष्कर्ष असा आहे कीं, निसर्ग गतिस्वरूप असून वारंवार नवनवीं रूपें धारण करणें हा त्याचा स्वभाव आहे. निसर्गात उत्पन्न होणारीं नवींनवीं रूपें हाच त्याचा विकास होय. निसर्गांत विकास होणें म्हणजे त्याच्यांत विरोधी क्रियाप्रतिक्रियांचें द्वंद्व उत्पन्न होऊन त्याची परिणति विकसनांत होणेंच होय. या प्रक्रियेचा असा सिद्धांत आहे की, सृष्टींतील कोणत्याही वस्तूचा पृथगात्मतेनें सलग असा विचार करतांच येत नाही. कारण प्रत्येक वस्तु तिच्या सभोंवारच्या परिस्थितीशीं संलग्न असल्यामुळें पृथगात्मतेनें तिचा विचार करणें चुकीचें आहे. ( या तत्त्वांतूनच साम्यवादानें समाज हा विचाराचा आरंभबिंदू ठरवून व्यक्तीस उडवून लावलें. ) कारण कीं, निसर्गांतील वस्तुजात हें एकमेकांशीं संलग्न असून एकमेकांवर अवलंबून असतें.

या प्रक्रियेचा दुसरा सिद्धांत असा आहे कीं, वस्तुजाताचा विचार करतांना तो केवळ या संलग्नतेला व संबंधिततेला धरूनच करावयाचा नसून त्यांची गतिमत्ता, होणारे बदल, त्यांचें विकसन, त्यांचें अस्तित्वांत येणें व विलयास जाणें या सर्वांनाच धरून केला पाहिजे.

या प्रक्रियेचा तिसरा सिद्धांत असा आहे कीं, वस्तुजाताच्या विकसनाचा विचार करतांना 'धाता यथापूर्वमकल्पयत्' या दृष्टिकोनाचा अथवा त्याच त्या वर्तुळांत राहून असें विकसन घडतें या दृष्टिकोनाचा परित्याग केला पाहिजे व विकसनाचा विचार म्हणजे जुन्या गुणधर्मांचा त्याग करून नव्या गुणधर्मांचा अंगीकार कसा करण्यांत येतो व खालच्या अवस्थेंतून वस्तुजात वरच्या अवस्थेंत कसें जातें याचाच विचार होय. ( प्रत्येक वस्तूंत बदल घडणें हा स्वभाव असून हा बदल विकासाचाच द्योतक असतो व प्रत्येक विकास हा विरोधांतूनच उत्पन्न होतो व त्या विरोधांत जुनें नष्ट होऊनच नवें जन्माला येतें असा या प्रक्रियेचा सिद्धांत आहे. )

या प्रक्रियेचा आणखी असा सिद्धांत आहे कीं, निसर्गामध्यें व प्रत्येक वस्तुजातामध्यें अंतर्गत विरोध व क्रियाप्रतिक्रियांचें द्वंद्व सदैव चालू असतें. अस्तित्वाची व नास्तित्वाची बाजू प्रत्येक ठिकाणीं असतेच. भूतकाळ व भविष्यकाळ प्रत्येकाला असावयाचाच. या अंतर्गत संघर्षांत अथवा परस्परविरोधांत जुनें कांहीं तरी मरत असतें व नवें कांहीं तरी जन्माला येत असतें. हा परस्परविरोधाचा, नव्याचा व जुन्याचा, मरूं घातलेल्याचा व जन्माला येणाऱ्याचा, विनष्ट होणाऱ्याचा व विकसन पावणाऱ्याचा संघर्षच विकसनाच्या क्रमाची अंतर्गत अवस्था दिग्दर्शित करतो. संख्याभिन्नतेंतून गुण-संक्रांतींत रूपांतर होण्याचा क्रमही हा अंतर्गत संघर्षच दिग्दर्शित करतो. म्हणून या प्रक्रियेचा असा सिद्धांत आहे कीं, सुसंगत संगती-करणांतून विकास कधींच होत नसून तो विरोधात्मक संघर्षांतूनच होत असतो. म्हणून लेनिन असें म्हणतो कीं, विरोधविकासवादी प्रक्रियेचा खरा अर्थ वस्तूच्या अंतर्गत असलेल्या परस्परविरोधाचा अथवा क्रिया-प्रक्रियांच्या विरोधी द्वंद्वाचा इतिहास होय. किंबहुना परस्परविरोधी द्वंद्वांचा संघर्ष म्हणजेच विकास होय."

## विरोधविकासी प्रक्रिया खरी आहे काय ?

या विरोधविकासवादी प्रक्रियेची ही वास्तविक अवस्था साम्यवाद्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणेंच निरपवाद व विसाव्या शतकांतील विज्ञानाला धरून नाहीं. इतकेंच नव्हे तर ती त्या तत्त्वज्ञाना-प्रमाणेंच हेतुपुरस्सर कृत्रिम घडविलेली असावी असें वाटतें. मार्क्स हा प्रत्येक गोष्टींत विरोधविकास पहावयास सांगतांना भौतिक शास्त्रांस अनुसरून विश्वाच्या मूलतत्त्वाची गतिमत्ता मान्य करतो. विसाव्या शतकांतील विज्ञानानें सृष्टीचें आद्यतत्त्व इलेक्ट्रॉन्स हें ठरविलेलें असून त्यांची प्रचंड गति ही कोणत्याही उपकरणांच्या कक्षेंत येणारी नाहीं. अशा स्थितींत ही गति पहाण्याचें जर कोणतेंच साधन उपलब्ध नाहीं तर तिची विरोधात्मकता व विकसना-त्मकता सिद्ध करावयाचें शास्त्रीय उपकरण अथवा साधन तरी काय? कल्पनातीत वेगानें फिरणाऱ्या विद्युत्कणांच्या अखंड गतिसागराचें

ठराविक वेळांत घडणारें जें आंदोलन त्यांचे संघ म्हणजेच जर जगांतील पदार्थ, तर त्यांत विरोध कशाचा आणि विकास कशाचा? इलेक्ट्रॉन्सचें खरें स्वरूप कळण्याच्या बाबतींत उपकरणांनींच जेथें हात टेकले आहेत तेथें त्यांच्यांतील अंतर्गत विरोध कोण व कसा शोधून काढणार? आजच्या विज्ञानाप्रमाणें पदार्थांच्या वेगवेगळया अस्तित्वाचें अथवा भिन्नतेचें खरें कारण धनकणाभोंवतीं (positive Electrons) अखंड फिरणाऱ्या ऋणकणाच्या (Negative Electrons) संख्येंत आहे. पदार्थांची भिन्नता ही त्यांच्या परमाणूंच्या भिन्न रचनेवर अवलंबून आहे व परमाणूंची ही भिन्नता ऋणकणांच्या संख्येंत आहे. या संख्येंत विरोधविकासाचें कोणतें तत्त्व दाखवितां येईल? प्रत्येक नवी निर्मिति ही केवळ विरोधांतून, पहिली वस्तू मारून निर्माण होते हेंही म्हणणें चुकीचेंच आहे. साखरेचा एक कण, हैड्रोजन, ऑक्सिजन व कार्बन यांच्या कणांनीं बनलेला आहे. त्यांत विरोधविकासाचें तत्त्व अनुस्यूत नाहीं; पण नवी निर्मिति निश्चित झालेली आहे. कारण कार्बन, हैड्रोजन व ऑक्सिजन यांच्या गुणधर्मापेक्षां साखरेच्या कणाचे गुणधर्म निश्चितच वेगळे आहेत. अशा स्थितींत प्रत्येक निर्मितीला वस्तूचा अंतर्गत विरोध व त्यांतून पहिल्या वस्तूचें नष्ट होणें व दुसरी निर्माण होणें हाच एकमात्र नियम लागू पडतो असें नाहीं. विसाव्या शतकांतील विज्ञानाप्रमाणें वस्तूंत कितीही बदल झाले तरी इलेक्ट्रॉन्सचें रूपांतर कधींही होत नाहीं. इतकेंच नव्हे तर सर्व वस्तुजाताचें पुन्हां त्याच्या या गतिस्वरूप विद्युत् परमाणूंत रूपांतर करतां येणें शक्य आहे. याला विकास म्हणतां येईल काय? व विकास म्हणजे मूळ स्थितीवर येणें हें जर असेल तर मूळस्थितीचा नाश करून नवी अवस्था उत्पन्न होणें हें जें विकासाचें लक्षण तें येथें मुळींच लागू पडत नाहीं हें उघडच दिसतें. अशा स्थितींत जग इलेक्ट्रॉन्सचा विकास आहे ही भाषा मुळींच शास्त्रीय ठरणारी नाहीं. तात्पर्य, साम्यवाद्यांचें तत्त्वज्ञान व त्यांची ज्ञानप्रक्रिया या दोन्हींची आजच्या विज्ञानाच्या दृष्टीनेंही विलक्षण अवस्था झालेली आहे. या मिथ्या ज्ञानप्रक्रियेच्या विषयींचा एंजलसचा दंभ तर इतका विलक्षण

आहे कीं, सूर्यचंद्रादिकांनाही त्यानें डॉयलेक्टिक्सच्या साच्यांत बसविण्याचा अट्टहास केलेला आहे! एकोणिसाव्या शतकांतलें विज्ञानाचें स्वरूप पालटल्यामुळें तत्त्वज्ञानाच्या व ज्ञानप्रक्रियेच्या बाबतीतील मार्क्सवादाचा पायाच उघडउघड ढांसळून पडला आहे व या अस्थिर पायावर सामाजिक जीवनाचे जे सिद्धांत साम्यवाद्यांनीं बसविले आहेत ते फारच भीषण असून ते एक प्रकारें अत्याचारांच्या परंपरेचे निर्माते ठरले आहेत. ही ज्ञानप्रक्रिया समाजजीवनाला लावून दाखवितांना मार्क्सवाद्यांनीं समाजजीवनासंबंधीं पुढीलप्रमाणें भयंकर सिद्धांत काढले आहेत:–

1. If there are no isolated phenomena in the world, if all phenomena are interconnected and interdependent, then it is clear that every social system and every social movement in history must be evaluated, not from the standpoint of 'eternal justice' or some other preconceived idea, as is not infrequently done by historians, but from the standpoint of the conditions which gave rise to that system or that social movement and with which they are connected.

Further, if the world is in a state of constant movement and development, if the dying away of the old and the upgrowth of the new is a law of development, then it is clear that there can be no 'immutable' social systems, no 'eternal principles' of private property and exploitation, no 'eternal ideas' of the subjugation of the peasant to the landlord, of the worker to the capitalist.

Further, if the passing of slow quantitative changes into rapid and abrupt qualitative changes is a law of development then it is clear that revolutions made by oppressed classes are a quite natural and inevitable phenomenon.

Hence, the transition from capitalism to socialism and the liberation of the working class from the yoke of capitalism cannot be effected by slow changes, by

reforms, but only by a qualitative change of the capitalist system, by revolution.

Hence in order not to err in policy, one must be a revolutionary, not a reformist.

Hence in order not to err in policy one must pursue an uncompromising proletarian class policy, not a reformist policy of harmony of the interests of the proletariat and the bourgeoisie, not a compromisers' policy of the "growing of capitalism into socialism."

" ज्या अर्थी जगांतील प्रत्येक वस्तुजात हें एकमेकांशीं संबद्ध व परस्परावलंबी आहे त्या अर्थी समाजपद्धतीसंबंधीं अथवा समाजाच्या विशिष्ट आंदोलनासंबंधीं विचार करतांना ती ती विशिष्ट अवस्था समाजांत कोणत्या भौतिक परिस्थितींतून उत्पन्न झालेली आहे व कोणत्या परिस्थितीशीं तो संबद्ध होती हेंच विचारांत घेणें खरें आवश्यक आहे. ज्या अर्थी संपूर्ण जग हें प्रतिक्षणीं नवें स्वरूप धारण करणारें व अखंड गतिमान् आहे व ज्या अर्थी कांहीं तरी मरणें व कांहीं तरी नवेंच जन्माला येणें हाच विकासाचा अर्थ आहे त्या अर्थी शाश्वत तत्त्व व शाश्वत नीतिमूल्यें असूंच शकत नाहींत. ( शाश्वत नीतिमूल्यें हा केवळ मनुष्यजीवनाशीं संबद्ध असा विचार आहे. नीति ही निसर्गांत नसते. ती मनुष्याच्या बुद्धींत असते. ओढ्याचें पाणी मनुष्य प्याला तर ओढा नीतिमान् ठरत नाहीं. पण तहानलेल्या माणसाला एकाद्या दयावंतानें आपल्या भांड्यांतून पाणी नेऊन दिलें तर तें नीतिशास्त्रांत नीतीचें कृत्य समजलें जातें. त्यामुळें सृष्टीचें मूलतत्त्व अथवा जड सृष्टि कितीही गतिमान् असली तरी तिच्यावरून केवळ मानवी जीवनाच्या कक्षेंत येणाऱ्या नीतीसंबंधीं एखादें विधान कसें करतां येईल ? इतकेंच नव्हे तर स्टालिनचा गुरु लेनिन हा स्वत: जीवासंबंधीं व मानवी अंत:करणांतील सुखदु:खसंवेदनांनीं युक्त अशा अस्मितेसंबंधीं विज्ञानाच्या आधारें निश्चित कांहींच सांगतां येत नाहीं असें स्पष्ट म्हणत असतां व अलीकडचा हाल्डेनही हेंच स्पष्टपणें सांगत असतां नीतीच्या केवळ त्या अस्मितेवर आधार-

केल्या शास्त्राच्या बाबतींत असें विधान करणें भ्रामक, चुकीचें व प्रचारकी ठरत नाहीं काय?) ज्या अर्थीं निसर्गांत हळू हळू घडून येणारे संख्येंतील बदल एकदम गुण-संक्रांति घडवून आणीत असल्याचा निसर्गाचाच नियम आढळतो, त्या अर्थीं पिळल्या जाणाऱ्या वर्गानें केलेल्या क्रांत्या ह्या अत्यंत स्वाभाविक व कधींही न टाळतां येणाऱ्याच असतात. म्हणून भांडवलशाहींतून समाजसत्तेच्या अवस्थेंत येणें व भांडवलशाहीच्या जोखडांतून श्रमजीवी वर्गाची मुक्तता करणें ही गोष्ट मंद गतीनें घडून येणाऱ्या शांततात्मक परिणामांच्या आंदोलनांनीं अथवा सुधारणांनीं घडून येणारी नसून ती गोष्ट केवळ क्रांतीनें साधणारी आहे. म्हणून आपण कधींही सुधारणावादी न राहतां नेहमीं क्रांतिकारकच राहिलें पाहिजे. (म्हणजे सुधारणा व विकसन शांततेच्या मार्गानें कधींच न घडवितां केवळ नि:पात, रक्तपात व अत्याचारांच्याच मार्गाचा अवलंब केला पाहिजे.) म्हणून आपल्या पक्षाचें धोरण नेहमीं कोणाशींही सलोखा न करण्याचेंच राहिलें पाहिजे व मध्यमवर्गीय आणि श्रमजीवी यांच्यांत सहिष्णु संवादिता निर्माण करण्याचें आपण नाकारून सतत क्रांतीचाच पाठपुरावा केला पाहिजे."

साम्यवाद्यांच्या अत्याचारी प्रवृत्तीचें मूळ त्यांच्या गुरूच्या या अखंड क्रांतीच्या घोषणेंत आहे. खोट्या ज्ञानावर व मिथ्या ज्ञानप्रक्रियेवर ही क्रांतीची परिभाषा कशी आधारलेली आहे हें आपण आतांपर्यंत पाहिलें. विरोधाशिवाय जर विकास नाहीं तर शासनसंस्थाविरहित अवस्था निर्माण करणें हें जें साम्यवादाचें अंतिम ध्येय तें निर्माण व्हावयास मात्र अशा विरोधाची कोणतीही पायरी साम्यवाद मानीत नाहीं हें कसें? सारांश, साम्यवादाचा विचाराचा आरंभबिंदूच चुकलेला आहे. अस्मिता अथवा स्वत:च्या अहंकाराची जाणीव ही माणसाची मूलभूत प्रवृत्ति असून त्याचें स्वत:वरील प्रेम हेंच मूलभूत असतें. हें आजचे मानसशास्त्रज्ञही मान्य करतात. म्हणून कोणत्याही विचाराचा, आंदोलनाचा व क्रियेचा खरा आरंभबिंदु समाज नसून व्यक्ति हाच असतो. साम्यवाद्यांनीं ही गोष्ट लक्षांत न घेतल्यामुळें अनेक बंधनांनीं बांधून

व्यक्तीचें व्यक्तित्व त्यांनीं मारून टाकावयाचा प्रयत्न चालविला आहे. साम्यवादाची राज्यघटना किती जुलमी व अत्याचारी आहे व रशियन नागरिकाला चोवीस तास घराबाहेर पडण्याचें अथवा एखाद्याशीं बोलण्याचेंही कसें स्वातंत्र्य नाहीं हें आपण मागल्या व्याख्यानांत पाहिलें. व्यक्तीची ही इतकी गळचेपी ज्या ध्येया-प्रीत्यर्थ आहे तें शासनसंस्थाविरहित अवस्था निर्माण करण्याचें ध्येय केवळ पंधरा वर्षांत प्रत्यक्षांत येईल असें युवक संघटनेसमोर बोलतांना लेनिन म्हणाला होता व १९३५ सालीं स्टालिननेंही रशियांत एकवर्गात्मक समाजरचना उत्पन्न झाली आहे असें घोषित केलें होतें. लेनिनचें पंधरा वर्षांचें स्वप्न खोटें ठरलें व जर स्टालिन म्हणतो हें खरें असेल तर रशियांत साम्यवादाच्या विरोधी सिद्धांत काढणाऱ्या शास्त्रज्ञांना गोळ्या घालून ठार मारणें, पक्षशुद्धी-करणाच्या नांवाखालीं आपल्याच सहकाऱ्यांची घोर कत्तल करणें व कोणाशीं बोलण्यास सुद्धां रशियन नागरिकांना बंदी करणें याचीं कारणें तरी काय ? अमेरिकेचे अध्यक्ष ट्रूमन यांनीं " आम्ही तुमचीं दुःखें जाणतों. तुम्हांला बोलतां येत नाहीं हेंच खरें " असें जें रशियन नागरिकांना उद्देशून म्हटलें तें अक्षरशः खरें आहे. साम्यवाद्यांचा ध्येयवाद हा प्रत्यक्षांत रशियांत तरी जीवन करपवून टाकणाऱ्या घोर हुकुमशाहींत पर्यवसित झाला असून जग साम्यवादाच्या पंखाखालीं गेलें तर मानवता करपवून टाकणाऱ्या हुकुमशाहींत तो पर्यवसित होईल हेंच आज स्पष्ट दिसतें. याचें कारण मुळांत मनुष्यांत बदल पडल्यावांचून आदर्श स्वरूपाची "एकमेकां साह्य करूं अवघे धरूं सुपंथ" अशी प्रवृत्ति कधींही निर्माण होत नाहीं. उत्पादन-साधनें व्यक्तीच्या मालकीचीं असलीं तर तीं जशीं अनेकांचें शोषण करणारीं ठरतात तशींच तीं राज्ययंत्राच्या मालकीचीं असलीं तर तें राज्ययंत्र शोषक ठरल्याविना रहात नाहीं. व्यक्ति जोंवर पशुत्वाच्या प्रवृत्तींनीं युक्त आहे व जोंवर ते पशुत्वाचे संस्कार तिच्या अंतःकरणांतून नष्ट करण्याचा कोणताही प्रयत्न होत नाहीं, तोंवर नुसत्या योजना व घोषणा यांच्या गर्जितांनीं मानवतेला सुखी करतां येणें शक्य नाहीं. मग व्यक्तिस्वातंत्र्यवादी

लोकशाही तशी हमी घेवो, अथवा साम्यवाद तशी हमी घेवो, तीं केवळ वृथा गर्जितेंच ठरणार!

साम्यवादाचें असें म्हणणें आहे कीं, भांडवलशाही पूर्ण नष्ट केली व उत्पादन-साधनें समाजाच्या हातीं दिलीं कीं सामाजिक नीतिमत्ता आपोआप सुधारेल. पण सुधारणा म्हणजे तरी काय? इंद्रियांच्या स्वाभाविक उपभोगप्रधान प्रवृत्तींना अंतःस्फर्तीनें संयमाचा अडसर घालणें म्हणजे सुधारणा व तसा तो नसणें म्हणजे पशुत्व. इतिहासाचा उलगडा करतांना व मानवी जीवनाचाही उलगडा करतांना शेवटचा सिद्धांत म्हणून साम्यवादी असें सांगतात कीं, आमच्या पद्धतीनें सर्व लोकांना भरपूर खायला प्यायला मिळालें व त्यांच्या वासना तृप्त होण्याची सोय झाली म्हणजे अन्याय करण्याची प्रवृत्ति नष्ट होईल व ती आहे तोंवरच राज्ययंत्राची आवश्यकता असल्यामुळें ती प्रवृत्ति नष्ट झाली कीं, राज्ययंत्र समाजाच्या त्या विकसित अवस्थेंत विलीन होईल. पण मानवी मनांत आणखी एक प्रवृत्ति असते व ती म्हणजे सत्ताप्रस्थापनाची प्रवृत्ति होय. ही वर्चस्व गाजविण्याची प्रवृत्ति मानवसमाजांतून नष्ट करावयास मन हें स्वतंत्र तत्त्व आहे हें मान्य करणें, त्याच्यावर संस्कार करणें व जगाविषयीं सहानुभूतीचा दृष्टिकोन त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न करणें आवश्यक आहे; पण त्यासाठीं जीवन हें स्वतंत्र तत्त्व आहे, आणि मन हेंही स्वतंत्र तत्त्व आहे हें तत्त्वज्ञानांत मानण्याची आवश्यकता असते. पण ती गोष्ट साम्यवादी तत्त्वज्ञानांत मानली जात नाहीं. अशा स्थितींत ही शासनसंस्था-विरहिततेची कल्पना निव्वळ मृगजळ ठरते. खास साम्यवादी-राज्यकर्ते अथवा हुकूमशहा हे स्वतःसुद्धां आपल्या अखंड सत्तेसाठीं शोषक बनणार नाहींत कशावरून? कारण व्यक्तित्वावर संस्कार करण्याची सोय त्यांच्या दृष्टिकोनांत कोठेंच नाहीं. अशा स्थितींत इस्लामच्या स्वर्गाप्रमाणें साम्यवादाचें अंतिम ध्येय हें केवळ कल्पनाजाल ठरून प्रत्यक्षांत जीवन खुरटवून टाकणाऱ्या हुकूमशाहींतच त्याची परिणति घडून येते.

आपण साम्यवाद्यांचें तत्त्वज्ञान व त्यांची ज्ञानप्रक्रिया ही अविज्ञाननिष्ठ कशी आहे हें थोडक्यांत पाहिलें आहे. हें त्यांनाही कळत नाहीं असें नाहीं. पण त्यांना साऱ्या जगांत जी क्रांति घडवावयाची आहे तिला तत्त्वज्ञानाच्या बैठकीची आवश्यकता असल्यामुळें त्यांनीं हें कृत्रिम तत्त्वज्ञान बुद्ध्या उत्पन्न केलेलें आहे असें जर कोणी म्हटलें तर तें चुकीचें ठरणार नाहीं. त्यांचा दृष्टिकोन चुकीचा असून जगांत विरोधावांचूनही केवळ संगतीनें व मिश्रणानें नवी निर्मिति होऊं शकतें, असें आजचें विज्ञानच म्हणतें. त्यामुळें क्रांति ही वारंवार केलीच पाहिजे व क्रांति हाच धर्म आहे हा त्यांचा उद्घोष चुकीचाच ठरतो. चुकीच्या दृष्टिकोनांतून, पण तोच बरोबर आहे असें म्हणून एकसारखे अत्याचार व रक्तपाताचें थैमान ते जगांत घालणार व जी एकवर्गात्मक सत्ता रशियांत साम्यवादी हुकुमशाही प्रस्थापित होऊनही कधींच अस्तित्वांत आली नाहीं ती सुखी समाजाची कल्पना या रक्तपाताचें समर्थन म्हणून पुढें मांडणार हें उघड आहे ! ही क्रांति प्रत्येक देशांत करावयाची म्हणजे द्वेषभावना, अत्याचारी प्रवृत्ति व भोगवासना यांना प्रदीप्त करीत जाणें हाच व्यवहार त्यांना पत्करावा लागणार व तसा तो त्यांनीं पत्करलेलाही आहे. पशुत्वाच्या सर्व प्रदीप्त वासनांना त्यांनीं शास्त्र पुरविलें व सर्व प्रकारच्या पतनाला त्यांनीं समर्थन दिलें ! एका दृष्टीनें भांडवलशाहींत व्यक्तित्वाचा जो अधःपात नाहीं तो साम्यवादामध्यें आहे. भांडवलशाहींत पाप करतांना मनाची खंत तरी वाटण्याचा संभव आहे; पण साम्यवादांत पतनाच्या बाबतींत शास्त्रीय समर्थनाचा पुरवठा करण्यांत आल्यामुळें त्या बाबतींतील संकोच सुद्धां नष्ट करण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. अतिशय सौम्यपणें बोलावयाचें झालें तर साम्यवाद उत्तम पशु निर्माण करील, दुसरें कांहींही नाहीं. साम्यवादाच्या बाबतींत मला असें म्हणावयाचें आहे कीं,

(१) साम्यवादाचें तत्त्वज्ञान व प्रक्रिया या अशास्त्रीय असल्यामुळें त्यांचा मानवी जीवनाचा उलगडा हा अशास्त्रीय ठरलेला आहे. आपल्या तत्त्वज्ञानाची ही लंगडी बाजू लेनिनला पूर्णपणें माहीत

असल्यामुळें त्यानें आपल्या अनुयायांना असें सांगितलें कीं, तत्त्वज्ञानावर भर न देतां प्रचारांत केवळ आर्थिक कार्यक्रमावर भर द्या. पण आर्थिक कार्यक्रम तत्त्वज्ञानांतूनच निघतो म्हणून तर साम्यवादालाही, कृत्रिम कां होईना, पण तत्त्वज्ञान उभारावें लागलें आहे. मार्क्सच्या आर्थिक कार्यक्रमासंबंधीं तर प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञांनीं प्रतिकूल अभिप्रायच व्यक्त केले आहेत. जगप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ कीन्स यानें 'कॅपिटॉल'वर अभिप्राय देतांना असें म्हटलें आहे कीं, "तें एक अर्थशास्त्रावरील जुनाट झालेलें पुस्तक आहे. शास्त्रीय दृष्टचा तर तें सदोष आहेच पण आधुनिक दृष्टचादेखील तें अत्यंत माघारलेलें आहे."

(२) नुसत्या साम्यवादी हुकुमशाहीनें वर्गहीन समाजरचना उत्पन्न होऊ शकत नाहीं याचा रशिया हाच प्रत्यक्ष पुरावा आहे.

(३) खोटें तत्त्वज्ञान जगावर लादण्यासाठीं, काल्पनिक सुखाची केवळ हमी घेऊन प्रत्येक देशांत उत्पात करणारे व क्रांतीच्या नांवाखालीं मानवतेचा खाटिकखाना चालविणारे म्हणूनच साम्यवादी या तत्त्वज्ञानांतून परिणत होत आहेत.

(४) साम्यवादानें अनिर्बंध वासनापूर्तीच्या आगीची वाढ केली असून पतनाला शास्त्र पुरविलें आहे.

(५) व्यक्ति-जीवनाचा, मनुष्य काय आहे याचा कोणताही विचार न करतां अत्याचारानें व्यक्तीच्या विकासाच्या वाटा बंद करून तिला खोटी जीवनदृष्टि देण्याचा प्रयत्न चालविलेला आहे.

(६) यामुळें साम्यवाद मानवतेच्या कल्याणाचा न ठरतां तिचा शत्रु म्हणून यापुढचें जग पददलित करावयास सतत प्रवृत्त होत राहणार हें उघड आहे. एका काळीं लेनिनच्या खांद्याला खांदा लावून काम करणाऱ्या साम्यवादी क्रांतिकारकांना साम्यवादांतील या दोषांची पूर्णपणें जाणीव होऊं लागली असून जगांत शांतता, सुख व मांगल्य नांदावयास व्यक्तीचा व तिच्या विकासाचा स्वतंत्र विचार करण्याची आवश्यकता वाटूं लागलेली आहे. लेनिन-

बरोबर रशियाच्या क्रांतींत प्रत्यक्ष भाग घेणारे कॉ. मानवेंद्रनाथ रॉय यांनीं आपल्या दि रॅडिकल ह्युमॅनिस्ट या पत्रांत यासंबंधीं जे उद्‌गार काढले आहेत ते या दृष्टीनें विचारांत घेण्यासारखे आहेत. रॉय म्हणतात:

But in practice, communism has turned out to be entirely different. Instead of promoting freedom, its destruction is postulated as the condition of greater. freedom in an indefinite future. This negative achievement is justified by ridiculing the concept of individual freedom as an empty abstraction. As a Utopian plan of social reconstruction, communism had a powerful moral appeal, which is the main sanction of its propaganda even to day. But communism is much more than a plausible plan of social organisation. It is a rounded-up system of philosophy. Its plan of social reconstruction is deduced from a rigidly determinist view of history that development of the forces of production is the lever of human progress—social, intellectual, cultural. This philosophy of history eveidently leads to a denial of the idea of freedom, not only freedom of the individual, but freedom as such. The materialist metaphysics of Communism frees man from the religious teleological view of life but it forges a new chain for him; the secular teleology of economic determinism".

या उताऱ्यांत रॉय यांनीं मानवी प्रगतीकडे दुर्लक्ष करणारे, स्वातंत्र्याची गळचेपी करणारे व एका भयानक पारतंत्र्यांत वा जोखडांत मानवतेला बांधूं इच्छिणारे म्हणून जी साम्यवाद्यांची बोळवण केली आहे ती यथायोग्य आहे. एक प्रकारें अप्रागतिक रूढिवादीपणा त्यांच्यांत आलेला असल्यामुळें प्रतिक्रांतिवादाचीं बीजें त्यांच्यांत उत्पन्न झालेलीं असून अत्याचार हा त्यांचा धर्म झालेला आहे. त्यांना जर कोणी असुर म्हटलें तर त्याचें त्यांना व दुसऱ्या कोणालाही वाईट वाटावयास नको. गीतेंतील आसुरी प्रवृत्तीचें वर्णन करतांना भगवान् श्रीकृष्ण म्हणतात :—

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ।। ७
असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनिरीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ।। ८
एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।
प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ।। ९
काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।
मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः १०
चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ।। ११
आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसञ्चयान् ।। १२
इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ।। १३
असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ।। १४
आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ।। १५
अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ।। १६

—गीता अ. १६

"प्रवृत्ति म्हणजे काय करावें व निवृत्ति म्हणजे काय करूं नये हें आसुरी लोकांना कळत नसतें. शुचिर्भूतपणा, आचार व सत्य, हीं त्यांच्या गांवींही नसतात. सर्व जग अशाश्वत, निराधार अनीश्वर, व एकमेकांपासून न झालेलें असें ते मानतात. विषयोपभोगाशिवाय जगाचा दुसरा कोणताही हेतु ते समजत नाहींत. अशा प्रकारची दृष्टि स्वीकारून हे अल्पबुद्धीचे नष्टात्मे व दुष्ट लोक क्रूर कर्में आचरीत जगाचा क्षय करण्यास प्रवृत्त होतात. कधींच पुऱ्या न होणाऱ्या विषयाच्या उपभोगाच्या इच्छेचा आश्रय करून

दंभ, मान व मद यांनीं व्यापिलेले हे असुर मोहानें भलभलत्या कल्पना मनांत धरून घाणेरडी कामें करण्यास प्रवृत्त होत असतात. कामोपभोगांत गढून गेलेले आमरणान्त सुखोपभोगाच्या अगणित चिंतेनें ग्रासलेले, आणि तेंच काय तें सर्वस्व असें निश्चयानें मानणारे, शेंकडो आशापाशांनीं बद्ध झालेले हे कामक्रोधपरायण असुर सुखोपभोगार्थ अन्यायानें पुष्कळ अर्थसंचय करण्याची हांव बाळगीत असतात. मी आज हें मिळविलें, उद्यां तो मनोरथ प्राप्त करून घेईन, आज हें माझ्याजवळ आहे, उद्यां तेंही माझें होईल, आज हा शत्रु मी मारला, उद्यां तोही मारीन, मीच उपभोग घेणारा, माझ्यासारखा बलाढ्य आहे कोण? याप्रमाणें अज्ञानानें मोह पावलेले व विषयोपभोगांत आसक्त झालेले हे आसुरी लोक कमालीचे अधःपतित होतात."

मग साम्यवाद लोकप्रिय कां वाटतो? याचें कारण भांडवलशाहीनें जीवनाच्या आवश्यक गरजांपासून मानवतेला वंचित करून तिची जी घोर पिळवणूक चालविलेली आहे तिच्यांत व पशुवृत्तीला साम्यवादानें जी प्रेरणा दिलेली आहे तिच्यांत दडलेलें आहे. इराणचा पंतप्रधान मुसादिक याला एकदां कम्युनिझम्च्या वाढीचें कारण व त्या वाढीला पायबंद घालण्याचा उपाय एका शब्दांत विचारला असतां त्यानें 'अन्न' या एका शब्दांत उत्तर दिलें व तेंच खरें आहे. असो.

साम्यवाच्या खंडनपर म्हणून मला स्वतंत्र विवेचन करावयाचें नाहीं. मानवतेच्या सुखाचा व कल्याणाचा मार्ग विसाव्या शतकांतील साम्यवाद व जागतिक लोकतंत्रवाद हे दोन्ही प्रवाह दाखवूं शकत नाहींत एवढेंच मला म्हणावयाचें आहे. हे दोन्ही जडवादी प्रवाह आहेत. त्यांनीं साऱ्या जगाचा विचार केला असला तरी मनुष्याचा मुळींच विचार केला नाहीं. त्यामुळें लोकशाहीला व्यक्तिस्वातंत्र्य म्हणतांना व्यक्तीची पशुता नष्ट करण्याचा उपाय सांपडला नाहीं व साम्यवादालाही केवळ पशुतेच्या पुरस्काराशिवाय दुसरें कांहीं सुचूं शकलें नाहीं. भौतिक संस्कृतीचा हा खरा परिणाम

आहे. ती पशुता नष्ट करूं शकत नाहीं उलट ती किती भयानक आपत्ति मानवतेवर ओढवूं शकते याचीं गेलीं दोन महायुद्धें हीं उदाहरणेंच होत. पशुतेच्या सेवेला आजचें शास्त्र-विज्ञान जुंपलेलें आहे व त्यामुळें मानवतेचें बलिदान घडत आहे. दिनांक २० एप्रिल १९५२ च्या केसरींत या बलिदानाचें कारुण्यपूर्ण चित्र रंगविणारा एक प्रकार वर्णिला आहे. तोच मी येथें उद्धृत करतों.

"नव्या शोधांतला अगदीं अलीकडचा शोध अणुबॉम्बचा होय. वास्तविक अणूचा शोध हा मानवी दुःखाऐवजीं सुखांत अपरिमित भर घालूं शकेल असें पुष्कळ शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. परंतु राजकारणाच्या रथाला जुंपलेले संशोधक अणूच्या संहारशक्तीचीच तेवढी वाढ करण्याच्या मागें आहेत. हिरोशिमा व नागासाकी या दोन शहरांत अणुबॉम्ब पडतांच जपानी युद्ध क्षणांत संपलें. परंतु तें युद्ध संपलें तरी जगांतील युद्धें कायमचीं बंद पडण्याऐवजीं तो शोध हस्तगत करून जगताचें जेतृत्व मिळविण्याची आसुरी लालसा विजयी झालेल्या राष्ट्रांत चेतविली गेली. जर्मनी, जपान व इटाली यांचा बीमोड करून जगांत शांतता प्रस्थापित करावयास निघालेले सहकारी देश एकमेकांच्याच नरडीचा घोट कसा घेतां येईल याकरितां या नव्या शोधांची आराधना करूं लागले, व त्या कामीं जिंकलेल्या देशांना आपआपल्या बाजूला ओढूं लागले. कारण हा बॉम्ब अमेरिकेनें प्रथम उपयोगांत आणला असला तरी अणूच्या पृथक्करणाचा व त्यायोगें मुक्त होणाऱ्या अपरिमित संहारक शक्तीचा शोध जर्मन संशोधकांनींच आधीं लावला होता. परंतु अखेर युद्धांत त्यांच्या झालेल्या पाडावाच्या धामधुमींत तें अस्त्र त्यांना पूर्णावस्थेस नेतां आलें नाहीं. अमेरिकन भूमीवर युद्ध चालू नसल्यानें अमेरिकेनें मात्र तें कसेंबसें पुरें केलें व त्याचा उपयोग जपानवर केला. त्यामुळें उपरिनिर्दिष्ट दोन्ही शहरांची संपूर्ण राखरांगोळी झाली. व त्यांतून तेथले जे रहिवासी जिवंत राहिले त्यांच्यावर विलक्षण व दीर्घकालीन शारीरिक व मानसिक परिणाम झाले असें म्हणतात. पण ते सगळे अजून उघड झालेले नाहींत. थोडक्यांत म्हणजे 'जिवंत असूनही मेले' अशी त्यांची

स्थिति झाली येवढें खरें. आणि तरी जपानवर टाकलेले बॉम्ब हे अगदीं ओबडधोबड व अपूर्णावस्थेंतले होते. आतां त्या बॉम्बचे अनेक कलापूर्ण नमुने पूर्ण होऊन शिवाय हैड्रोजनबॉम्ब ही त्याच्या पुढची आवृत्ति तयार झाली आहे असें वृत्त आहे. पण प्रश्न पडतो तो हा कीं, कोणतेंही महायुद्ध अजून सुरू झालेलें नाहीं. अशा वेळीं या अतीव हिंसक अस्त्रांच्या मारक शक्तीची गुप्त रीतीनें प्रतीति तरी कोठें पहावयाची? "कुठें आतां दावी प्रखरनखलीला मृगपति ?' अशी स्थिति या अस्त्रांच्या उत्पादकांची झाली आहे. त्यांतून अमेरिका हा विशाल देश असल्यानें त्याला आपल्याच देशांत अशा प्रयोगाला जागा उपलब्ध होऊं शकते. परंतु इंग्लंडला या प्रयोगासाठीं ऑस्ट्रेलियांत सोय करून ठेवावी लागली होती असें समजतें. कारण हें अजस्र ब्रह्मास्त्र उलटलें तर तें एखादे वेळीं सबंध इंग्लंड देशाचाच बळी घ्यावयाचें! कोरियांत यू.नो.च्या सैन्यानें नुकतेच जंतु बाँब टाकले अशी बोलवा आहे. डांस, माशा, प्लेग–जंतु वगैरे शत्रुप्रदेशांत टाकून अखिल जनता रोगग्रस्त करून नष्ट करण्याच्या या अघोरी उपायाच्या नीतीबद्दल वाद चालू असतांच त्यापुढचें अस्त्र शोधून काढण्यांत आलें आहे. त्याचें नांव नापाम बाँब. त्याच्या अत्यंत भयानक परिणामाच्या बातम्या आतां रोज येत आहेत. ब्रिटिश नभोवाणीचा कोरियांतील बातमीदार कटवर्थ यानें पुढील हकीकत स्वतः पाहिलेली म्हणून कळविली आहे:–

आमच्या डोळ्यांसमोर एक विचित्र आकृति उभी होती. ती थोडी वाकलेली, गुडघ्यांत पाय फांकलेली, व हात अंगाला स्पर्श न करतील अशा रीतीनें लोंबत असलेली अशा प्रकारची होती. त्या आकृतीला डोळे नव्हते. अंगापासून सर्वत्र जळलेल्या लक्तऱ्या लोंबत होत्या व अंगावर कठिण आणि काळा असा पापुद्रा व त्यांतून ठिकठिकाणीं पिवळा पू डोकावत होता. त्याच्याजवळ उभी असलेली स्त्री सांगत होती कीं, त्याला बसतां अगर आडवें होतां येत नाहीं. उभे राहण्याशिवाय त्याला गत्यंतर नाहीं. याचें कारण त्याच्या अंगावर कातडें नसून सहज चुरला जाणारा पापुद्रा तेवढा आहे. मरणाची वाट उभे राहून पाहणारी

अशी ही आकृति नापामबाँब या नव्या अस्त्राचा अपूर्व बळी होय! आसन्नमरण झालेला कोणताही मनुष्येतर प्राणी देखील आडवा पडलेला असतो. कारण शक्तिपातानें होणारी ती त्याची स्वाभाविक अवस्था होय. मग तें मरण रोगानें, अपघातानें, वा शस्त्रांनीं येणारें असो; परंतु मृत्यूला कवटाळतांना आडवें पडूं देण्याइतकी देखील सवलत न देणारा असा हा अभूतपूर्व मारणप्रकार आधुनिक शास्त्रसंशोधकांनीं सैनिकांना उपलब्ध करून दिला आहे."

( श्री. के. वि. गोडबोले यांचा लेख ).

भौतिक संस्कृति यापेक्षांही दारुण दृश्यें उत्पन्न करील. याचें कारण तिला सर्व कांहीं उत्पन्न करतां आलें तरी जगाविषयीं खरा आत्मीयतेचा दृष्टिकोन उत्पन्न करतां आला नाहीं. मानवांमानवांत सहानुकंपा उत्पन्न करतां आली नाहीं व खरें म्हणजे पशूंतून मनुष्यच तिला उत्पन्न करतां आला नाहीं. उलट तिनें मनुष्याचेंच पशूंत रूपांतर केलें व त्याचींच हीं घोर फळें आहेत. यांतून मानवतेची कोणी सुटका करूं शकेल काय? विश्वाविषयींचा खरा आत्मीयतेचा व सहानुकंपेचा दृष्टिकोन कोणी उत्पन्न करूं शकेल काय? मनुष्यामनुष्यांत खरी आत्मीयता कोणी उत्पन्न करूं शकेल काय? असें कोणी उत्पन्न करूं शकेल तरच विनाशापासून मानवतेची सुटका होण्याची शक्यता आहे. असा दृष्टिकोन कोण उत्पन्न करूं शकेल? "भगवान् श्रीकृष्ण व त्यांचें गीतोपदिष्ट तत्त्वज्ञान" असें माझें या प्रश्नांना उत्तर आहे. कसें तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

---

"कलियुगांत बडे बडे वेदान्ती पुष्कळच असतात. प्रत्यक्ष मुक्ति-साधनाच्या बाबतींत मुळींच सावधपणा न बाळगतां लोकसंख्येंत भर टाकणाऱ्या आपल्या सांसारिक कार्यक्रमांच्या बाबतींत मात्र ते सदैव दक्ष असतात. त्यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या वटवटीला हुताशनि पौर्णिमेच्या दिवशीच्या मुलांच्या गोंगाटापलीकडे अधिक कांहीं अर्थ नाहीं." तत्त्वज्ञानी पुरुष म्हटला कीं, तो कमालीचा संयमी, सर्व इंद्रियविकारांवर विजय मिळविलेला व शोकामोहा-तीतच असला पाहिजे असा येथील संकेत असून तो तसा नसेल तर त्याला येथें शून्य किंमत आहे. वर विशुद्ध तत्त्वज्ञान सांगून शेवटीं जिव्हालौल्याला बळी पडणारा एखादा कांट हा भारत-वर्षाचा आदर्श असूं शकत नाहीं. अथवा तोंडानें विश्वबंधुत्वाच्या गप्पा मारून मानवतेचा खाटिकखाना उघडणारा एकादा महत्त्वा-कांक्षी व सत्ताभिलाषी स्टॅलिन हा भारतवर्षाचा द्रष्टाही असूं शकत नाहीं. तत्त्वज्ञानाचे सिद्धांत बुद्धींत उतरल्यावर मनांत बिंबून, हृदयांत ठसून व हाडामांसांत खिळले जाऊन शरीराच्या कणांकणांतून एकच परब्रह्म सर्व प्राणिमात्रांत भरलें आहे अशा प्रकारचा परमेश्वरी स्वरूपाचा साक्षात् आविष्कार होण्यास व त्याच भावनेनें दुःखाचे आणि विपत्तींचे डोंगर डोक्यावर सतत कोसळत असतां देखील सर्वांशीं समतेनें वागण्याचा अचल देह-स्वभाव बनण्यास अनेक पिढ्यांच्या संस्कारांची, इंद्रियनिग्रहाची, दीर्घोद्योगाची व ध्यान, उपासना इत्यादि अनेक साधनें यांची आवश्यकता लागते. यावांचूनचें कोरडें तत्त्वज्ञान फुकट होय. म्हणून या सर्वांच्या साह्यानें 'सर्वभूतीं एक आत्मा' हें तत्त्व संकट-समयीं देखील ज्याच्या प्रत्येक कृतींत साहजिकरीत्या स्पष्ट प्रत्ययास येऊं लागलें त्याच्या ठिकाणींच ब्रह्मज्ञानाचा खरा परिपाक झाला आणि तोच खरा मुक्त झाला असा गीताकारांचा स्पष्ट अभिप्राय आहे. नुसत्या वटवटीला व पोकळ घोषणांना त्यांच्या मतें शून्य किंमत आहे. गीताकार म्हणतात :

**"विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ।।** अ. ५-१८

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद् ब्रह्मणि ते स्थिताः ॥** अ. ५–१९
**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥** अ. ६–२०
**सुखमात्यंतिकं यत्तद् बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥** अ. ६–२१
**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥** अ. ६–२२

"जे पंडित म्हणजे ज्ञानी झाले त्यांची दृष्टि विद्याविनययुक्त ब्राह्मण, गाय, हत्ती तसेंच कुत्रा आणि चाण्डाल या सर्वांच्या ठायीं समान असते. याप्रमाणें ज्यांचें मन साम्यावस्थेंत स्थिर झालें ते तेथल्या तेथेंच म्हणजे मरणाची वाट न पाहतां मृत्युलोक जिंकतात. कारण ब्रह्म हें निर्दोष व सम आहे. म्हणून साम्यबुद्धीचे हे पुरुष नेहमीं ब्रह्माच्या ठायीं स्थित म्हणजे येथल्या येथेंच ब्रह्मभूत झालेले असतात. योगानुष्ठानानें निरोध होऊन चित्त ज्या ठिकाणीं रममाण होतें आणि जेथें आपण आत्म्याला पाहून आत्म्यांतच संतुष्ट होऊन राहतों, जेथें केवळ बुद्धिगम्य व इंद्रियांना अगोचर असें जें अत्यंत सुख त्याचा त्याला अनुभव घडतो, आणि जेथें तो एकदां स्थिरावला म्हणजे तत्त्वांपासून केव्हांही ढळत नाहीं, तसेंच जी स्थिति प्राप्त झाली म्हणजे त्यापेक्षां दुसरा कोणताही लाभ त्यास अधिक वाटत नाहीं आणि जेथें स्थिरावला म्हणजे कितीही मोठें दुःख असलें तरी तें त्याला तेथून चाळूं शकत नाहीं, इतकेंच नव्हे तर पुढें भगवान् म्हणतात :

**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसः ।** गीता अ. ६–२३

"त्याला दुःखाच्या स्पर्शापासून वियोग म्हणजे योग नांवाची स्थिति समजतात आणि हा योग मन कंटाळूं न देतां निश्चयानें आचरिला पाहिजे." हें आचरण ज्या पुरुषांत दिसून येत नाहीं त्याचें मडकें त्या मानानें कच्चेंच आहे. ब्रह्मज्ञानाग्नींत अद्याप तें

पूर्ण भाजून निघालें नाहीं, हें नामदेवाच्या डोक्यावर थापटणें मारून संतमंडळींत गोरोबा कुंभारानें सिद्ध केलें होतें ही गोष्ट प्रसिद्धच आहे. म्हणून गीतेंत ज्ञानाचें लक्षण करतांना तें असें केलें आहे कीं :

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ।। अ. १३–७**
**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ।। अ. १३–८**
**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ।। अ. १३–९**
**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ।। अ. १३–११**

"मान नसणें, दंभ नसणें, अहिंसा, क्षमा, सरळपणा, गुरुसेवा, शुचिर्भूतपणा, स्थैर्य, मनोनिग्रह, इंद्रियांच्या विषयाविषयीं विरक्ति अहंकार नसणें, जन्म, मृत्यू, जरा, व्याधि, व दुःख हे दोष आहेत असें समजणें, कर्माच्या ठिकाणीं अनासक्ति, बायका, मुलें, घर व प्रपंच यांत लंपट न होणें, इष्ट किंवा अनिष्ट प्राप्त झालें तरी चित्ताची समता कधींही न ढळणें, अध्यात्मज्ञान नित्य आहे अशी बुद्धि होणें, व तत्त्वज्ञानाच्या सिद्धांतांचें नित्य परिशीलन याला ज्ञान असें म्हणतात. बाकी सारें अज्ञान होय." ज्ञानी पुरुषाचीं हीं खरीं बाह्य लक्षणें होत. ज्ञानानें बुद्धि आत्मानात्मविचारांत स्थिर होऊन ज्याच्या मनाला सर्व भूतात्मैक्याची ओळख पटली त्या पुरुषाची वासनात्मक बुद्धीही शुद्धच असते. परंतु कोणाची बुद्धि कशी आहे हें समजण्यास त्याच्या प्रत्यक्ष व्यवहाराशिवाय व आचरणाशिवाय दुसरें कोणतेंच साधन नसल्यामुळें ज्ञान किंवा समबुद्धि या शब्दांतच शुद्ध बुद्धि, शुद्ध वासना आणि शुद्ध आचरण यांचा समावेश होतो. जो अंतर्बाह्य शुद्ध झाला तोच खरा आत्मनिष्ठ; व त्यालाच मुक्ति मिळते. नुसत्या पण्डिताला नाहीं. सर्व उपनिषदांचें गीता हें सार आहे व उपनिषदांत असें स्पष्ट

सांगितलें आहे कीं, "नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन" आत्मा व्याख्यानांनीं, बुद्धिमत्तेनें, व निव्वळ बहुश्रुतपणानें मिळत नाहीं. या अवस्थेलाच ब्राह्मी स्थिति असें म्हणतात. ही स्थिति प्राप्त होणें हें जीवनाचें परमसाध्य आहे. विश्वबंधुत्ववादांत सुद्धां एक प्रकारचा परकेपणा आहे. तोहि या विश्वात्मवादांत नाहीं. माझें माझ्या स्वतःवर जितकें प्रेम असतें तितकें तें दुसऱ्या कोणावरहि असू शकत नाहीं. बृहदारण्यक उपनिषदांत असें सांगितलें आहे कीं,

**न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवति, आत्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति। नवा अरे देवानां कामाय देवाः प्रिया भवन्ति, आत्मनस्तु कामाय देवाः प्रिया भवन्ति।**

तात्पर्य आपलें आपल्या स्वतःवर मुळांत खरें प्रेम आहे. त्याच्यांसाठीं बन्धु इत्यादिकांवर आपण प्रेम करीत असतो. स्वतःसाठीं सख्या भावाचाच गळा घोटणारे लोक विश्वांतल्या बंधूचें काय करणार आहेत? विश्वांतल्या अणुरेणूंविषयीं प्रत्यक्ष आत्मत्वाची भावना दृढ झाली म्हणजे खरें विश्वप्रेम अंतःकरणांत नांदतें. अन्यथा नाहीं. ही ब्राह्मी स्थिति अंतःकरणांत बाणली म्हणजे ज्ञानाची पराकाष्ठा साधत असून ती ज्यांना साधली तेच पुरुष खरे धन्य व कृतकृत्य होत.

वासनापूर्तीला केवढेंहि इन्धन पुरविलें तरी त्यामुळें अंतःकरणाचें समाधान न होतां उलटी वासनेची आग भडकत मात्र जाते. आज आपणांस जितकीं सुखसाधनें उपलब्ध आहेत त्या मानानें शंभर वर्षांपूर्वीं कमी सुखसाधनें उपलब्ध होतीं. पण आपण शंभर वर्षांपूर्वीं अधिक दुःखी होतों व आज कमी दुःखी आहोंत असें छातीवर हात ठेवून कोणाला तरी म्हणतां येईल काय? पूर्वीं खटाऱ्यांतून प्रवास करीत तर आतां विमानांतून प्रवास करतात. पण नित्याच्या संवयीमुळें विमानाचें सुखत्व आपण विसरलों असून अंतःकरणांतील वासनारूपी अग्नि एकसारखा भडकतच आहे. आज एक गरज भडकली व तिच्या शांतीचा विचार केला तर

उद्यां पुन्हां दुसरीच गरज भडकते व कांहीं दिवसांनीं वासनापूर्तीचें सामर्थ्य इंद्रियांतून नष्ट झालें तरी विषयपूर्तीच्या आगीची दाहकता वाढत जाऊन अनिवार तृष्णेनें मनुष्य पुन्हां दुःखीचा दुःखीच राहतो. एका मोगल बादशहाची अशी गोष्ट सांगतात कीं, त्याच्या वार्धक्यामुळें कामोपभोगाचें सुख त्याला उपभोगतां येणें अशक्य झालें, तरी त्याची वासना शेवटी इतकी प्रदीप्त राहिली कीं, जिना चढतांना पायरीवर एकेक सुन्दर तरुणी उभी करून हातांनीं तरुणींच्या स्तनमंडलांचा आधार घेतच तो चढावयाचा ! सारांश मनांत पशुवृत्ति सदैव जागृत ठेवून वासनेच्या अग्नीला विषयोपभोगाचें इंधन सतत पुरवीत बसणें हा कांहीं मनःशांतीचा उपाय खात्रीनें नव्हे. एवढ्याचसाठीं मनुस्मृतींत असें म्हटलें आहे कीं,

**न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥** अ. २–९४

सुखांचा उपभोग घेतल्यानें विषयवासनेची तृप्ति न होतां हवनद्रव्यानें जसा अग्नि, त्याप्रमाणें उपभोगानें विषयवासना अधिकाधिकच वाढते. म्हणून त्या विषयवासनेला आवर घालणें हाच खरा मार्ग आहे. असें कोणी सांगितलें कीं, त्याच्यावर एक ठरलेला आक्षेप नेहमींच असतो. तो हा कीं, भौतिक सुख, ऐश्वर्य, इतकेंच नव्हे तर गरजांचा उपशम, पोट भरणें इत्यादि सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करावयाची शिकवण गीतेनें दिली आहे. पण ही गोष्ट साफ खोटी आहे. गीता ही एका महान् योद्ध्याला युद्धकार्यासाठीं प्रवृत्त करून राज्य संपादन करावयास सांगत आहे हें विसरून कसें चालेल ! जीवनांतील गरजा अवश्य पुरवा. आर्थिक व्यवहार सुव्यवस्थित सांभाळा. पण हें सारें करीत असतांनाच त्यांचे गुलाम न होतां मानवतेच्या कल्याणाचें खरें कार्य करावयाचें असेल तर विश्वरूप बनून हें सारें करा असा गीतेचा संदेश आहे. शारीरिक व केवळ पशुत्वाच्या गरजा पुरविण्यापेक्षां मानसिक व ज्ञानमय अवस्थेच्या सुखाची योग्यताच खरी अधिक असून तें सुख मिळविण्यांतच मानवी जीविताची खरी सफलता आहे. हें भौतिक

पंडितांनाही पटतें. पण त्याची उपपत्ति त्यांना समजत नाहीं. विख्यात तत्त्वज्ञ मिल्ल आपल्या (Utilitarianism) ह्या ग्रंथांत असें म्हणतो कीं, " It is better to be a human being dissatisfied than a pig satisfied, better to be a Socrates dissatisfied than a fool satisfied. And if the fool or the pig is of a different opinion, it is because they only know their own side of the question " "संतुष्ट डुकराच्या जीवनापेक्षां असंतुष्ट मनुष्याचें जीवन अधिक श्रेष्ठ होय. मूर्ख राहून संतुष्ट राहण्यापेक्षां असंतुष्ट शहाणपणाचें जीवन अधिक श्रेयस्कर. मूर्ख किंवा डुक्कर यांचें जर या संबधांत वेगळें मत असलें तर त्याचें कारण इतकेंच आहे कीं या प्रश्नाची केवळ स्वत:पुरतीच बाजू त्यांना माहीत आहे. " मनुष्यालाही पशुजीवनाच्या गरजा असतात हें खरें आहे. त्या तो पुरवितो हेंहि खरें आहे. पण ज्ञानशक्तीचा उदय झालेल्या मनुष्याला पशूचें सर्व सुख देऊन त्याच्या त्या सुखाची सदाची हमी घेतली तरी तो पशु होण्यास कधीही मान्यता द्यावयाचा नाहीं. यावरून मनुष्यजीवनामध्यें कांहींतरी विशेष आहे हें स्पष्ट आहे. मन आणि बुद्धि यांच्या द्वारें सत्यासत्यनिर्णयाचा विचार सुरू झाला म्हणजे पशु आणि मनुष्य ह्या दोघांना समान असें जें विषयोपभोगसुख, त्यापेक्षां मनाच्या आणि बुद्धीच्या या अत्यंत उदात्त व्यापारांत व शुद्धावस्थेंत जें सुख होतें, तेंच मनुष्याचें श्रेष्ठ सुख होय. सुप्रसिद्ध ग्रीक तत्त्वज्ञ 'प्लेटो' यानें आपल्या " रिपब्लिक " या सुप्रसिद्ध ग्रंथांत शारीरिक सुखापेक्षां मानसिक सुख अधिक श्रेष्ठ आहे, व मानसिक सुखापेक्षांही आध्यात्मिक सुख सर्वश्रेष्ठ होय, असेंच प्रतिपादन केलें आहे. भगवद्गीतेनें सुखाचे राजस, तामस व सात्त्विक असे तीन भेद केले असून त्यांपैकीं सात्त्विक सुख सर्वश्रेष्ठ होय असा आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. गीता म्हणते:.

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ।।** अ. १८–३७

"आरंभीं संयमाच्या अडसरानें इंद्रियप्रवृत्तीला आवर घालावा लागत असल्यामुळें जें विषासारखें वाटतें, पण परिणामीं जें

अमृताप्रमाणें मधुर व कल्याणप्रद आहे; व जें मीच सर्वत्र भरलेला आहें, हें आपलें खरें स्वरूप ओळखून त्यांतच रत झालेल्या बुद्धीच्या प्रसन्नतेनें लाभतें तेंच सर्वश्रेष्ठ सात्त्विक सुख होय." इंद्रियातीत सुखासच श्रेय, कल्याण, हित असें म्हणतात; व तें सुख स्वतःचें स्वतःलाच प्राप्त करून घेतां येतें. आपलें वस्तुस्थितींतलें स्वरूप वेगळें असून वस्तुतः ज्याचा व आपला खरा संबंध नाहीं त्यांत आपण ममत्वाची सारी भावना गुंतवून ठेवल्यामुळें केवळ अज्ञानानें दुःखी बनलों आहोंत.

आपली देहाच्या पिंजऱ्यांत अडकून पडलेली अस्मिता विश्वरूप करणें हें जीवनाचें सारसर्वस्व असून तेंच आत्यंतिक सुखसर्वस्व होय. हें खरें असलें तरी हें प्राप्तव्य हस्तगत करून घेणें कोणाच्या अधीन आहे? तें ज्याच्या त्याच्या स्वतःच्या अधीन असून प्रत्येक व्यक्तिमात्रानें आपली अस्मिता साधनांच्या साहाय्यानें विश्वात्म करावी असा गीताकारांचा अभिप्राय आहे. भगवान् म्हणतात :—

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ।।** —गीता अ. ६-६

"मनुष्यानें आपण होऊनच आपला उद्धार करावा. आपण आपल्या स्वतःला खचूं देऊं नये. कारण प्रत्येकजण आपल्या स्वतःचा हितकर्ता आणि आपणच आपला नाशकर्ता आहे." संत-श्रेष्ठ श्रीतुकाराममहाराजांनीं भगवंतांच्या याच वचनाचा अनुवाद करतांना असें म्हटलें आहे कीं, 'येथें कोणाचें काय बा गेलें। ज्याचें त्यानें अनहित केलें।'

जगांतील प्रत्येक मनुष्याला आपलीं दुःखें नाहींशीं व्हावीं व आपण सुखी असावें अशी इच्छा असते. किंबहुना सर्व प्राणिमात्रांच्या प्रवृत्तींचें मूळ केवळ सुखेच्छा हीच आहे. महाभारतकारांनीं असें म्हटलें आहे कीं, 'सुखार्थाः सर्वभूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः'। जगांतील सर्व प्रवृत्तींचें मूळ सुखेच्छेंत आहे.' वासना व गरजा यांच्या उपशमांत हें सुख आपणांस मिळेल अशी प्राणिमात्रांची

कल्पना असते; पण जग इतकें वैषम्यपूर्ण आहे कीं नेहमीं गरजा भागविणारीं द्रव्यें जगांत उपलब्धहि होत नाहींत व उपलब्ध झालीं तरी गरजा ह्या आणखी वेगळें स्वरूप धारण करून वाढतच असतात. अशा स्थितींत सुखाच्या स्वरूपाचा खोलवर विचार करणें आवश्यक ठरतें. ज्याचें सुख दुसऱ्यावर अवलंबून आहे तो पूर्ण सुखी कधींच असूं शकत नाहीं. ज्याचें सुख स्वतःवर अवलंबून आहे तोच खरा सुखी. सुख म्हणजे समाधान. हें समाधान केवळ मनावर अवलंबून असल्यामुळें मनाचें तें समाधान स्वाधीन नसलेल्या प्रकृतीच्या पसाऱ्याच्या अधीन करून तिच्या तालावर नाचण्यांत परतंत्र होत असल्यामुळें त्या मानीव पारतंत्र्यापासून अस्मितेची सुटका करणें आवश्यक असतें. ती सुटका करणें याचा अर्थ प्रकृतीचा संसार आणि आपण वेगवेगळे आहोंत अशी पक्की जाणीव अंतःकरणांत बिंबविणें होय. दोरीच्या वांकडेतिकडेपणामुळें तो सर्प असल्याचा माणसाला जो भ्रम उत्पन्न होतो, तो भ्रम नाहींसा करावयास व त्यापासून उत्पन्न होणारें भयही नष्ट करावयास दोरी ही दोरी आहे हें ओळखणें हा एकच मार्ग आहे. तोच मार्ग गीतेनें सांगितला आहे. इंद्रियोपभोगजन्य सुख टिकत नाहीं. तें नष्ट होईल. आपण तरी मरूं. वीट येईल. कितीही भोगलें तरी वासनेची आग वाढेल. म्हणून गीता या सर्व दुःखांची उपपत्ति लावून मर्यादित, मर्त्य व विनाशी जडतेंतून अमर्याद, चैतन्यमय, आनंदमयतेंत संपूर्ण जीवन परिणमित करूं इच्छिते हें परिणमन करणें स्वतःच्याच मनाच्या अधीन असल्यामुळें मनाच्या एकाग्रतेपासून तर भक्तिमार्गापर्यंत सर्व प्रकारच्या साधनांचा मार्ग गीतेनें दिग्दर्शित केला आहे. एका दिवसांत हें सारें होईल असें गीतेचेंही म्हणणें नाहीं. पण निदान बुद्धीच्या कक्षेंत तरी सुखाचें हें स्वरूप व अस्मिता विश्वात्म करण्याची ही तात्त्विक धारणा एकदां आली म्हणजे दृष्टिकोन बदलल्याविना राहात नाहीं. यांत्रिक जडवादी दृष्टिकोनामुळें आलेला, असंस्कारित व्यक्तिवादामुळें दृढमूल झालेला पशुतेचा भयानक आविष्कार सौम्य होण्यास व हळूहळू नष्ट होण्यास त्यामुळें साहाय्य होऊं शकेल.

पूर्ण विश्वरूप होऊन राहणें हेंच देवजीवन आहे. मनुष्यजीव
हें पशुता व देवत्व यांच्यांमधील एक दारवंठा आहे. या जीवनां
सर्व प्रकारचा प्रयत्न करून पशुतेकडे जाणाऱ्या प्रवृत्ती पार नष
करून टाकणें हेंच खरें साध्य होय. ही पूर्णावस्था व्यक्तिमात्रां
प्राप्त करून घ्यावी व मानवी जीवनाचें देवजीवनांत रूपांत
करावें असें श्रीमद्भगवद्गीतेचें म्हणणें आहे. या देवजीवनाचें वर्ण
करतांना गीताकारांनीं त्याला स्थितप्रज्ञ असा शब्द वापरलेला आहे
स्थितप्रज्ञाचीं लक्षणें सांगतांना भगवान् म्हणतात :—

प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ अ. २–५५
दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ २–५६
यः सर्वत्रानभिस्नेहः तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ २–५७
यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।
इंद्रियाणीन्द्रियार्थेभ्यः तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ २–५८
विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ २–७१
असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ॥
अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ २–१३
यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १२–१५
समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः । १२–१८
सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ ६–२९
आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ६–३२

या दुसऱ्या व बाराव्या अध्यायांतील उद्गारांत श्री भगवंतांनीं जें पूर्णावस्थेचें वर्णन केलेलें आहे तेंच देवजीवन होय. त्याचें तात्पर्य असें आहे कीं, " मनांतील सर्व वासना जेव्हां सुटतात व आपण आपल्या ठिकाणींच संतुष्ट होऊन राहतों तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणतात. दुःखांत ज्याच्या मनाला खेद होत नाहीं, सुखाच्या ठिकाणीं ज्याची आसक्ति नाहीं आणि प्रीति, भय, व क्रोध हीं ज्याचीं सुटलीं त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. सर्व गोष्टींत ज्याचें मन निःसंग झालें आणि यथाप्राप्त शुभाशभाचा ज्याला आनंद किंवा विषादहि नाहीं त्याची बुद्धि खरोखरच स्थिर झाली. कासव आपले हस्तापादादि अवयव ज्याप्रमाणें आखडून घेतो त्याप्रमाणें जेव्हां एखादा पुरुष इंद्रियांच्या शब्दस्पर्शादि विषयांपासून आपलीं इंद्रियें आखडून धरतो तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली असें म्हणावें. सर्व ठिकाणीं अनासक्ति ठेवून ज्यानें आपलें मन जिंकलें व वासना पूर्णपणें नाहींशी होऊन ब्रह्मात्मैक्य भाव ज्याच्या ठिकाणीं बाणला, तो सदैव प्रसन्न असणारा पुरुष स्वतःसाठीं कशाचीहि अपेक्षा करीत नाहीं व कशाबद्दलहि शोक करीत नाहीं. त्याच्या अंतःकरणांत कोणाबद्दलहि द्वेष नसतो. सर्व भूतमात्रांचा तो मित्र आहे. सर्वांविषयीं त्याच्या अंतःकरणांत अपार दया भरून राहिलेली असते. त्याची ममता व अहंकार पूर्णपणें नष्ट झालेले असतात. सदैव क्षमा करून सुखदुःखांच्या बाबतींत तो समबुद्धीचा असतो. हर्ष, शोक, भय, उद्वेग यांपासून तो सर्वथैव मुक्त असून लोकांना त्याच्याविषयीं कधीं उद्वेग वाटूं शकत नाहीं. व त्यालाहि लोकांचा कधीं उद्वेग येत नाहीं. मान, अपमान, शीत, उष्ण, शत्रु, मित्र यांच्या बाबतींत त्याची बुद्धि सदैव सम असते. जो सर्वभूतीं एकच आत्मा आहे व सर्वभूतमात्र आत्म्यांतच आहेत हें ओळखतो तो सर्वत्र समदृष्टि ठेवणारा योगयुक्तात्मा पूर्णपुरुष होय. तो सर्वत्र आत्मभावनेनेंच पाहतो. मग ती गोष्ट सुखाची असो वा दुःखाची असो. त्यालाच योगी असें म्हणतात. श्री ज्ञानेश्वरमहाराजांनीं या पूर्ण जीवनाचें चित्र इतकें हृदयंगम रेखाटलें आहे कीं, तें

वानगीदाखल येथें दिग्दर्शित केल्याविना माझ्यानें राहवत नाहीं. महाराज म्हणतात :–

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कांहीं
आपपरू नाहीं । चैतन्य जैसा ॥
उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे
हें कांहींच नेणिजे । वसुधा जेवि ॥
गाईची तृषा हरूं । का व्याघ्रा विष होऊनि मारूं
ऐसे नेणेचि गा करूं । तोय जैसें ॥
तैसे अघवियाचि भूतमात्रीं । एकपणें ज्या मैत्री
कृपेसी धात्री । आपणचि जो ॥
आणि मी हें भाष नेणे । माझें कांहींच न म्हणे
सुखदुःख जाणणें । नाहीं जया ॥
वर्षियेवीण सागरू । जैसा जळेंविण नित्य निर्भरू
तैसा निरुपचारू । संतोषी जो ॥
तरी सिंधुचेनी माजें । जळचरां भय नुपजे
आणि जळचरें नुबगिजे । समुद्रू जैसा ॥
तेवि उन्मत्तें जगें । जयासि खंती नलगे
आणि जयाचेनि अंगें । न शिणे लोकू ॥
किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवा
तैसा नुबगे जीवां । जीवपणें जो ॥
जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें
हर्षामर्ष ठेले । दुजें न वीण ॥
मोक्ष देउनी उदार । काशी होय कीर
परी वेंचे लागे शरीर । तिये गांवीं ॥
हिमवंतू दोष खाये । परी जीविताची हानी होये ।
तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥
शुचित्वें शुचि गांग होये । आणि पाप तापहि जाये
परी तेथें आहे । बुडणें एक ॥
आपणचि विश्व जाहला । तरी भेदभावो सहजचि गेला
म्हणोनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥

**हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ॥**

श्री ज्ञानराजांच्या या तेजस्वी शब्दांना आणखी कोणी पुष्टि जोडण्याची आवश्यकताच नाहीं. तात्पर्य, गीता त्या देवजीवनाचा संकेत करते कीं, जेथें चित्ताची संपूर्ण निर्विशेष साम्यावस्था परम शांतीचें मांगल्य सर्व विश्वांत उधळील, विश्वांतील यच्चयावत् द्वंद्वांच्या अतीत असणारी समदृष्टि जेथें निर्भेळ आनंदाचा, शांतीचा व समाधानाचा प्रकाश पाडील, व जेथें भोक्तृत्वाबद्दलच नव्हे तर कर्तृत्वाबद्दलही सूक्ष्मसुद्धां अहंकार नसेल ही पूर्णावस्था प्रत्यक्ष जीवनांत उतरणें अत्यंत कठिण आहे. पण या दिशेनें पाऊल टाकणाऱ्याला ती असाध्य मात्र मुळींच नाहीं. किंबहुना भगवान् श्रीकृष्ण सर्व साधकांना उद्देशून असें आश्वासन देतात कीं,

**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ।** —गीता अ. ६–४०

कल्याणमार्गाच्या कोणत्याही पथिकाला दुर्गति मिळणें कधींही शक्य नाहीं. त्याला त्याचें साध्य निश्चित प्राप्त होईल. जगांतील सर्व मनुष्यांची बुद्धि या परिपूर्ण साम्यावस्थेला आत्मसात् करून ज्या वेळीं विश्वात्म बनेल त्या वेळींच "पडलें वळण इन्द्रियां सकळां" इतक्या सहजतेनें, "एकमेकां साह्य करूं अवघे धरू सुपंथ" ही प्रवृत्ति अंगीं बाणते, व तेव्हांच संपूर्ण विश्वांतील मानवी जीवनांत खरें देवजीवन उमटतें. दीर्घकालीन प्रयत्नानंतर साध्य होणारी ही अवस्था आहे. म्हणून तिला कृतयुग असें म्हणतात. ज्याला "Withering away of the State" असें कम्युनिस्ट म्हणतात ती अवस्था ही देखील विश्वांत हें पूर्णजीवन अस्तित्वांत आलें म्हणजे त्याचा स्वाभाविक परिपाक होय. अखिल मानवतेच्या सामाजिक जीवनाला ही पूर्णावस्था प्राप्त झाल्यानंतर त्याचें महाभारतकारांचें असें वर्णन आहे कीं,

**यद्येकान्तिभिराकीर्णं जगत्स्यात् कुरुनंदन ।**
**अहिंसकैरात्मविद्भिः सर्वभूतहिते रतैः ॥**
**भवेत् कृतयुगप्राप्तिः आशीः कर्मविवर्जिता ।**

"ज्या वेळीं भूतमात्राविषयीं प्रेम बाळगणाऱ्या आत्मवेत्त्या लोकांनीं संपूर्ण जग भरून जाईल त्या वेळीं ही कृतयुगाची अथवा सुवर्ण-युगाची अवस्था उत्पन्न होईल व तिचें बाह्य स्वरूप कोणतीही अपेक्षा न ठेवतां केवळ उदात्ततेसाठीं उदात्ततेचें, पावित्र्यासाठीं पावित्र्याचें व चारित्र्यासाठीं चारित्र्याचें अखंड आचरण करीत राहाणें हें असेल." शासनसंस्थाविरहित अवस्था ह्या सुवर्णयुगांत उत्पन्न होतें. तिचा संकेत करीत असतां महाभारतकार म्हणतात:

**न वै राज्यं न राजासीन्न दण्डो न च दाण्डिकः।**
**धर्मेणैव प्रजाः सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ॥** –शांतिपर्व अ.५९–१४

"त्या ठिकाणीं राज्यही नाहीं, राजाही नाहीं, कोणी अपराधीच नसल्यामुळें शासनसंस्थाही नाहीं. पूर्ण कर्तव्यबुद्धीचा उदय झाल्यामुळें सर्व लोक परस्परांचें संरक्षण मात्र करीत आहेत." आंतरिक विकसन व अस्मितेच्या पशुभावाचें निखंदन याची कल्पनाच नसल्यामुळें साम्यवादी फक्त या अवस्थेचा उद्घोष करणारे ढोंगी बनले. गीताकारांनीं या गोष्टीकडे प्रत्यक्ष लक्ष दिल्यामुळें त्यांनीं विकसनाचा खरा मार्ग दाखवून जगाचा प्रश्न सोडविला. खरा प्रश्न असा उरतो कीं, हें विश्वात्म जीवन प्राप्त झाल्यावर म्हणजे व्यक्तीच्या जीवनांतील सर्वश्रेष्ठ अंतिम साध्य मिळविल्यानंतर या महापुरुषाचा जीवनहेतु काय असतो ? भगवान् श्रीकृष्णांनीं यासंबंधीं काय सांगितलें आहे ?

स्थितप्रज्ञावस्थेचें अथवा पूर्णावस्थेचें जें अंतिम साध्य तें हस्तगत झाल्यानंतर या पूर्णपुरुषाचे जे व्यवहार असतात ते भूतमात्रांच्या कल्याणासाठींच केवळ असतात व त्यांत तो गढून गेलेला असतो. अशा पुरुषांना उद्देशून भगवान् श्रीकृष्णांनीं जें 'सर्वभूतहिते रताः" हें विशेषण वापरलेलें आहे त्यावरूनच हें सिद्ध होतें. अमक्या एका विषयांत अमक्याला रति आहे असें म्हणणें वेगळें व तो त्या विषयांत रत आहे असें म्हणणें निराळें. त्याला अमक्या एका विषयांत रति आहे याचा अर्थ त्याला त्या विषयाविषयीं प्रेम आहे येवढाच होईल. पण तो त्या विषयांत रत आहे याचा अर्थ मात्र तो

सदैव त्या विषयांत गढून गेलेला आहे असा होतो. गीताकार येथें सुखाऐवजीं हित शब्द हेतुतःच वापरीत आहेत. प्रत्येकाचें हित ज्याचें त्यानेंच साधून घ्यावयाचें असलें तरी अखिल मानवतेला तिच्या खऱ्या हिताचें दिग्दर्शन करणें हें ज्ञानी पुरुषाचें काम होऊन बसतें. भगवान् श्रीकृष्णांनीं सुद्धां "यथेच्छसि तथा कुरु" असें इच्छा-स्वातंत्र्य अर्जुनाला देऊन शिवाय त्याला त्याच्या हिताच्या मार्गाचें पूर्णपणें दिग्दर्शन केलेंच आहे. सुख व हित यांत फरक आहे. तात्पुरतें बरें वाटणें याला सुख म्हणतात. गीतेमध्यें ज्याला

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**

असें म्हटलें आहे त्या सात्त्विक सुखाला हित असें म्हणतात. ज्ञानी पुरुषाची प्रवृत्ति, जें देवजीवन त्यानें स्वतः प्राप्त करून घेतलें तें अखिल भूतमात्रात उत्पन्न व्हावें ही असते, व भूतमात्रांत ही स्थिति उत्पन्न व्हावयाची असली तर त्यासाठीं त्या प्रवृत्तीला अनुकूल असें वातावरण उत्पन्न करण्याचीं व तिला विरोधी असणाऱ्या प्रवाहांना आवश्यक व परिस्थितिप्राप्त अशा सर्व उपायांनीं परतविण्याची अथवा नष्ट करून टाकण्याची द्विविध कामगिरी ज्ञानी पुरुषाकडून होते. पूर्ण पुरुषानें लोक-संग्रहार्थ कर्में करावीं असा संकेत करीत असतां 'लोकसंग्रह' हा जो भगवान् श्रीकृष्णांनीं शब्द वापरलेला आहे त्याचें स्पष्टीकरण करीत असतां भगवद्पूज्यपाद श्रीमदाद्य शंकराचार्य असें म्हणतात कीं,

**लोकसंग्रहः लोकस्य उन्मार्गप्रवृत्तिनिवारणम् ।**

तात्पर्य जीवनाचा ध्येयवाद चुकलेल्या लोकांना पुन्हां त्या मार्गा-वंर आणून ठेवणें भूतमार्गाच्या कल्याणाप्रीत्यर्थ त्यांच्या उन्नति-मार्गांत उन्मत्तपणें अडथळा आणणाऱ्या दुष्टांना शासन करणें व सर्व भूतमात्रांचें कल्याण साधणें हाच ज्ञानी पुरुषाचा जीवनहेतु होय. पूर्णपुरुष स्वतः जरी पूर्ण असला तरी तो ज्या परिस्थितींत व ज्या लोकांत वावरतो ते कांहीं सारे पूर्ण नसतात. अशा स्थितींत त्या साऱ्यांना पूर्णतेला नेणें हाच त्याचा जीवनहेतु असल्यामुळें अधः-पतित सामाजिक परिस्थितींत, 'घटासि आणावा घट। उद्धटासी

उद्धट। खटनटासी खटनट। अगत्य करीं।।' या न्यायानें सामर्थ्याचा उपयोग त्याला आवश्यकच ठरतो. मात्र पूर्णपुरुष आतां मला लोककल्याण करावयाचें आहे असें म्हणून, तो एखादा परमार्थ आहे असें समजून लोककल्याण करीत नाही. सूर्य ज्याप्रमाणें स्वभाव म्हणूनच सगळ्यांना प्रकाश देतो, त्याप्रमाणें पूर्णपुरुष स्वभाव म्हणूनच लोकहित करीत असतो. लोक व तो यांत कांहींच फरक नसल्यामुळें अखिल भूतमात्रांचें हित हा त्याच्या प्रत्येक निःश्वासाचा स्वभावसिद्ध हेतु आहे. तात्पर्य, श्रीमद्‌भगवद्‌गीता अस्मितेचा स्वतंत्रपणें विचार करून व सर्वप्रकारच्या पशुभावांतून मानवाला पूर्णपणें मुक्त करून विश्वात्म बनवावयास सांगते व व्यक्तिमात्रानें हें ध्येय साध्य करून अखिल भूतमात्रांत हें देवजीवन निर्माण करणें हेंच त्या पूर्णजीवनाचें साध्य आहे असा संकेत करते. आजच्या यंत्रयुगानें जे प्रश्न उत्पन्न केले आहेत ते वस्तुतः यंत्रयुगानें उत्पन्न केलेले नसून अत्यंत मर्यादित व असंस्कारित अशा स्वार्थी व्यक्तित्व-भावनेंतून उत्पन्न झालेले आहेत. व्यक्तित्व विश्वरूप करणें हाच त्यावरील खरा तोडगा होय. अस्मिता उंचावली व ती विशुद्ध झाली, कीं ज्या भौतिक शोधांनीं मानवी जीविताची आज ससे-होलपट चालविली आहे तेच भौतिक शोध मानवी जीविताची मंगलमयता स्थिरपद करतील. यंत्रपद्धति वा योजना वाईट नाहींत. वाईट आहे तें त्यामागचें अंतःकरण, साऱ्या जगांतील अंधार, जडता मर्यादितता दूर करून तेथें देवजीवन उत्पन्न करणें हा पूर्णपुरुषाचा स्वभाव असल्यामुळें या स्वभावाचा पुरुषच जगताचें जीवन सुधारूं शकतो. कारण, या पुरुषाचा वर्तनक्रम म्हणजेच नीति होय. पूर्ण पुरुषाची बुद्धि व त्याचें वर्तन हा नीतिशास्त्राचा पाया असून पर-मावधीची शुद्ध व समबुद्धि झालेल्या या पुरुषास नीतीचे नियम लावूं पाहणें म्हणजे दिवटीनें सूर्यास प्रकाश दाखविण्यासारखेंच हास्या-स्पद आहे. तो जें वागेल तें स्वभावतःच लोकांच्या कल्याणाचें असतें; व लोककल्याणासाठींच त्याचें दिव्यकर्म प्रवृत्त होतें. त्यानें कर्म न केलें तर जगांत अंधारच पडेल. पूर्ण पुरुषाचा जीवनहेतु विशद करतांना स्वतः पूर्णावतार श्रीकृष्ण म्हणतात :—

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।। २१
न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ।। २२
यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ।। २३
उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ।। २४

—गीता अ. ३

" पूर्ण पुरुष जें जें आचरण करतो तें तेंच सामान्य लोक करीत असतात. तो जी गोष्ट प्रमाण म्हणून अंगीकारितो तिलाच लोक अनुसरतात. हे पार्था त्रैलोक्यांत मला व्यक्तिशः माझ्यासाठीं म्हणून कांहींही कर्तव्य उरलेलें नाहीं. कोणतीही अप्राप्य वस्तु मला मिळवावयाची राहिलेली नाहीं. तथापि मी सतत कर्तव्य कर्म करीत आहे. कारण मी जर दक्षपणें कर्म करीत राहणार नाहीं तर लोक माझ्याच मार्गाचें अनुकरण करतील. मी जर कर्म न केलें तर लोक नष्ट होतील. संकराचें उत्तरदायित्व सर्वस्वी माझ्यावर राहील व पर्यायानें मींच भूतमात्रांचा घात केला असें होईल " तात्पर्य, सुखदुःख, भावाभाव, मानापमान, स्वार्थपरार्थ, इत्यादि सर्व द्वंद्वांच्या अतीत निर्विशेष व आनंदमय साम्यावस्थात्मक पूर्ण जीवन हेंच देवजीवन होय. हें देवजीवन व्यक्तिमात्रानें स्वतः प्राप्त करून घेतल्यावर अखिल मानवतेंत तें उत्पन्न करण्यासाठीं अविरत प्रयत्नशील राहणें हा त्या जीवनाचा स्वभाव होऊन राहतो. सुप्रसिद्ध ग्रीक तत्त्वज्ञ एपिक्यूरस यानें म्हटल्याप्रमाणें a tranquil, undisturbed, innocuous, non-competitive fruition, which approached most nearly to the perfect happiness of the Gods, who neither suffered vexation in themselves, nor caused vexation to others म्हणजे शांत समबुद्धीचा व परमेश्वराप्रमाणें सदा आनंदमय, ज्याच्या-पासून लोकांना व लोकांपासून ज्याला यत्किंचित्हि त्रास होऊंच

शकत नाहीं अशा आंतरिक धारणेचें पूर्णत्व जर अखिल मानवतेंत नांदू लागलें तर मानवतेनें विकसनाचें अंतिम टोंक गांठलें असें होईल. उदात्ततेसाठीं उदात्तता, पावित्र्यासाठीं पावित्र्य, चारित्र्यासाठीं चारित्र्य व नीतिमत्तेसाठीं नीतिमत्ता हा या महान् जीवनाचा स्वाभाविक व नित्य आविष्कार आहे. या अवस्थेंत शासनसंस्था समाजांत विरून जाते. अखिल मानवतेंत ही पूर्णावस्था उत्पन्न करण्यासाठीं कटिबद्ध होणें हेंच गीताकारांच्या दिव्य कर्मयोगाचें स्वरूप आहे.

## गीतेचा ध्येयदर्शक व परिपूर्ण संदेश

. तात्पर्य, (१) चुकीच्या तत्त्वज्ञानावर आधारल्यामुळें पाश्चात्य लोकतंत्रवाद संकुचित, स्वार्थी, जड व यंत्रमय अशा निर्जीव उपयुक्ततावादावर भर देणारा, व साऱ्या पशुभावांनीं परिपूर्ण अशा व्यक्तिवादावर व व्यक्तिस्वातंत्र्यवादावर भर देणारा होऊन मर्यादातीत शोषक बनला. साम्यवाद या शोषणाचीच प्रतिक्रिया असल्यामुळें लोकतंत्रवाद्यांनीं, आतां साम्यवादानें त्यांची गळचेपी केली अथवा मानवतेवर अघोरी आक्रमण चालविलें अशी ओरड करण्यांत अर्थ नाहीं. हें शोषण नसतें तर साम्यवाद उत्पन्नच झाला नसता. लोकतंत्रवादांतील व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेंत व्यक्तिमात्राचें आंतरिक विकसन व विशेषत: पशुभावाचें निखंदन अभिप्रेत नाहीं. याचें कारण त्याच्या पाठीमागें असलेल्या तत्त्वज्ञानांतील पिंड-ब्रह्माण्डाचा चुकीचा उलगडा हें आहे. भौतिकवादी दृष्टिकोनाच्या अपूर्णतेंतून व त्याच्याच जोडीला त्यांत उत्पन्न झालेल्या सत्यासत्य निर्णयाविषयींच्या अहंकारदूषित दृष्टिकोनांतून ही चूक उद्भवली व स्थिरपद झाली. मुळांत सत्प्रवृत्त असलेल्या मिल्लसारख्या तत्त्वज्ञालाहि स्वार्थ व परार्थ यांच्या निरगांठी भौतिकवादाचा आश्रय केल्यामुळें सोडवितां न येऊन त्याचें उपयुक्ततावादावर आधारलेलें तत्त्वविवेचन हास्यास्पद होऊन बसलें आहे. व्यावहारिक व इंद्रियजन्य सुखाशिवाय सुखाची दुसरी कोणतीहि कल्पना मिलसारख्या तत्त्वज्ञांजवळसुद्धां नाहीं; मग

सामान्य भौतिकवाद्याची तर गोष्टच बोलावयास नको! व्यावहारिक इंद्रियगम्य सुखाशिवाय दुसऱ्या कोणत्याच सुखाची कल्पना जवळ नसल्यावर व व्यक्तिमात्राची स्वतःच्या सुखाकडे लक्ष देण्याची मूलभूत प्रवृत्ति ध्यानांत घेतल्यावर नीतीच्या उभारणीचा पाया डळमळीत झाल्याविना राहात नाही. कारण नीतीचा प्रारंभच परार्थापासून होतो. आपल्याला भूक लागली म्हणून अन्नाचा घास स्वतःच्या पोटांत ढकलणें याला कोणी नीति म्हणत नाहीत. उलट आपल्या समोरचें ताट ढकलून दुसऱ्या भुकेल्याच्या जेवणाची व्यवस्था करणें हें मात्र नैतिक वर्तन समजलें जातें. नीतीचा आधार असलेल्या या परार्थप्रवृत्तीचें कोणतेंहि समर्थन जड यांत्रिक उपयुक्ततावाद्यांना देतां येत नाहीं. परार्थ प्रवृत्तीचें विवेचन करतांना मिल म्हणतो कीं, स्वार्थाचें ( म्ह. भौतिक स्वार्थाचें ) साधन म्हणून मनुष्य प्रथम परार्थासाठीं प्रवृत्त होतो. व पुढें संवयीनें परार्थ हेंच त्याच्या जीवनाचें ध्येय होऊन बसतें. शत्रूचा निःपात करावयास्तव प्रथम मनुष्य खड्ग हातांत घेतो व पुढें तो मूळ ध्येय विसरून नुसताच खड्गपूजक बनतो. याचा अर्थ असा नाहीं काय कीं मनुष्याची परार्थ प्रवृत्ति ही एक प्रकारच्या भ्रमावर, विस्मरणावर आधारलेली आहे ? जर हें भ्रमज्ञान जाऊन त्या ठिकाणीं यथार्थ ज्ञानाचा दीप प्रकाशला तर मनुष्य पक्का स्वार्थी बनेल. मग या स्वार्थीप्रवृत्तीला कुणाला काय व कसें दूषण देतां येईल ? जेथें स्वार्थ सत्य व परार्थाची उपपत्तीच भ्रमांतून लावावी लागते तेथें नीतिमत्ता ही केवळ ढोंग ठरणार नाहीं तर दुसरें काय होईल? शिवाय जोंपर्यंत या जगापलीकडील आपल्या अस्तित्वाला नाकारावयाचें आहे व व्यक्तिव्यक्तींच्या परस्पर आंतरिक संबंधाची जोंवर कांहींच उपपत्ति नाहीं तोंवर पुष्कळांच्या पुष्कळ सुखासाठीं एका व्यक्तीनें आपल्या सुखाचें व जीवनाचें बलिदान केलें पाहिजे या उपयुक्ततावाद्यांच्या म्हणण्याला केवळ इच्छा व्यक्त करण्यापलीकडे त्यांना दुसरी कोणतीच उपपत्ति देतां येण्यासारखी नाहीं. चालू जीवनानंतर जर जीवनाचें अस्तित्वच संपावयाचें असेल तर माझ्या जीवनांतील आजच्या

सुखाची मी काय म्हणून होळी करूं? मी समाजासाठीं बलिदान पावण्याऐवजीं समाजानेंच माझ्यासाठीं कां बलिदान पावूं नये असें जर एखाद्या व्यक्तीनें मिलसारख्या तत्त्वज्ञाला विचारलें तर त्याला त्याचें समर्पक उत्तर देऊन समाधान करतां येणार नाहीं. नुसते 'स्वार्थी, आपमतलबी' इत्यादि शब्दांची उधळण करणें हें कांहीं उत्तर नव्हे. व यामुळेंच 'मुखमें राम बगलमें छूरी' या हिंदी म्हणीप्रमाणें लोकतंत्रवादाचा भौतिकवादी व व्यक्तिस्वातंत्र्यवादी घटक शेवटीं "यावज्जीवेत्सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" या मनोवृत्तीचा स्वार्थी व शोषक बनतो. आजचे भांडवलशाहीचें भयानक स्वरूप या प्रवृत्तींतून उत्पन्न झालें आहे. या गोष्टीचें विशदीकरण मागें झालेंच आहे. उपसंहार म्हणूनच केवळ येथें मी आढावा घेत आहे. असो. जोंवर व्यक्तींतील पशुभावांवर कोणतीहि उपाययोजना होत नाहीं व विश्व, मूलतत्त्व आणि अस्मिता यांच्या अन्योन्याश्रयी व परस्परसंलग्नतेचें विशदीकरण करणारें तत्त्वज्ञान अंगीकारण्यांत येत नाहीं तोंवर लोकतंत्रवाद्यांच्या व मोठमोठ्या लोकशाही राष्ट्रांच्या सूत्रधारांच्या विश्वबंधुत्ववादाच्या घोषणा व जागतिक लोकशाहीचें संघटन करण्याच्या योजना अंतिम परिणा-माच्या दृष्टीनें फुकट आहेत. ढोंगी आहेत. निग्रोशीं झालेल्या व होत असलेल्या श्वेतवर्णीयांच्या वागणुकी व नापाम बाँबसारखे अघोरी प्रकार याविना त्यां दुसरें कांहींच सिद्ध करीत नाहींत.

(२) लोकतंत्राच्या शोषणाची साम्यवादी प्रतिक्रिया ( कम्यु-निझम् ) हेतुपूर्वक उभारलेल्या अशास्त्रीय, जडवादी विरोधविकासी प्रक्रियेच्या हट्टी दृष्टिकोनाचा व आपणांशिवाय दुसऱ्यास जगूंच द्यावयाचें नाहीं या दुराग्रहाचा जोंवर परित्याग करीत नाहीं तोंवर वासनेच्या आगीनें धगधगलेला पशू निर्माण करण्यांतच ती पर्यवसित होईल हें उघड आहे. साम्यवादानें हीन वासनांना चेतवून आग व रक्त यांचें थैमान घालण्यापलीकडे आपल्या प्रचारतंत्राचा दुसऱ्या कशासाठीं आजवर वापर केला आहे व आजही करीत आहे? कोणती आंतरिक उदात्त प्रेरणा त्यांनीं दिली? पतनाला शास्त्र मात्र त्यांनीं पुरविलें! व्यक्तिविकासाचे

व अस्मितेच्या उदात्तीकरणाचें कोणतेंहि नवें तत्त्वज्ञान वा दृष्टिकोन त्यांच्या जवळ नसल्यामुळें अत्याचाराच्या व सामर्थ्याच्या धाकानें व्यक्तिमात्राचें सर्व प्रकारचें स्वातंत्र्य हिरावून घेऊन एका गटाची भयानक हुकुमशाही निर्माण करावयाची व तिचा पोलादी पंजा सदैव उगारलेला असावयाचा हें साम्य-वादाचें आजचें राक्षसी स्वरूप आहे. आपणाशिवाय दुसऱ्यास जगूंच द्यावयाचें नाहीं या प्रवृत्तीनें खास साम्यवाद्यांची पितृभूमि असलेल्या रशियांतच आज मार्क्सो-लेनिनिझम्चें कंबरडें मोडलेलें असून केवळ स्टॅलिनची अत्याचारी व शोषक हुकुमशाही प्रस्थापित झाली आहे. प्रचार, भाषण, वादविवाद इत्यादि सर्व प्रकारच्या स्वातंत्र्याचा तेथें अपहार करण्यांत येऊन व्यक्तीला व समुदायाला राज्ययंत्राचें मूक दास बनविण्यांत आलें आहे. आजची चीनचीही पावलें याच दिशेनें पडत आहेत. आपल्या गटाशिवाय दुसऱ्यालां आम्ही 'लोकच' समजत नाहीं असें म्हणून वर लोकशाहीचा उद्घोष करावयाचा व ' लोक ' नसलेल्यांना कायद्यांचें संरक्षण नाकारून त्यांचा जगण्याचा हक्कच उडवून लावावयाचा याचा दुसरा काय अर्थ होतो? आजच्या कम्युनिस्ट चीनचें हें स्वरूप आहे. साऱ्या विश्वबंधुत्वाच्या जागतिक एकराष्ट्रीयत्वाच्या व शासनसंस्था-विरहिततेच्या घोषणा या अशास्त्रीय दुराग्रहामुळेंच व संकुचित धारणेमुळें साम्यवाद्यांच्या बाबतींत खास त्यांच्या पितृभूमींतच वांझोटचा ठरून साम्यवाद—निदान अधिकृत साम्यवाद तरी जगावरील एक रावणी आपत्ति ठरण्यांतच पर्यवसित होत आहे.

(३) ज्या भौतिकवादी दृष्टिकोनांतून मानवताविनाशाची अग्निकुंडें पेटून उठली त्याचा अपुरेपणा व त्याची विनाशकता आतां त्याच्या निर्मात्यांनाच पटत चाललेली असून त्याऐवजीं विश्वाकडे पाहण्याचा नवा तात्त्विक दृष्टिकोनच निर्माण करण्याची आवश्यकता वाटूं लागली आहे. आजचें विज्ञान मागच्या शतकां-तील भौतिकवादाला अनुकूल नाहीं. हा नवा तात्त्विक दृष्टिकोन संवादी, मूलतत्त्व, विश्व व अस्मिता यांचा परस्पर आंतरिक संबंध प्रस्थापित करणारा व चैतन्यवादी असला पाहिजे असें

आजचे नामवंत तत्त्वज्ञ व समाजशास्त्रज्ञ म्हणूं लागले आहेत. जिच्या भरंवशावर विश्वाच्या अस्तित्वाविषयीं ब्रह्मप्रलयाच्या पैजा मारीत बसावयाचें त्या अस्मितेलाच नाकारण्याचा केलेला वेडेपणा आजच्या भौतिक शास्त्रज्ञांनाच जाणवत असून साऱ्या आपत्तीचें तेंच मूळ असल्याची धारणा त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होऊं लागली आहे.

(४) आजच्या जगाची ही गरज मानवतेची सदाचीच गरज असून गीताकार भगवान् श्रीकृष्णांनीं ती गरज पांच सहस्र वर्षांपूर्वीं पुरविलेली आहे. त्यांनीं विशद केलेलें तत्त्वज्ञान मानवतेंत सदाचा मांगल्यदीप उजळावयास पूर्णपणें समर्थ आहे.

(५) गीताकार भगवान् श्रीकृष्ण सर्व चराचर सृष्टींत एकच चैतन्यरूप वस्तुतत्त्व भरून राहिलेलें असून विश्व, मूलतत्त्व व अस्मिता हीं वस्तुतः एकच आहेत असें सांगतात व त्या द्वारें जीव, जगत् व जगदीश्वर यांच्या संबंधीचा संवादी दृष्टिकोन उत्पन्न करतात. विश्वाशीं अस्मितेच्या असलेल्या नैसर्गिक स्नेहमय आंतरिक संबंधाची उपपत्ति त्यामुळेंच लागूं शकते.

(६) भगवान् श्रीकृष्ण व्यक्तित्वांतील पशुभाव कसा नष्ट करावयाचा याचा प्रत्यक्ष साधनयोग सांगून मानवतेचें देवजीवनांत रूपांतर करण्याचें प्रत्यक्ष मार्गदर्शन करतात, व त्यायोगें विश्वात्मभाव उत्पन्न करून सर्व भूतमात्रांच्या हिताविषयींच्या प्रयत्नांत अखंड गढून राहणें हा स्वभाव कसा बनेल याचें प्रत्यक्ष दर्शन घडवितात.

(७) हक्कांकरितां हक्क ही जीवनांतील संघर्षाची परिभाषा काढून टाकून कर्तव्याकरितां कर्तव्य व तेंहि फलाशाविरहिततेनें अखंडित करीत राहणें हें जीवनसूत्र श्रीकृष्ण उपदेशितात. त्यांच्या मतें हक्कसुद्धां कर्तव्यासाठींच असून कर्तव्य हेंच जीवनाचें सार होय, (कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन) विश्वसंसाराचें विकसनोन्मुख यज्ञचक्र न चालविणाऱ्या कर्तव्यभ्रष्टाचें जीवन व्यर्थ होय असें भगवंताचें म्हणणें आहे. (अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ

स जीवति ।) किंबहुना भगवंतांच्या मतें तो इंद्रियसुखालाच सर्वश्रेष्ठ समजणारा उपयुक्ततावादी स्वार्थपटु केवळ पापात्मा होय. त्याची हक्काची परिभाषा हीच अधःपतनाची नांदी.

भगवंतांनीं दिलेल्या जीवनाविषयींच्या या दृष्टिकोनामुळें स्वाभाविकपणेंच पशुभावाला अडसर उत्पन्न होतो व विश्वाविषयींच्या सहानुकंपेचा दृष्टिकोन केवळ वाग्जाल न ठरतां प्रत्यक्ष अंतःकरणांत त्याची जोपासना व शरीराच्या कणांकणांतून हळूहळू त्याचा आविष्कार घडूं लागतो. तसा घडविण्यासाठीं प्रत्यक्ष प्रयत्न करणें भगवंतांना अभिप्रेत आहे व म्हणूनच "उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः" असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे.

(८) सुखसाधनांची वाढ म्हणजे सुख व त्याची वाढ नसून आपण स्वतःच सुखस्वरूप आहोंत असें भगवान् सांगतात व या अंतर्निष्ठ सुखस्वरूपाशीं तन्मय होण्याच्या मार्गाचा उपदेश करून अस्मितेच्या विकसनावर व्यक्तिमात्राचें लक्ष केन्द्रित करतात. त्यामुळें कधींच उपशम न पावणाऱ्या धगधगलेल्या वासनांच्या पूर्तीऐवजीं आत्मविकसन हें जीवनाचें साध्य ठरतें.

(९) भगवंतांचें तत्त्वज्ञान जीवाच्या अंतःकरणांत जीवनाच्या अनंतकालीन नित्यत्वाची धारणा उत्पन्न करून त्याच्या विकासाविषयीं व सत्यतेविषयीं प्रगाढ विश्वास उत्पन्न करते. त्यामुळें व्यक्तीनें उच्चतम तत्त्वासाठीं व परार्थासाठीं त्याग कां करावा याची उपपत्ति लागते. जड भौतिकवादांत ती तशी लागत नाहीं हें आपण पाहिलेंच आहे. अनंतकालीन जीवनाच्या द्रुतगतीच्या विकसनाचा परार्थ हा मार्ग ठरतो व स्वतःच्या जीवनाचें हें विकसनाचें ध्येय हस्तगत करून घेण्यासाठींच व्यक्तींकडून त्यागाची अपेक्षा केली जाते.

(१०) चित् व जड हे विश्वाचे दोन्ही भाग वस्तुतः एकाच मूळ वस्तूचीं स्वरूपें असून साऱ्या विश्वाचेंच आधिदैविक व आधिभौतिक असे सूक्ष्म व स्थूल पर्याय आहेत. पाण्याच्या पातळीवर हिमनगाचा

केवळ एक सप्तमांश भागच दृष्टोत्पत्तीस येत असला तरी त्याचा बाकीचा भाग त्या पातळीच्या खालीं असून त्याच्या आधारावरच वरचा भाग दिसत असतो. त्याप्रमाणें सूक्ष्मसृष्टीच्या आधारावरच स्थूलसृष्टि प्रत्ययास येत असून या सृष्टीतील प्रत्येक अणूरेणू हा परस्पराश्रयी आहे असें भगवंतांचें म्हणणें आहे. सृष्टीविषयीचा हाच दृष्टिकोन निर्माण करण्याची आज तत्त्वज्ञांना आवश्यकता वाटू लागलेली आहे. या परस्पराश्रयी विश्वव्यापाराच्या मुळाशीं चैतन्यमय इच्छाशक्तीची प्रेरणा अथवा ईश्वरी प्रेरणेचा आधार आहे असें सांगून श्रीगीतेनें विश्वघटनांच्या व विश्वव्यापाराच्या नियमबद्धतेचें तर्कशुद्ध स्पष्टीकरण दिलेलें आहे.

(११) गीताकारांनीं व्यक्ति हाच विचाराचा, क्रियांचा व आंदोलनांचा आरंभबिंदू आहे हें ओळखलें. पण व्यक्तिमात्राच्या अस्मितेला विश्वात्म बनवून आपपर भावाचें बंड पार मोडून टाकलें. विश्वातील अणूरेणूंसुद्धां चैतन्यमय असून महाचैतन्यसागरांत विलीन होणें अथवा हेंच दुसऱ्या नेहमींच्या परिचयाच्या शब्दांत सांगावयाचें तर नरानें नारायण, जीवानें परमात्मा, अस्मितेनें विश्वात्म होणें हेंच मानवी जीविताचें परमसाध्य म्हणून भगवंतांनीं सांगितलें आहे. परिपूर्ण जीवनाच्या या ध्येयदर्शनानें गीताकारांनीं मानवांत उदात्त आशावाद निर्माण करून संकुचित व्यक्तिवादांतून उत्पन्न होणाऱ्या शोषक प्रवृत्तीला पायबंद घातला.

(१२) सर्व द्वंद्वातीत व अखंड मांगल्याचा वर्षाव करणारी साम्यावस्था अथवा ब्राह्मी स्थिति साधणें ही गोष्ट कांहीं ताबडतोब साधणारी नव्हे. भगवंतांनीं पुनर्जन्मवादानें जीवनसातत्याची कल्पना देऊन निराशावाद घालविला व वर्तमानाची भविष्याशीं सांगड घालून दिली. इतकेंच नव्हें तर कल्याणमार्गाच्या पथिकाला अधःपतन नाहीं (न हि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति) अनेक जन्म अविरत प्रयत्न करून अखेरीस ही पूर्णावस्था प्राप्त होते ( अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ) व या जन्मांत अस्मितेच्या विकसनाच्या उद्देशानें जें जें सत्कर्म झालें असेल तें तें

पुढें चालविण्यासाठीं व त्यायोगें पूर्णावस्था प्राप्त होण्यासाठीं आवश्यक ती प्रेरणा पुन्हां दुसऱ्या जन्मांतही मी देतों (तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्) असें सांगून सद्वर्तन, नीति व नीति मूल्यें यांचा पाया स्थिरपद केला.

(१३) कर्मवादाच्या आश्रयानें भगवंतांनीं मनुष्याच्या कर्माचा व फलाचा उत्तरदायी मनुष्यच आहे असें सांगून सत्कर्माची व तीही आंतरिक स्फुरणांतून जन्म पावणाऱ्या सत्कर्माची प्रेरणा दिली.

(१४) 'वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता' ज्याची इंद्रियें स्वाधीन तोच स्थितप्रज्ञ' असें सांगून पशुभावाच्या विनाशाच्या मार्गाचें भगवंतांनीं स्पष्ट शब्दांत दिग्दर्शन केलें.

(१५) उच्चतम शास्त्रीय तत्त्वज्ञान व मानवतेच्या शाश्वत कल्याणाचा मार्ग सांगूनहि शेवटीं "विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु" 'मी जें कांहीं तुला सांगितलें आहे त्याचा पूर्णपणें विचार करून तुला जें योग्य वाटेल तसेंच तूं वाग असें सांगून श्रीकृष्णांनीं अत्याचार, दडपण व खड्ग हे विचारप्रणालीच्या प्रसाराचे मार्ग असूं शकत नाहींत, हृदयपरिवर्तन हाच एकमात्र त्याचा मार्ग होय हें दिग्दर्शित केलें.

(१६) पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या तत्त्वज्ञानाचें फलित काय ? त्यांना काय उत्पन्न करावयाचें आहे ? त्यागी, संयमी, समबुद्धीचा, विश्वात्मभावनेचा, स्थिरचरविश्वाच्या तत्त्वज्ञानाचें पूर्णपणें आकलन झालेला, शुद्धबुद्धीचा, द्वंद्वातीत, दयामय, भूतमात्रांविषयीं कळकळ असलेला कर्तव्यनिष्ठ असा महान् कर्मयोगी उत्पन्न होणें हें या तत्त्वज्ञानाचें फलित आहे व असा सामर्थ्यसंपन्न कर्मयोगी पूर्ण पुरुषच आजचे मानवतेचे प्रश्न सोडवूं शकतो.

जगांतील साऱ्या कलहाचें, शोषणाचें व रक्तपाताचें मूळ मानवी अंत:करणांतील संकुचित व्यक्तिवादांत व पशुतेंत दडलेलें आहे. यंत्रयुगानें मानवतेवर मोठी आपत्ति आणली असें म्हणण्याची अलीकडे एक फॅशन पडलेली आहे. वस्तुतः जी आपत्ति आली ती

यंत्रयुगानें आणलेली नसून ती यंत्रयुगानें अधिक भव्य झाली, तिचें क्षेत्र वाढलें इतकेंच. यंत्रयुगानें कोणती नवी आपत्ति मानवतेवर आणलेली आहे? यंत्रयुगापूर्वी मनुष्य हिंसा करीत नव्हता व आतां तो नव्यानें करूं लागलेला आहे असें कोणास तरी दाखवून देतां येईल काय? यंत्रयुगापूर्वी मनुष्यांत शोषणप्रवृत्ति नव्हती व आतां ती नव्यानेंच उत्पन्न झाली आहे असें कोणास तरी म्हणतां येईल काय? यंत्रयुगापूर्वींच्या माणसांत स्वार्थ नव्हता व आतां तो यंत्रयुगानें नव्यानें उत्पन्न केला आहे असें एखाद्या वेड्याविना कोणीही म्हणूं शकणार नाहीं. तात्पर्य मनुष्य तोच आहे. कलह, शोषण, अत्याचार इत्यादि गोष्टी पूर्वी जशा होत होत्या तशाच त्या आजही होत आहेत. यंत्रानें या गोष्टींची फक्त गति व मर्यादा वाढविली. अश्मयुग, लोहयुग इत्यादि बदलत्या वस्तुस्थितींत हिंसेचीं साधनें जशी अणुकुचीदार दगडांपासून खड्गापर्यंत व भाला आणि बाण यांपासून तोफा-बंदुकांपर्यंत बदललीं, त्याप्रमाणें नव्या विज्ञानानें अणुशक्तीला हिंसेसाठीं राबविलें. पण या साऱ्या साधनांचा वापर ज्या आंतरिक प्रेरणेमुळें मुळांत करतात त्या आंतरिक प्रेरणेंत काय बदल पडलेला आहे? नापाम बॉंबनें दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या क्रौर्याची जात व गोविंदसिंहाचीं मुलें भिंतीत चिणून ठार मारतांना दृष्टोत्पत्तीस आलेल्या क्रौर्याची जात यांत कांही फरक आहे काय? कुळांना लुबाडणारे जुने सावकार व नवीन भांडवलदार यांच्या वृत्तीत काय भिन्नता आहे? तात्पर्य, यंत्रयुगानें मानवतेवर कोणतीही नवी आपत्ति आणलेली नसून होती तीच आपत्ति केवळ व्यापक केली. त्यामुळें यंत्रयुगाच्या नांवानें बोटें मोडून नव्या योजना कोणी कितीही सांगितल्या तरीही ती आपत्ति जाणारी नसून ती फार तर आणखी वेगळें नवें स्वरूप धारण करील. त्यामुळें आजच्या प्रश्नांचा व संघर्षाचा करण्यांत येणारा उलगडा व त्यावर सुचविण्यांत येणाऱ्या उपाययोजना या केवळ वरवरच्या व चुकीच्या ठरतात. रोग्याचें मुळांत बिघडलेलें रक्त शुद्ध करण्याची जोंपर्यंत उपाययोजना होत नाहीं तोंपर्यंत वरच्या फोडावर कितीही मलमपट्टी केली तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. यंत्र

व सामर्थ्य मुळांत वाईटही नाहीं व चांगलेंही नाहीं. त्याचा उपयोग करणारीं माणसें व त्यांचीं अंतःकरणें यांवर त्यांचा चांगले-वाईटपणा अवलंबून आहे. श्रीमन्महाभारतांत यासंबंधानें एका अत्यंत उद्बोधक गोष्ट आलेली आहे. दुर्योधनाच्या व स्वतःच्या पित्याच्या वधाचा सूड घेण्यासाठीं अश्वत्थाम्यानें पांडवांच्या शिबिरांत शिरून रात्री कृतवर्मा व कृपाचार्य यांच्या साहाय्यानें पांडवांच्या सर्व साहाय्यकांना व त्यांच्या मुलांना ठार मारलें. सकाळीं तो प्रकार लक्षांत येतांच कृष्णार्जुनांनीं अश्वत्थाम्याचा पाठलाग केला. त्या वेळीं अश्वत्थामा व्यासांच्या आश्रमांत होता. त्यानें पांडव येत असलेले पाहून अर्जुनावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. तो प्रयोग करताना रागानें 'पांडवांचा सर्वनाश होवो' असा संकल्प करून त्यानें तो प्रयोग केला. नंतर श्रीकृष्णांच्या सूचनेवरून अर्जुनानें त्याच अस्त्राचा प्रयोग केला. पण अर्जुनाचा संकल्प वेगळा होता. अश्वत्थाम्याचा संकल्प व अर्जुनाचा संकल्प यांचें वर्णन करतांना महाभारतकार म्हणतात, ( सौप्तिकपर्व अ. १३–५१ व अ. १४–५, ६). " रागानें पांडवांचा सर्वनाश होवो असें म्हणून अश्वत्थाम्यानें अस्त्रप्रयोग केला. पण अर्जुनानें मात्र प्रथम आचार्यपुत्र अश्वत्थामा, नंतर आपण स्वतः व सर्व बंधु यांचें कल्याण होवो असें म्हणून व देवता, गुरु यांना नमस्कार करून अस्त्रानें फक्त अस्त्राचा नाश होवो असा संकल्प केला." पुढें अर्जुनानें आपलें अस्त्र आवरून टाकल्यावर व्यास अश्वत्थाम्याला अस्त्राचा उपसंहार करण्याविषयीं सांगूं लागले. पण तो म्हणाला कीं, 'माझा रागच गेला नाहीं तर मी अस्त्र कसें आवरणार ?' त्या वेळीं व्यास अश्वत्थाम्याला असें म्हणाले कीं, तुझा धिक्कार असो. अर्जुन तुझ्याइतकाच ब्रह्मास्त्रज्ञ असूनसुद्धां त्यानें ( सौप्तिकपर्व अ. १५–२३ व २४). " ज्या ठिकाणीं ब्रह्मास्त्राचा दुसऱ्या अस्त्रानें नाश होतो, तेथें बारा वर्षेंपर्यंत कोरडा दुष्काळ पडतो हें ओळखून प्रजांचें हित व्हावें ह्या एकाच इच्छेनें व तुझेंही रक्षण व्हावें म्हणून आपलें अस्त्र आवरलें आहे. तुला मात्र तें करतां आलें नाहीं." केवळ अर्ध्या मुहूर्तांत साऱ्या कौरवांचा संहार करूं शक-

णारें महान् पाशुपतास्त्र अर्जुनाजवळ होतें. पण मानवी मर्यादा सोडून अमानुष शक्तीनीं भीषण नरमेध करणें त्याला योग्य वाटलें नाहीं. साऱ्या युद्धांत एकदांही त्यानें पाशुपत वापरलें नाहीं." आजही अमेरिकेसारख्या नापाम बॉंब व अणुबॉंबचा उपयोग करणाऱ्या राष्ट्राला उद्देशून कोणी असेंच म्हणू शकणार नाही काय? अश्वत्थामा व अर्जुन हे दोघेही ब्रह्मास्त्रज्ञ असले तरी दोघांच्याही अंतःकरणांतील धारणेच्या फरकामुळें त्यांच्या वर्तनांत फरक घडून आलेला आहे. विपत्ति आली ती ब्रह्मास्त्रामुळें आली असें समजून ब्रह्मास्त्रच नको असें म्हणणें जितकें वेडगळपणाचें होईल इतकेंच आजची आपत्ति यंत्रयुगामुळें आली म्हणून यंत्रावर बहिष्कार टाका हें म्हणणेंही वेडगळपणाचेंच आहे. आपत्तीचें मूळ यंत्रयुगांत नसून संकुचित व्यक्तिवाद व पशुभाव यांत आहे. गीतेनें त्यावरच बरोबर प्रहार केला आहे. पशुभावविरहित व विश्वात्मवादी मनुष्य निर्माण करण्याची गीतेची घोषणा हीच आजच्या समस्येवरील शाश्वत उत्तर होय. हा प्रश्न अनादिकालापासूनचा आहे व त्याचें उत्तरही शाश्वत आहे. भगवंतांच्या आदेशानुरूप अंतःकरणाची धारणा बदलविली तर आजचें यंत्रयुग बाधणार तर नाहींच, पण तें आजच्याप्रमाणें मानवतेचा अभिशाप न ठरतां अर्जुनाच्या ब्रह्मास्त्राप्रमाणें अथवा श्रीरामचद्रांच्या महान् सामर्थ्याप्रमाणें मानवतेचा अभिलषणीय अलंकार ठरेल. गीता सर्व प्रकारच्याच पशुतेच्या विरोधी असल्यामुळें त्या पशुतेचें एक अंग असलेल्या आर्थिक शोषणाच्या तरी ती अनुकल कशी राहणार? किंबहुना या बाबतींत भगवंतांची तर अशी स्पष्ट घोषणा आहे कीं,

भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ।

"जे केवळ स्वतःचेंच सुख पाहण्याकडे लक्ष देतात ते लोक प्रत्यक्ष पाप खातात. ते केवळ पापात्मे होत." याहून अधिक कडक भाषा कोण वापरूं शकणार? पण आर्थिक शोषण बंद पाडावयाचा उपायसुद्धां पशुभावाच्या निखंदनावांचून दुसरा नाहीं हें गीतेच्या टीकाकारांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. असो.

पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या तत्त्वज्ञानानुसार नवमानवतेची पुनर्रचना पुढील तत्त्वावर करावयास हवी : (१) जगण्याचा प्रत्येकाला हक्क असल्यामुळें मानव जगलाच पाहिजे, व त्या दृष्टीनें मानवांतील पशुतेच्या गरजांच्या उपशमाची व्यवस्था कोणत्याही पुनर्रचनेच्या योजनेंत असलीच पाहिजे. शरीर हेंच लोकहिताचें साधन असल्यामुळें तें जगणें अवश्यच आहे. भुकेच्या आगीनें धर्म व संस्कृतीच्या वेलीसुद्धां करपल्याविना राहात नाहींत. ही व्यवस्था बदलत्या उत्पादनसाधनांच्या अनुसार बदलती राहील. तिची एक कोणतीही पोलादी चौकट असूं शकत नाहीं. आहार, निद्रा व विहार या पशुतेच्या सामान्य गरजा होत. (२) मानव हा पशूहून ज्ञानशक्तीच्या बाबतींत वेगळा असल्यामुळें त्याच्या जशा पशुतेच्या गरजा असतात, तशाच कांहीं मानवी गरजाही असतात. साम्यवादानें पशुतेच्या गरजांचें अवास्तव स्तोम माजवून मानवी गरजांकडे पूर्ण दुर्लक्ष केलें आहे. या मानवी गरजा म्हणजे इच्छास्वातंत्र्य, कर्मस्वातंत्र्य, व व्यक्तिस्वातंत्र्य यांत सामान्यतः ज्या गोष्टी येतात त्यांचा अंतर्भाव होतो. नव्या व्यवस्थेंत या गरजांच्या उपशमाला स्थान असलेंच पाहिजे. 'यथेच्छसि तथा कुरु' हें सांगण्यांत भगवंतांनीं हें मान्य केलें आहे. (३) पण येवढ्यानें प्रश्न सुटत नाहीं हें आपण पाहिलेंच. त्यामुळें पशुत्व व मानवता यांच्या पाशांतून मुक्त होऊन मानवी जीवनाचें देवजीवनांत रूपांतर करावयाची प्रत्यक्ष योजना व त्या दृष्टीनें शिक्षण संस्कारादिकांची पुनर्रचना करणें आवश्यक आहे. त्याला आवश्यक असलेलें तत्त्वज्ञान तदनुसार उत्पन्न होणाऱ्या महामानवाचें स्वरूप व त्याची प्रत्यक्ष योजना भगवंतांच्या शब्दांत आपण पाहिली आहे.

पूर्णावतार भगवान् श्रीकृष्ण ज्या राष्ट्रांत उत्पन्न झाले व ज्या भूमीवर उभे राहून शाश्वत कल्याणाचा मार्ग त्यांनीं अखिल मानवतेला दाखविला त्या परंपरेचे आजचे आम्ही वारसदार आहोंत. त्या दृष्टीनें विचार केला तर भारतीय राष्ट्र या दृष्टीनें मानवतेचें देवजीवनांत रूपांतर करण्यासाठीं झटणें, सर्वांत आधीं तें जीवन स्वतःत व राष्ट्रांत उत्पन्न करणें व नंतर समर्थ राष्ट्र म्हणून अखिल

मानवतेंत तें उत्पन्न करण्यासाठीं तद्विरोधक बाह्य व आंतर आसुरी शक्तींशीं झगडा करणें हें आमचें ध्येय होय. श्रीकृष्ण हे या राष्ट्राचे द्रष्टे पुरुष होत व गीता हा आमच्या राष्ट्राचा घोषग्रंथ होय. ज्या विशिष्ट दृष्टिकोनांतून आजचें आमचें म्हणजेच मानवतेचें जीवन उजळणारा नंदादीप म्हणून तत्त्वज्ञ श्रीकृष्णांचें दर्शन मला घडवावयाचें होतें तें हें असें आहे. पूर्णावतार श्रीकृष्णांच्या जीवनाच्या आणखी एका पैलूकडे वळून आपण इतके दिवस चालू असलेल्या व्याख्यानमालेचा उपसंहार करूं.

# उपसंहार

विख्यात जर्मन तत्त्वज्ञ कॉंट यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, नीतिशास्त्रवेत्त्यांनीं लोकांना समजण्यासाठीं म्हणून परिपूर्ण नीतितत्त्वालाच पुरुषाचा परिवेष चढविलेला आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत असा कोणी पुरुष राहूंच शकत नाहीं. पण हें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं. असे पूर्ण पुरुष भगवान् श्रीकृष्ण होते. मानवी अपूर्णतेच्या सर्वस्वी वर अशी त्यांची अवस्था होती. मागच्या व्याख्यानांत देवजीवनाचें जें वर्णन आहे, तें त्यांच्या ठिकाणीं पूर्णपणें प्रकट झालेलें होतें. त्यांची सुखदुःखातीत, मानापमानातीत, निर्मम आणि अहंकर्तृत्व व अहंभोक्तृत्व याहून अतीत असलेली निर्विशेष साम्यावस्था आपण मागच्या कित्येक व्याख्यानांतून पाहिलीच आहे. त्यांचा भाचा अभिमन्यु याच्यावर त्यांचें सर्वांत अधिक प्रेम होतें. पण अभिमन्यूचा वध झाल्यावर त्या अत्यंत करुणास्पद घटनेनें ज्यांच्या अंतःकरणावर अणुमात्रसुद्धां परिणाम झाला नाहीं असे केवळ एकटे भगवान् श्रीकृष्णच होते. गीतेच्या उपदेशानंतर मोह नष्ट झाल्याचें सांगणारा पार्थ या घटनेनें शोकाकुल होऊन त्याची पुत्रमोहानें अतिशय शोचनीय अवस्था झाली होती. वास्तविक श्रीकृष्णांचें इतरांनीं समाधान करावें अशी अवस्था असतां शोकातीत श्रीकृष्णांनींच उलट अर्जुनाचें व इतर सर्वांचें समाधान केलें. भगवन्तांच्या शोकातीत ज्ञानमयतेचें वर्णन करतांना महाभारतकार म्हणतात ( द्रोणपर्व अ. ७२—६५ ते ६७ व ७२ ते ७४ ) कीं,—

"अश्रूंनीं डवरलेल्या नेत्रांनीं तोच तो विचार करीत असलेल्या शोकपीडित अर्जुनाला आवरून श्रीकृष्ण त्याला म्हणाले कीं, असा शोक करणें तुला योग्य नाहीं. युद्ध हेंच कर्तव्य असलेल्या व समरांगणांत शत्रूंना कधींही पाठ न दाखविणाऱ्या शूरांचा हा ठरलेलाच मार्ग आहे. हे पुरुषव्याघ्रा, क्षत्रियांनीं रणांगणांत देह ठेवावा हा

---

व्याख्यान २८ वें दि. २६—४—५२

त्यांचा शाश्वतधर्म धर्मवेत्त्यांनीं पूर्वींच निश्चित केलेला आहे. मनुष्यजन्मांत येऊन जें ज्ञान मिळविणें आवश्यक असतें तें तूं पूर्वींच मिळविलेलें आहेस (भगवद्‌गीतेच्या रूपानें). आतां तुला शोक करणें मुळींच शोभत नाहीं." त्यांच्या ज्ञानमय शोकातीततेच्या खऱ्या परीक्षेचा प्रसंग यापुढेच आहे. द्रौपदी, सुभद्रा, विशेषतः तरुण अभिमन्यूची पत्नी उत्तरा यांचें समाधान कसें करावयाचें हा मोठाच प्रश्न होता. शोकाकुल पार्थानें भगवान् श्रीकृष्णांवरच ती कामगिरी सोपविली. पण ज्ञानमय भगवंतांनी किंचित्‌ही आढेवेढे न घेतां ती कामगिरी सहजपणें पार पाडली आहे.

भगवान् श्रीकृष्ण हे सर्व प्रकारच्या द्वंद्वमयतेच्या अतीत होते. ब्रह्माची साम्यावस्था श्रीकृष्णांच्या रूपानेंच अभिव्यक्त झाली आहे असें दिसतें. त्यांच्या जीवनाचें सूत्र ध्यानांत यावयास बुद्धिमंतांना देखील अडचण पडते. मनुष्यांत देवजीवन उत्पन्न करणें हा धर्म, त्याला येणारे अडथळे व तद्विरोधी प्रवाह हाच अधर्म, ते नष्ट करणें हें अवतारकार्य व हें कार्य पार पाडण्यासाठीं शठे शाठ्यं, अथवा कटकं कंटकेनैव, या मार्गाचा विषम परिस्थितींत अवलंब आवश्यक म्हणून तदनुसार घडणारें सर्व आचरण धर्म्य हें त्यांच्या लौकिक जीवनाचें स्वरूप आहे. पण या लौकिकतेंत जी विश्वात्म, सर्वभूतहितरत, निर्मम, निरहंकार, द्वंद्वातीत व केवळ कर्तव्याकरितां कर्तव्य ही भावविकारातीत धारणा भरून राहिलेली आहे तिच्यांत त्यांचें पूर्णावतारत्व प्रकट झालें आहे. कर्तव्याकरितां कर्तव्य या त्यांच्या धर्मस्थापनेच्या जीवनसूत्राआड कंस, जरासंध, दुर्योधनादि लोक आल्यावर त्यांना त्यांनीं जितक्या स्थिर अंतःकरणानें ठार मारलें इतक्याच स्थिर अंतःकरणानें प्रभास क्षेत्रावर त्यांनीं उन्मत्त व अधार्मिक बनलेल्या स्वकीय यादवांचा, इतकेंच नव्हे तर स्वतः-च्या मुलांचाही संहार केला. फार काय पण धर्मस्थापनेचें साधन-यंत्र म्हणून वापरलेल्या आपल्या शरीराचाही त्यांनीं साध्यसिद्धी-नंतर परित्याग केलेला आहे. परमेश्वराच्या अवतारांत सुद्धां हा आविष्कार श्रीकृष्ण सोडून इतरत्र नाहीं. म्हणूनच श्रीमद् भाग-

व्रतकारांनीं "एते चांशकलाः पुंसः कृष्णस्तु भगवान् स्वयम्" बाकी सारे अंशावतार असून श्रीकृष्ण मात्र पूर्णावतार होत असा आपला अभिप्राय प्रकट केला आहे व तो अत्यंत यथार्थ आहे. यादवांचें साधनयंत्र अधार्मिक कां बनलें असेल ?

## यादवांच्या विनाशाचीं कारणें

भगवान् श्रीकृष्णांच्या धर्मस्थापनेच्या कार्याचीं यादव व पांडव हीं दोन प्रमुख साधनयंत्रें होतीं याचा उल्लेख मी मागें केलाच आहे. यांपैकीं कौरवांच्या विनाशानंतर पांडवांच्या पराक्रमाचें साधनयंत्र युधिष्ठिरासारख्या धर्ममूर्तीच्या अधीन असल्यामुळें त्यांच्याकडे क्षणोक्षणीं लक्ष देण्याचें कारण नव्हतें. यादवांच्या साधनयंत्राचा उपयोग करून भगवान् श्रीकृष्णांनीं सर्व दूषित व पतित राजसत्तांचा अंत घडवून आणला आणि धर्मस्थापनेच्या मार्गांतील अडथळा दूर केला. दोन्ही साधनयंत्रांच्या कार्याची परिसमाप्ति कौरवांच्या विनाशानंतर युधिष्ठिराच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या धर्मसाम्राज्यानें झाली. भारतीय राष्ट्र आपल्या यशानें, वैभवानें व पराक्रमानें तळपून उठलें. राष्ट्राच्या बलसंपन्नतेंत त्याची सुरक्षितता असते. युधिष्ठिराच्या सामर्थ्याचा धाक सर्व राजसत्तांना कसा वाटत असे याचें प्रत्यंतर अश्वमेध यज्ञाच्या वेळीं अर्जुनानें जो संचार केला त्या वेळीं दिसून आलें. पण यादव गणराज्याला पांडवसत्तेचा तो धाक वाटण्याचें कारण नव्हतें. त्यांच्या गणराज्याच्या नेत्याच्या कर्तृत्वानें व इच्छेनेंच हें नवें धर्मराज्य स्थापन झालेलें आहे याची त्यांना पूर्ण कल्पना होती. श्रीकृष्णांचें सामर्थ्य हेंच या राज्याचेंही खरें सामर्थ्य होतें. तात्पर्य, कार्य संपलेलें, सर्वश्रेष्ठ सामर्थ्य प्राप्त झालेलें, शत्रू कोणीही उरला नसलेलें, वैभवश्रीनें तळपत असलेलें असें हें यादवांचें गणराज्य झालें. अशा अवस्थेंत असलेल्या राष्ट्रांत नेहमी दोन अवस्था उत्पन्न होत असतात. एक तर ऐहिक इतिकर्तव्य संपल्यामुळें अशा राष्ट्रांतील विवेकी लोक आत्मनात्मविचाराकडे वळून त्यांच्यांत श्रेष्ठ अध्यात्मशास्त्र उत्पन्न होतें. पण ही गोष्ट कांहीं विवेकी लोकां-

पुरतीच असते. दुसरे सर्वसामान्य धारणेचे लोक कमालीचे अकर्मण्य व भोगसुखाधीन होऊन त्यांच्या सर्वांगीण पतनाला प्रारंभ होत असतो. यादवांच्या गणराज्यांतही हे दोन प्रवाह स्पष्टपणें दिसूं लागले होते. छत्तीस वर्षे युधिष्ठिराचें राज्य होतें. कौरवांच्या विनाशानंतर छत्तीस वर्षें सर्वत्र शांतता नांदली व या काळच्या उत्तरार्धांत हीं पतनाचीं बीजें भगवान् श्रीकृष्णांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागलीं.

भारतीय राजसत्ता ही मुळांत स्वयंभू व अनियंत्रित नसून ती घटनेनेंच धर्म व तपस्वी जीवन यांनीं नियंत्रित केलेली आहे, याचें विस्तृत विवेचन मी 'महाभारतावरील व्याख्यानें' या माझ्या ग्रंथांत व या व्याख्यानमालेंतही पूर्वी केलेलेंच आहे. या नियंत्रणाला उडवून व तेंही पाशवी सामर्थ्याच्या भरंवशावर उडवून लावण्याची प्रवृत्ति सत्तेंत उत्पन्न झाली कीं तिचा खरा अधःपात सुरू होतो. शहाणपणाची, त्यागाची, विद्वत्तेची, तपस्येची व अंतःकरणाच्या उच्च धारणांची टवाळी व हेटाळणी करण्याची प्रवृत्ति सत्तेंत उत्पन्न झाली, व ती शील, चारित्र्य आणि नीतिमत्ता यांचा उन्मत्तपणानें अधिक्षेप करूं लागली कीं पाशवी बल हाच मानवतेचा निर्बंध ठरून सत्तेच्या व तिच्या द्वारा सर्व मानवतेच्या पतनास प्रारंभ होत असतो. यादवांच्या ठिकाणीं ही प्रवृत्ति स्पष्टपणें दिसूं लागली. जे जीवनाच्या मूल्याचे व धर्माचे संरक्षक होते तेच भोगसुखासीन व त्या मूल्यांचे भक्षक बनले ! त्यांना आवरणारें श्रीकृष्णाविना दुसरें कोणीही नव्हतें. भगवंतांना स्वतः प्रद्युम्नच एकदां 'या तपस्व्यांचा मान आम्ही सामर्थ्यवंतांनीं कां राखावा ' असें विचारूं लागल्याचें महाभारतांत वर्णन आहे. साधन हें खड्गासारखें आहे. तें एखाद्या अतिमानवाच्या हातांत पडलें तर जसें जगाचें उद्धारक ठरेल तसेंच तें अनियंत्रित झालें व पापात्म्यांच्या हातांत पडलें तर विनाशकही ठरेल. श्रीरामचंद्रांचे सैनिक म्हणून ज्या वानरांनीं रावणी आक्रमणाचें निखंदन करून धर्माची प्रतिष्ठापना केली तींच वानरकुळें श्रीकृष्णांच्या काळांत कंस-जरासंधाशीं सख्य करून अधार्मिक अत्याचार करूं लागल्यामुळें श्रीकृष्णांना त्यांचा संहार

करावा लागला असा उल्लेख आहे. तशीच परिस्थिति यादवांच्याही संबंधांत होईल असें श्रीकृष्णांना स्पष्ट दिसत होतें. ज्यांच्या सामर्थ्याला कोणी विरोध करूं शकणारा उरलाच नाहीं, त्या या लोकांकडून, आपण जातांच होणाऱ्या मानवतेच्या विनाशाचें चित्र श्रीकृष्णांना स्पष्ट दिसूं लागलें. इतकेंच नव्हे तर तज्ज्ञांनीं उन्मत्त यादवप्रमुखांना तसें सूचितही केलें. श्रीमद्‌भागवतकारांनीं भगवान् श्रीकृष्णांच्या अंत:करणांतील विचार त्यांच्याच शब्दांत व्यक्त केले आहेत. त्यांचें अवतारकार्य संपलें असल्याचें ब्रह्मदेवानें त्यांना सूचित केलें असतां, तें अजून संपलें नसल्याचें ब्रह्मदेवाला सांगतांना श्रीकृष्ण म्हणतात:

**अवधारितमेतन्मे यदात्थ विबुधेश्वर ।**
**कृतं वः कार्यमखिलं भूमेर्भारोऽवतारितः ॥ २८**
**तदिदं यादवकुलं वीर्यशौर्यश्रियोद्धतम् ।**
**लोकं जिघृक्षद् रुद्धं मे वेलयेव महार्णवः ॥ २९**
**यद्यसंहृत्य दृप्तानां यदूनां विपुलं कुलम् ।**
**गन्तास्म्यनेन लोकोऽयमुद्वेलेन विनङ्क्ष्यति ॥ ३०**

—श्रीमद् भागवत एकादशस्कंध, अ. ६

"आपण जें सांगितलें तें माझ्या ध्यानांत आलें. भूमीवरचा भार हरण करून तुमचें सर्व कार्य मीं पार पाडलें आहे. पण अजून एक महत्त्वाचें कार्य उरलेलें आहे. वीर्य, शौर्य व वैभव यांच्या शिखरास पोहोंचल्यामुळें अत्यंत उन्मत्त झालेलें हें यादव-कुल सर्व मानवतेचा विनाश करील. समुद्राच्या मर्यादेप्रमाणें माझ्या सामर्थ्याच्या प्रभावानें हें कुल अजून नियंत्रणांत आहे. जर या उन्मत्त यादवांच्या सर्व गणांचा मी संहार न करतां तसाच जगाचा निरोप घेतला तर नियंत्रणरहित होतांच हे उन्मत्त साऱ्या मानवतेचा संहार केल्याविना राहणार नाहींत." म्हणून निर्मम द्वंद्वातीत भगवंतांनीं असुरांच्या संहाराचा घ्यावा इतक्याच सहजतेनें आपल्या कुळाच्या संहाराचाही निर्णय घेतला. विनाशास कारण झालेल्या या पतनाचें चित्र रेखाटतांना महाभारतकार म्हणतात:—

विश्वामित्रं च कण्वं च नारदं च तपोधनम् ।
सारणप्रमुखा वीरा ददृशुर्द्वारकां गतान् ।। १५
ते तान्साम्बं पुरस्कृत्य भूषयित्वा स्त्रियं यथा ।
अब्रुवन्नुपसंगम्य दैवदण्डनिपीडिताः ।। १६
इयं स्त्री पुत्रकामस्य बभ्रोरमिततेजसः ।
ऋषयः साधु जानीत किमियं जनयिष्यति ।। १७
इत्युक्तास्ते तदा राजन् विप्रलंभप्रधर्षिताः ।
प्रत्यब्रुवंस्तान्मुनयो यत्तच्छृणु नराधिप ।। १८
वृष्ण्यन्धकविनाशाय मुसलं घोरमायसम् ।
वासुदेवस्य दायादः साम्बोऽयं जनयिष्यति ।। १९
इत्यब्रुवन्त ते राजन् प्रलब्धास्तैर्दुरात्मभिः ।
मुनयः क्रोधताम्राक्षाः समीक्ष्याथ परस्परम् ।। २२
तथोक्त्वा मुनयस्ते तु ततः केशवमभ्ययुः ।
अथाब्रवीत्तदा वृष्णीन् श्रुत्वैवं मधुसूदनः ।। २३
अन्ततो मतिमांस्तस्य भवितव्यं तथेति तान् ।

—महाभारत, मौसलपर्व, अ. १

“ एकदां विश्वामित्र, कण्व व तपोधन नारद हे ऋषि द्वारकेंत आले असतां सारणप्रमुख वीरांच्या मनांत त्यांच्या तपस्येची व ज्ञानाची थट्टा करावी असें आलें. दैवानें बुद्धिभ्रष्ट झालेल्या त्या दुरात्म्यांनीं श्रीकृष्णांचा मुलगा जो साम्ब त्याला स्त्रीवेषानें सजविलें व त्या तपोधन ऋषींच्या जवळ जाऊन त्यांना ते म्हणूं लागले कीं, ‘ही अक्रूराची पत्नी असून गरोदर आहे. तिला पुत्र व्हावा अशी फार इच्छा आहे. तरी हिला काय होईल तें सांगा.’ ही भलतीच थट्टा पाहून त्या तपोधन ऋषींना अत्यंत राग आला व त्यांनीं उत्तर दिलें कीं, ‘हा वासुदेवाचा पुत्र साम्ब एका घोर पोलादी मुसळाला जन्म देईल व तें मुसळ साऱ्या वृष्णी व अन्धक कुळांचा नाश करील.’ याप्रमाणें त्या दुरात्म्यांना सांगून ते ऋषि भगवान् श्रीकृष्णांच्या कडे गेले. तो सर्व शापाचा वृत्तान्त ऐकून दीर्घदर्शी श्रीकृष्णांनीं ‘असेंच ठरलेलें भवितव्य आहे’ असे उद्गार काढले.”

मुसळ कसचें ! उन्मत्तता व भोगसुखासीनता यामुळें भंग पावलेली गणांची एकसंधता व श्रीकृष्णांनीं त्यांच्या अंताचा घेतलेला निर्णय हेंच तें विनाशक मुसळ होय. ज्या कारणासाठीं केशी, कंस, जरासंध यांच्या विनाशाचा श्रीकृष्णांनीं निर्णय घेतला होता त्याच कारणांसाठीं त्यांनीं आपल्या कुळाच्या विनाशाचाही निर्णय घेतला. तपोधन ऋषींचा शाप व मुसळ खरें मानलें तरी, हा शाप खोटा करण्याचें सामर्थ्य हवें तेव्हां विश्वरूप प्रकट करणाऱ्या व अश्वत्थाम्याचें ब्रह्मास्त्र लटकें पाडून मेलेल्या परीक्षितीला जीवदान देणाऱ्या श्रीकृष्णांमध्यें नव्हतें असें नाहीं. प्रत्यक्ष त्यांचे वडील वसुदेवच म्हणतात :—

केशिनं यस्तु कंसं च विक्रम्य जगतः प्रभुः ।
विदेहावकरोत् पार्थ चैद्यं च बलगर्वितम् ।
नैषादिमेकलव्यं च चक्रे कालिंगमागधान् ॥ ११
सोऽभ्युपेक्षितवानेतमनयान्मधुसूदनः ।
त्वं हितं नारदश्चैव मुनयश्च सनातनम् ॥ १३
गोविन्दमनघं देवमभिजानीध्वमच्युतम् ।
प्रत्यपश्यच्च स विभुर्ज्ञातिक्षयमधोक्षजः ॥ १४
प्रत्यक्षं भवतश्चापि तव पौत्रः परंतप ॥ १६
अश्वत्थाम्ना हतश्चापि जीवितस्तस्य तेजसा ।
इमांस्तु नैच्छत्स्वान्ज्ञातीन् रक्षितुं च सखा तव ॥ १७

—महाभारत मौसल पर्व अ. ६

" हे पार्था ! ज्यानें आपल्या पराक्रमानें केशी, कंस, बलोन्मत्त शिशुपाल, निषादराज एकलव्य व कलिंग, मागध इत्यादिकांना यमसदनास पाठविलें त्यानें त्याच कारणास्तव नीतिविरोधी वर्तणूक व उन्मत्तता पाहून आपल्या कुळाच्या होत असलेल्या विनाशाकडेही दुर्लक्ष केलें. तूं, नारद व ऋषिलोक श्रीकृष्णांचें यथार्थ स्वरूप ओळखतां. तुझा नातु अश्वत्थाम्यानें ठार मारला असतां देखील आपल्या सामर्थ्यानें ज्यानें त्यास जिवंत केलें त्यानेंच आपल्या डोळ्यांसमोर आपल्या कुळाचा होत असलेला विध्वंस

पाहिला. या कुळाचें संरक्षण करण्याची त्याची इच्छाच नव्हती." आणि ती इच्छा कशी असेल ! नुसत्या ऋषींच्या केलेल्या एका वेळच्या अपमानाला प्रमाद म्हणतां येईल. पण उन्मत्त यादवांचें पतन इतक्या झपाटचानें चालू झालें होतें कीं, प्रमाद ही त्यांची नित्याची संवय होऊन गेली होती. महाभारतकार म्हणतात, (मौसलपर्व, अ. २–१०, ११) "पाप करण्याची यादवांना मुळींच लाज वाटत नव्हती. ते तपस्वी लोक, सन्मान्य कुलवृद्ध, देव व गुरु यांचा भयानक द्वेष करूं लागले होते. पत्नी पतींचा व पति पत्नींचा सहज विश्वासघात करीत. इतक्या पतनानंतर, घटोत्कचाच्या वधाच्या वेळी 'माझें व्यक्तीवर प्रेम नसून धर्मावर प्रेम आहे' असें उद्घोषणारे भगवान् श्रीकृष्ण कसे क्षमा करतील ? अशा राष्ट्रांत तत्त्वज्ञानाकडे वळण्याची जी प्रवृत्ति असते तिचें यादव गणसंघांतील निदर्शन म्हणजे उद्धव होय. यादवगणाचा अधःपात पाहून व त्यांचा विनाश जवळ आलेला आहे हें ओळखून उद्धवानें श्रीकृष्णांचा निरोप घेतला व तो बदरिकाश्रमाला निघून गेला. त्यानंतर श्रीकृष्णांनी गणांचा संहार घडवून आणण्याच्या इच्छेनें (मौसलपर्व अ. २–२३, २४) "तीर्थयात्रेची कल्पना काढली व त्यांच्या इच्छेनुरूप सर्व यादव प्रभास क्षेत्रावर आले. तीर्थयात्रेच्या ठिकाणीं आल्यानंतर कसें वागावयाचें हें सुद्धां उन्मत्त यादव विसरले होते." महाभारतकार म्हणतात, (मौसलपर्व–अ. ३–१४, १५). "जें अन्न तपस्वी लोकांना देण्यासाठीं म्हणून तयार केलें होतें तें त्यांनीं दारूंत शिजवून वानरांना खावयास दिलें व नंतर नृत्यगायनाच्या कोलाहलांत त्यांनीं यथेच्छ मद्यपान केलें. मद्यानें शुद्धि गेलेल्या स्थितींत ते एकमेकांचेंच उणें काढूं लागले व त्यांत वाद विकोपास जाऊन सात्यकीनें कृतवर्म्याचें डोकें उडविलें." झालें ! तीच खूण समजून त्यानंतर उत्पन्न झालेल्या संघर्षांत स्वतः श्रीकृष्णांनीं भाग घेतला व महाभारतकार म्हणतात,

'स निःशेषं तदा चक्रे शार्ङ्गचक्रगदाधरः ।

'श्रीकृष्णांनीं सर्व यादव गणांचा संहार करून टाकला.' संन्याशालासुद्धां लंगोटीचा मोह सोडवत नाहीं. पण श्रीकृष्णांनीं

साधनाचा सुद्धां मोह दूर सारला. धर्माच्या बलिवेदीवर स्वतःच्या पुत्रांचेंच आपल्या हातानें बलिदान दिल्याचें असें दुसरें उदाहरण जगाच्या पाठीवर तरी सांपडणें शक्य आहे काय ? यादव गणांच्या संहारानंतर आपलें स्वतःचें शरीरही, कार्य पूर्ण झाल्याचें पाहून भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या अनंत शाश्वततेंत विलीन करून टाकलें.

## उपसंहार

गेलीं दोन वर्षें महाभारतावर जी व्याख्यानमाला मी सुरू केली होती ती पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या या अनुचिंतनांत मी समाप्त करीत आहें. दोन वर्षे मी चालविलेल्या वाग्यज्ञाचें हें अवभृथ स्नान आहे असें म्हटलें तरी चालेल. महाभारताचा इतिहास अंतरंग परीक्षणाच्या पद्धतीनें मी या दोन व्याख्यान-मालांतून आपल्यासमोर मांडला. बहिरंग परीक्षणाची पद्धति व तिच्यांतून उत्पन्न होणारें कालादिकासबंधीचे वाद यांच्यांत मी बुद्धयाच शिरलों नाहीं. ते वाद कधींही संपणारे नाहींत; व जीवन उजळण्याच्या दृष्टीनें त्यांतून तादृश कांहीं मिळण्यासारखें नाहीं. दिलेल्या मुदतींत त्या सर्वांचा आढावा घेणेंही शक्य नव्हतें. म्हणूनही मी त्यांत शिरलों नाहीं. तसेंच भारताच्या अंतरंगांत येणाऱ्या सर्व विषयांतही मी शिरलों नाहीं. उदाहरणार्थ निव्वळ महाभारताचें अंतरंगच घेतलें तरी त्यांत भारतीय राज्यशास्त्र, भारतीय राजनीतिशास्त्र, भारतीय युद्धशास्त्र, भारतीय मोक्षशास्त्र, उपासनाशास्त्र, सृष्टिजीवनाचा उलगडा इत्यादि विविध विषयांचे वर्ग पडतात. यांपैकीं प्रत्येक विषयावर स्वतंत्र व्याख्यानमाला देतां येण्यासारखी आहे. ज्या मध्यवर्ती सूत्राभोंवतीं महाभारताची संहिता गुंफण्यांत आलेली आहे तें सूत्र केवळ या दोन व्याख्यानमालां-तून मी आपणांसमोर उलगडण्याचा प्रयत्न केलेला आहे.

महाभारताचा इतिहास म्हणजे नरनारायणांच्या विजयाचा इतिहास असून नर म्हणजे अर्जुन व नारायण म्हणजे भगवान् श्रीकृष्ण होत. या नर-नारायणांनीं अधर्मावर विजय मिळवून

धर्माची प्रतिष्ठापना केली व मानवतेला शाश्वत कल्याणाचा मार्ग दाखवून दिला हें महाभारताचें प्रतिपाद्य आहे. हें मीं माझ्या व्याख्यानमालेच्या प्रारंभींच सांगितलें आहे. ही गोष्ट भगवान् श्रीकृष्णांनींच घडवून आणलेली असल्यामुळें व नर अथवा अर्जुन हे श्रीकृष्णांच्या धर्मस्थापनेच्या कार्यांतील साधनयंत्र असल्यामुळें वस्तुतः भगवान् श्रीकृष्णांचा धर्मसंस्थापनेच्या कार्याचा इतिहास म्हणजेच महाभारताचा इतिहास होय. धर्माची संस्थापना, अधर्माचें विध्वंसन व साधूंचें परित्राण, हें श्रीकृष्णांच्या अवतारकार्याचें स्वरूप होय. मानवतेंत देवजीवन उत्पन्न करणें हा धर्म, त्याला होणारे अडथळे हा अधर्म, द्वंद्वातीत निर्मम भूमिकेवरून ते अडथळे नष्ट करणें हें अवतारकार्य व मानवतेच्या विकसनाचें स्पष्ट दिग्दर्शन हा त्या अवताराचा संदेश असें महाभारताचें इतिहाससूत्र आहे. महाभारतकालीं धर्माचें अधःपतन झालें होतें. पण पतन कळावयास त्याचें शुद्ध स्वरूप समजणें अवश्य आहे. आर्य राष्ट्राच्या व्यक्तिविषयक व समाजविषयक विकसनाच्या अंतिमाचें महर्षि व्यासांच्या प्रतिभेनें महाभारतांतून केलेलें दिग्दर्शन मी माझ्या या विषयावरील पहिल्या व्याख्यानमालेंत सांगितलें आहे. तसेंच महाभारतकालीं आपल्या आदर्शापासून समाज कसा भ्रष्ट झाला होता याचें महर्षि व्यासांनीं व्यक्तिचित्रांच्या रूपानें केलेलें दिग्दर्शनही मी पहिल्या व्याख्यानमालेंतून मांडलेलें आहे. सर्वांचें मूळ जी तपस्वी संस्था तिचें अधःपतन द्रोणांच्या रूपानें महाभारतांत दृष्टोत्पत्तीस येतें, व अश्वत्थाम्याच्या व्यक्तिचित्रानें तें चित्रण पूर्ण होतें. वसिष्ठांची व परशुरामाची तेजस्विता लुप्त होऊन सतीच्या वस्त्रहरणप्रसंगीं लाचारीनें मौन स्वीकारून ब्राह्मण्याला अधम राजसत्तेच्या संरक्षणाची ढाल व्हावें लागलें; इतकेंच नव्हे तर झोपलेल्या लोकांची कत्तल करण्यांत ते पुरुषार्थ मानूं लागले. आर्य राष्ट्राच्या नेतृपदाचीं वस्त्रें ज्यांच्या अंगावर होतीं त्यांचेंच हें अधःपतन सुरू झाल्यानंतर समाजाचा सर्वांगीण अधःपात होऊं लागल्यास त्यांत नवल नाहीं. सम्राट् जरासंधाच्या रूपानें धर्माऐवजीं पाशवी

सामर्थ्य हेंच साम्राज्याचें प्रेरक ठरलें असें त्यांत दाखविलेलें असून धृतराष्ट्र व दुर्योधनांच्या रूपानें राज्यसंस्था अधमपणाच्या अंतिम टोकावर येऊन कुलस्त्रियांच्या अब्रूची देखील तिला चाड कशी राहिली नव्हती हें स्पष्ट केलें आहे. कर्ण, शकुनि व दुःशासन ह्यांच्या रूपानें अमात्यसंस्था कशी पापिष्ठ झाली होती हें महर्षींनीं दाखविलें असून महत्त्वाकांक्षी पुरुष आत्मकेंद्रित व अहंकारी बनला म्हणजे त्याच्या सुद्‌गुणांची माती होऊन त्याचें पतन कसें होतें व तो मानवतेचा भयानक संहारक व राष्ट्राचा विध्वंसक कसा ठरतो हें महारथी कर्णाच्या रूपानें महर्षींनीं दाखविलें आहे. राजर्षि भीष्मांच्यासारखें भव्य जीवन देखील समष्टिनिष्ठेऐवजीं व्यक्तिगत ध्येयनिष्ठेनें व्यापलें असलें तर तें शेवटीं दुराचाऱ्यांचें संरक्षक बनून कसें निर्माल्यवत् होऊन जातें हें महर्षींनीं दाखविलें असून भीष्म, विदुर व गांधारी यांच्या रूपानें सचिवसंस्था कशी दुर्बल झाली होती हें महर्षींनीं स्पष्ट केलें आहे. आत्यंतिक धर्मश्रद्धेतून धर्माच्या हेतूऐवजीं त्याच्या अंगावरच अधिक जोर दिला गेला तर कार्पण्य कसें उत्पन्न होतें हें महाभारतांत युधिष्ठिराच्या व्यक्तिचित्राच्या रूपानें दिग्दर्शित करण्यांत आलें असून अशा कार्पण्याच्या नियंत्रणामुळें प्रचंड सामर्थ्य व महनीय पौरुष हीं साधीं नीतिमूल्यें संरक्षण करावयाच्या बाबतींत देखील कशीं दुर्बल होऊन जातात हें भीम व अर्जुन यांच्या व्यक्तिचित्रांच्या रूपानें दाखविण्यांत आलें आहे. सभापर्वांतील द्रौपदी-वस्त्रहरणाचा प्रसंग हें याचें उत्कृष्ट निदर्शन होय. तेजस्विनी द्रौपदी व राजमाता कुंती यांचीं करुणामय व्यक्तिचित्रें हीं ह्या धर्मकार्पण्याचेंच बलिदान म्हणतां. येतील. तात्पर्य, महाभारतकाळीं राज्यसंस्था भ्रष्ट, सचिवसंस्था पापी, धर्म दुर्बल व तेजस्वी आणि तत्त्वज्ञानी पुरुष अकर्मण्य व निरुपयोगी झाले होते. बलवान् म्हणेल तो धर्म व सत्ताधारी म्हणेल ती नीति अशी परिस्थिति उत्पन्न होऊन धर्म व तत्त्वज्ञान यांनीं सामर्थ्याला नियंत्रित करण्याऐवजीं सामर्थ्यच त्यांना नियंत्रित करूं लागलें. अधर्माचें अभ्युत्थान तें हेंच होय. हें संकट बाह्य आक्रमणाचें नसून तें आभ्यंतर आक्रमणाचें होतें. बाह्य आक्रमण शस्त्रांनीं

परतवितां येतें व त्यासाठीं मनाची सिद्धता होणें सुलभ आहे. पण आभ्यंतर आक्रमण स्वकीयांचें असतें. तें नष्ट करावयास सर्व कोमल मानवी भावनांवर विजय मिळवून अंतःकरण वज्राप्रमाणें कठिण व समष्टिजीवनाच्या कल्याणाशीं पूर्णपणें एकरूप करावें लागतें. अपूर्ण मानवी जीवनाच्या मर्यादेंत ही गोष्ट बसूं शकत नसल्यामुळें पूर्णावताराशिवाय हें कार्य कोण करूं शकणार? भगवान् श्रीकृष्ण सर्व प्रकारच्या मानवी अपूर्णतेच्या इतके वर आहेत कीं, पूर्णता व श्रीकृष्ण हे शब्द जणूं काय एकमेकांचे पर्यायवाचक आहेत. आपल्या जीवनाचा हेतु सांगतांना महाभारतांत भगवंतांनीं अनेक ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "धर्माच्या संस्थापनासाठीं व संरक्षणासाठीं त्या त्या वेषांनीं व रूपांनीं मी त्रैलोक्यांत जेथें आवश्यक असेल तेथें जन्म घेऊन प्रत्येक युगायुगांत परिवर्तनाच्या क्षणीं धर्ममर्यादेची स्थापना करतों. प्राणिमात्रांच्या कल्याणावांचून माझ्या जन्माचा दुसरा कोणताही हेतु नाहीं. जे धर्माचा लोप करणारे असतील ते मला वध्य आहेत. धर्माच्या स्थापनेसाठीं मी ही प्रतिज्ञा केली आहे. ज्ञान, सत्य, विकारावर विजय मिळविणें, पावित्र्य, कर्तव्यनिष्ठा, अकार्याविषयीं घृणा, मनाचें वैभव व औदार्य, धैर्य व व क्षमा ज्या ठिकाणीं नांदते तेथेंच मी रमतों." ही प्रतिज्ञा मानवी हृदयांतील स्वपरभावांना पूर्णपणें पराभूत करणारी आहे. भगवान् श्रीकृष्णांना अधर्माचें अभ्युत्थान करणाऱ्या स्वकीयांनाच कंठस्नान घालावें लागलें आहे. आर्यधर्माचें कार्पण्य नष्ट करून धर्मनिष्ठ व्यक्तींच्या अंतःकरणांत धर्माची तेजस्वी ज्योत पाजळण्यासाठीं त्यांनीं श्रीमद्भगवद्गीतेचा उपदेश केला. श्रीकृष्णांच्या धर्मसंस्थापनेच्या कार्याचा इतिहास म्हणजेच महाभारताचा इतिहास होय. या धर्मस्थापनेसाठीं त्यांनीं वापरलेलें प्रधान साधनयंत्र म्हणजे पांडव होत. पांडव परिपूर्ण नाहींत हें त्यांना माहीत होतें; पण त्यांची संघटित नेतृत्वाची वस्तुस्थिति त्यांना मान्य झाली. पांडवांचा नेता युधिष्ठिर धर्माचें नियंत्रण स्वभावतःच मानणारा असून भीमार्जुनांच्या प्रचंड शक्ती त्याच्या नेतृत्वाखालीं असल्यामुळें त्या उन्मादी व उन्मार्गगामी नव्हत्या. परस्परविसदृश स्वभावाच्या

अतिप्रचंड सामर्थ्यांना संघटित स्वरूपांत सदैव आपल्या नेतृत्वाखालीं युधिष्ठिरांनीं राखलें आहे, यांतच नेता या दृष्टीनें त्यांची असलेली थोरवी व्यक्त होते. म्हणून श्रीकृष्णांनीं धर्मसंस्थापनेचें साधनयंत्र या नात्यानें त्यांचा उपयोग करून घेतला. एवढें विवेचन महाभारताच्या इतिहासाचें मुख्य सूत्र उलगडण्यासाठीं आवश्यक असल्यामुळें माझी संपूर्ण पहिली व्याख्यानमाला या विषयावरच झाली. ज्यांनीं पांडव व यादव या साधनयंत्रांना धर्मसंस्थापनेच्या कार्यासाठीं उपयोगांत आणलें त्या पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांचें व्यक्तित्व व कार्य यांचें समालोचन करावयास्तव दुसऱ्या स्वतंत्र व्याख्यानमालेची आवश्यकता होती. त्याविना एका विशेष दृष्टीनें केलेलें महाभारताचें हें विवेचन पूर्ण होणारें नव्हतें. म्हणून ही स्वतंत्र व्याख्यानमाला मी गुंफली. पूर्णावतार भगवान् श्रीकृष्ण यांच्या अत्यंत गूढ जीवनाचें (१) युगपुरुष, (२) विभूति, (३) पूर्णावतार व (४) तत्त्वज्ञ या चार भूमिकांतून या व्याख्यानमालेंत समालोचन करण्याचा मी प्रयत्न केला आहे. तो प्रयत्न करीत असतांच पद्धतशीरपणें भारताच्या इतिहासाला विकृत करण्याचा प्रयत्न करणाऱ्या कॉमरेड डांगे प्रभृति सुजाण व पाश्चात्य संशोधकांसारख्या अजाण अशा दोन्ही आक्षेपकांचा मला समाचार घेणें प्राप्त झालें. कोणत्याहि कोमल भावनांच्या आहारीं न जातां मी तो घेतला आहे. अशा ग्रंथांत विवेचनाच्या वेळीं कांहीं व्यक्तींचा अधिक्षेप झाल्याचेंही कोणाला वाटेल. पण तो अधिक्षेप मी हेतुतः केलेला नाहीं. या साऱ्या व्यक्तींविषयीं असावयास पाहिजे इतका आदर माझ्या मनांत आहे. पण माझा धर्म, माझी संस्कृति व तिनें प्रवर्तित केलेली मानवतेच्या शाश्वत कल्याणाचीं जीवनमूल्यें यांचा बुद्धिपुरस्सर अधिक्षेप करून त्यांचें आपमतलबासाठीं विडंबन करण्याचा जर कोणी प्रयत्न करीत असेल तर त्याची तमा बाळगण्याचें मलाही कांहीं कारण नाहीं. भारतीय राष्ट्राच्या वैभवशाली इतिहासाला उगाच कोणी विडंबित करूं लागलें तर यथाशक्ति तो हल्ला परतविणें हेंच भारतीय राष्ट्रांत जन्म पावल्याचें खरें सार्थक होय.

## इतिहास भावमूलक असतो

मानवतेचा इतिहास हा कलहात्मक अथवा संघर्षात्मक असला तरी तो संघर्ष निव्वळ उपजीवनाच्या प्रश्नांतून निर्माण झालेला व म्हणून अर्थमूलक नाहीं. कोणताही इतिहास अर्थमूलकच असूं शकतो, अन्यथा नाहीं, असें म्हणणें व तशी पोलादी चौकट आपल्या विवेचक शक्तीभोंवतीं निर्माण करून तिच्यांतूनच आकसानें प्रत्येक घटनेची संगति लावीत बसणें हें अशास्त्रीयतेचें, अपरिपक्वतेचें व हटवादाचें निदर्शक असून मानवी जीवितांतील महान् मूल्यांचा अवमान करणारें आहे. जीवन हें एका बाजूनें जसें जडाचें बनविलेलें आहे तसेंच त्या जडाचा उपभोग घेणाऱ्या अस्मितेमुळें तें सार्थ झालेलें आहे. जडवाद्यांना ही अस्मिता उडवून लावतां येत नाहीं. उलट तिला दुय्यम मानून अथवा गौण लेखून आजवर करण्यांत आलेला जीवनाचा विज्ञाननिष्ठ विचार केवळ अपुरा राहिल्याची जाणीव विसाव्या शतकांतील आजच्या शास्त्रज्ञांना झालेली असून या अस्मितेच्या स्वतंत्र विचारापासूनच यापुढच्या विचारास प्रारंभ करणें त्यांना आवश्यक वाटूं लागलें आहे. मानवी जीविताचें कोडें त्यामुळेंच यथार्थतेनें उलगडूं शकेल असें आतां त्यांनाही वाटूं व पटूं लागलेलें आहे. अस्मितेचें जग म्हणजेच भावांचें जग होय; व मानवी इतिहास हा कलहांतून उत्पन्न होत असला तरीही तो कलह भावमूलक असतो. विशिष्ट मूल्यासाठीं व श्रद्धांसाठीं उपजीवनाचा विचारसुद्धां न करतां मानव झगडत असतात. जीवनांत भावमूलकता उत्पन्न होणें हाच संस्कृतीचा उदय होय.

महाभारताचा इतिहास व एकंदरच भारतवर्षाचा इतिहास भावमूलक आहे हें ध्यानांत ठेवून तो उलगडण्याचा प्रयत्न केला तरच तो उलगडूं शकतो.

श्रीमन्महाभारत हा आर्यराष्ट्राचा अखंड स्फुरणशाली सांस्कृतिक ज्ञानकोश असून अखिल मानवतेला कल्याणाचें मार्गदर्शन

करण्याचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं आहे, महर्षि व्यासांनीं आपल्या या ग्रंथराजाचें वर्णन करतांना,

**इतिहासप्रदीपेन मोहावरणघातिना ।**
**लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत्संप्रकाशितम् ।।**

"या इतिहासाच्या दीपस्तंभानें मानवतेच्या अंतःकरणाचे सांदीकोपरे सदैव उजळले आहेत. मोहाचें आवरण नष्ट करण्याचें त्याचें शाश्वत सामर्थ्य आहे असें जें म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. अखिल मानवतेची आज ससेहोलपट चालू असून तिच्यांतून तिचा पुनरुद्धार करावयाची व तिची मंगलमय घडण बसवावयास ज्या तत्त्वज्ञानाची व ज्या मूल्यांची आवश्यकता आहे, तीं मूल्यें महाभारत कसें पुरवितें हें आपण तत्त्वज्ञ श्रीकृष्णांच्या भूमिकेचें समालोचन करतांना पाहिलें आहे. अखिल जगताचें कल्याण करण्याच्या एकमात्र इच्छेनें प्रवर्तित झालेल्या ध्येयवादाला संकुचित म्हणण्याचें धाडस करंट्यावांचून दुसरें कोण करूं शकेल ? भारतीय राष्ट्राचें मानवतेंत असणारें महान् कार्य महाभारतानें दिग्दर्शित केलें आहे. मानवतेंत देवजीवन उत्पन्न करणें हें तें महान् कार्य होय. मानवतेंतील हें आपलें महान् व इतिहासाच्या ओघानुसार वांट्यास आलेलें कार्य पूर्ण करण्यांत स्वतंत्र भारतीय राष्ट्राची इतिकर्तव्यता आहे. व त्यासाठीं त्या जीवनमूल्यांवर अधिष्ठित असलेलें संघटित, सामर्थ्यसंपन्न व एकात्म राष्ट्रजीवन भारतवर्षांत उत्पन्न होण्याची आवश्यकता आहे. भावी भारतसंतानांसाठीं पूर्णावताराचा हाच युगसंदेश आहे.

रामायण व महाभारत या आर्षींच्या सांस्कृतिक ग्रंथांवर मला आपले विचार व्यक्त करण्याची संधि देऊन पुण्यासारख्या महान् सांस्कृतिक विद्यापीठांतील आपण सहस्रावधि विचक्षणांनीं व श्रेष्ठ तपस्व्यांनीं "जैसा स्वभावो मायबापांचा। अपत्य बोले जरी बोबडी वाचा। तरी अधिक तयाचा। संतोषु आथी ।।" या वृत्तीनें तें गोड करून घेतलें याविषयीं मी अत्यंत कृतज्ञ आहें. कदाचित् हे हवेंत विरून जाणारे विचार ग्रंथरूपानें सदैव लोकांसमोर राह-

ण्याची सोय माझे मित्र व दैनिक 'काळचे' संपादक श्री. शं. रा. दाते यांनीं करून दिली त्याविषयीं मी त्यांचा किती कृतज्ञ आहें हें मी शब्दांनीं व्यक्त करूं शकत नाहीं. श्रीरामायण, महाभारत व भगवान् श्रीकृष्ण या माझ्या तिन्ही व्याख्यानमालांना भरपूर प्रसिद्धि देऊन व गौरवून माझे विचार महाराष्ट्रांतील कोनाकोपऱ्यांपर्यंत पोहोंचविण्यांत 'केसरी'नें मला अमूल्य साह्य केलें याबद्दल मी अत्यंत कृतज्ञ आहे. 'केसरी' हें महाराष्ट्राचें गुरुपीठ आहे. या गुरुपीठाला वंदन करणें हें माझें कर्तव्यच आहे. मित्रवर्य श्री. जयंतराव टिळक यांना मी ' मदंगे जीर्णतां यातु यत्त्वयोपकृतं सखे ' इतकेंच मित्रभावानें म्हणतों. सतत तीनही वर्षे उपस्थित राहून वडिलकीचें कृपाछत्र ज्यांनीं माझ्यावर सदैव उभारलें त्या प. पू. तात्यासाहेब करंदीकरांविषयींच्या माझ्या भावनांना शब्दरूप द्यावयासही मी असमर्थ आहें. धर्मवीर अण्णासाहेब भोपटकर, डॉ. जयकर, ह. भ. प. सोनोपंत दांडेकर प्रभृतींनीं रसग्रहण करून माझ्या कार्यांत मला प्रोत्साहन दिलें त्या सर्वांना मी धन्यवाद देतों. व शेवटीं ज्या पूर्णावताराच्या कृपालेशानें मी त्याच्या चरित्राचें तोटकें कां होईना पण समालोचन करूं शकलों त्याला श्रीज्ञानराजांच्या तेजस्वी शब्दांत पुढील पसायदान मागतों.

**आतां विश्वात्मके देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।**
**तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ।।**
**दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।**
**जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।।**
**चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।**
**ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे हो तूं ।।**
**किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं**
**भजि जो आदि पुरखी । अखंडित ।।**